# अश्वपरीक्षा.

ह्मणजे,

अश्वजाती, त्यांच्या भोंवऱ्यावरून चांगल्या वाइट खाणा
पाहणें. त्यांजला होणारे रोग कसे ओळखावे, त्यांवर
औषध काय द्यावें, आणि त्याला कसें
वागवावें शिकवावें इत्यादि.

हें पुस्तक,

**रा. ब. रामचंद्र सखाराम गुप्ते,**

पनशनर मामलदार व हुजुरडेप्युटी कलेक्टर, आणि कृषिकर्म
विद्येचे व सूपशास्त्राचे कर्ते,

यांणी तयार करून

पुणें, पेठ बुधवार येथें,

भाऊ गोविंद सापकर यांचे 'ज्ञानचक्षु' छापखान्यांत छापिलें.

आवृत्ति पहिली.

तारीख १० माहे फेब्रुवारी सन १८८५ इसवी.





किंमत २ रुपये

# प्रस्तावना.

---

अश्वपरीक्षेचे ग्रंथ साद्यंत मराठींत कोठें आढळत नाहींत. मुख्य प्राचीन नकुलकृत व नलकृत असे दोन शालिहोत्राचे ग्रंथ आहेत ह्मणून पुष्कळ लोकांस ठाऊक आहेत. हे पुरे ग्रंथ दुर्मिळ आहेत. ज्या ज्या ग्रंथांचे किती एक त्रुटित दाखले अश्वपरीक्षेविषयीं सांपडतात तेही ग्रंथ कल्याणकृतसार, शालिहोत्र, वीरमित्रोदय, विष्णुधर्मोत्तर, जयकृतअश्वचिकित्सा, शारंगधर, भूपवल्लभ इत्यादि मिळत नाहींत. अग्निपुराणांत अश्वपरीक्षेचे कांहीं गुणावगुण सांगितले आहेत, परंतु पद्धतशीर कोठें ग्रंथ झालेला नाहीं. श्रीमंत प्रतापसिंह सातारछत्रपति राजाचे कारकीर्दींत प्रतापसिंहग्रंथ झाला आहे—तो ग्रंथ आह्मास फार प्रयत्नांनीं मिळाला. तो पद्धतवार ग्रंथ झाला आहे त्या संस्कृतग्रंथावरून आह्मास हा ग्रंथ करण्यास फार उपयोग झाला. नळकृत व नकुळकृत हे दोन्ही ग्रंथ मिळाले. फारशी भाषेंत अनुभवशीर असलेला ग्रंथ, श्री. रा. रा. बाळासाहेब, खारकर जामनगर राजाचे दिवाण, यांणीं आह्मास दिला. त्यावरून घोड्यांचे रोगांविषयीं चिकित्सा व औषध यांचा उपयोग केला. हा फारशी ग्रंथ जुन्या संस्कृत ग्रंथांस अनुसरून आहे. यांत अनुभवास आलेलीं औषधें फार आहेत. हल्लीं अश्वपरीक्षेविषयीं इंग्लिशलोकांपेक्षां जास्ती माहिती कोणास नसावी असें वाटतें. तेही इंग्रजी ग्रंथ पाहिले तरी आमचे जुने ग्रंथास मिळत आहेत. इंग्रजी, मराठी, फारशी, व संस्कृत हे ग्रंथ आह्मास मिळाले त्यावरून हा ग्रंथ आह्मीं आजसुमारें चार वर्षे करीत आलों; तो आमच्या मतें बराच लोकोपयोगी झाला आहे. हा ग्रंथ जवळ बाळगिला असतां घोडे कसे बाळगावे व त्याच्या

घोडी व रोग, त्यावर औषध काय, व घोड्यांस कसें वागवावें, शिकवावें व, तयार करावें, हें सर्व ज्ञान होणारें आहे. आणि किमतवान् घोड्याचा बचाव रोगापासून वगैरे करतां येईल. श्रीमान् लोक घोडीं बाळगितात त्या लोकांस फारकरून थोडीबहुत माहिती असते. त्यांचे उपयोगास हा ग्रंथ अवश्य असला पाहिजे. घोडा खरेदी घेणें ह्मणजे पूर्वीचे लोक गुण अवगुणाचे खोडीकडे फार लक्ष्य देत असत. त्याविषयीं हल्लीं आम्निक्य कमी झालें आहे; तरी अद्याप ती चाल मोडली नाहीं. सबब घोडी पहाण्यास दुसऱ्याचे आर्जव करणें नको. तसेंच घोडा आजारी आला तर लागलीच विटिनरी सर्जन ( घोड्याचे डाक्तर ) यांजकडे पाठविण्याची जरूर पडणार नाहीं.

संस्कृत ग्रंथाचें भाषांतर वेदशास्त्रसं० रा० वामनशास्त्री केमकर, पुणें नेटिव इन्स्टिट्यूशन विद्यालयांतील संस्कृताध्यापक व ' आर्यमित्र, नामक मासिक पुस्तकाचे कर्ते, यांणीं केलें आहे. फारशी ग्रंथाचें भाषांतर पुणें येथील विद्वान् व वृद्ध काजी सय्यद अली साहेब काजी यांणीं केलें आहे. फारशींत जीं औषधांचीं नांवें मराठींत लागलीं नाहींत तीं तशींच आह्मीं क्वचित् ठिकाणीं ठेविलीं आहेत; तरी त्यामुळें त्या औषधांचा कमीपणा होणार नाहीं. एक रोगावर एकच औषध लिहिलें असें नाहीं. दहा वीस औषधें लिहिलीं आहेत.

या ग्रंथांत इंग्रजी ग्रंथांवरून इंग्रजी औषधाचा बराच उपयोग लिहिला आहे. त्याचा उपयोग पुणें, मुंबई, वगैरे ज्या शहरांत इंग्रजी दव्याचीं दुकानें आहेत तेथें आयास न पडतां करून घेतां येईल.

या ग्रथांत इंग्रजीवरून घोड्यांचें शारीरज्ञानही आह्मीं साद्यंत लिहिणार होतें, ह्मणजे तेणेंकरून कोणताही रोग झाला असतां तो शरीरांत कोठें होतो हें समजण्यांत आलें असतें. परंतु हें सांगणें फार कठीण आहे. आह्मीं त्याचें मराठींत भाषांतर केलें आहे पण हल्लीं हा ग्रंथ फार वाढल्यामुळें त्यांत ते दाखल केलें नाहीं. पुढें दुसरी

# प्रस्तावना.

आवृत्ति काढण्याचा सुप्रसंग येईल तर त्यांत तें सामील करूं. अशी इच्छा ठेविली आहे.

ग्रंथ साद्यंत मन लावून वाचावा अशी ग्रंथ करणाराची विनयपूर्वक विनंति आहे, ह्मणजे वाचणारास माहिती होईल व ग्रंथ करण्याची मेहनत किती झाली हें कळेल.

इतका मोठा अश्वपरीक्षेचा मराठींत ग्रंथ आजपर्यंत कोणीं केला नाहीं. हा प्रथमच झाला आहे. यांत चूक व अशुद्ध कोठें पडलें नसेल असें ह्मणवत नाहीं, तरी याविषयीं परीक्षकांनीं माफी करावी.

हें पुस्तक आह्मीं जाहिरात दिल्याप्रमाणें मुदतींत शेवटास गेलें नाहीं; याचें कारण, आह्मास इतर कामांमुळें पाहिजे तसा अवसर मिळाला नाहीं व तसेंच ग्रंथ विस्तारही फार झाला त्यामुळें आपला निरुपाय झाला.

हें पुस्तक इतकें मोठ होईल असें आह्मास वाटत नव्हतें व अनुमानापेक्षां दुप्पट लिहिणें होऊन वेळही जास्ती लागला व त्या मानानें खर्चही वाढला; सबब शारीरज्ञानाचा भाग मागें ठेवावा लागला.

हा ग्रंथ श्रीमंत रा. बाळासाहेब खारकर, जामनगरचे माजी दिवाण, यांणीं पाहून पसंत केला आहे, व अश्वविद्येंत यास चांगली माहिती आहे. ह्याच प्रमाणें आणखी कित्ता एक अश्ववेत्यांनींही कबूल केलें आहे.

प्रसिद्ध श्रीमंत बाबासाहेब आपटे या ग्वाल्हेर संस्थानांतील अश्ववेत्यांजवळ शिकलेले नामांकित प्रोफेसर रा. रा. विष्णु मोरेश्वर छत्रे, "धि ग्रचांड इंडियन सर्कस" चे मालक यांणींही हा आमचा उद्योग पसंत केला आहे.

रामचंद्र माखाराप गुप्त.

# अनुक्रमणिका.

## अनुक्रमणिका.

## अनुक्रमणिका.

# भाग २ दुसरा.

# अनुक्रमणिका.

## अनुक्रमणिका.

## अनुक्रमणिका.

## अनुक्रमणिका.



## मेंदूसंबंधी रोग.



## नेत्ररोग.

## अनुक्रमणिका.

## छातींतील रोग.

## अनुक्रमणिका.

विषय. पृष्ठ.

### शूळाविषयीं.

## अनुक्रमणिका.

पोटदुखी.

विषय. पृष्ठ.



पृष्ठीरोग.



कुक्षिरोग.



केंस आणणें.

विषय. पृष्ठें.



## मुत्रारोग.



## ज्वर.



## जखम.

## शारीररोग.

# भाग पहिला.

## अश्व वर्णन.

घोड्यास अश्व नांव पडण्याचें कारण असें आहे कीं, अश्वपात नांवाच्या ऋषीनें यज्ञ केला. त्या यज्ञाचा धूर त्या ऋषीचे डोळ्यांत जाऊन डोळ्यांतून पाणी आलें. तें पाणी जमिनीवर पडतांच त्यापासून अश्व उत्पन्न झाले. उजवे डोळ्यांतील पाण्यापासून जे उत्पन्न झाले ते नर जातीचे अश्व, आणि डावे डोळ्यांतील पाण्यापासून उत्पन्न झाली ती स्त्री जात. ह्याप्रमाणें अश्रूपासून उत्पन्न झाले ह्मणून त्यास अश्व ह्मणतात.

ह्या घोड्यांस पूर्वीं पंख होते तेव्हां ते आकाशांत यथेच्छ गंधर्वापेक्षां त्वरेनें गमन करीत असत. ते मोठे बलाढ्य आणि वेगवान् असे असल्यामुळें हे आपणास वहानास योग्य आहेत असें समजून इंद्र त्याजवळ असलेल्या शालिहोत्र नामक ऋषीस ह्मणाला कीं, हे ऋषिवर्या, आपणास कोणतीही गोष्ट करण्यास असाध्य नाहीं याकरितां हे अश्व ज्या योगानें वाहनास योग्य होतील असें करावें, ह्मणजे मी युद्ध करते वेळेस माझा रथ रणांत हे वाहतील आणि दैत्य समुहांत हे उत्तम वाहन होतील. हें इंद्राचें वाक्य ऐकून शालिहोत्र ऋषीनें दर्भास्त्र सोडून अश्वांचे पंख छेदून टाकिले. पंख छेदल्यानंतर ते अश्व रक्तानें भरलेले आणि दीन असे त्या ऋषीकडे येऊन त्यास ह्मणाले, आमचा कांहीं अपराध नसतां आमचे पंख आपण कां छेदिले, आपण जाणते आहांत आणि ज्ञाते (जाणते) कोणतेही जिवास उपद्रव करीत नाहींत. असो, आतां आपण आमचे पंख छेदिले तर आह्मा पक्षहीनांस जेणेंकरून सुख होईल असें करावें. तेव्हां शालिहोत्र

ऋषीस दया येऊन त्या दुःखित अश्वांस ह्मणाले, मी हें कृत्य इंद्राच्या आज्ञेनें केलें. आतां तुमच्या देहास सुख होईल आणि त्रैलोक्यांत जेणेंकरून तुमचा गौरव राहील असें मी करतों. तुह्मी आजपासून इंद्रादिदेवांचें आणि पृथ्वीवरील राजांचें वाहन व्हाल आणि त्या योगानें तुमची कीर्ति होईल. जो राजा तुह्मांस चांगल्या रीतीनें पाळून आपल्या जवळ ठेवील त्याच्या अंगीं दुसरे कोणतेही गुण नसले, आणि त्याला शत्रु पुष्कळ असले तरी त्याचा पराभव कोणाच्यानें होणार नाहीं. तसेंच तुमच्या संतोषाकरितां, रोगनाश होण्याकरितां मनुष्य चिकित्सेप्रमाणें मी अश्वचिकित्सा करितों. तर तुह्मी कांहीं भूलोकास आणि कांहीं पाताळास जा ह्मणजे तुह्मास स्वस्थता होईल. याप्रमाणें शालिहोत्र ऋषींनें घोड्यांस आज्ञा देऊन आपण अश्वचिकित्सा नामक बारा हजार संहितात्मक ग्रंथ केला. तेव्हांपासून अश्व हे या लोकांत वाहन झाले. नंतर शालिहोत्रकृत अश्वचिकित्सा शास्त्र जगांत प्रसिद्ध झालें. याप्रमाणें अश्व वाहन होण्याचें कारण आहे, ही कथा नकुलकृत शालिहोत्रांत आहे.

याचप्रमाणें भूपवल्लभ ग्रंथांत अश्वोत्पत्तीविषयीं असें लिहिलें आहे कीं, श्वेतवर्ण अश्व ब्रह्मदेवाच्या अश्रूपासून उत्पन्न झाले आहेत. ते श्रेष्ठ अश्व होत. त्यांस ब्राह्मणाश्व ह्मणतात. क्षत्रियाश्व हे सूर्याच्या नासिकेंतून उत्पन्न झाले. ते रक्तवर्ण असून युद्धाचे कामांत मोठे उपयोगाचे असतात. सूर्याच्या वीर्यापासून क्षत्रियाश्व श्रेष्ट असा रैवत नामक उत्पन्न झाला. तसेंच वडवा (घोडी) इचे ठिकाणीं सूर्यापासून अश्विनीदेव क्षत्रिय उत्पन्न झाले त्यापासून चित्रविचित्र बळवान असे अश्व उत्पन्न झाले. वैश्यअश्व अग्नीच्या ज्वाळापासून उत्पन्न झाले. ते श्याम मिश्रित तांबड्या रंगाचे असतात. काळे अश्व ते शूद्र अश्व. ते गंधर्वापासून उत्पन्न झाले. ते युद्धांत बलवान त्याचे मात्र रक्षक होत. कृष्णमिश्रित निळ्या रंगाचे घोडे

गालव ऋषीच्या श्वासापासून उत्पन्न झाले. ते ब्राह्मण जातीचे अ-सतात. त्यांना वेग फार असतो. शुभ्रमिश्रित निळ्या रंगाचे अश्व चंद्रापासून उत्पन्न झाले. हिरवे निळे घोडे विष्णूपासून उत्पन्न झाले. रक्तवर्ण अश्व सूर्यापासून उत्पन्न झाले.

### अथाश्व प्रशंसा विरमित्रोदये.

ज्या राजाचे राष्ट्रांत सर्व लक्षण संपन्न अश्व आहेत त्याच्या राष्ट्रांत लक्ष्मी, धर्म, काम, आणि अर्थ संपत्ति ह्या स्थिर रहातात. ह्यावरून सुलक्षणयुक्त अश्वावरच आरोहण करावे असें सांगितलें आहे.

### अथ विष्णुधर्मोत्तरे.

राजांना जय प्राप्त होणें हें अश्वांचे स्वाधीन आहे याकरितां राजानें सर्व प्रयत्नें करून अश्व संपादन करावे आणि पालनाविषयीं विशेष प्रयत्न करीत असावे.

राजानें जितक्याचें पोषण आपल्यास सुखानें करितां येईल तितकेच अश्व बाळगावेत. क्षुधित होऊन दुःख पावणारे व ज्याचें पोषण करण्यास आपल्यास दुःख होईल इतके अश्व ठेवूं नयेत.

## अश्व जाति परीक्षा.

अश्वाचें स्वरूप यथार्थ जाणणारा व त्याविषयीं तत्पर, व जितेंद्रिय असा महाप्राज्ञ जो शालिहोत्र मुनि, त्यास कोणी एक जिज्ञासु मित्राप्रमाणें प्रश्न करीत आहे. हे महाराज शालिहोत्र, घोड्याचे चारी वर्ण कोणकोणच्या चिन्हांवरून समजावे? हें मला आपण सांगण्यास योग्य आहां. असें विचारल्यावर महाचार्य जो शालिहोत्र मुनि तो ह्मणाला, अश्वाचे चारी वर्णांचें ज्ञान होणें कठीण आहे. परंतु लक्षणांवरून मी तुला सांगतों हें श्रवण कर. अश्वांतील चार वर्णांचे विभागावरूनच जे अनुलोमज ( उत्तम वर्णापासून नीच वर्णाचे ठिका-

र्णी,जन्मलेले ) आणि प्रतिलोमज ( नीच वर्णा पासून उत्तम वर्णाचे ठायीं जन्मलेले) हेंही मी विशेषें करून सांगतों, तें श्रवण करून लक्षांत ठेव. जाति चार प्रकारच्या; ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शुद्र अशा चार जाती आहेत.

## ब्राम्हणाश्व परीक्षा.

ब्राह्मण अश्वांची परीक्षा रूपवान्, तेजस्वी, नम्रता धारण करणारे, ज्यांना पुष्कळ उपचार करावे लागतात, आणि ज्यांची बुद्धी चांगली असून जे मागली स्मृति बाळगतात ते अश्व ब्राह्मण जातीचे जाणावे. गुरू व राजा यांची आज्ञा मान्य करण्याविषयीं यत्न करणारे, प्रदक्षिणा ह्मणजे मंडळावर फिरण्याविषयीं जे शक्तिमान व अतिशय शब्द न करणारे, आणि शुचि ह्मणजे शुद्ध पदार्थ सेवन करणारे ते ब्राह्मण अश्व होत. क्षुधा सहन करणारे, भार सोसण्यास समर्थ, सुंदर शरीराचे, प्रसन्न मनानें असणारे, गंध, पुष्पें, ज्यांस प्रिय असून जे उत्तम वेश धारण करून संतोषी असतात, ज्यांचा सत्कार केला असतां आनंदी होऊन अनुकूलत्वानें गमन करतात, जे देखणे असून नेहमीं हर्षित असतात, स्वछंदानें चालणारे, तेजस्वी, सर्व कर्मांस अनुसरणारे, जे पाणी, चंदी आणि वस्त्र (जीन ) हीं दुसऱ्याचीं उच्छिष्ट असल्यास टाकितात, तसेंच अशुद्ध ( मूत्र, विष्टा वगैरे ) पदार्थांचा जे तिरस्कार करतात, मधु ( द्राक्षासव ), लाह्या, तूप, अपूप (अनारसे किंवा घारगे) आणि पायस इत्यादि पदार्थांची इच्छा करणारे अश्व ब्राह्मण जातीचे होत. गंध व फुलें यांनीं संतुष्ट होणारे, तसेंच स्नान, नीरांजनादि मंगल, हीं ज्यांस प्रिय, जे न्हेषणा ( अश्व जातीचा शब्द ) करीत असतां हुंगतात, जे दिसण्यांत सुंदर असून ज्यांची निद्रा सुख साध्य आहे ह्मणजे जमिनीवर न पडतां जे निद्रा घेतात,

क्षुधा व तृषा यांविषयीं जे महाशूर, (सोसणारे) ज्यांची गर्जना मोठी असून उग्र आहे, ज्यांच्या त्वचेचा रंग पिवळा, पांडुर, तांबडा, गोरा व मधासारखा पिंगट आहे, पुष्कळ चालण्याविषयीं ज्यांना हौस असते, ज्यांचा शब्द श्राव्य आहे, जे स्थिर, ओलसर भासणाऱ्या तेजस्वी रंगाचे व शरीरास रक्षण करणारे.ते सर्व अश्व श्रेष्ट असे ब्राह्मण जातीचे होत. निजले असतां जे लौकर जागे होतात व सोडले कीं झोंपीं जातात, ज्यांचा गंध, लाह्या, ऊंस आणि वाळा यांप्रमाणें आहे, देव व गंधर्व यांप्रमाणें ज्यांचें सत्व (धैर्य) आहे आणि त्याप्रमाणेंच ज्यांचा आचार आहे, ते ब्राह्मण होत. या प्रकारच्या लक्षणांवरून व आचारावरून ब्राह्मण जातीचे अश्वांची परीक्षा करावी.

### तथाच कल्याण कृत्सार समुच्चये.

ज्याचा स्वभाव चांगला आहे, व जो भार सोसणारा सुगंधि असून शुद्ध एक्या रंगाचा, सुंदर दिसणारा, गंभीर शब्दानें हिंसणारा, स्वच्छ, धैर्यवान आणि ग्रास ह्मणजे चंदीविषयीं मोठा उत्सुक असा अश्व ब्राह्मण जातीचा होय.

## अथ क्षत्रियाश्व परीक्षा.

### शालिहोत्रे.

दु:खाविषयीं ज्यांचा स्वभाव आहे ह्मणजे अडचणींत जाण्यास जे निर्भय, रागीट, अति तेजस्वी, तिखट स्वभावाचे, शूर, आणि ज्यांचा शब्द अतिशय गंभीर आहे, ते अश्व क्षत्रिय जातीचे होत. ज्यांचें प्रमाण (उंची) अधिक आहे, ज्यांचें धैर्य मोठें, जे बळकट असून चपळ, ज्यांच्या शरीरांत दृढता आहे, ज्यांचे अवयव विविक्त (वेगळे किंवा स्पष्ट) असून त्वचा सूक्ष्म आहे, पर्जन्यकाळांत पाण्याच्या शब्दानें भीत नाहींत, मारिलें असतां, किंवा गर्दीमध्यें कठीण

पदार्थांचा स्पर्श झाला असतां व झाडांच्या अडचणींत जे निर्भय असतात, कोणी आडविलें असतां, व उंच सखल जमिनींत चालतांना जे खिन्न, श्रमी होत नाहींत, ज्यांचा वेग उत्तम आहे, व ज्यांचें दर्शन प्रिय आहे, रथांच्या घडघडाटांत व शंखताल यांचा शब्द होत असतां, हत्तींच्या गर्जनांत, घंटानाद होत असतां, छत्र, ध्वज, पताका यांच्या योगानें मोठ्या सैन्यांत गर्विष्ठ होतात, जे पुच्छ अतिशय हलवितात, हर्षयुक्त होऊन प्रफुल्ल ज्यांचे नेत्र आहेत, सोडल्याबरोबर पृथ्वीवर धांवतात, व खुरांनीं जमीन विदारण करीत जे हिंसनात, ज्यांना घाम फार येतो, मूत्र व लीद फार सोडीत असतात, पुढें घोडे पाहिले असतां त्यांना भय दाखवतात, व आपण हर्षानें क्रीडा करतात, चतुरंग सैन्यांत जे आनंदानें प्रवेश करितात, त्यावेळीं अनेक गर्जना करितात, व रणांत रममाण होतात, दुसऱ्या घोड्यांच्या पाठीमागें चालण्यास जे इच्छित नाहीत, शस्त्र पाहून ज्यांस आनंद होतो, प्रहारे करून जे व्यथा पावत नाहींत, संग्रामांत जे पराक्रम करतात, ज्यांच्या अंगांत चपळपणा आहे, माणि, रत्नें, मल्लिका यांप्रमाणें ज्यांची कांति स्वच्छ आहे, ज्यांचे नेत्र पिंगट वर्ण आहेत, जे विवर्ण ह्मणजे निस्तेज किंवा अनेक रंगाचे नसतात, सर्व कर्मांत जे समर्थ, ज्यांचा शब्द उत्तम असून जे प्रमादि ( बेसावध ) कधीं नसतात, देव, गंधर्व यांप्रमाणें ज्यांचें धैर्य असतें, जे उत्तम कुळांत जन्मले असून हिमणं चांगलें आहे, या प्रकारें ज्यांचें आचरण असतें ते अश्व क्षत्रिय जातीचे जाणावे.

### तथाच सार समुच्चये.

शूर, तिखट स्वभावाचा, अभिमानी, रागीट, वाऱ्यासारखा वेगवान, उत्तम गर्जना करणारा, दीर्घकाळ ज्याचें आयुष्य आहे, चालण्यांत ज्याची फार जलदी असते, आणि जो अति धैर्यवान असतो तो अश्व क्षत्रिय जातीचा होय. इति क्षत्रियाश्व परीक्षा.

# अथ वैश्याश्वपरीक्षा.

बुद्धि उत्तम असून शिक्षादिक्रियेविषयीं जे मंद अल्प जातीचे, जे कधीं रागावत नाहींत व हर्षही पावत नाहींत, जे स्थिर मनाचे आणि जितेंद्रिय (अन्य अश्विनीशीं गमन न करणारे) ज्यांनीं क्रोध जिंकिला आहे, असे व निराभिमानी, मृदु व सम स्वभावाचे. प्रहरादिकामुळें वेदना होत असल्यास क्षुधार्त होणारे, भार घेऊन स्थिर चाळणारे, मध्यम वेग धारण करणारे, बळ व धैर्य हीं ज्यांचे मध्यमच असे आणि हिरवे किंवा पिवळ्या नेत्राचे, ज्यांचे नेत्र क्रोधयुक्त व काळे असतात, ज्यांचे अधरोष्ट ( खालचे ओठ ) केशयुक्त व तांबडे असतात, जे कोठें व्यंग नसलें तरी मोठे वीर्यवान नसतात, ज्यांचा वास मत्स्याप्रमाणें किंवा उंटिणीच्या दुधाप्रमाणें असतो, जे खुषींत असले ह्मणजे लागलीच झोंपी जातात आणि क्षमाशील असून मनुष्य जातीप्रमाणें धैर्यवान असतात, अशा प्रकारें ज्यांचा आचार असतो, ते अश्व वैश्य जातीचे होत.

### तथाच सार समुच्चये.

ज्याला मद्य प्रिय आहे असा व जो निराभिमानी, दूरदृष्टि आणि लहान शरीराचा अश्व वैश्य जातीचा होय. इतिवैश्याश्व परीक्षा.

---

# अथ शुद्राश्व परीक्षा.

ज्यांस अन्न व पाणी एकमेकांचें उच्छिष्ट आवडतें, व एका पात्रांत जे उभयतां हर्षानें खाणें व पिणें करतात, ज्यांचे नेत्र आरक्त आहेत, जे पायांनीं जमीन उखळतात, लीद व मूत्र यांस जे हुंगतात आणि निंद्य पदार्थ भक्षण करतात, मत्सरानें वागतात, आपळें पाळन करणारास मारतात, आणि खुरानें, शेंपटीनें व दातांनीं, आपल्या अंगास खाजवन घेतात, दर्भ व काशा ( एक प्रकारचें तृण ) यांचे यो-

गानें संतोष पावणारे, भित्रे व शिक्षेचा खेद मानणारे, ज्यांचा आचार चांगला शुद्ध नसतो ह्मणून शुचिपणा ज्यांस आवडत नाहीं, चवाठ्याचे ठिकाणीं व द्वाराचे ठायीं जे मळ त्याग करतात, धूर व अभ्र यांप्रमाणें ज्यांचा मळकट रंग आहे, ज्यांचीं मुखें मोटीं असून पांढरीं असतात, रुक्ष, भिन्न स्वराचे, आकळण्यास कठीण आणि पिशाच राक्षस याप्रमाणें नेहमीं झोंपेंत गैर सावध असतात, अशा प्रकारचा ज्यांचा आचार ते शूद्र जातीचे अश्व होत. इति शु०

तथा सार समुच्चये.

क्रोधी व फार अभिमानी असून अति वेगवान असा अश्व शूद्र जातीचा होय. इतिशुद्राश्व परीक्षा.

---

## विलोमजादिकांची परीक्षा सांगतों.

ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र अश्व यांपासून क्रमानें ब्राह्मणादि जातीच्या अश्विनीचेठायीं उत्पन्न झालेले अश्व ब्राह्मणादि नामक होत ह्मणजे ब्राह्मणाश्वापासून ब्राह्मण जातीचे अश्विनीचे ठिकाणीं झालेला ब्राह्मण, क्षत्रियाश्वापासून क्षत्रियाश्विनीचे ठिकाणीं झालेला क्षत्रिय, याप्रमाणें जाणावें.

---

## अथ अनुलोमजादिकांविषयीं तच्चोक्तं शालिहोत्रे.

शालिहोत्र मुनी म्हणतात अनुलोमज जातीचें ज्ञान व आचार मजपासून ऐक. ब्राह्मणाश्वापासून क्षत्रियाश्विनीचे ठायीं झालेला अश्व क्षत्रिय होय. क्षत्रियाश्वापासून वैश्य जातीच्या अश्विनीच्या ठिकाणीं झालेला वैश्य होय. येथें सर्व मातुश्रीच्या जातीचे होतात असें सांगितलें असून वैश्यापासून शूद्रिणीचे ठिकाणीं झालेला वैश्य

वास्तविक शूद्र होतो असें पाहिजे. तथापि शूद्रापेक्षां अधिकत्व दाखवण्याकरितां तसें सांगितलें आहे. हे अश्व ज्या रंगाचे असतील त्या वर्णाप्रमाणें त्यांचा आचार असेल तर ते त्या वर्णाचे समजावे. जर आचारापासून भ्रष्ट असतील तर ते शूद्र जाणावे. ब्राह्मणाश्वापासून वैश्य अश्विनीचेठायीं झालेला वैश्य होय. क्षत्रियाश्वापासून शूद्रिणीचेठायीं झालेला क्षत्रियतुल्य होय. अथवा ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य या अश्वांपासून शूद्र अश्विनीचे ठिकाणीं झालेला अश्व, निषाद ( शूद्रापेक्षां नीच ) होतो.

## अथ भूपालवल्लभे विशेषः

ब्राह्मणाश्वापासून शूद्र अश्विनीचेठायीं झालेला अश्व संग्रामांत हर्ष देतो, किंवा शत्रूचे बाण लागतांच स्वामीला टाकून रणांत शयन करतो, याप्रमाणें दोघांचे गुण त्यांत असतात. पांचपासून दहा अंगुलें पर्यंत ज्यांचे पाय पांढरे रंगाचे असतात, त्यांस हलायक असें ह्मणतात. ब्राह्मणाश्वापासून क्षत्रियाश्विनीचे ठिकाणीं जन्मलेला अश्व संग्रामांत धन्यास कधीं सोडीत नाहीं. क्षत्रियापासून वैश्य अश्विनीचे ठिकाणीं झालेले, शेंवाळें, पोपट, याप्रमाणें ज्यांचा रंग आहे किंवा निळ्या रंगाचे, अथवा जवसाच्या फुलाच्या रंगाचे आणि पांढरे, हे अश्व रणांत जयप्रद होत. शूद्र अश्विनीचेठायीं क्षत्रियापासून झालेले मेघासारख्या रंगाचे, किंवा कोरांटीच्या फुलासारख्या रंगाचे, ज्यांच्या अंगावर तुषाराप्रमाणें चिन्हें आहेत, ज्यांना क्षमा नाहीं व धूळ हें ज्यांचें भूषणच होय, ते अश्व दुष्ट होत. इति अनुलोम जाति.

## आतां प्रतिलोम जाति सांगतों शालिहोत्र.

ब्राह्मण जातीच्या अश्विनिचे ठिकाणीं क्षत्रियाश्वापासून झालेला अश्व सूत जातीचा होय. हे अश्व कोरांटीच्या पुष्पाप्रमाणें गौर किंवा दांताप्रमाणें स्वच्छ असतात, अथवा तांबड्या रंगाचे असून बहुधा प्रसन्न ज्यांचे नेत्र असतात, ज्यांचा ध्वनी मोठा असतो, मद्य किंवा

पुष्प श्याप्रमाणें ज्यांस गंध आहे, निर्हार झोपेंत सावध होणारे व शांत असे अश्व ते बधीर जाणावे. ब्राह्मण जातीचे अश्विनीचे ठिकाणीं वैश्य अश्वापासून झालेला मागध होय. या जातींतले अश्व भार सोसणारे, पण बळहीन, शब्दतावर्जित, (न हिंसणारे,) चंचळ स्वभावाचे, व कोणाच्या रक्षणांत न राहणारे, बुद्धिमान असून अशिक्षित, आणि वेगवान असून आनंद रहित असतात. ब्राह्मण अश्विनीचे ठिकाणीं शूद्राश्वापासून उत्पन्न झालेला अश्व चांडाल होय. या जातीचे अश्व शिक्षादि कर्मांस जाणत नाहींत. नेहमीं बेसावध असतात. त्यांचा शब्द फार तीक्ष्ण असतो, नखें रुक्ष व फुटीर असतात, त्यांचा स्वभाव क्रूर असतो. आणि जे अशक्त असतांही दुसऱ्यास आकळत नाहींत; कांहीं खुणा भोंवरे इत्यादि लक्षणें ज्यांचीं दग्ध व अप्रशस्त आहेत, निंद्य असें शरीर बिंदु व तिलक यांनीं शोभायमान, जे मल मूत्र खातात, अशुद्ध व शून्य अशा गृहाचे ठिकाणीं रममाण होतात, कोल्हे व लांडगे याप्रमाणें ज्यांचा रंग आहे, किंवा धुराप्रमाणें रंगाचे किंवा अनेक रंगांचे, ज्यांचा शब्द क्रूर आहे, गंध पूर्वाप्रमाणें, ज्यांना मांस मज्जा हें फार आवडतें, ते अश्व पिशाच, राक्षस यापासून झालेले चांडाळ होत, असें जाणावें. या खुणांवरून व लक्षणांवरून चारी वर्णांचा निर्णय करावा.

### तथाच भूपालवल्लभे, विशेषः

ब्राह्मण जातीच्या अश्विनीचे ठिकाणीं वैश्य जातीय अश्वापासून उत्पन्न झालेला लंबायमान आकृतीचा श्यामकर्ण ( ज्याचे कान काळे असा ) गर्दभाप्रमाणें सर्व रंग असून कपाळाचे ठिकाणीं काळा असा अश्व युद्धकर्मांत नष्ट होय.

क्षत्रिय जातीच्या अश्विनीचे ठिकाणीं वैश्य अश्वापासून उत्पन्न झालेले, चंद्राप्रमाणें शुभ्र कपाळाचे, आणि नक्षत्राकृति चिन्हें ज्यांच्या अंगावर आहेत, असे व चित्र रंगाचे जे अश्व ते राजे लोकांचीं

उत्तम वाहनें होत. शूद्र जातीच्या अश्विनीचे ठिकाणीं वैश्य अ-श्वापासून उत्पन्न झालेले, आंखूड केसाचें, तोंडल्याच्या रंगाचे किंवा पाणकोंबड्याच्या रंगाचे, तसेच वाघासारख्या रंगाचे जे अश्व ते सैन्यास शोभा आणणारे व बळकट असतात. केशांचीं अग्रें वंश ( पाठीचें हाड ) आणि पाय हीं ज्यांची काळ्या रंगाचीं असतात असे शूद्राश्वापासून ब्राह्मणाश्विनीचे ठिकाणीं झालेले अश्व कंकोन संज्ञक होत. व ते अंत्यजांचीं वाहनें असें जाणावें. वैश्य अश्विनीचे ठिकाणीं शूद्राश्वापासून उत्पन्न जे अश्व त्यांस दर्दुर किंवा शुक शालिक ह्मणतात, यांस व चंडाळ ( ब्राह्मणाश्विनीचे ठायीं शूद्राश्वापासून उत्पन्न) जालेले. सूत(ब्राह्मणआश्विणीचे ठायीं क्षत्रियअश्वापासून उत्पन्न ) जालेले. आणि मागध (ब्राह्मणाश्विनीचे ठिकाणीं ) वैश्यापासून उत्पन्न जालेले यांस संग्राम कर्माचे ठायीं वर्ज्य करावें.

---

# आतां प्रसंगानें खेचरीची परीक्षा सांगतों.

ब्राह्मणअश्वापासून गर्दभीचे ठिकाणीं जन्मलेली श्वेत वर्णाची खेचरी शुभ होय. ती अश्व शाळेंत रक्षण करावी, कारण तिचें दर्शन व स्पर्श हे शुभ होत. आतां ब्राह्मणअश्विनीचे ठिकाणीं गर्दभापासून झालेली कृष्ण वर्णाची जी खेचरी ती चांडालीण होय. तिला स्पर्शही करूं नये. कारण ती दुष्ट व दुःख देणारी आहे. ती भार सोसण्यास मात्र मोठी बळकट असते. क्षत्रियाश्वापासून गर्दभीचे ठिकाणीं झालेली तांबड्या रंगाची खेचरी शुभ होय.

क्षत्रियाश्विनीचे ठिकाणीं गर्दभापासून झालेली तांबडी किंवा काळी खेचरी अतिनिंद्य होय. वैश्या पासून गर्दभीचे ठिकाणीं झालेली पिवळ्या व भुरकट रंगाची खेचरी तशीच वैश्यश्वा जातीय अश्विनीचे ठिकाणीं गर्दभापासून उत्पन्न झालेली मळकट रंगाची आणि रांवाकी

[ भुरकी ] खेचरी शुभ होय. गर्दभीचे ठिकाणीं शुद्राश्वापासून झालेली गर्दभासारख्या रंगाची जी खेचरी ती गर्दभीच होय. शूद्राश्विनीचे ठिकाणीं गर्दभापासून झालेली नाकाचे ठिकाणीं शुभ्रवर्ण गर्दभाप्रमाणे जिचें तोंड तीही गर्दभ जातीची जाणावी. इति खे० प०

## गर्दभ परीक्षा.

गर्दभापासून निषाद जातीच्या अश्विनीचे ठिकाणीं झालेली गर्दभाप्रमाणें किंवा अश्वाप्रमाणें शब्द करणारी खेचरी गर्दभीच होय. अश्वापासून निषाद जातीय अश्विनीचे ठिकाणीं झालेली, हिंसतांना गर्दभासारखा शब्द करणारी, धूम्र रंगाची, गर्दभासारख्या मुखाची खेचरी चांडाळी होय. ती अशुभ असल्यामुळें युद्धादिकृत्यांत वर्ज्य करावी इतकेंच कीं, तर सांगितलेल्या खेचरी अश्वशाळेंत किंवा अश्वशाळेच्या समोर स्थापन कराव्या. त्याच्या दृष्टिपातानें विघ्नांचा नाश होतो. त्यांत जी श्वेता ह्मणून खेचरी प्रथम सांगितली तिच्या अवलोकनमात्रें करून भूतें, प्रेतें, पिशाच, शाकिनी, डाकिनी ग्रह, यक्ष, चेटकें, वेताळ, कुष्माड, भैरव, आणि झोटिंग हीं सर्व नष्ट होतात. श्वेता खेचरी युद्धांत किंवा भार वाहण्यांत आणि वहन कर्मांतही सर्व वर्णांस जयप्रद होते. इतर खेचरी केवळ भार वाहक होत आणि अंत्यजादिकांस वाहनभूत होत्सात्या युद्धांत जयप्रद होत परंतु त्या एक जातीच्या असाव्यात, भिन्न जातीच्या वर्ज्य होत. मिश्र वर्णाचे व मिश्र जातींत उत्पन्न झालेले जरी अश्व आहेत, तथापि पान, भक्षण, चेष्टा यावरून त्याचें अंतःकरण जाणावें.

## गुणावरुन अश्वजाति परिक्षा,

### गंधावरून अश्वांची परीक्षा.

ज्याचा वास पुष्पाप्रमाणें येतो तो ब्राह्मण जातीचा. कृष्णागरू

प्रमाणें ज्याचा वास तो क्षत्रिय. तुपाप्रमाणें वासाचा अश्व वैश्य आणि माशाप्रमाणें ज्याचा वास तो शूद्र होय.

## गुणावरून परीक्षा.

विचारवान व दयाळू ब्राह्मण. बळकट व तेजस्वी क्षत्रिय. दुष्ट अंतःकरणाचा तो वैश्य. आणि जो अगदीं निर्बल इंद्रियाचा तो शूद्र होय.

## तदुपयोगः नकुलकृताश्व चिकित्सायी :प्रसंगविशेषीं त्यांचा उपयोग.

निर्भय अशा स्वस्थपणाच्या कृत्यांत ब्राह्मण जातीचे अश्व सिद्धिकारक होत. युद्धादिकर्मांत क्षत्रियाश्व, द्रव्य किंवा सेवक संपादन करण्याचे कामांत वैश्य जातीचे अश्व आणि याशिवाय अन्य कृत्यांचे प्रसंगीं शूद्र जातीचे अश्व सिद्धिकारक होत असें जाणावें.

## तथाच भूपाल वल्लभे विशेषः

ब्राह्मण जातीचा अश्व ग्रंथित तृण (न विसकटतां) खातो. क्षत्रिय अश्व चहूंकडे विखरून खातो. वैश्य अश्व बाजूस असलेलें खातो आणि शूद्र अश्व भूमींतून उगवलेलें खातो.

## नकुलकृतेऽश्वचिकित्से.

कांहीं अश्व जलापासून झालेले ( ज्यांच्यांत जल हें तत्व अधिक आहे ) आहेत. कित्येकांत तेजतत्व अधिक आहे, कोणी वायुतत्वानें अधिक आहेत, आणि कितीएकांत भूमितत्व जास्त असतें. जलतत्व प्रधान (अर्थातशांत) ते ब्राह्मण, तेजःप्रधान ते क्षत्रिय, वायुतत्व अधिक असणारे ते वैश्य, आणि ज्यांत पृथ्वीतत्व अधिक ते शूद्र जाणावे. ब्राह्मण जाति आपला मळ ( लीद ) पाहत नाहीं. क्षत्रिय अश्व लीद पाहतो. वैश्य जातीय मलास हुंगतो. आणि शूद्राश्व तर लीद भक्षण करतो.

## पाण्यावरून परीक्षा.

ब्राह्मणाश्व नाकानें पाणी पितो. क्षत्रिय ताडित केलेलें पाणी पितो. आणि वैश्य ओठांनीं पितो व शूद्र पितांना भितो.

जो घोडा सर्व तोंड डोळ्यापर्यंत पाण्यांत बुडवून पाणी पितो तो ब्राह्मण जातीचा.

जो घोडा दोन्ही ओठ पाण्यावर ठेवून नाकपुड्यापर्यंत तोंड पाण्यांत बुडवितो तो क्षत्रिय जातीचा.

जो घोडा पाण्यांत जात नाहीं, पाण्यावर दोन्ही ओट. टेवून पाणी पितो तो वैश्य जातीचा.

जो घोडा कोरडे मारल्या वांचून पाण्यांत जात नाहीं लांबूनच पाणी पितो तो शूद्र जातीचा जाणावा.

## भयावरून परीक्षा.

ब्राह्मण जाति अश्व थंडीस भीत नाहीं. क्षत्रिय थंडी व उष्ण या दोन्हीस भीत नाहीं. वैश्य थंडी व पाणी यापासून भितो आणि शूद्र तिन्ही ( शीत, उष्ण, जल ) सोसतो.

## वाद्यावरून परीक्षा.

ब्राह्मण वाद्यें वाजवल्यापासून हर्ष पावतो. क्षत्रिय कहोल (एक विशेष वाद्य आहें) ते वाजल्यापासून हर्षित होतो. वैश्य वाद्यानें रागावतो. शूद्र तर रागावून चाकरास खातो. ब्राह्मण संग्रामांत पाठमोरा होतो. क्षत्रिय सन्मुख होतो. वैश्य रणामध्यें मळमूत्र करितो. आणि शूद्र जवळ असणाऱ्यास चावतो. ब्राह्मण अश्व रणांत शस्त्रादिकांनीं दुःखित होतांच धन्यास घेऊन जातो. क्षत्रिय शत्रूस विदारण करतो. वैश्य स्वामीस टाकून निघून जातो. आणि शूद्र तत्काळ रणांत मरण पावतो. ब्राह्मण जातीचा अश्व पांढरा आणि उज्वळ असतो. क्षत्रिय बोराप्रमाणें व तांबडा असतो. वैश्य पिवळा व श्याम ( सावळा ) असतो. आणि शूद्र निळा आणि काळा असतो.

## तथाच जयदेव कृताश्व चिकित्से.

त्रासक स्वभावाचा व क्षुधातुर होणारा ब्राह्मण होय. शूर व फार रागीट तो क्षत्रिय. पापी व वाईट रुपाचा व दुष्ट तो वैश्य आणि

विरूप व वेडे वाकडे व उग्र ते शूद्र होत. ब्राह्मणाश्वास दाणा वगैरे दिली असतां तो चांगल्या प्रकारें स्वामीस चाहतो. क्षत्रियाश्व साम ह्मणजे प्रिय भाषणानें राहतो. वैश्य दंड व शब्द यांनीं वळतो. आणि शूद्रास दंडच पाहिजे. ब्राह्मणाश्वास पाहटे चालवावें. क्षत्रियाश्वास प्रहर दिवस आल्यावर. वैश्यास संध्याकाळीं आणि शूद्रास रात्रीं चालवावें. आतां असा उत्तम लक्षणी अश्व असून पराभव पावतो तो संकीर्ण ( मिश्र ) जाणावा.

## उत्तम गंधाची परीक्षा.

ज्या घोड्याचे आंगाचा स्वाद मद, कमळ, पुष्प, कुंद, उंच मद्य, चंदन, अशोक फूल, जाईचें फूल याप्रमाणें असतो तो उत्तम.

## उत्तम सत्वाची परीक्षा.

ज्या घोड्याचा उत्तम वर्ण, व स्वर व गति व सुगंधि, तो कुलिन, नम्र, ज्याचें सत्व देवासारखें. गंधर्व, श्रेष्ठ मुनी तो शुद्धसत्व जाणावा.

## सत्वादि गुण अश्वाचे ठिकाणीं कसे ओळखावे याविषयीं.

बुद्धिमान्, मुखभागीं सुंदर आणि प्रशस्त शरीराचे, सुखभोक्ते, दीर्घ दृष्टी, दीर्घायुषी आणि क्षमावान् असे जे अश्व ते सात्विक; अखूड शरीराचा दुःखी; मत्सरी, तीक्ष्ण, अल्पायुषी, रागीट अशा स्वभावाचे ते राजस; आणि तंद्रा ( गुंगी ) निद्रा फार असणारे, मंदगती, दुर्बुद्धी, आळशी, असे अश्व ते तामस गुणाचे जाणावे.

## घोड्यांचे सहज गुण.

उत्तम बुद्धि, शौच ( शुद्धता ) शौर्य व इतर चेष्टा यांच्या योगानें मोह न पावणारे, औदार्य, समंजसपणा, अंतः कर्णाचे ठिकाणीं प्रीति, प्रफुल्लितपणा, संताप न करणें, स्वभावानुरूप वर्तन, स्मरण, धैर्य, एकण्याची इच्छा; अभिमान, संचार करणें, सर्व कर्मांत मनाचा निश्चय आणि त्यांचा अंगिकार हे अश्वांचे सहज गुण होत.

## घोड्यांचे सत्वज (मनाचे) गुण.

तीक्ष्णता, शूरता, शुचित्व, सत्कर्माचे ठिकाणीं निश्चय, विषाद (खेद) न करणें हे घोड्यांचे मनाचे गुण होत.

घोड्याचा आकार, बळ, स्वभाव शक्ति, दम प्रीति ठेवणें व स्मरण हे गुण सर्व देशाचे घोड्यांत एकसारखे रहात नाहींत. देशपरत्वें कमी जास्त असतात. घोड्यामध्यें गुण येण्यास शिकवण्यास मनुष्याचा सहवास असणें हें मुख्य कारण आहे. घोड्यास जाच बिलकूल करूं नये. वाईट वागविल्यानें घोडें बिघडतें. घोड्यावर प्रीति केली असतां तो मनुष्याचे स्वाधीन होतो. घोड्यास इजा किंवा वाईट पणानें वागविलें तर तो त्याचा सूड उगवितो.

## घोड्याच्या हिंसण्यावरून परीक्षा.

अश्व, हंस, हत्ती, कुरर, क्रौंचपक्षी, मेघ, नगारा, जलप्रवाह, या सारखा हिंसल्यास उत्तम. ज्याचें हिंसणें पुष्कळ घोड्यांच्या हिंसण्यांत ऐकूं येतें तो उत्तम. जो अश्व आपल्या उजव्या आंगाकडे पाहून हिंसतो, तो उत्तम. ज्याचा शब्द पुष्कळ घोड्यांच्या हिंसण्याप्रमाणें वाटतो, असा जो गंभीर शब्दाचा अश्व तोही उत्तम. तसाच जो दुसऱ्या अश्वाचें हिंसणें ऐकून मागून हिंसतो तोही उत्तम. हीं उत्तम लक्षणें सांगितलीं. आतां वाईट लक्षणें सांगतों.

जो घोडा खालीं तोंड करून हिंसतो तो वाईट. आपल्या डाव्या आंगाकडे पाहून हिंसतो तोही वाईट. तसाच जो अल्पही वस्तु पाहून हिंसतो, तोही वाईट. गर्दभा सारखा हिंसणाराही वाईट जाणावा.

अश्वाचें हिंसणें मधुर, अविछिन्न, गंभीर, आणि दिनता रहित असल्यास, तसेंच भरलेलें पात्रस, ब्राह्मण पुष्पें हीं पाहून हिंसल्यास, त्याचप्रमाणें ध्वजाचे अग्रभाग व सूर्य यांस पाहून हिंसल्यास उत्तम लक्षण समजावें.

दिसतील त्या घोड्यांस अंगलेपन ( चंदनादिकाचा लेप ) स्नान, उटणें, माळा, सुगंध, उत्तम भोजन हीं नित्य द्यावींत व प्रदक्षिणा कराव्यात. ज्यांच्या घरीं सुपूजित असे अश्व आहेत, त्यांस पुत्र पौत्रादि संतति, शत्रु पराजय हीं फळें प्राप्त होतात.

## अंगदंड मतिस्थूलः

अश्वांची वर सांगितल्याप्रमाणें पूजा केली असतां मोठाही शरीर दंड ते सहन करतात, याकरितां राजानें नित्य त्यांची पूजा करावी.

## दीर्घग्रीवाक्षीकूट.

मानेचे ठिकाणीं लांब, नेत्र, त्रिकस्थानें, व हृदय या ठिकाणीं विस्तीर्ण; तालु, ओष्ट व जिव्हा या ठिकाणीं आरक्त; त्वचा व केश या ठिकाणीं सूक्ष्म; शफ, गति आणि मुख इतके ठिकाणीं सुंदर, कान, ओंठ व शेपूट हीं ज्याचीं अखुड आहेत असा व जंघा, ( पोटऱ्या ) गुडघे व मांड्या या ठिकाणीं वर्तुळ, सारख्या व शुभ्र दंताचा, रुपानें सुंदर, सर्वांगांनीं शुद्ध असा अश्व राजाच्या शत्रूंचा नाश करणारा होय.

कंठस्थानीं कौस्तुभमण्यासारखा भोंवरा असेल तर त्या घोड्यास चिंतामणी ह्मणतात.

सर्व अंग पिवळे रंगाचें, चारी पाय पांढरे, व डोळे श्वेत रंगाचे त्या घोड्यास चक्रवाक ह्मणतात.

ज्या घोड्याचे ललाटावर एक हरिनें तीन भोंवरे असतात त्या घोड्यास त्रिकूट ह्मणतात. तो उत्तम होय.

दोन्हीं गंडस्थळीं भोंवरे असतात त्या घोड्यास इंद्राक्ष ह्मणतात.

कर्णमूळ स्थानाचे ठायीं दोन भोंवरे असले तर त्या घोड्यास विजयाख्य ह्मणतात.

नाशिक मध्यभागीं भोंवरा असेल तर त्या घोड्यास चक्रवर्ती ह्मणतात.

# रंगाविषयीं.

घोड्याचे मुख्यः—सात रंग असतात ते येणें प्रमाणें श्वेत (पांढरा), तांबडा, पिंवळा, निळा, जरदा, काळा आणि कबूर ( चित्रविचित्र रंगाचा ). ह्या सर्वांत पांढरा उत्तम व त्याच्या खालोखाल तांबडा. सर्व शुभ्र, काळा, तांबडा आणि पिंवळा हे चार रंगाचे घोडे युद्धाचे उपयोगी आहेत. हिरव्या रंगाचे घोडे फार दुर्मिळ असतात-घोडा पांढरा किंवा श्यामवर्ण असून मेहन (शिश्न) अरक्त वर्ण असल्यास तो घोडा उत्तम होय. कपोत पक्ष्या प्रमाणें काळा असून केश जर पांढरे असतील तर तोही प्रशस्त होय. ज्याच्या पाठीच्या कण्याला अनुसरून पांढरी रेषा आहे व ज्याचें मस्तक कांहीं पांढरें व कांहीं काळें तो अश्व प्रशस्त नाहीं. ज्या त्या रंगापेक्षां भिन्न रंगाचें पुच्छ व शीर आहे किंवा पुच्छ व शीर या ठिकाणीं चित्रविचित्र रंग आहे ते अश्व प्रशस्त नाहींत. ज्याचा रंग अस्पष्ट आहे, किंवा तितीर पक्ष्याप्रमाणें आहे आणि तोंड वानराप्रमाणें आहे, किंवा व्याघ्रा प्रमाणें ज्याचें चाटणें आहे, ते अश्व चांगले नाहींत.

घोड्याचे सर्व रंग प्रशस्त आहेत पण ते तेजस्वी, स्थिर व स्निग्ध असावेत. त्या सर्वांत पांढरा उत्तम आहे. कारण तो नित्य सर्व रंगाचा पति आहे ह्मणून सर्व वर्णांना संयोग पांढऱ्या रंगानें मिश्रित असावा.,,

ज्या घोड्याचे केश पीतवर्ण आणि गौरवर्ण आहेत तो, व पुच्छ व केश आणि मुख हे तिन्ही पांढरे रंगाचे आहेत तो, असे दोन्ही अश्व उत्तम होत. ज्याचे तार ( केश ) पिवळे किंवा पांढरे आहेत तो ही उत्तम. ज्याचे तार ( केश ) पांढरे तो युद्धांत उत्तम. सर्व पांढरा सर्व काळा, सर्व तांबडा आणि पिंवळा हे अश्व युद्धांत उपयोगी आहेत. हिरवे घोडे महा पुण्य असल्यास प्राप्त होतात.

कोणत्याही रंगांत काळे, निळे रंगाचें मिश्रण असलेले प्रशस्त नाहीं व अगदीं त्याज्य आहे. अन्यही सर्व रंग मिश्र असलेले प्रशस्त नाहींत. ज्या घोड्याचा उत्तम असलेला पहिला रंग हळु हळु वृद्धिगत होतो तो अश्व उत्तम समजावा, आणि ज्याचा पहिला रंग पुढें कमी होत जातो तो वाईट समजावा.

इंग्रजींत रंगाचे पुष्कळ भेद आहेत. सफेत (पांढरा), निळा, लाल (तांबडा), बोर, पिंवळा, जर्दा, काळा, सारंगा, कुमाईत, तांबूस कुमाईत, काळमरकुमाईत, पिंवळाकुमाईत, गहिरा, निवळ बोर, बोरतांबूस, भुरका (हरिणा), तांबडे झोकाचा, काळसर, तांबडा (तेल्याबोर), तांबसरकाळा, कोळश्या सारखा काळा, आणि आस्मानी.

गांगा, तांबडा, पांढरा मिश्र ह्मणजे तांबडा कर्डा (उंब्रा केसांचा) काळ्या पांढऱ्या मिश्र केसांचा, कर्ण ह्मणजे सब्जा, चित्राविचित्र ह्मणजे चितोडा, फाक्ता, दूदा, सौर, निळा (निळीचे रंगाचा), कबूर, जर्दा, गर्दास (शेंडी पासून नाका पर्यंत पांढरी लकेरी असेल त्यास ह्मणतात. जर दुसरें कोठें अंगावर पांढरे असेल तर गर्दास ह्मणत नाहींत), पिंवळी अयाळ, वाघ, गिधड, लांडगा यांचे रंगा प्रमाणें दूम ह्मणजे शेपूट नसावी. संजाबाला गर्दास प्रमाणें लकेर असेल तर वाईट रंगाचा घोडा समजावा. सौर ह्मणजे सर्व शरीर काळे रंगाचें किंवा माती अथवा गुलाबी किंवा घारे असे रंगाचें असल्यास त्यास सौर असें ह्मणतात. फुल्ला, शरीरावर पांढरे ठिपके होतात तो. सुरंग, कुमाईत, मुषाक, जर्दा या रंगांवर पांढरे ठिपके असल्यास वाईट. उंदराचे रंगाची दूम असल्यास वाईट. एक हात किंवा एक पाय गुढघ्यापर्यंत पांढरा असल्यास त्याला अर्जल ह्मणतात, पण तो घोडा या खेरीज सर्व ठिकाणीं एक रंगाचा असावा. सदहू फाक्त्या पासून अखेर पर्यंत जे सदरीं रंग लिहिले आहेत ते वाईट रंग असें ह्मणतात.

१ अष्टमंगळ, २ समंद, ३ फलवरी, ४ काव, ५ चाळ, ६ संदली, ७ मक्सी, ८ सुरगा, ९ चिनी, १० सुरंग, ११ संजाप, १२ गहिरा, १३ चौधर, १४ हरा, १५ गर्के, १६ मोहताब, १७ बावर्त, १८ जुरई, १९ शनवनी, २० मुरगा, २१ टोपड, २२ हरांजनी, २३ निलाप्कुक, २४ पंगत, २५ टपाला, २६ घेर, २७ कछा, २८ मळहीर, २९ खिरा, ३० सबजा, ३१ शामकर्ण, ३२ फाकताई, ३३ अचंब, ३४ अर्जन, ३५ मोतम, ३६ लखीख, ३७ पंचकल्याण, ३८ परेल, ३९ वचक, ४० अबलक, ४१ सोहा, ४२ बदामी, ४३ कुमेन, ४४ एकरंग, ४५ सौर, ४६ बिलोरी, ४७ हुतग, ४८ गर्ग, ४९ बागंबरी आणि ५० चल हे रंग फारषी ग्रंथांतून घेतलेले आहेत

## तांबडे रंगांतील प्रकार.

१ मुरंग छिद्डा—शरीर लाल, व आयाळ, दूम आणि शेंडी सफेत, कपाळावर पांढरा ठिपका असावा.

२ मुतलकलमी—शरीर तांबडे, दोन पाय व उजवा हात सफेद गुडघ्या पर्यंत व कपाळावर ठिपका पांढरा असावा.

३ सुरंग—ह्यांत दुसरा रंग नसावा केवळ रक्ता प्रमाणें असावा.

४ सुरंग आबलख—हा शरीर सफेद, तोंड लाल किंवा सफेद पट्टे आणि शरीर लाल अगर सफेद शरीर किंवा लाल पट्टे याप्रमाणें असतो.

५ सुरंग आपसानी—लाल शरीर, त्यावर सफेद काळे पिवळे यांपैकीं एखादे रंगाचे पट्टे असतात. हा घोडा चांगला परंतु क्वचित आढळतो.

६ सुरंग माहावा—शरीर लाल, त्यांत काळसर रंग चांगला, व हात पांढरे गुडध्या पर्यंत, व डोळ्याची अकृती मनुष्याचे डोळ्याप्रमाणें असते. यालाच जयमंगळ ह्मणतात.

७ सुरंगगरा—शरीर लाल, त्यांत पांढरे केंसाचें मिश्रण व डोळे मनुष्याचे डोळ्या प्रमाणें असावेत.

८ सुरंग सुनेरी—सर्व शरीर तांबडें, त्यांत पिवळेपणा असावा, व कांहीं जर्दा केसाचें मिश्रण असावें. असा घोडा चांगला होय.

९ सुरंग बदामी—हा सर्व रंग बदामा प्रमाणें असून त्यांत लाली असावी. असा घोडा फार चांगला होय.

१० निखालस कुमाईत—शरीर सर्व लाल, आयाळ व दूम काळी, चारी पाय गुडघ्या पर्यंत खाल पासून काळे असावे, कान व शेंडी काळे केंसाची असावी.

११ तेलीया कुमाईत—यांत केंश लालकमी व काळेजास्त असावे, पाय गुढघ्या पर्यंत काळे असावे, व कपाळावर पांढरा ठिपका असावा. जर चारी पाय पांढरे असतील तर तो तेलीया पंचकल्याण असें समजावें.

१२ कुमाईत आबलख—अर्धे शरीर लाल व अर्धे पांढरें असें असावें.

१३ अबलग—सर्व शरीर लाल त्यांत कांहीं काळे, पांढरे, जर्दे असे पट्टे असावे ह्मणजे चांगला. असा घोडा क्वचित आढळतो. सदरप्रमाणें शरीरावर पट्टे असून मुखपट्टाही असावा.

१४ कछा—सर्व शरीर लाल त्यांत जर्दा रंग मिश्र असून आयाळ व दूम काळी असावी व पाठीवर सैली असावी.

१५ दूर्वेगुष—सर्व शरीर लाल व त्यांत काळें मिश्रण असावें, आणि शेंडी, आयाळ, दूम, हातपाय काळे व कान सफेद असे असावेत.

१६ आप्सतुर्क फलवारी—सर्व शरीर लाल किंवा लाल रंगावर निरनिराळे रंग, कपाळावर पांढरा ठिपका, नाक व वरचा ओंठ पांढरा असावा. डोळे गारे असावेत. हातपायावर काळे, जर्दे किंवा पांढरे ठिपके असावेत.

## काळे रंगांतील प्रकार.

१ मुषकी—सर्व काळे शरीर, आयाळ दूमसहीत काळे रंगाची असावी.

२ मुषकी अबलक—अर्धकाळा व पांढरा या दोन रंगांत कमजास्त असला तर चालेल. हा घोडा कार्य सिद्ध करणारा होईल.

३ मुषकी पंचकल्याण—सर्व शरीर, दूम व आयाळ काळी, डोळे मनुष्यासारखे, चारी पाय पांढरे व कपाळावर पांढरा ठिपका असावा.

४ तुर्की लाखोरी–काळा व लाल रंग असावा. हातपाय पांढरे व कपाळावर पांढरा मुखपट्टा.

५ समंदकाळा—काळा व लाल रंग असावा. हातपाय काळे, दूम, आयाळ काळी, नाकपुड्यावर, छातीवर व पोटावर पांढरेपणा व काळेपणा असावा, व कानही काळे असावेत.

६ खर्व—खिसमिसी सारखा रंग. आयाळ, दूम, हातपाय काळे, कानाचीं टोकें काळीं, नाकपुड्या व छातीपुढें व पायाचे मागें सफेत व त्यावर पांढरी लकेरी असावी.

## पिवळे रंगांतील प्रकार.

१ सुरगा—सर्व शरीर पांढरें, आयाळ व दूम यांत जर्द्या रंगाचे केस जास्त असावे.

२ सुरगा अबलक—सर्व शरीर हळदी प्रमाणें व त्यावर पांढरे पट्टे असावेत.

३ जर्दा—सर्व शरीर जर्दे परंतु आयाळ व दूम यांत जर्द्या रंगाची सफेती कमी असावी. हळदी प्रमाणें पिवळा असल्यास बादशहाचे स्वारीस लायक घोडा आहे.

४ समंद शियाजानू—सर्व शरीर पिंवळें, आयाळ, दूम, शेंडा, कानाचीं टोंकें व पाय काळे, आणि ढुंगणावर पांढरे ठिपके असतील तर समंद शियाजानू फलावरी ह्मणावें.

५ समंद बदामी शियाजानू—सर्व शरीर बदामी रंगाचें, आयाळ, दूम, शेंडा व हातपाय काळे असावेत.

६ समंदअबलक—सर्व शरीर पांढरें त्यांत जर्दा रंग सर्व शरीरावर पांढरे पट्टे असावे

## पांढरे रंगांतील प्रकार.

१ निळाबूज—सर्व शरीर पांढरें, दूम व आयाळ पांढरी, त्यांत काळेही केस थोडे असावे.

२ निळा संजाप—काळे, लाल, जर्द असें निरनिराळे रंगाचे केस असावेत, सर्व शरीर पांढरें, दूम व आयाळही पांढरी असावी. त्यांत काळे, लाल, जर्द असे निरनिराळे रंगाचे केस असावे. तो घोडा स्वारास व राजास व मालकास मुबारक होईल. मालक खुप राहील.

३ मुक्सी—पांढऱ्यांत काळे ठिपके असावे. हा घोडा चांगला.

४ आस्प खुंग—सर्व शरीर पांढरें, गुडघ्यावर काळा रंग, किंवा अर्धा शरिराचा काळा भाग असावा, डोळे हरणा सारखे काळे असावे, पाठीवर सैली दूमपर्यंत असावी, कानाचीं टोंकें काळीं असावींत. हा घोडा चांगला. मालक खुप राहील. इमाम व हुसेन यांचे बसावयाचे घोडे या रंगाचे होते

५ सबजा—सर्व शरीर पांढरे त्यांत काळे केस असावे.

६ सबजा सुरखा—सर्व पांढरा रंग असावा त्यांत तांबडे केस मिश्र असावे.

७ शिरास—पांढरा रंग असून त्यांत चमक असावी.

८ नुकरा—पांढरा रंग असून त्यांत जर्दा रंग असावा व डोळे सफेत व चकचकीत असावेत.

९ नुकरापलंग—पांढरें शरीर त्यांत जर्दे व काळे ठिपके असावेत.

१० बवर्ता—सफेत व काळे केंस असून त्यांत लाल केस असावे.

११ निळा कबूद—सफेत व काळे केंस असावे, 'डोळे घारे, आयाळ व दूम पांढरी, आयाळींत कांहीं केंस पांढरेही असावे.

१२ महावा अबलग—मोहाच्या बियांच्या रंगा प्रमाणें सर्व शरीर असून त्याजवर बारीक पांढरे पट्टे असावेत, हातपाय, आयाळ व दूम हीं सर्व पांढरीं असावींत, कान काळे, शेंडी, तोंड व नाक पांढरें, कपाळ सर्व रंगीं आणि डोळे मनुष्याचे डोळ्याप्रमाणें असावेत.

१३ बुजतेलीया अबलग—सर्व शरीर पांढरें असून त्यांत काळसरपणा असावा, कान काळे, पोटा खालीं काळें, आयाळ व दूम काळी आणि पाठीवर व हातपायावर काळी लकेर असावी.

१४ हातपाय, दोन्ही कान व कपाळ तसेंच छाती व दूम सर्व पांढरी असतील तर वाईट ह्मणतात परंतु ते वाईट नाहींत.

१५ पिसाबाच्या जाग्यावर पांढरा रंग असेल तर चांगला.

१६ खूब—सर्व रंग एक असून एक कान रंगीन असावा.

---

# भरत खंडांतील ५६ देशांचीं संस्कृत व प्राकृत नांवें.

अंगदेश-(बहार) पाटना, राजमहाल, मोंगीर, गाजीपूर इत्यादि.

अवंतिदेश-(माळवा) उज्जनी, चित्तूर, इंदूर इत्यादि.

आंध्रदेश-(तैलंगण) नेलोर, गंतूर, मच्छलिपट्टन, राजमहेंद्र, विशागापट्टन, आणि गंजम इत्यादि.

ह्या हिंसण्याच्या स्वराचें लक्षण घोडा लहान, निर्बळ, वृद्ध, भुकेलेला, तृषित, श्रमी, आणि भीत असलेला असतां पाहूं नये.

या हिंसण्यांत सिंहादि पशूंच्या प्रमाणें हिंसणें असल्यास उत्तम आणि काकादि पक्ष्यांप्रमाणें असल्यास वाईट जाणावें.

मागे अश्वाचे गंधावरून परिक्षा सांगितली आहे तो गंध कोणते ठिकाणचा पाहावा तीं इंद्रियें वगैरे—मुख, नाशिक व त्यांतून स्वास येतो तो, कर्णमळ, लिंद आणि रेत इतके जागीं गंधावरून परिक्षा करावी.

---

## अश्वाचे ठिकाणीं ५ छाया असतात त्यांचें वर्णन.

पृथ्वि, अप, तेज, वायु, आणि आकाश ह्यांची पांच प्रकारें छाया अश्वावर पहावी. सर्व रोम, मांड्या, दांत, केश, नखें या ठिकाणीं अधिक कांति असते. ती भूछाया जाणावी. कठीण, दिन व भस्मा सारखी पूर्वीं सांगितलेल्या ठिकाणीं कांति असल्यास ती वायुछाया जाणावी. अतिरक्त, अति स्निग्ध, सुवर्णासारखी कांति असल्यास अग्निछाया जाणावी. मेघासारखी निळी असून तेजस्वी अश्वप्रभा असतां जलछाया होय. रूक्ष, सूक्ष्म व विरळ अशी अश्वाची कांति असतां आकाशछाया जाणावी. गंभीर, स्निग्ध असून इतर सर्व रंगाची पृथ्वि छाया जाणावी. या वर सांगितलेल्या पांच छायेंत जल, पृथ्वि व अग्नि यांची छाया असल्यास उत्तम आणि वायु व आकाश यांची छाया असल्यास वाईट समजावी.

---

# घोड्यास सार ह्मणजे शुक्र मज्जादि धातु ज्यास्त असते त्या वरून सार समजण्याचा प्रकार.

१ ज्याची त्वचा व केश स्निग्ध असून गुप्त अग सुदर आहेत आणि जो बुद्धिवान, वेगसंपन्न, दक्ष, व स्वच्छ केसाते करणारा असतो तो अश्व त्वकसार होय. तो देखणा व शूर असतो.

२ परिमाणानें ज्याचीं अंगें विभक्त आहेत, व सर्व अवयव सारखे आहेत. तो तांबड्या रंगाचा किंवा तांबडी झांक असणारा रक्तनेत्राचा देखणा, तेजस्वी, शूर, स्मरण ठेवणारा व बुद्धिवान असा अश्व रक्तसार होय. तो मोठा जिवट असतो.

३ ज्याचे दांत, आश्रुस्थान, डोळे व केश हे स्निग्ध, शिर मृदु, स्निग्ध, व विस्तीर्ण, खुरांतील शफ ( नख ) लांबट, जिव्हा मऊ व घट्ट असून कमळ पत्राच्या आकाराची, मांस सर्वत्र सारखें आणि नासिक, नेत्र व तालू आरक्त आहेत तो मांससार होय. हा अश्व शुद्ध बळवान असतो.

४ लोध्र पुष्पाचे रंगाचा वृत्त ( गोल ) घट्ट अशा अंगांनीं युक्त जो, आणि कांहीं अंगें विभक्त व कांहीं पिळदार आहेत व नेत्र तालू यांचे ठायीं स्निग्ध जो घोडा तो मेदसार होय. त्याचा रंग चकचकीत दिसतो.

५ अगदीं स्वच्छ किंवा मेघाप्रमाणें रंगाचे, साग्र, सारखे व दाट असे दांत, दाढा व शफ ( नखे ) असून हाडें घट्ट व विभागलेलीं, बळकट, व भार सहन करणारीं आहेत तो अश्व अस्थिसार होय.

६ ज्याची मज्जा थिजलेल्या घृताप्रमाणें स्थिर, व पुष्कळ बाहेरचीं सर्व मांसें स्निग्ध, नेत्र तेजस्वी व स्वच्छ, सर्व रोम स्निग्ध

आहेत तो अश्व मज्जासार होय. हा बळकट व तेजस्वी असतो.

७ ज्याचें वीर्य स्निग्ध, घट्ट, दुर्गंधीरहित, व दुधा प्रमाणें असत तो तृप्त असून वेगवान असतो. तो शुक्रसार होय. तो फार बळवान आणि कठीण असतो.

८ ज्याचे खूर सुंदर, शब्द गंभीर, सर्व अंगें सुरेख असून शीघ्र वृद्धि पावणारे साधे, उत्तम व दृढ असून सर्व कर्मे करणारा तो अश्व स्नायुसार होय.

९ शूर, रणांत खिन्न न होणारा, स्मरण व बुद्धि यांनीं युक्त, स्निग्ध वर्ण, स्वच्छ केशाचा व ज्याचें गुदद्वार मलानें लिप्त होत नाहीं तो सत्वसार होय.

---

## घोड्याची बुद्धि, आहार, निद्रा ह्यांविषयीं.

घोड्याचा विचार केला असतां असें दिसून येतें कीं, त्याची बुद्धि कुत्र्याच्या बुद्धिपेक्षां कांहीं कमी आहे. कुत्र्यास मनुष्याचा हुकूम ऐकण्याची व त्याप्रमाणें करण्याची जशी बुद्धि आहे तशी घोड्यास नाहीं. त्याचें सर्व शिकण्याचें ज्ञान लगामावर आहे. बसणारा जसा लगाम वळवील त्याप्रमाणें तो चालतो. तथापि घोड्यास कांहीं चाली वगैरे शिकवितात. त्यावरून त्यास बुद्धि अगदीं नाहीं असें ह्मणतां येत नाहीं. घोड्याचा जठराग्नि प्रदिप्त आहे ह्मणजे त्यानें कितीही खाल्लें तरी तें त्याला पचतें. घोड्याची निद्रा बहुतकरून उभ्यानेंच असते. ती पांच तासांहून जास्त नसते. उभ्यानें झोंप घेतली असतां पायास इजा आहे परंतु जमिनीवर अंग टाकून झोंप घेणें हितकारक आहे. ती तो आपल्या खुषीनेंच घेतो.

---

# आनुकार.

चार प्रकारचे अनुकार सांगतों:—अश्वाची गति, स्वर, रुप आणि सत्व-यांवरून अनुकार पाहावे. सत्व तीन प्रकारचें-सात्विक १, राजस २, तामस ३. आतां रुपावरून अश्वाची आकृती ज्या दुसऱ्या प्राण्याचे आकाराची असेल त्याचें तें रुपानुक समजावें; ह्मणजे वानर मुख. गत्यानुक पुढें सांगावयाचें आहे ह्मणजे हंस, गज वगैरे पशूंचे चालीप्रमाणें ज्या अश्वाचें चालणें आहे त्यावरून गत्यानुक समजावें. स्वरानुक ह्मणजे सिंव्हादि पशूंच्या स्वरा प्रमाणें ज्याचे स्वर असतात ते अश्व शुभ होत. काकादिकां प्रमाणें शब्द करणारे ते वाईट.

श्रीमान, कांतिमान, मुखभागीं सुंदर व प्रशस्थ शरीराचा अश्व सात्विक. अखुड शरीराचा, तिक्षण व मत्सरी अश्व राजस. हे अश्व राजास सहाय होत. दुर्बुद्धि आळशी तो अश्व तामस.

---

# देव सत्वाश्व.

कित्येक अश्व देवा प्रमाणें सत्वधीर असतात. तसेच कित्येक यक्षा प्रमाणें बळवान, कित्येक गंधर्व व सर्प याप्रमाणें बळकट असतात ह्मणून त्यांची पूजा केली असतां ते राजास धर्म, अर्थ व काम येणें करून पूर्ण करितात.

---

# देवाश्व.

सर्व पांढरे अश्व चंद्राचे, इंद्राचे सुवर्णा सारखे पीतवर्ण, यमाचे काळे, सुलक्षण संपन्न व रंगानें निळे विष्णूचे, सूर्याचे पोपटाच्या रंगा प्रमाणें हिरवे, अग्नीचे पळसाच्या फुला सारखे, वरुणाचे निळ्या ढगा प्रमाणें, व कुबेराचे अश्व पाढऱ्या कमळाच्या रंगाचे होत; या प्रमाणें वर्णावरून देवाचे अश्व पृथक पृथक सांगितले.

# अश्वमेधास घोडा कसा असावा ह्याविषयीं.

जो अश्व सारा पांढरा व एक कान मात्र शामवर्ण आहे तो अश्वमेधास उत्तम.

तोंडाचे ठिकाणीं गाईच्या दुधा सारखा पांढरा आणि इतर ठिकाणीं कुंकवाप्रमाणें रक्त वर्ण, मानेवरील केश उत्तम व कान शामवर्ण आहेत असा अश्व अश्वमेधास योग्य आहे.

गाईचें दूध, कुंदाचें फूल, चंद्र आणि बर्फ याप्रमाणें पांढरा, पिवळ्या पुच्छाचा, श्यामकर्ण किंवा सर्वच शामवर्ण आहे तो उत्तम होय.

नील मेघाप्रमाणें सर्वांगाचेठायीं निळा, पाय व पुंड्र या ठिकाणीं मात्र चंद्राप्रमाणें शुभ्रवर्ण आहे आणि ज्याचे अंगावर पांढरीं कमलाकार चिन्हें आहेत, तो अश्वमेधास उत्तम होय.

सर्व अंगाचे ठिकाणीं दुधासारखा शुभ्र असा असल्यास त्यास उच्चैश्रवा ह्मणतात. सर्व शरीर पिवळें असून पाय आणि तोंड मात्र श्वेतवर्ण असल्यास त्यास पंचभद्र ह्मणतात.

सर्व ठिकाणीं काळा असून पाय आणि तोंड श्वेतवर्ण असल्यास त्यास पंचवर्धन ह्मणतात.

गुह्य स्थान आणि मागील सांगितलेलीं पांच अवयवें मिळून ६ अंगें ज्याचीं शुभ्र आहेत त्यास पटवर्धन ह्मणतात.

सर्व रंग पिवळा असून पांयाचीं तळें व पाय ज्याचे पांढरे आहेत, तो चक्रवाक् नांवाचा अश्व होय.

पाय पांढरे असून मुखावर जांभळाच्या आकाराचे पांढरे बिंदु असतात त्यास मल्लिकाक्ष ह्मणतात.

ज्याचे डोळ्यांतील बाहुली, कांहीं पांढरी व कांहीं काळी अशा रेषेनें वेष्टिली आहे त्यास मल्लिकाक्ष ह्मणतात.

•सारा पांढरा असून चारी पाय काळे असल्यास यमदूत जाणावा त्याचा त्याग करावा.

चारी पाय व मुखाचा मध्य भाग हीं ज्याचीं शुभ्र आहेत तो पंचकल्याणी होय. तो सर्वकाळ कल्याणकारक होतो. इति शार्ङ्गधरे.

### भूपवल्लभे.

मुख व चरण या ठिकाणीं मात्र पांढरा आणि अन्य सर्व ठिकाणीं रक्तवर्ण अश्व पंचकल्याणी होय.

### शार्ङ्गधरे.

ज्याचे चारी पाय, शेपूट, ऊर, तोंड, आणि डोक्यावरील केश शुभ्रवर्ण आहेत त्या अश्वास अष्टमंगळ असें जाणावें.

---

## राजयोगकारक.

ज्याचे कान रुईच्या पानाच्या आकाराचे असतात, दांत सारखे असून विरळ असतात, लाखेच्या रंगा सारखी ज्याची जिव्हा, स्तन, टाळू हीं आरक्त असतात, डोळे वैडुर्यासारखे तशींच नखेंही असतात त्यास विजयी अश्व ह्मणतात. तो फारच उत्तम. असा अश्व राजांनीं पाळावा.

### शुक पक्ष सवर्ण

सर्व शरीराचा रंग पोपटाच्या पंखा सारखा असून शीर मात्र तांबडें असतें, नेत्र स्निग्ध असून भिन्न रंगाचे असतात त्यास शुकपक्ष ह्मणतात. हा अश्व उत्तम समजावा. हा अश्व राजांनीं पाळण्याला योग्य आहे.

### गौर मणिनिभ.

सर्व शरीराचा रंग गौरवर्ण, टाळूचे ठिकाणीं मात्र तांबडा, अशा घोड्यास मणिनिभ अश्व ह्मणतात. तो राजानी पाळण्याला योग्य आहे.

### श्वेताश्व तालूरक्त.

टाळूचे ठिकाणीं तांबडा, दारूप्रमाणें नेत्र, मानेवरील केश आरक्त वर्ण आणि बाकी सर्व अंग तांबडें अशा घोड्यास रक्ततालू ह्मणतात. तो राजांनीं पाळण्यास योग आहे.

### कृष्ण सट:

ज्याचे मानेवरील केश काळे, मेघ किंवा नगारा याप्रमाणें ज्याचा गंभीर शब्द, कृष्ण सर्पाप्रमाणें ज्याचा श्वास, गती उत्तम, ज्यास धैर्य पुष्कळ आहे त्यास कृष्णसट ह्मणतात तो उत्तम अश्व होय.

### शंखश्वेत.

शंखा सारखे शुभ्रवर्ण, शंखाप्रमाणें ज्याचा शब्द सुशील, हंसाप्रमाणें उभा राहणारा, फार ठेंगणा नाहीं फार उंचनाहीं, अशा अश्वास शंखश्वेत ह्मणतात. .तो राजानीं पाळण्यास योग्य होय.

ज्या अश्वाचे डोळे दीपाच्या ज्वालेप्रमाणें, धांवणें बहीरससाण्याप्रमाणें, क्रौंच् पक्षासारखी ज्याची मान आणि पाय खोल आहेत, उडी मारण्याविषयीं जसे वानरच, पाहण्यांत फार उग्र आणि शंख, क्रौंचपक्षी, सिंह, मेघ गर्जना यांच्या शब्दा सारखा ज्याचा शब्द तो उत्तम समजावा.

कृष्णावर्त ह्मणजे घोड्याचे सर्व अंगांपैकीं एके ठिकाणीं शंखाप्रमाणें भोंवरा असतो तो फार चांगला आहे.

सुपर्ण पंख ह्मणजे छातीवर केश आले असावे कीं, ज्याचे योगानें छाती झांकून जावी; आणि चार पायास किंवा एक पायास केश असतात ते लहान किंवा मोठे असले तरी त्यास सुपर्ण पंख ह्मणतात.

गरुड पक्ष ह्मणजे घोड्याचे दोन्ही कुशींवर दोन भोंवरे असतात. एका कुशीवर असल्यास वाईट त्यास कुखावर्त ह्मणतात.

ज्या घोड्याचे डोक्याचे केश लांब असून त्याच्या योगानें डोळे झांकले जावे, आणि शेपटींचे केश जमिनीवर पडतात इतके लांब असतात त्यास कांबी आयाळ ह्मणतात.

दिव्यपक्ष दुसरे कांहीं भोंवरे व दुसरा रंग नसावा जर दोन्ही बगलांत दोन भोंवरे असतील तर तो उत्तम समजावा व त्यास दिव्यपक्ष ह्मणतात. एका बगलेंत भोंवरा असल्यास तो वाईट त्यास काखावर्त ह्मणतात.

कंठाभरण हाळकुळाचेखालीं भोंवरा असतो त्यास ह्मणतात.

दोन्ही कुशी खालीं दोन भोंवरे असतात ते शंखाप्रमाणें, कमलाच्या फुलांप्रमाणें अथवा बांगडीप्रमाणें भोंवरा असतो त्यास शीतमंगळ ह्मणतात.

ज्याचे कपाळावर किंवा डोक्यावर किंवा हाळकुळावर भोंवरा असेल तो ते २।३।४।५ असतील तर त्याचें नांव जयमंगळ.

## अरिष्टभंग.

जो ठेंगणा व टाळू आणि मुख या ठिकाणीं तांबडा त्या अश्वाच्या योगानें शत्रूचा पराभव होतो.

## पुष्कर.

ज्याच्या कपाळावर कमळ, पृथ्वी, माळा, चंद्र, वस्त्र, हत्ती, ध्वज, शंखपताका आणि भुज हीं चिन्हें शुभ्रवर्ण आहेत, तो अश्वराजलक्षण होय. कारण हीं राजचिन्हें होत. ज्याचे पाय व पोटऱ्या पांढऱ्या रंगाच्या आहेत त्यास अंनदरूप समजावें. तो अश्वपरराष्ट्राचें मर्दन करणारा होय. वक्र किंवा वज्र अथवा विस्तीर्ण धनुष्य हीं रंगाचीं चिन्हें ज्यावर आहेत तोही राजलक्षण युक्त अश्व जाणावा. त्याच्या येगानें मित्र, प्रीति, कोश, राष्ट्र, अश्व यांची वृद्धि, युद्धांत जय इत्यादि इष्टफलें प्राप्त होतात. या प्रकारचीं राजचिन्हें ज्यांवर

आनर्तदेश—द्वारका प्रांत.

कनोजदेश—गंगा व यमुना यांमधील प्रांत, अंतर्वेदी, इ०.

करहाटदेश—दक्षिण कोंकण.

कर्नाटकदेश—म्हैसूर, श्रीरंगपट्टण, यांतून कावेरी नदी वाहते.

कलिंगदेश—( ओढिआ ) कटक, बलासूर, खुर्द अ० जगन्नाथपुरी इ०.

कांबोजदेश—( रोहिलखंड ) मुरादाबाद, वगैरे किंवा ब्रह्मदेशाचा दक्षिण भाग ज्यास कांबोडिया ह्मणतात.

कामरूमदेश—( आसाम ) बंगाल इलाख्यांत.

काश्मीरदेश—प्रसिद्धच आहे. जंबू.

किरात—पूर्व समुद्राकांठीं, उन्नूर, सुंदा, इ०.

कुंतलदेश—(दक्षिण हैद्राबाद) कल्याणी, कलबुर्गी प्रांत, बेदराचा मुलूख, इत्यादि.

कुरुदेश—अकबराबाद, आग्रा, मिरत, मुजफरनगर, साहरणपूर, पाणपत, अंबाला, संपाटु, लुधियाना, इत्यादि.

केरलदेश—( मलबार ) कालिकोट इ०.

कैकेयदेश—काबूल.

कोंकणदेश—रत्नागिरी, (ठाणें, साष्टी), कोळवण इ०.

कोसलदेश—( आयोध्या ) लखनौ.

गांधारदेश—कंदहार.

गुर्जरदेश—सुरत, बडोदें, खेडा, अमदाबाद, वगैरे.

गौडदेश—बंगाल्यांतील गंगातीरचा भाग.

चैद्यदेश—शिशुपाळाचा देश पूर्व हिंदुस्थान.

चोलदेश—( मद्रास ) अर्काट, त्रिचनापल्ली, तंजावर वगैरे.

जालंदरदेश—पंजाबचा दक्षिण भाग.

टंकणदेश—( मद्रास ) कुर्ग.

दशार्णवदेश—( ठठ्ठा ) सौराष्ट्र काठेवाडाकडे.

द्रविडदेश—त्रावणकोर जिल्हा, चितोर, चिंगलपट व मद्रास इत्यादि.

नेपालदेश—प्रसिद्धच आहे. यांत मुख्य देवस्थान पशुपतेश्वर मुक्तस्थान आहे.

नैषधदेश—बंगाल्याचा एक भाग.

पांचालदेश—( पंजाब ) लाहोर वगैरे.

पांड्यदेश—( मद्रास ) मधुरा जिल्हा.

पाटनादेश—( प्रयाग ) कालिप, चित्रकूट वगैरे.

पारासिकदेश—इराण.

पुलिंददेश—बलुचिस्थान.

बर्बरदेश—आफ्रिकेंतलीं बार्बरी संस्थानें.

बाल्हिकदेश—अर्बस्थान.

भद्रदेश—( इजिप्त ) मिसरदेश.

भोजकोटदेश—कच्छदेश.

मरुदेश—मारवाड, अजमीर, जयपूर, जोधपूर.

मलियाड—मलबार.

मत्स्यदेश—कानपूर, मिरजापूर इ०.

महाराष्ट्र—पुणें, सातारा, अहमदनगर, सोलापूर, नासिक, खानदेश, इ०.

मागधदेश—गया जिल्हा.

मालवदेश—( माळवा ) इंदूर, उज्जनी इ०.

मेदपाटदेश—मेवाड, उदेपूर वगैरे.

मैथिल अथवा विदेहदेश—( जनकपूर ) गोरखपूर प्रांत.

मेंध्रुवदेश—दिल्ली, अग्रा इत्यादि.

यवनदेश—ग्रीसदेश वगैरे.

लाटदेश—( औरंगाबाद ) वेरूळ वगैरे.

वंगदेश—( बंगाला) चितेगाग व कामाक्षादेवी आहे तो प्रांत.

विदर्भदेश—( वऱ्हाड ) आकोला, उमरावती, वगैरे.

शूरसेनदेश—अलिगड अ० कोएल, मथुराप्रांत.

सिंधुदेश—सिंधप्रांत.

सिंव्हलद्वीप—( लंका ) सिलोन.

सौराष्ट्रदेश—काठेवाड, सोरटी सोमनाथ.

हूणदेश—तिबेटदेश वगैरे हिमालयाचे पलीकडील प्रांत, उत्तरभद्र उत्तरकुरु अथवा सिंधुदेश इत्यादि.

याप्रमाणें भरतखंडांतले ५६ देश ग्रंथांतरीं प्रसिद्ध आहेत.

हे देश जेथें देशाचें संस्कृत नांव येईल तें समजण्याकरितां प्राकृत भाषेंत दिले आहेत.

---

# घोड्यांचे जन्मदेश.

उत्तम अश्व सर्वांत अधिक गुणवान् असतात, तें पारशिक ( इराण ) तार्तरी, केकाण ह्या देशांत उत्पन्न झालेले असतात. हे पृष्टज ( पृष्ट भागाचे ठिकाणीं अधिक उंच ) असतात. उरोज ( उराचे ठिकाणीं विस्तीर्ण ) हे बुखार ( बुखारा ), भूपृष्ट आणि आंध्र या ठिकाणचे झालेले होत. तसेंच, हे पट्ट, सिंधू ( सिंध ) सारस्वत, समंग, आकूत आणि जटा ह्यादेशांत उत्पन्न झालेले असतात. त्यांचा दीर्घपणा बेताचा असतो. मान साधारण लांब असते. कान आंखूड असून, शरीर मोठें व ऊर रुंद असतो ते अश्व उत्तम होत. इति जयदेवकृते.

## नकुल कृते.

चार प्रकारचे घोडे भूमीचे ठिकाणीं देशविशेषाच्या सबधान

उत्पन्न झाले. ते उत्तम, मध्यम, कनिष्ट आणि नीच याप्रकारे होत. जाजिक, बुरसान, तुषाण ह्या देशांत उत्पन्न झालेले घोडे उत्तम होत. गोजिककाण, केकाण आणि पोटाहार या देशांतले घोडे मध्यम; गाद्दर, साहुराण, आणि सिंधुबार येथील कनिष्ट; आणि वरील देश शिवाय करून इतर देशातले नीच अश्व समजावे.

वर लिहिल्याप्रमाणें घोड्याचे जन्म देश सांगितले. मूळ घोड्याची प्रख्याती व त्याचा उपयोग आरबस्थानांत झाला असें जें इंग्लिशांच्या शोधांत आहे तें वास्तविक आहे. कारण घोड्याची उत्तम जात आणि त्याचे जन्म देश जे वर सांगितले त्यांत आपल्या हिंदुस्थानास लगत बुखारा आणि पारशिक ( इराण ) ह्या ठिकाणचे उत्तम घोडे असें लिहिलें आहे. यावरून अरबी घोडे उत्तम अशी जी ह्मण आहे ती खरी आहे. अरबस्थानांत घोडे ईजिप्तांतून आले असें इंग्लिशांचे धर्मपुस्तकांत जेकब महापुरुषानें लिहिलें आहे. यावरून आफ्रिकाखंड हें घोड्याचें मूळ जन्म स्थान शोध लागलेलें होय.

सांबराणी, जयनाथ, महा, माभुती, लातव, कलोती, या सहा देशांतले घोडे उत्तम समजावे. अस्सल आरबी घोड्याचें आयुष्य चाळीस वर्षे असेंत. आदन, बुखारा, जिवनीया, सफरा, खुरासान येथील घोडें उत्तम व बळकट असतात. यांचें आयुष्य बत्तीस वर्षें.

मुलतानचा घोडा लहान असून त्यास शक्ती फार असते.

विलायत, हुरमूज, अज्यनाग, नागळार, येवलें, येथील घोडे मोठे व पळणारे असे असतात.

कच्छ व विलायत येथील घोडा फार चांगला असतो.

ताजी ( आरबी, ) नरदीन, तुर्की, तुरासानी, ईराकी, यमनी, तार्तरी, खुतनी, आदनी, चिनी, माचिनी, तुराणी, काबुली, काश्मीरी, इराणी, भिवरथडी, काठेवाड, जंगल, भुटिया, रंगपूर, घोडाघाट, इजानीइजन, नजत, शामी, जंजिरे, बारकी, मिश्री, खपाजी, मगरीफ

( पश्चिमेकडील ), विलायती (इफीरखीर), मानदेश, केकाण, दक्षिण देश हेही घोड्यांचे देश आहेत. सदरीं सांगितले देशांपैकीं कांहीं देशचे घोड्याचें वर्णन पुढें सांगण्यांत येईल.

## पृष्टज.

आतां पृष्टजांचें लक्षण ह्मटलें ह्मणजे त्याचीं शरीरें स्थूल किंवा अस्थूल असतात. त्यांच्या पाठी लांबरुंद असतात. केकाण देशांत झालेल्या हलक्या प्रतीच्या घोड्यांचीं मुखें नावेच्या मुखासारखीं असतात, हें त्यांचें सामान्य लक्षण होय.

## उरुजा.

लांब व आंखूड शरीराचे ( चांगले लठ्ठ असून अतिशय तापट ) पाहिजेत तशीच शरीराची ठेवण सुरेख, व वाटोळी असून स्वभावानें जलाल, शरीरानें फार उंच, अथवा नीच नसून साधारण मध्यम आकाराचे असणारे घोडे ' उरुज ' जातीचे होत.

## तुरुष्का.

तुरुष्क देशांतील घोड्यांचीं शिरें व विशेषतः मुखें स्थूल असून त्यांचीं बाकी सर्व लक्षणें उरुज जातीचे अश्वा प्रमाणें असतात.

केकाण देशांतील घोडे मांडलिक असल्यामुळे ते सौम्य, शरीरानें धिप्पाड वगैरे गुणांनीं तुरुष्काचें साम्य पावत नाहींत.

सिंधु देशांतील घोडे शरीरानें बळकट असून बहुत सुख देणारे होतात. सिंधु देश कोणता याविषयीं तंत्रराजांत लिहिलें आहे कीं, लंकेपासून तों थेट मक्के पर्यंत असणारा जो डोंगरी मुलूख तो सिंधु देश होय.

## आननंचापि.

पक्क आणि सारस्वत (सरस्वती नदीच्या कांठचा देश) या देशांतील घोडे पराक्रमानें व वेगानें प्रख्यात व रणामध्यें मरदुमकी करणारे ताजीक देशांतील घोड्यापेक्षां स्वारावर अधिक प्रेम करणारे असून

शरीरानें उंच, आंगलोट, विस्तृत, पाठ व तोंड लांब व कान फार तिखट असे असतात.

कानाच्या पाळया लांब व गुढघे एकमेकांस लागणारे असले ह्मणजे तो अव्याल जातीचा घोडा समजावा.

दक्षिणेकडील घोडे लढाऊ असून शरीरानें लहान व सरळ आकृतीचे असतात. पूर्वेकडील घोडे अतिशय दुष्ट व चालण्यामध्यें कमकुवतीचे असतात.

वर सांगितलेल्या लक्षणांवरून घोड्यांचीं लक्षणें जाणावीं.

## राजकोशे.

सैंधवाश्व, रहवाल, यावन, इराखी, पारशीक, आरबी, जवत, कछी, विजायतीय, मुजतस, वाल्हीक, जहरी, मंद्रज, ताजी, पार्वतीय, टांकण या ठिकाणींचे घोडे वरील लक्षणाप्रमाणेंच असतात.

## गणकृताश्वायुर्वेदे.

कांबोज, वाल्हीक, वनायुज, गांधार, रद, चांपेय, सैंधव, तैतिल, कुलज, उपकुलज, मेचक, उपमेचक, त्रिगर्त, अर्जून, सावित्रेय, यौधेय, यावन, ऱ्हस्व यावन, तुषार, कंदर, पर्वत, अवंती, उरस्प, सकानन, मद्र पर्वतोत्तर, मद्र, कैकेय, अंतर्द्वीप, वासंतक, सौवीर, दारद, सैंधव, कैरावत, मालव, अवंति. कालिंग, मौग्दल, वानवार, तैलंग, क्रथन, प्रावृतक, सौराष्ट्र, पाल्क, कुरुक्षेत्र, पांचाळ, प्रोथक, कुकुशष ऱ्हस्वकुकुश इतक्या देशांत अश्वांची उत्पत्ति विशेषेंकरून होते.

अश्वांचीं कुलें १४ आहेत तीं पुढें सांगण्यांत येतील. शिवाय त्यांचीं कुलें आहेत तीं येणें प्रमाणें.

मंड, वक, वार्मतेय, मौलिक, श्वेतवाहन, चकोर, श्वेतगिरीज, वैदर्भवसामेय ( शेवटची जात हिमालय पर्वताच्या दक्षिणेकडील व पूर्वे कडील भागांत राहाते ) ॥ इतिअश्वोत्पत्तिः

# अथाश्वकुलानि.

शालिहोत्रांत सांगितलें आहे कीं, मागें सांगितलेल्या कुळांच्या पुत्रपौत्रांनीं काळें करून सर्व पृथ्वी व्यापली त्यांपैकीं कित्येक समुद्राच्या कांठावर जाऊन राहिले. यवन, कांबोज, ( यवन देश वायव्येस आहे व कांबोज देश पांचाल देशापासून म्लेंच्छ देशाच्या पूर्वेस व दक्षिणेस जो देश आहे त्यास ह्मणतात. ) हे देश व त्याच्या भोंवतालचीं अरण्यें त्याप्रमाणेंच शता (शतद्रु-सतलज), विविधाशा, काकधा, चंद्रभागा, सरस्वती, कौशिकी, गंगा, मेषवती इत्यादि नद्यांचीं तिरें यांमध्यें ते पसरले.

## केचित्पर्वताश्रिताः

आणखी कच्छ, कुकु, हिमालय, मलय, गिरिथि, गंधमादन, कुणीर, कैलास या पर्वतांमध्यें ते जाऊन राहिले.

## अथ देशाश्रितः

आणखी सौराष्ट्र, शूरसेन, काश्मीर, मंदभूमिक, पांचाल, कुकुर, वंग, गांधार, बर्बर, दशार्ण, सौवीर, मध्यप्रांत, कलिंग, विदर्भ इतक्या देशामध्यें ते जाऊन राहिले.

हिंगुलाजा पासून ४०० कोस पसरलेला गुजराथचा भाग सौराष्ट्र नांवाचा आहे ( ज्यास हल्लीं काठेवाड ह्मणतात ). मगध देशापासून ( बहार ) दक्षिणेकडे व विंध्याचलाच्या पश्चिमेकडे जो देश तो शूरसेन देश होय. काश्मीर हा देश उत्तरेस आहे. कुरुक्षेत्रा पासून पश्चिमेस, इंद्रप्रस्ता पासून उत्तरेस त्रयोदश योजन पर्यंत पांचाल देश होय. कुकुर हा देश उत्तरेस आहे. हस्तनापुरापासून ( दिल्ली )कुरुक्षेत्राच्या दक्षिणे कडील व पांचालाच्या पूर्व कडील भागास कुरुदेश ह्मणतात गांधार हा देश पूर्वेस आहे ( परंतु त्यास हल्लीं कंदाहार ह्मणतात. तोच तो असावा. ) या पुरापासून उत्तरेकडे सप्तशृंगा पर्यं-

ते बर्बर देश ( परंतु पुष्कळ लोकांचें मत असें आहे कीं, हा देश आफ्रिका खंडाच्या उत्तर टोंकाला जो बार्बरी ह्मणून देश आहे तो-च हा असावा ) दशार्ण हा एक उपदेश आहे ( अजमीरच्या आ-सपास प्रांताला हेंनांव आहे. मध्यदेश ह्मणजे अंतर्वेदी आहे सौवीर हा देश किंकरा पासून पश्चिमेकडे व शूरसेनाच्या पूर्वेकडे जो आहे तो. ओढ्याजगन्नाथ पासून दक्षिणेकडे कृष्णा नदीच्या मुखा पर्यंत क-लिंग देश होय. वज्राकार या स्थला पासून ब्रह्मपुत्रानदी पर्यंत देशाला वंग हें नांव आहे ( यास हल्लीं बंगाल ह्मणतात ) भद्र-काली पासून रामदूर्ग पर्यंत पश्चिमेकडील देश विदर्भ ( यास हल्लीं वऱ्हाड ह्मणतात ). क्रथ हा उपदेश आहे. कौशिक ह्मणजे जेथें कौशिक नदी आहे तो. हा आग्नेयींदिशेकडे प्रसिद्ध. आहे

घोड्यांची एकंदर ९४ कुळें आहेत ह्मणून मागें सांगितलें तीं येणें प्रमाणें:—मुख्य कुळें ४ कांबोज, वानायुज, आरट्टज, सैंधव. हीं होत.

तशींच उपकूळें ४ उपकुळ ह्मणजे मुख्य कुळें ज्या देशांत होतात, त्या-च्या जवळच्या देशांत त्या कुळा पासून झालेलीं कुळें तीं उपकुळें तीं ४ बाल्लिकेय हें कांबोजांचें उपकुळ होय. गांधार हें वानायुजांचें उप-कुळ चांपेय हें आरट्टजाचें उपकुळ. आणि तैतिल हें सैंधवाचें उप-कुळ होय. मेचक, उपमेचक, कुलज हीं चार अंतरकुळें आहेत. त्रैंगाल, आर्जुनेय, सावित्रेय, योधेय हीं चार तदमुस्थ कूळें आहेत. यावन, तुषार, विषमेय, कादंबरेय, वार्ष्मतेय हीं ५ पंचस्थ. अवंत्य, काश्मीर, सकाचक, पातीय, उत्तरांत, हीं ५ विषमेय कुळें होत. दक्षिणांत. माद्रेय, अंतर्द्वीपिक, कैकय, अंबष्ट हीं ४ अनूपज कुळें होत. वासंत, सौवीर, दारद, सैंधव हीं चार अपरांतक कुळें आहेत. क्षुद्रक, मालवक, ऐरावत, आवंत्यक हीं चार शूद्रकुळें आहेत. कालिंगक, मोकुल, वानवासिक, तैलिंग हीं चार दक्षिणात्य कुळें होत. क्रथन, अपावृतक, तौराष्ट, साल्वेय हीं चार वैशिम कुळें होत.

कुरुक्षेत्रज, पांचाल, वोष्टज, अपिसाज हीं चार बेसर कुळें होत. स्वाकज व हिमालयाच्या उत्तरेकडील प्रांतांतील हीं २ कुकुस कुळें. एक उत्तर कूळ. मंतावक, अश्मकेश, मौत्किल, चकोरक, श्वेतशैलज, वैदर्भिक, पूर्व हैमेय, दक्षिण हैमेय, सामेय हीं नऊ कुळें घोटक होत. याप्रमाणें चार कुळें, चार उपकुळें, चार अंतस्थ कुळें, चार तदनुस्थ कुळें, पांच पंचमस्थ, पांच विपमेय, चार अनुपज, चार अपरांतक, चार वैशिम,चार बेसर, दोन कुकुस, एक उत्तर, नऊ घोटक, अशीं एकंदर कुळें ५४ व त्यांखेरीज मुख्य कुळें व उपकुळें आठ आहेत.

या प्रमाणें कुळें सांगून देशादेशाच्या ठायीं होणाऱ्या अश्वांचीं भिन्न भिन्न चिन्हें, स्वभाव वगैरे कथन करतों.

## तत्रादौकांबोजाश्व प्रशंसा.

( कांबोज्यांची लक्षणे. )

कांबोज देशांतील घोडे सर्वांहून श्रेष्ट होत. रुप, तेज, वेग इत्यादि गुणांनीं यांची बरोबरी दुसऱ्यांच्यानें होत नाहीं. हे कुलीन, चांगल्या स्वभावाचे, दमदार, बळकट, क्रूर नव्हत असे, धन्याचे हितकरणारे, सुंदर, शुभकारक असे आहेत.

यांची हनुवटी व कपाळ हीं मोटीं असतात. तोंड लांब असतें. पावलें व पायाचे घोटे थोडे उंचावलेले, माज्या भरदार, शरीराच्या मानानें पोट सडपातळ, शरीराचा बांधा उंच व थोडा डौलाचा, शंकूच्या आकाराचे कान, बेडकाच्या डोळ्या प्रमाणें डोळे उचलून आलेले, मान लांब, शरीरावरील केश तुळतुळीत, अंगावरील कांतडीं मऊ, ते घोडे काळ्या, तांबड्या, पांढऱ्या रंगाचे असले तरी त्यांचा तोच रंग कायम राहातो, विटत नाहीं, सदां आनंदांत असून खिकाळत असतात, इतकीं लक्षणें त्यांचीं आहेत.

## तेषामुपकुलजाबाल्हिकाः

( बाल्हिकांचीं लक्षणें. )

त्या कांबोजाचें उपकुलज बाल्हिक देशांतील अश्व होत. हे रुपानें, गुणानें, व पराक्रमानें, कांबोज देशांतील घोड्या सारखे असतात. यांकरितां त्यांतील विशेष भेद काय काय याचा निर्देश करितों. शरीराचे अवयव लांब, पाठ रुंद, कांतडीं मऊ, मांडया आंखूड व भरदार, शरीरावर ठिपके ठिपके असतात. शरीराची पुढील बाजू उचललेली, लांबी रुंदीनें कांबोजच्या घोड्यापेक्षां किंचित् वरिष्ठ, या प्रकारें करून शरीरानें असतात; व ते शरीरानें प्रायःपिंगट रंगाचे असतात.

हे उदार मनाचे, धन्या विषयीं प्रेमळ, प्रसंगीं पराक्रम करणारे, स्थिर, संकटामध्यें कधींही स्वाराला सोडणारे नव्हेत असे असतात.

## अथवनायुजदेशस्थाः

(वनायूज देशांतील अश्वांचीं लक्षणें.)

शरीरें फार उंच नाहींत परंतु फार लहानही नाहींत. तीं मध्यम प्रमाणानें असतात. पुढली शरीराची बाजू उचललेली, तोंड लहान, डुकरा सारखे डोळे तीक्ष्ण, शंकू सारखे कान, शरीराचा बांधा बळकट व वाटोळा, नाक उंच, पाठ आणि त्रिक हीं लहान, चालीनें वरिष्ट, उदार स्वभावाचे, गर्धभाच्या खुरा प्रमाणें ज्यांच्या कडा अतिशय खोल व मोठे असे खूर, प्रत्येक कामाच्या ठिकाणीं स्थिर, पुष्कळ मजल करणारे, मनस्वी ओझें घेणारे, शरीरानें बळकट व वेगवान् असे असतात. त्यांना जें काम शिकवावें तें ते लक्ष लावून शिकून त्यांत लवकर प्रवीण होतात. त्यांचा रंग बहुधां काळा असतो. ते दम, तेज, बळ यांही करून वरिष्ट असे असतात.

## तदुपकुलस्थाः

( उपकुलज गांधार याची लक्षणे. )

त्यांचे डोळे काळे व भुरे प्रायशःअसतात. त्यांचे रंग काळवीटासारखे अथवा तांबडे लाल अथवा दुसऱ्याही कित्येक रंगाचे असतात. त्यांचीं शरीरें बळकट व धिप्पाड, अंगावर ठिपके ठिपके, पुढल्या भागापेक्षां मागला भाग अंमळ बारीक, बारीक व लांब मुख, अयाळीचे केंश रांठ अशा लक्षणाचे असतात. हे मोठे रागीट, पराक्रमी व बळकट असे असतात.

## अथ आरददेशस्थाः

( आरद (आरब) देशांतील अश्वांचीं लक्षणे. )

यांच्या पाठी लहान, मुखें सुरेख, डोळे पाणीदार, शरीरावरील केंश बारीक व मऊ, पुढली बाजू विस्तारलेली व उंच, कांतडीं मऊ, कान लहान असून शंकूच्या आकाराचे, घोंव्यावर केंश असून ते थोडे उचललेले, कमरे मध्यें बळकट, तांबड्या रंगाचे अथवा शुभ्र पांढऱ्या रंगाचे अथवा पांढऱ्याच्या जवळ जवळ असणारे जे दुसरे वर्ण त्या वर्णांनीं युक्त, पुढल्या बाजूच्या पायानें सहज लीला करणारे, पायाच्या नखांनीं पाणी उडविणारे, दोन पायामधील अंतर्भूत जागेमध्यें पाय आपटून क्रीडा करणारे, मोठ्या वेगाचे व मोठ्या बळाचे या प्रकारचे घोडे आरदज कुळापैकीं जाणावे.

## तेषामुपकुलेजाताःचांपेयाः

( उपकुलज चांपेय याचीं लक्षणे. )

पाठ लहान, ज्याचे कित्येक इंद्रियाच्या ठिकाणीं विवक्षित सुगंध येतो. पाय लहान, मांड्या हरिणा सारख्या, शरीरावरील प्रत्येक अवयव मांसल, शरीरावरील केंश तुळतुळीत व बारीक, या लक्षणांनीं युक्त आणि तेजस्वी ,दमदार, बळकट असे असतात.

## अथ सैंधव देशस्थः

( सैंधव देशांतील अश्वांचीं लक्षणें. )

यांचे पाय स्थिर, यांच्या मांड्या सडसडीत, डोळे टपोर, मान लांब, अयाळ बारीक केंसाची, शरीरें मोठीं, कांतडीं मऊ, खालचा ओंठ बारीक, प्रोथ प्रदेश मोठा, घोडीच्या पोटा प्रमाणें पोट, मेहन आणि वृषण हीं लंबायमान, शेंपूट वांकडें, पृष्ठ आणि मुख असावीं तशीं लांब आणि विस्तृत, कुलवान, शीलवान, बळवान, दमदार, शिकवावे त्या कामांत प्रविण असे असतात.

## तेषामुपकुलस्थास्तैतिलाः

( त्यांच्या उपकुलां मधील झालेले तैतील यांचीं लक्षणें. )

मान आणि पाठीवरील आसनस्थान हीं दोन्ही स्थूल, मांड्या भरदार, डोळे विशाळ, शरीरावरील केंश व अयाळीचे केंश हे रांठ, गुदस्थानचे फल मोठें, तसेंच कपाळ व ऊर हीं विशाळ, डोकें आणि विशेषें करून तोंडाचा खालचा ओंठ हीं सदां उर्ध्व, पाय बळकट, प्रत्येक अवयव सुरेख, दमदार, बल आणि वेग इहीं करून युक्त, मंद बुद्धीचे, मार्गामध्यें कितीही ओझें अथवा क्लेश पडले तरी न जुमानणारे, तहान व भूक हीं सोसून मजल काटणारे, या प्रकारें करून लक्षणाचे असतात.

## अथ मेचक लक्षणः

( मेचकांचीं लक्षणें. )

ज्यांचा संस्थान प्रदेश उत्तम, वक्षस्थळ विशाळ, शंकु सारखे कान, खालचा ओंठ लहान, मदानें धुंद झालेले डोळे, लांब रुंद व मऊ कांतडीची अशी मान, जत्रु प्रदेश ( मान आणि स्कंद यांच्या मधील भाग ज्यास वह असें ह्मणतात ) वर आलेला, शरीराचा झोंक वाटोळा, आसन प्रदेश विस्तृत, मांड्या आणि जंघा लहा-

न व वाटोळ्या, कुक्षि प्रदेशाचीं हाडें लहान लहान, कमर बारीक, पोट सडपातळ, सर्व शरीरावर रोम ह्मणजे बारीक केंश, स्वभावानें फार क्रूर नव्हेत आणि मृदुही नव्हेत. नाना प्रकारचे रंगाचे विशेषें करून पाटल पुष्पा प्रमाणें रंगाचे, मार्ग चालणें, भार वहाणें, शौर्य, तेज, बल, वेग इत्यादि सर्व गोष्टींत मध्यम प्रतीचे असतात.

### अथोपमेचकाः

( उपमेचकांची लक्षणें. )

शरीरानें लहान, शेंपटाचे आणि अयाळांचे केंश रांठ, कांतडीं मऊ, मान सदां उंचावलेली, यांचे खूर दुर्बळ, तोंडाची आकृती चांगली नाहीं, उरस्थळ अगदीं लहान, नेत्र विरुप, हीं लक्षणें उपमेचकांचीं होत.

### अथ कुलजाः

( कुलजांचीं लक्षणें. )

पाठी लांबरुंद, गुदस्थानचें फल लहान, मान वाटोळी, मुख सदां खालीं, कंबर बारीक, शेंपटाचे केंश लांब, अयाळीचे केंश बारीक, ऊर लहान अशा लक्षणाचे अश्व कुलजजातीचे होत.

### उपकुलजाः

( उपकुलजांचीं लक्षणें. )

शरीरानें लहान, मान, मांड्या, कुक्षि हीं लहान; शेंपटाचे केंश लांब, व क्रूर स्वभावाचे परंतु पराक्रम फार थोडा, तेजोहीन, मंद बुद्धीचे, अल्प बलाचे, बाकी सर्व लक्षणें कुलजजातीचीं.

### तदनुस्था स्त्रिगर्ताः

( त्रिगर्तांचीं लक्षणें. )

मान बारीक, ऊर विस्तृत, शेंपटाचे केंश व अयाळ यांचे केंश रूक्ष, पायाचे खूर बळकट, क्रोड ( उरा खालचा भाग ), तोंड व

केंश मऊ हीं सर्व सशा सारखीं असतात. प्रायः गर्दभा सारखा रंग, बळवान् असून क्रूर नसणारे, रागीट असून कमी पराक्रमी असे असतात.

## आर्जुनेयाः

( अर्जुनेयांचीं लक्षणें. )

ऊर विस्तृत, डोळे मोठे, अयाळीचे केंश रांठ, कुत्र्यासारखीं तोंडें, गुद स्थानचें फल मोठें, खांदे उंच, मान मऊ, काळा अथवा त्याजवळचा रंग ज्यास प्रायशः असतो, स्वभावानें कांहींसे क्रूर असे असणारे घोडे आर्जुनेय होत.

## सावित्रेयः

( सावित्रे यांचीं लक्षणें. )

सावित्रेय जातीच्या अश्वांचीं लक्षणें अशीं आहेत कीं, त्यांच्या पाठी लहान, मांड्या विस्तीर्ण, शेंपूट आणि अयाळ यांचे केंश रांठ, खूर बळकट, शरीर मांसल, सर्व शरीराला सुगंध येतो, शरीर मऊ, डोळे मोठे, पाय लांब, कटि प्रदेश लांब, शरीरानें धिप्पाड, शूर अशीं असतात.

## अथ योधेयाः

( योधेयांचीं लक्षणें. )

कान लहान, खालचा ओंठ लहान, अंगलोट वाटोळा व विस्तृत असा, मान खालीं, कमर, मांडी, आणि कुक्षि हीं वाटोळीं, शेंपटाचे केंश लांब, कांहींसा पिंगट, मुख लांब, ऊर विस्तृत, कांतडीं मऊ, सूक्ष्म केंश, मजल काटणारे, भार वहाणारे, आणखीं त्यांचीं लक्षणें सांगतों. त्यांचीं ललाटें विस्तृत, नेत्र मोठमोठाले असे असतात. सुंदर मुखें लंबायमान, ऊर अरुंद, कांतडी मऊ, केंश बारीक, शंकूसारखे कान, चाल जलदीची, यांच्या पाठी लांब, रुंद मांड्या व त्या भोंवताळचा प्रदेश हा मांसल, यांचे खूर एकमेकांना लागलेले,

प्रत्येक कामीं स्थिर, स्वभावानें गंभीर, दमदार, बलवान्, तेजस्वी, शरीरें धिप्पाड, ज्यांचें दर्शन झालें असतां तत्क्षणींच आनंद व्हावा असे असतात.

## यावनाश्वः

( यावनाचीं लक्षणें )

पुढले दोन पाय किंचित् लांब असून शरीराची घडण लहान, शरीर वाटोळें, सर्व अवयव पूर्ण, स्पष्ट, सडसडीत, केंश व रोम ( शरीरावरील केंश ) हे बारीक नरम, वर्णानें, तेजानें, बलानें श्रेष्ठ, स्वभाव थोडा कर्कश, खेळकर, धन्यावर प्रीति करणारे असे असतात.

## तुषाराः

( तुषारांची लक्षणें. )

शरीरावरील केंश रुक्ष असतात. मजल करणारे असून ओझें पुष्कळ घेणारे, मधुर शब्द करणारे, बळकट खुराचे, आरंभिलेलें काम तडीस नेणारे, तेज, बळ, इहीं करून युक्त या प्रकारचे लक्षणाचे व दुसऱ्याही कांहीं किरकोळ भेदांनीं युक्त असे तुषार अश्व असतात.

## विषमेयाः

( विषमांची लक्षणें. )

कुक्षिप्रदेश लहान, शरीर वाटोळें, डोकें व मान सदां वर उचललेली, पोट सडसडीत, पाठीवर भोंवरे, उरस्थळें विस्तृत, चाल जलदीची, शरीरावरील केंश बारीक, प्रायः पांढऱ्या रंगाचे, असे असले ह्मणजे विषमेय अश्व समजावे.

## कादंबरेयाः

( कादंबरांचीं लक्षणें. )

आंगलोट सुरेख, पाय बळकट, कुक्षिप्रदेश उत्तम, कांतडा जाड,

रोम बारीक व नरम शेंपूट व मानेवरील अयाळ यांचे केंश रांठ, ज्यास कधीं कोप येत नाहीं, सुशील असे कादंबरेय अश्व जाणावे.

## वार्ष्मतेयाः

( वार्ष्मतेयांचीं लक्षणें. )

मनुष्या सारखी मान, शरीर लहान, कुक्षिप्रदेशीं उत्तम, शरीराचा मागला भाग सर्वत्र सारखा, पुढला भाग अढळ, पोट सडसडीत, पाठ लहान, शीलवान् व बलवान या प्रकारचे वार्ष्मतेय अश्व जाणावे.

## आवंत्याः

( आवंत्यांचीं लक्षणें. )

शरीरें स्थूळ, कुक्षिप्रदेश बळकट, पोट सडसडीत, पाठ रुंद व लांब, ऊरस्थळ विशाळ, बहुतकरून तांबडा व त्याजवळचा रंग यानें युक्त असे अश्व अवंतिदेशीय जाणावे.

## क्रथेयाः

( क्रथेयांचीं लक्षणें. )

जंघा व उरू मोटमोठ्या, मऊ तुळतुळीत केंश, पाठ बळकट, रंग पांढरा अथवा त्याजवळचा, ऊर विशाळ, या लक्षणांनीं युक्त अश्व क्रथदेशांतील जाणावे.

## काश्मीरकाः

( काश्मीरांचीं लक्षणें. )

शरीरें धिप्पाड, तेजस्वी, प्रत्येक अवयव सुरेख, सुंदर आणि विस्तृत कपाळ, जलदी चालणार, कांतडीं मऊ, रोम नरम, पाठ रुंद, मुख लांब, बलिष्ट, स्वभावानें क्रूर, शरीराची घडण बळकट, तांबडा किंवा त्याजवळचा रंग, अशा लक्षणांचे अश्व काश्मीरक जाणावे.

## सकानकाः

( सकानकांची लक्षणे. )

सकानक या नांवाची एक नदी आहे त्या ठिकाणीं होणारे घोड्यांस हें नाव आहे. या घोड्यांचा पुढला भाग उंच असून मागला भाग सखल असतो. त्यांची मान मृदु, अरुंद, लांब, शेपटाचे केश हे लांब, दांत तीक्ष्ण, भुराप्रमाणें डोळे, घोडा अथवा घोडी पाहिली असतां खिंकाळून त्यावर चालून जातात शंकुसारखे कान, मुख लांब, पार्श्व आणि उदर ही लंबायमान, शंख (गलप्रदेश) व तलपार्ष्णि प्रदेश हे रोम युक्त, गात्रें उन्नत, जघन भाग मोठे अशा प्रकारचे असतात.

## पार्वतीयः

( पार्वतीयाची लक्षणे. )

बारीक मान, जघन आणि वक्षस्थळें हीं मोठीं, गात्रें आणि पृष्ट भाग ही लंबायमान, शेंपूट आणि मान यांचे केश लांब, पाय बळकट, वेगानें जबर, बलवान्, याप्रकारचे पार्वतीय जात्युत्पन्न अश्व जाणावे.

## अनुपोत्तर माद्रेयाः

( अनुपोत्तराची लक्षणे. )

शेंपूट आणि मान यांवरचे केश रांठ, खुर बळकट, मान जाडी, कान लांब, मजल लांब करणारे. परंतु ते कोणच्याही जरूरीच्या कामाला लावण्या इतके प्रमाणिक नाहीत, कारण ते शिलवान् नव्हेत. त्यांस धरण्यास कठीण पडतें. शिवाय त्यांस रूप करणें हीही गोष्ट कठीणच होय. ते रंगानें पिंगट, शुभ्र पांढरे अथवा त्याजवळच्या रंगाचे असे असतात.

दक्षिणसमुद्र देशांतील अश्वांचे स्वभाव वगैरे सर्व याप्रमाणेंच आहेत. विशेष इतकें आहे कीं, हे थोडे गरीट व आळशी असतात.

## अंतर्द्वीपेयाः

( अंतर्द्वीपांचीं लक्षणें. )

इरावति, विपाशा ( रावी ), सतद्रु ( सतलज ), चंद्रभागा, इतक्या नद्यांच्या तीरावर व आंतील बेटावर होणारे अश्वांस अंतर्द्विपेय अश्व ह्मणतात.

सरस्वतीच्या जवळचे अंतर्द्वीपेय जातीचे जे आश्व आहेत त्यांचीं लक्षणें अशीं आहेत कीं, यांच्या पाठी लांबरुंद, मान लांब, शुभकारक व्यंजन ( डाग ) शरीरावर असणें, उत्तम शिलवान अशा प्रकारचे असतात.

## कैकेयः

( कैकेयांचीं लक्षणें. )

हे शरीरानें उंच, वरचा ओंठ व एकंदरीनें तोंडही लांब, मान लांब, श्वास बहुत, शेंपूट आणि अयाळ हीं लांब, रस्त्यामध्यें बहुत मजल करणारे, बहुत शब्द करणारे, पाय बळकट असून बाकी सर्व लक्षणें यवन अश्वासारखीं असलीं ह्मणजे ते कैकेयक जातीचे अश्व जाणावे.

## अंबष्टकाः

( अंबष्टक अश्वांचीं लक्षणें )

खांदे उंच, मान वाटोळी, मुख प्रदेश किंचित वक्र, रंग थोडा पांढरा, शरीरें उंच, वक्षस्थळ विशाळ, कान व मेहन ( गुद ) हीं लांब, आस्कंद मोठा, कुर्च, मांड्या आणि कुक्षि हे प्रदेश विस्तृत या प्रकारचे घोडे आंबष्टक जातीचे जाणावे.

## वासंतकाः

( वासंतक अश्वांचीं लक्षणें. )

मान लांब, हरिणा सारखें पोट, पाठ लहान, कान आणि मेहन हीं लहान, पाय बळकट, कुक्षि प्रदेश उंच व विस्तृत, ऊर आणि मां-

ज्या यामध्यें बळकटी, स्वभाव क्रुर, या प्रकारचे वासंतक अश्व जाणावे.

## शिबीरकाः

( शिबिरक अश्वांची लक्षणें )

पाठ लहान, इंद्रियें बळकट, उड्डाणयुक्त गति, दोन पायांमधील अंतरांत क्रिडा करणारे, हुकूमांत वागणारे, प्रत्येक अवयव पूर्ण अशा प्रकारचे घोडे सौवीरक जातीचे जाणावे. शिवाय त्यांचीं लक्षणें अशीं आहेत कीं, मांड्या लहान, कुर्च प्रदेश लहान, बुद्धि थोडी, पोट, डोकें, खांदे हीं मोठीं आणि प्रसंगीं मोठा पराक्रम करणारे, बलवान, वेगवान उंच असे असतात.

## दरदाः

( दरद अश्वाचीं लक्षणें. )

डोळे लहान, पुच्छ व पाठ हीं लहान, बाकी सर्व लक्षणें सौवीरक अश्वांप्रमाणें जाणावीं.

## सैंधवाः

( सैंधव अश्वांचीं लक्षणे. )

केंश व शरीरावरील रोम हीं गंठ, कांतडीं जाड, खांदे, मांड्या हीं मोठीं, श्वास पुष्कळ, कुक्षि व पोटऱ्या हीं स्थूल, शरीरें धिप्पाड, मव्य, शूर, बलवान असे सैंधव अश्व होत.

## क्षुद्रकाश्वाः

( क्षुद्रक अश्वांची लक्षणें )

खुर बळकट असून मोठे, कान आणि मेंढ्र हीं दीर्घ, मांड्या भरदार असून विस्तृत, शरीराचा आंगलोट विस्तृत व वाटोळा, सुरेख, कुशळ, तेज, बल, वेग इहीं करून युक्त असे क्षुद्रक अश्व जाणावे.

## मालवाः

( मालव अश्वांची लक्षणे )

यांच्या मांड्या विस्तृत, पुढली बाजू उचललेली, ओंठ लांब, कान लांब, मान आखुड असून उंच, सुंदर व तेजस्वी असे हे अश्व असतात.

## ऐरावताः

( ऐरावत अश्वांची लक्षणे. )

यांचे अस्थि आणि मांस हीं स्थूल असतात. कान रुक्ष, वेगहीन, बुद्धिहीन असे ऐरावत अश्व जाणावे.

## अवंत्यकाः

( अवंत्यक अश्वाचा लक्षणे )

कान लांब, जघन आणि ऊर व मान यांचा आकार मोठा, मानेवर ठिपके, मुख वांकडें, मागला भाग बारीक, शरीरावर ठिपके लहान लहान, केंश लांब, तळवे मृदु, बळानें आणि वेगानें मध्यम, बहुशः मृदु शरीराचे, नानाप्रकारचे रंगाचे, स्वभावानें स्थिर, सुशील, कोणच्याही स्थितीत सुख मानणारे असे अवंत्यक अश्व जाणावे.

## कालिंगकाः

( कालिंगक अश्वांची लक्षणे. )

कान लांब, पाय स्थूल, खुर बळकट, मागला भाग पुढल्या भागाशी विषम, पाठीवरील हाड उंच असल्यानें कुब्ज दिसणारे, शरीरें लांबरुंद, मान दंडाप्रमाणें सरळ, तोंड वांकडें, मेहन ( गुद ) लांब, तेज आणि बळ यांनी हीन असे कालिंगक अश्व जाणावे.

## मौकुलाः

( मौकुल अश्वांचीं लक्षणें. )

केंश रांठ, पाठ व जघन प्रदेश हीं लहान, साधारण सर्व अवयव

लहान, कुक्षि व पोटऱ्या हीं स्थूल, आमन प्रदेश विस्तृत, त्यांस उत्साह नसून बल आणि तेज यांहीं करून हे कमीच असतात, तरी ते तापट, व बुद्धिहीन असतात.

### वानवासिकाः

( वानवासिक अश्वाची लक्षणे )

दक्षिणेकडील प्रांतात जीं अरण्यें आहेत त्यांमध्यें एका प्रकारच्या घोड्याची जात आहे, तिचीं लक्षणें सांगतों:—

पृष्ट, मांड्या आणि जघन हीं लहान, पुढली बाजू संहत ह्मणजे जुळून आलेली असून मागची बाजू त्याप्रमाणें नसते. पाय बळकट, थोड्या आयुष्याचे, दम, तेज, वेग यांहीं करून युक्त, शांत स्वभावाचे असे ते असतात.

### वैशिमाः ( तैलिंगाः )

( वैशिम अश्वाची लक्षणे )

हे अश्व तैलंगण देशामध्यें होतात. यांचे खांदे व ऊर हीं विशाळ असून रागीट व क्रुर कर्म करणारे असे असतात.

### क्रथनाः

( क्रथन अश्वाची लक्षणे )

कान लांब, मांड्या मोठ्या, जघन प्रदेश विस्तृत, सर्व शरीराचे अवयव उचललेले परंतु मागला भाग नीच असतो. पुच्छ, लांब, कुक्षिप्रदेश मोटा, रंग अगदीं भिकार, तेज हीन, गात्रें मंद, अशा प्रकारचे अश्व क्रथन कुळांतील होत.

### उपावृत्तकाः

( उपावृत्तक अश्वांची लक्षणे. )

पच्छ लांब, कुक्षि प्रदेश मोठा, कान लांब, खांद्यावर ठिपके, वृष-

ण, मेहन आणि सृक्क ( वरचा ओंठ ) हीं लांब, पाठ रुंद असून वरील हाड उंच, बहुत करून पिंगट रंगाचे असे अश्व उपावृत्तक जाणावे.

### सौराष्ट्राः

( सौराष्ट्र अश्वांचीं लक्षणें. )

यांचे पाय स्थूल, बळकट आणि रोमयुक्त, पार्ष्णि दीर्घ आणि विस्तीर्ण, मागला भाग उंच, पोटऱ्या, मांड्या आणि कुक्षी हे अवयव स्थूल या प्रकारचे अश्व सौराष्ट्र कुळांतील होत.

### साल्वेयाः

( साल्वेय अश्वांचीं लक्षणें )

यांचे अवयव मंद, कुक्षि लहान, लांब, बारीक आणि मृदु अशीं मान, कान लांब, ऊर विस्तृत, मागल्या दोन पायांनीं विशेष उड्डाण करणारे, रुक्ष, बारीक, असे केश (शेपूट व अयाळ यांचे), स्वभावानें रागीट असे हे अश्व जाणावे.

### कुरुक्षेत्रजाः

( कुरुक्षेत्रज अश्वांचीं लक्षणें. )

शरीराचा पुढील भाग विस्तृत, खांदे उंच व पाठ लांबरुंद, मागल्या भागामध्यें वेग विशेष, असे अश्व कुरुक्षेत्रांतील जाणावे.

### पांचालाः

( पांचाल देशांतील बेसर जातीच्या अश्वांचीं लक्षणें. )

तोंडें लांब, कुक्षि मोठ्या, विस्तृत व लवलेली पाठ, गात्रें मृदु, पाय सुरेख पण त्यांत पुढले दोन पाय बळकट, तेजोहीन, आरोहण करण्यास कठीण असे हे अश्व जाणावे.

### ओठजाः

( ओठज जांगालाश्रीत अश्वांचीं लक्षणें. )

सर्व शरीर स्थूल, पाठ लांब, पोट लहान, ओंठ व कान हे

लांब, डोंके व त्यांत तोंडें हीं मोठीं मांसल. सर्व शरीरावर मांस जमलेलें, केवळ भार वहाण्यास योग्य, शरीरावरील केंश बळकट, वेग अगदीं मंद असे हे अश्व जाणावे.

## अभिसाराः

( अभिसार अश्वांचीं लक्षणें. )

यांचे पुढले दोन पाय स्थूल, बाकी सर्व शरीर लहान असून यांचे कान उभे असतात. हे बहुत व्रात्य असल्याकारणानें त्यांना शिकविण्यास व ताब्यांत ठेवण्यास कठीण पडतें, परंतु हे शिकले तर चांगले वेगवान होतात याकरितां त्यांचा उपयोग चांगला विशेष होईल.

## काचकाः

( काचक अश्वांचीं लक्षणें. )

शरीरावरील केंश बारीक, मेहन लहान, पाठ लहान, मान बारीक, मेंढ्र प्रदेशांचें ( गुदस्थानचें ) फल लहान, पाय स्थिर ( मंदगती ), तेजहीन, दम थोडा, साराख्या रूपरंगाचे, खिखाळणारे असे हे काचक अश्व होत.

## ऱ्हस्व कौशलाः

( ऱ्हस्व कौशल अश्वांचा लक्षणें. )

यांचे अवयव लहान, चतुर, शरीराचा विस्तार लहान, गति मंद, अशा प्रकारचे अश्व ऱ्हस्व कौशल जाणावे.

## कुकुसः

( कित्येक अश्व जातीच्या अभिसारापासून झालेले कुकुस या नांवाच्या जातीचें कुळ आहे त्याचें लक्षण. )

ऱ्हस्व कौशल्य जातीचे अश्व याच लक्षणाचे जाणावे.

## हिमवत्युत्तराः

( हिमवत्युत्तर अश्वांचीं लक्षणें. )

शरीराची उंची विशेष, कुक्षि लहान, पाय स्थूल, शीर मोठें, पुढली बाजू जमून आलेली असून मागली बाजू तशी नसते, पायांचे खूर बळकट, वेगवान या लक्षणाचे ते अश्व जाणावे.

## घोटकाः

( घोटक अश्वांची लक्षणे. )

आतां घोटकाचीं कुळें ९ आहेत ह्मणून सांगितलें तीं लक्षणांसह येथें सांगतों:—

१. नेत्र मोठे व पाणीदार, मुष्क ( वृषण ) लहान, पाय बळकट, कुरु आणि अश्मार्क देशांत होणार असतात.

२. डोळे मोठे, मान व डोकें यांमधील संधि ( स्नायु ) स्थूल, सद्गुणसंपन्न असे मंतावक जाणावे.

३. वरील लक्षणाचे चकोरक अश्व जाणावे. विशेष इतकाच कीं, यांचे कान आंखूड व शेपूट लांब असतें.

४. चकोरकामध्यें व श्वेतशैलजामध्यें विशेष फरक नाहीं, परंतु श्वेतशैलज हे काळ्या किंवा त्या जवळच्या एखाद्या रंगाचे अश्व असतात.

५ वैदर्भिक हे सुरेख, चंचळ व उत्साहवंत असे असतात.

६. पूर्व हैमेय, दक्षिण हैमेय आणि माम्येयक या तिन्ही जाती सारख्या आहेत. त्यांची लक्षणें हींच कीं, ते तापट, वेगवान व दमदार असे असतात.

९. मामेचकांची लक्षणें अशी आहेत कीं, इतरापेक्षां हे थोडे उंच असून यांचें कूचें उंच व वर्तुळ, डोळे मोठमोठे, कुक्षि उचललेल्या असतात. हे नाना प्रकारच्या वर्णाचे असतात.

या प्रकारच्या १४ कुळांचे अश्व सांगून उत्तम, मध्यम व कनिष्ट कोणते याचा निर्णय येथेंच सांगतों:—

कांबोज इत्यादि कुळें व सर्व उपकुळें हीं श्रेष्ट.

अपरकुळें व अंतस्थकुळें हीं मध्यम.

शेष राहिलेलीं सर्व कुळें कनिष्ट होत.

याप्रमाणें मुख्य कुळें ४, उपकुळें ४ आणि उपकुळांचीं पोटकुळें १४ यांचीं लक्षणें सांगितलीं. आतां याशिवाय आणखी जीं उपकुळें आहेत त्यांचीं लक्षणें सांगतों:—

## मागधाः

( मागध अश्वांचीं लक्षणें. )

रोम बारीक, कुक्षि लहान, शरीर निर्मांस, आहार थोडा, अल्पायुषी, निरुत्साह, तेजहीन परंतु दमदार, ओंठ व कान हे लांब, हीं लक्षणें मागधांचीं आहेत.

## अर्धमागधः

( अर्धमागध अश्वांचीं लक्षणें. )

हिमालयाच्या आसपास दक्षिणेकडे, मगध देशाच्या पूर्वेस व पश्चिमेस होणारे ज्यांची पुढली व मागली बाजू अगदीं हीन ह्मणजे बेढब, शरीरें लहान, मुखें लहान, बहुत करून पिंगट रंगाचे, हे बलहीन, शिक्षण लवकर न घेणारे, सदां सर्वदां क्षुधित व तान्हेले, भार वहाण्याच्या व साधारण कामाच्या उपयोगी असे हे अश्व जाणावे.

## चोटकाः

( चोटक अश्वांचीं लक्षणें. )

शरीरानें लहान, तेजोहीन, जरूरीच्या व वजनदारीच्या कामास योग्य, बुद्धीनें व चालीनें मंद असे हे जाणावे.

## अनेक देशांतल्या उत्पत्तीमुळें कुळांचा भेद.

ज्या देशांत जो घोडा जन्मला त्या देशाचें नांव व गुण त्या घोड्यास प्राप्त होतात. जसें—शिंदी, काठेवाडी, आरबी, काबली, भिवरथडी अथवा दक्षणी, पहाडणी, पेगू, मारवाडी, कच्छी, माळवी इत्यादिं.

१. शिंदी घोड्याचें नाक मेंढराचे नाका सारखें उंच आकृतीचें असून तो देश रेतीचा असल्या कारणानें चाल कांहीं प्रकारें रेतींत चालण्याप्रमाणें असते. ही जात काठेवाडी घोडीपासून उत्पन्न आहे ह्मणून जितक्या जाती काठेवाडींत आहेत तितक्या शिंदींत असतात.

२. काठेवाडी घोडे कडक, शरीरानें पातळ व देखणे असतात. यांत दुसऱ्या जाती बहुत आहेत. जसें—१ फुलमाळिया. २ माणिक्या. ३ बोरिया. ४ ताजणिया. ५ केशऱ्या. ६ भुतडीया. ७ रेडिया. ८ मलिया. ९ बोदालिया. १० लखिया. ११ कशिया. १२ शिंगाळिया १३ वांदरिया. १४ चवरढाळ १५ जखामिया. १६ हरणिया. १७ मारूया. १८ डोंलर. १९ रेशमिया. २० लखमिया. २१ वागळिया. २२ बेगडीया. २३ चटपंख्या. २४ नागफण्या. २५ बहेरिया. २६ सारटिया. २७ रिमीया. २८ बोजळिया. २९ चिंतामणी. ३० अगरिया. ३१ परवाळिया. ३२ मोरध्वज. ३३ पारखमाणि. ३४ पटैया. ३५ पोपट. ३६ छलवल. ३७ तोखरिया. ३८ साखळिया. ३९ कावर. ४० धुमटि. ४१ कालडि. ४२ बचनाग. ४३ कागडीया. ४४ पंखळिया. ४५ हसाळिया. ४६ मणिया. ४७ आखाडिया. ४८ रामपहा. ४९ पारेवेयु. ५० काळिभार. ५१ शिनया. ५२ चांग्या. ५३ पुताळिया. ५४ उतावळिया. ५५ तेजा. ५६ विछपिया. ५७ खखारिया. ५८ सोंसळीया. ५९ दावलिया. ६० कोहाल ६१ वडिग्रुथा. ६२ लालपा. ६३

रुपाळिया. ६४ माळिया. ६५ मलिया. ६६ हरडिया. ६७ मोरा-
लिया. ६८ टिळालिया. ६९ माकडा. ७० बागळिया. ७१ छप-
रिया. ७२ चोटिया. ७३ हिराळा ७४ बलियुया. व ७५ माछ-
लिया, इतक्या जातीचे घोडे हल्लीं ह्या देशांत उत्पन्न होतात.

३. अरबी घोडा पातळ अंगी असून कानांत ताठा नसतो. तो चालते वेळीं दांडी उचलतो व मेळ्यांत राहतो ( दुसरे घोड्यांबरोबर दांडगाई करीत नाहीं ). हा घोडा गरीब असून शाहाणा असतो, व पाहिजे तें काम शिकतो. इंग्रज लोक बहुतकरून या घोड्यास पसंत करतात. अरबी घोड्यास कानामागें डाग दिलेला असतो.

४. काबली घोडा मोठा असून सुंभाचा मजबूत आणि दांड असतो.

## अश्वकुळांचे गुण.

घोड्यावरील स्वार पडला असतां बहुधा घोडा उभा राहतो आ-
णि घोडीवरील स्वार पडला असतां ती पळून जाते, इत्यादि शालि
होत्रांत अनेक प्रकारचे गुण सांगितले आहेत. जो घोडा ठाणांत
सामायन ठेवलें ह्मणजे उल्हासें करून पुढचा उजवा पाय उचलतो व
सामायन ठेऊन बाहेर आणिला ह्मणजे खासदाराचे हातांत कलोल
करून स्वार बसूं लागला ह्मणजे स्थिर उभा राहून त्यास स्वस्थतेनें
बसूं देतो. नंतर स्वारानें अनिन हातांत घेतली ह्मणजे तो हुषार हो-
ऊन इशाऱ्याची वाट पहातो, आणि सर्व कामांत स्वाराचे मर्जी
प्रमाणें वागतो; व बहुत फिरवून दमला असतां कांहीं वेळ टेहळा-
टल्यावर लागलेंच कलोल करूं लागतो तो उत्तम कुळांतील घोडा
जाणावा. जो घोडा सामान ठेवून अश्वशाळे बाहेर आणिल्यावर क-
लोल करून स्वार बसते वेळीं कांहीं तेजी करतो, फिरविला ह्मणजे
चांगला फिरतो व स्वारानें एड मारली तर फारच उत्सूक होतो तो
चांगल्या कुळांतील स्वाभावीक गुणांचा आहे असें समजावें.

**विशेष सूचना**—मणक्या हा घोडा रूपवान असतो. ताजणिया हा घोडा बसत नाहीं, कदाचित झोंप घेणें झाल्यास तो उभ्यानेंच घेतो. ह्या जातीच्या घोडीस पसवते वेळीं बकरूं खाण्यास द्यावें लागतें, नाहीं तर ती आपलें शिंगरूं खाते. भुताडिया ह्यास धुवून स्वच्छ न ठेवल्यास भुतासारखें करतो. शिंगाळिया ह्या घोड्याला शिंगासारखी खूण असते. चवरढाल हा घोडा दांडी उभी करून चवरीसारखी पसरतो.

---

# घोड्याचें शारीर.

घोड्याच्या शरीराचे विभाग ह्मणजे ज्यास संस्कृतांत क्षेत्र अशी संज्ञा आहे ते येणें प्रमाणें:—

१ मुख. २ कपाळ व मस्तक. ३ मानेपासून खांद्यापर्यंत. ४ कंठ, ऊर, गुढघे, वसवंड आणि काकस. ५ आसन. ६ कटी. ७ स्फिक. ८ फलक. ९ जंघा आणि कूर्च संधी.

---

# स्थानकोश.

अश्वाचे अवयवांचें ज्ञान होण्याकरितां संस्कृत भाषेंत जीं नांवें सांगितलीं आहेत तीं समजण्याकरितां प्राकृत भाषेंत सांगतों. हीं स्थानें कळल्यावांचून या ग्रंथांत जे शब्द येतील त्यांचीं स्थानें समजणार नाहींत व त्यांची चिकित्सा होणार नाहीं सबब हा स्थानकोश अवश्य समजला पाहिजे.

**जिव्हा**—ही सर्व प्रसिद्ध आहेच.

**सृना**—जिव्हेच्या खालचा भाग.

**तालू**—जिव्हेच्या वरचा भाग.

**दंतपीठिका**—जिव्हेच्या पुढचा भाग.

**दंत**—दंत्त पिठिकेच्या वरचे व खालचे दांत.

**चिबुक**—दंताचा खालचा भाग.

**अधरोष्ट**—( खालचा ओंठ ) चिबुकाच्या वरचा भाग.

**हनुवटी**—चिबुकाच्या उजवेकडचा व डावेकडचा भाग.

**सृक्किणी**—तोंडाचीं दोन्हीं शेवटें.

**प्रपाण**—वरचा ओंठ.

**प्रोथ**—ओंठावरील भाग.

**नाकपुड्या**—प्रोथाच्या डावेकडे व उजवेकडे जे भाग असतात ते.

**घोणा**—दोन्ही नाकपुड्याच्या मधला भाग.

**गंडस्थळें**—घोण्याच्या उजव्या व डाव्या बाजूचे भाग.

**अश्रुपात**—नेत्राच्या खालचा भाग.

**अपांग**—डोळ्याचा जो भाग कानाकडे गेलेला असतो तो.

**कनिनिका**—नाकाच्या समोरचा डोळ्याचा भाग.

**प्रच्छादन**—डोळ्यामध्यें काळें व पांढरें जें मंडळ ( वर्तूळ ) असतें तें.

**अक्षिकूट**—डोळ्याच्या पुढील चर्मभाग.

**कपाळ**—अक्षिकूटावरची जी केशाची रेषा असते तिजपासून पुढचा भाग.

**केशांत**—कपाळाच्या वरचा भाग.

**स्रुव**—केशांताचा पुढचा भाग.

**शिर**—स्रुवाचा वरचा प्रदेश.

**कान**—शिराचा पार्श्व भाग.

**शकुंतल**—कानाचें मळ..

शंख—अपांगापासून दोन अंगुळें प्रदेश.

कटाक्ष—शंख व कर्ण ह्यांमधील अंतर.

बिंदु—कानाच्या खालीं सहा अंगुळावर जो भाग असतो तो व कानाचा पृष्ठभाग.

निगाल—घंटाबंधाच्या समोरचा भाग.

गल ( गळा )—निगालाच्या खालचा प्रदेश.

कंठ—गळ्यापासून खालचा भाग.

ग्रीवा—मान.

केसर—मानेवरील केंश ( आयाळ ).

वह— मान व खांदा यांमधील अंतर तें.

जत्रु ( गर्दन )—वहाच्या वरचा भाग.

मान—आयाळ याच्या अंतप्रदेशापर्यंत.

मान व आयाळ—स्कंध व पाठ यांचे मधील भाग.

ककुद—जत्रू ( गर्दन ) जवळ जें हाड असतें तें.

पृष्ट ( पाट )—ककुदा पुढील भाग.

आसन—पाठीच्या मध्य भागाची जागा.

स्कंध ( खांदा. )—ककुदाशीं जोडलेले भाग.

बाहु—स्कंदाच्या खालचा प्रदेश.

धिष्ण्य—स्कंध सोडून सहा अंगुळें बाहूचा जो प्रदेश तो.

गुढगे—धिष्ण्याचा खालचा भाग.

पोटऱ्या—गुढग्याच्या खालील भाग.

फलक—कंबरेचा सांधा.

क्रोड—उराच्या खालचा प्रदेश.

कुष्किका—खुरांचा मध्य भाग.

जबडा—मुखाचा खालचा व वरचा भाग.

वैसिक संधी —पोटऱ्याच्या बाजू.

पहिला—वैसीक संधीचा अग्र भाग ( मागील भाग. )

कूर्च—खुराचा वरचा भाग.

कीण—खुराचा मध्य भाग.

कूर्चिका—कूर्चाच्या मागील भागाचें ठिकाण.

खुरसंधी—कूर्चिकेच्या खालचें ठिकाण.

खूर—खुरसंधीच्या खालचें ठिकाण.

पार्ष्णि—खुराचा मागील भाग.

नखें—खुराचा पुढचा भाग.

तळ—खुराचा खालचा भाग.

क्षिरिका—खुराचें मांस.

कुक्षि—पार्श्व हृदयाच्या डावे व उजवे कडचे भाग.

नाभि—पोटाचे दोन भागाचे मध्याचें ठिकाण.

रोमराजि—नाभीपुढील भाग.

मुत्रकोश—रोमराजी पुढील भाग.

पुट ( स्फिक् )—पृष्ठभागाचे ठिकाणीं कंबरेपर्यंत ज्या दोन बाजू त्या.

रंध्र ( उपरंध्र )—कुक्षीचा अंतर्भाग.

पुच्छ—शेंपटीचें मूळ.

मांसल—पुच्छमूळ.

पायु ( गुद )—पुच्छाचा खालचा भाग.

सिवणी—गुदाच्या पुढचा भाग.

मुष्क—अंड.

उरुसंधी—कटि संधीच्या पुढचा भाग.

मांड्या—उरुसंधीचा पुढील भाग.

**मंदिर**—खुराचे खालील भाग.

**कला**—कुर्च आणि कुष्किका.

**मंडूकी**—खुराचा शेवटचा भाग.

**जंघा** ( मांड्या )—ऊर, मान, डोकें आणि तोंड हे सर्व मिळून घोड्याचा पूर्व भाग.

**पृष्ठदेश** ( पाठ )—मध्यभाग आणि कंबरेपासून खुरापर्यंत पश्चिम भाग.

---

# प्रत्येक अवयव कसे असावे ह्याविषयीं.

**जिव्हा**—घोड्याची जीभ सूक्ष्म असून सरळ व लांब असावी. ती वर्णानें तांबडी असून मृदु असावी, ह्मणजे उत्तम लक्षण समजावें. कोणी ती आंखूड असावी असेंही ह्मणतात.

**सूना** ( अश्वाच्या जिभेचा खालचा भाग )—ही पुष्ट व रक्तवर्ण असावी आणि तिचा रंग प्रफुल्लीत असून ती मृदु असावी.

**तालू**—घोड्याची टाळू खोल असून त्यावर सूक्ष्म रेषा असलेली अशी असावी. ती रक्तवर्ण असून आखूडही असावी.

**दंत**—घोड्याचे दांत पूर्ण, दृढ, घन( दाट ), स्थीर, अविकार (विकृती नाहीं असे), स्निग्ध ( तेजस्वी ), तीक्ष्ण आणि आंतून उंच असावे. त्यांचा रंग पांढरा किंवा मधाप्रमाणें असावा. ते विषम नसावेत.

**चिबुक** ( दांतांच्या खालचा भाग )—हा स्थीर, थंड आणि कृश असावा. त्याची आकृती सारखी असून त्यावर केंश नसावेत.

**अधरोष्ट** ( खालचा ओंठ ) आणि **प्रपाण** ( वरचा ओंठ )—ह्यांवर सुरकुत्या असाव्या. ह्यांची आकृती सूक्ष्म असून लांबट असावी

ती अशी कीं, दांत त्या ओंठांनीं दुरूनच झांकले जावेत. त्या ओंठांत मृदूपणा आणि पुष्टता असावी. त्यांत प्रधान ह्मणजे खालचा ओंठ तो चतुष्कोन किंवा वर्तूळ आणि सम असावा. हें उत्तम लक्षण आहे. हे आंखूड असावेत व किंचित रक्तवर्ण असावेत असेंही कोणी ह्मणतात.

**प्रोथ** ( वरच्या ओंठाचा वरचा भाग )—तो समान, मृदु, गोल, सरळ, उंच व सुंदर असावा. त्याचा मध्यभाग उंच असून अ-गदीं मिळालेला असावा. तो विस्तीर्ण असल्यास उत्तम होय.

**नासापुट** (नाकपुड्या)—मृदु व सारख्या उंच असून त्यांतून नि-घणारा श्वास वर जात असावा. त्यांचा आकार वर्तूळ असून ना-जूक असावा.

**घोणा** ( नाकपुड्याच्या मधला भाग )—तो सारखा जडलेला असून सरळ असावा ह्मणजे उत्तम होय. हा उंचही असावा.

**गंडस्थळ** (घोणाच्या दोन्ही बाजू)—पूर्व भागीं विस्तीर्ण व छिद्र-रहित असून उग्र नसावें ह्मणजे उत्तम होय.

**अश्रुपात** ( डोळ्याच्या खालचा भाग )—तो पूर्वभागीं उंच व घट्ट अशा घोणेवर असून त्याच्या समोर मांस, शिरा व स्नायु असावेत.

**अक्षिकूट**(नेत्राच्छादनाचें जें कातडें असतें त्याचे वरचा भाग)—हा स्थूळ ( लठ्ठ ) नसावा आणि विषम नसावा.

**कपाळ** ( ललाट )—घोड्याचें कपाळ रुंद असून उंच असावें व खोल नसावें. तें मांसरहित सारखें, पुष्ट आणि वरच्या भागास विशाळ असावें, व त्यावर भोंवरा असावा. असे असलेले घोडे चांगले व धैर्यवान असतात

**शिर** ( मस्तक )—सारखें पुष्ट व किंचित उंच व वर्तुळ असावें. तें प्रशस्त असून त्यावर दोहींकडे दोन भोंवरे असावेत.

**कान** ( कर्ण )—घोड्याचे कान आंखूड, सूक्ष्म, त्रिकोन, पातळ व तीक्ष्ण असावेत. त्यांची कांती चंद्रासारखी असावी. त्यांच्यावर दीर्घ केंश नसावेत. त्यांवर रेषा असाव्यात, व ते फार लांब व फार आंखूडही नसावेत.

**शंख** ( कंठाच्या वरचा दोन अंगुळें प्रदेश )—तो अस्थि, मांस, शिरा यांनीं युक्त असावा.

**विंदु** (कानाचे खालीं सहा अंगुळें परीमित जो भाग तो )—हे शिर आणि मान यांमध्यें असून परस्पर चिकटलेले आणि गोलाकार व उग्र असावेत.

**निगाल** (नटाबंधनाच्या जवळचा कंठप्रदेश)—हा अगदीं मांस रहित व उंच असावा. तो मऊ, लहान आणि मांसास मिळालेला असून सुरेख असावा.

**गल** ( गळा )—हा निर्मळ, सरळ, गोल व सारखा असून सुरेख असावा.

**कंठ**—वर्तुळ, सरळ, फार संलग्न झालेला समान असून विस्तीर्ण असावा.

**मान**—बळकट आणि लांब अशी असून अकुंचित होणारी अशी असावी.

**केसर** ( मानेवरचे केंश )—हे अतिशय पांढरे किंवा सामान्यतः शुभ्र, मृदु, स्निग्ध, सूक्ष्म आणि लांब असे मस्तकावरचे केंश असले तर उत्तम समजावे, आणि त्यांत जटा असाव्या.

**पृष्ठ** ( पाठ )—घोड्याची पाठ विस्तीर्ण व पुष्ट आणि मांसयुक्त असावी. ती नम्र असून कांहीं पहात बसलेल्या हंसाप्रमाणें उंच असावी ह्मणजे किंचित वांकलेली असावी, परंतु फार लांब नसावी.

**स्कंध** ( खांदा )—हा पुष्ट, मांसांत बुडालेला व दृढ, मांसंयुक्त असून स्थिर व विस्तीर्ण, बळकट असावा ह्मणजे उत्तम. त्यावर भोंवरा नसावा.

**बाहू**—अश्वाचे बाहू लांब, दृढ, पुष्ट व गोल असून सारखे सरळ आणि विभक्त असावेत. ह्मणजे एकमेकास न लागणारे व संधीचे ठायीं अगदीं मिळालेले असून पूर्वभागीं विस्तीर्ण असावेत. ते आंखूड असावेत असेही कोणी ह्मणतात.

**ककुद**—घोड्याचे जत्रु ( गर्दनाजवळचें हाड ) सारखें असून घट्ट व पुष्ट असावें.

**जानू** ( गुडघे )—सारखे वर्तुळ, उंच, सरळ, मांसरहित, स्थिर, घट्ट व बळकट असावेत. ते आकारानें सुरेख व मांसांत अगदीं बुडालेले असावेत.

**जंघा**—वर्तुळ, लांब, मांसरहित, सरळ, घट्ट आणि स्नायु ( शिरा ) यांणीं युक्त असाव्यात. ह्या एकमेकाशीं सुटून भिन्न भिन्न असाव्यात. त्या काळ्या नसाव्यात. व चक्रहीन असून आंखूडही असाव्यात.

**क्षीरिका** (खुर संबंधी मांस)—हें सर्व ठिकाणीं सारखें असावें.

**मंडूकी** ( खुराच्या खालीं तळ संधीचा मध्यभाग )—ही अगदीं खुर संधींत बुडालेली असून आंखूड असावी ह्मणजे उत्तम होय.

**नाभि**—घोड्याची नाभि वर्तुळ व खोल असून स्निग्ध असावी.

**सृक्कीणि** (मुखाचे दक्षिणोत्तर भाग )—हे मोटे, निर्मळ व मृदु असून त्यांजवर केश अगदीं नसावेत.

**स्फिक्** ( कंबरेच्या मागचा भाग )—तो गोल घट्ट व सारखा असून एकमेकास मिळालेला असावा.

**पुच्छ**—आंखूड नसावें. तें वर्तुळाकार असून उंच असावें. क्रमानें वृद्धिंगत झालेलें व ज्यांतील केंश लांब असें असावें. त्यावरील केंश वरचेवर वाढणारे असें असावें, आणि मृदु, चकचकीत व स्निग्ध असावें.

**पायु** (गुद)—हें सरळ, खोल व मोठें वर्तुळ असून अच्छादित असावें. तें अगदीं मिळालेलें असून नेहमीं सारखें असावें, व आंखूडही असावें.

**मांड्या**—प्रशस्त आकृतीच्या वर्तुळ, आंखूड आणि सुस्थिर असाव्यात, परंतु फार स्थूल नसाव्यात आणि त्यांचे सांधे गुप्त असावेत. त्या एकमेकांस मिळालेल्या व वर पुष्ट असाव्यात व काळ्या नसाव्यात.

**कुष्किका** (खुराचा मध्यभाग)—ही सारखी, वर्तुळ, आंखूड, स्थिर आणि किंचित उंच असून तिजवरील शिरा गुप्त असाव्यात.

**फलक** (कंबरेचे सांधे)—उंच व पुष्ट असून सुरेख असावेत.

**अंस** (ककुदाचे पार्श्व भाग)—हे विस्तीर्ण, पुष्ट, सारखे आणि त्यांचे सांधे मिळालेले असून सम असावेत.

**ऊर**—हा विस्तीर्ण, रुंद, उथळ, मोठें व स्थिर असून पुष्ट असलेला उत्तम होय.

**क्रोड** (खुराच्या खालचा भाग)—तो पुष्ट, वर्तुळ व घट्ट असून सारखा असावा.

**पार्श्व** (दक्षिणोत्तर खुराचा भाग)—हे लांब, च्छिद्ररहित, पूर्ण, स्थिर, सारखे, घट्ट व मांसांत चिकटलेले असावेत.

**उदर** (पोट)—गोल, विस्तीर्ण, सुटलेलें, लोंबकलेलें नसावें. आकृतीनें सारखें, हरिणाच्या पाठीसारखें, च्छिद्ररहित, अविभक्त, लहान आणि सम असावें.

**नेत्र**—घोड्याचे नेत्र विस्तीर्ण, धुंद, शुद्ध, मोठे, तेजस्वी आणि मधाच्या रंगासारखे निर्मळ व त्यांतील बाहुली कृष्णवर्ण असावी, किंवा सुवर्णासारखे असावेत. त्यांची आकृती मल्लिका ह्मणजे मोगऱ्याच्या फुलासारखी किंवा मोर, उंट व चिमणा यांच्या नेत्रासारखी असावी. क्रौंच (कुरकुच्या) व तितिर पक्षी यांच्या डोळ्याप्रमाणें कृष्णवर्ण, आणि हत्ती, हरीण, हंस किंवा टिटवी यांच्या नेत्रासारखे असून लांब दाट पापण्यांनीं युक्त असलेले घोड्याचे डोळे उत्तम होत.

**हनुवटी**—ही विस्तीर्ण, वर्तुळ, दृढ व स्थिर असलेली उत्तम होय. ती पूर्वभागीं पुष्ट असून तिंतील मांस व हाड यांचा सांधा अगदीं चिकटलेला असावा.

**मुख** (तोंड)—हें विस्तीर्ण, निर्मांस, सुगंधयुक्त आणि सुवृत्त असावें. लांबट नसावें ह्मणजे उत्तम. परंतु कोणाचें मत तें लांबटही असावें असें आहे.

**दंष्ट्रा** (दाढा)—ह्या सुंदर रंगाच्या असून त्यांचीं अग्रें तीक्ष्ण असावीत व त्या चतुष्कोन, बळकट, स्निग्ध, सूक्ष्म आणि सारख्या असाव्यात.

**वृषण**—हें सारखें, वर्तुळ व केंशरहित आणि आंखूड असावें. तें किंचित लोंबलेलें असावें आणि त्यावर वळ्या पडूं नयेत. तसेच शिश्न कृष्णवर्ण नसून आंखूड असावें ह्मणजे उत्तम लक्षण समजावें.

**खूर**—हे पुष्कळ उंच असून मोठे, गोल (वर्तुळ), आंखूड बळकट आणि विस्तीर्ण व स्निग्ध (तेजस्वी) असावेत. ते सारखे असून जमिनीवर टेकलेले असावेत, फुटीर किंवा खंडीत झालेले नसावेत. ते पांढरे, तांबडे, काळे अशा कोणत्याही एका रंगाचे असावेत. ते मध्यभागीं तळ्याचे ठिकाणीं खोल आणि शिळा तळा प्रमाणें कठीण असावेत, त्यांचे सांधे अगदीं मिळालेले असून निर्मांस असावेत.

**जघन**—मोठें विस्तीर्ण, चतुरस्त्र, सारखें असून साच्छिद्र व वर वा ढळेलें असावें.

**कुक्षि** ( पार्श्व )—कुशी सारख्या, दीर्घ ह्मणजे लांबट, उंच व वर्तुळ असलेल्या शुभ होत. त्यांतील मांस वर असावें.

**रंध्र**—लांब व साच्छिद्र नसून सम असलेली शुभ होय.

**वर्तिका**—मूळांत निमग्न झालेली लांब आणि सूक्ष्म असून-गोलाकार असावी ह्मणजे उत्तम होय.

**कूर्च** ( खुराच्या वरचा भाग )—सारखा व चांगला जडलेला असून उंच व सम वर्तुळ असावा. त्या ठिकाणीं ग्रंथी किंवा व्रण नसावें. व त्याचा रंग कृष्णवर्ण नसावा.

**तळवा**—खुराचे तळ काळे असावेत.

**कटी**—ही पुष्ट व तिचा मागला भाग वर्तुळ व विस्तीर्ण असावा.

**मेहन** ( मूत्रद्वार )—गोल व संश्लिष्ट ( चिकटलेलें ) असावें.

**मेंढ्र** ( शिश्न )—आंखूड, मऊ, वर्तुळ, सारखे व स्थिर असावें. त्याचें मुख मोठें असून अच्छादित असावें. व तें एक रंगी असावें.

**योनी** ( अश्विनीचें मूत्रद्वार )—सरळ व मोटी असून अच्छादित असलेली व घट्ट असावी आणि सुंदर मुखाची असावी.

**पिंड**—हे मांसांत बुडालेल्या शिरा व स्नायु यांनीं युक्त व पांढऱ्या रंगाचे असून उंच असावेत. तसेंच ते घट्ट व गोल असावेत.

**स्तन**—घट्ट, स्थिर, सारखे, वर्तुळ आणि दुग्धयुक्त असावे.

**सक्थिनी** ( तळसंधी )—ह्या सरळ, सारख्या, गोल व पूर्ण असाव्या. त्या पूर्वभागीं विस्तीर्ण आणि पूर्ण असाव्या.

**संधी**—फार खोल किंवा फार उथळही नसावेत.

**वंश** ( पाठीचा कणा )—वर्तुळ असावा.

**आसन** ( पाठीचा मधला भाग )—विस्तीर्ण असावा.

किला—तीक्ष्ण असाव्यात.

जीं अंगें दीर्घ, र्‍हस्व ( आंखूड ), वृत्त ( वाटोळीं ), पृथु ( विस्तीर्ण ), मृदु, स्निग्ध ( तेजस्वी ), तीक्ष्ण व मोठीं, उंच, निर्मांस अशीं असावींत ह्मणून सांगितलें आहे, तर तीं तशीं असल्यास ते अश्व कोणत्या गुणाचे होतील तें सांगतों:—

त्यांचीं अंगें दीर्घ असल्यास ते बलवान, र्‍हस्व असल्यास निरोगी, वृत्त ह्मणजे गोल असल्यास दीर्घायुषी, तेजस्वी आणि पुष्ट व पृथु असल्यास बलवान, मृदु असल्यास तेजस्वी व पुष्ट, स्निग्ध आणि तीक्ष्ण असल्यास पराक्रमी, मंडलाकृती असल्यास बुद्धिमान, नम्र आणि धैर्यवान असे होत.

जीं स्थानें निर्मांस असावींत ह्मणून सांगितलें तीं तशीं असल्यास तो अश्व मार्ग क्रमण्यास व भार वाहण्यास समर्थ असा असतो.

---

# अवयवांची परिक्षा.

## प्रकार दुसरा.

१ कपाळ विस्तीर्ण व उत्तम लक्षणाचा भोंवरा. २ मस्तक समान असून त्यावर वाटोळे भोंवरें दोन असावेत. ३ नेत्रांतील बाहुल्या काळ्या असाव्यात. नेत्राखालीं आवळलेलें नसावेंत. ४ घोड्याचे दंत दाट व मऊ, हिरड्या आणि बळकट बांधलेले लांब व आंखूड नसावेत सारखे समान असावेत ते उत्तम. ५ ओंठ थोडे तांबडेवर्ण असावेत रुक्ष नसावेत, कांतडें मऊ असावें. ६ हनुवटी लांब व मोठी नसावी, समान असावी. ७ कान आंखूड व चंचळ व पातळ असावेत. ८ जिव्हा मोकळी असावी. ९ टाळु लाल व मऊ चांगली. १० मान बाकदार सुंदर, बळकट व चोंहोकडे फिरती असावी. ११ अयाळ मोकळी, जटा नसाव्या, तिचे केंश मऊ

व लांब असावेत. १२ पुच्छाचा कांदा बारीक व सरळ असावा. १३ खांद्यावर भोंवरा नसावा. १४ छाती रुंद असावी. १५ काख लांब व उंच असावेत. १६ पायाचे पोटऱ्याच्या नळ्या मांसहिन सरळ असाव्यात. १७ घोटे काळे आणि त्याचे खालवरचे संधी वेगळे असावेत त्यांस गांठ नसावी ह्मणजे नेवर लागणार नाहीं. १८ खूर मोठे, वाटोळे, काळे, बळकट बेडुकामारखे असावेत. १९ कुशी उंच व लांब आणि बळकट असावी. २० पोट लांब नसावें. २१ पाठ लहान नसावी मध्यें बाक नसावा सारखी असावी. २२ कंबर पुष्ट असावी. २३ आगा वाटोळा असावा. २४ दांडी मऊ, चिकण व तिचे केंश लांब असावेत. २५ वृषण आंखूड, बेलफळासारखें वाटोळें असावें त्यावर केंश नसावेत. २६ शिश्न आंखूड व काळें नसावें. या प्रकारें चिन्हांचा घोडा उत्तम समजावा.

---

या आकड्याचे वर्णन पान १३। १४ याजमध्यें पहा



# घोड्यांचें शारीर वर्णन.

(इंग्रजी ग्रंथाधारें.)

## भाग पहिला.

Head डोकें. Face चेहरा.

१ Muzzle तोंड अथवा मुमकट.
२ Nostril नाकपुडी.
• Eyes डोळे.

तोंडापासून ते डोळ्यापर्यंतचे भागास चेहरा ह्मणतात.

३ Forehead कपाळ.
४ Jaw जबडा.
• Ears कान.
५ Poll डोकें अथवा मस्तक.

कपाळापासून ते कानपर्यंतचे भागास मस्तक किंवा डोकें म्हणतात.

## भाग दुसरा.

Neck मान.

६ Crest शेंडी अथवा टाळूचीबट
७ Thropple or wind-Pipe कंठ किंवा घसा.

शेंडीपासून खांदा सुरू होतो तेथपर्यंतचा प्रदेश म्हणजे अयाळांचा अंत प्रदेश.

## भाग तिसरा.

Fore-quarter पहील भाग.

८ Shoulder-Blade खांदा किंवा फरा.
९ Point of Shoulder खांद्याचें टोक.
१० Bosom or Breast or chest छाती किंवा ऊर म्हणजे गळ्या खाली आणि खांद्याचे मधीं जो भाग तो
११ True-Arm बाहू ह्म० कोपरापर्यंत जो भाग तो.
१२ Elbow कोंपर ह्म० काखा.
१३ Fore-Arm हात ह्म० दंड.
१४ Knee गुडघा ह्म० कोंपर.

हेच अवयव मनुष्याचे अवयवाशीं ताडले तर काखा-दंड-कोंपर या प्रमाणें येतात

१५ Cannon-bone गुडघ्या खालची नळी.
१६ Back Sinew गुडघ्या खालचे नळीचे मागील हाड.
१७ Fetlock or pastern joint नेवर ४५ पासून ६० डीग्रि.
१८ Coronate जिव्हाळी किंवा मळवा.

१९ Hoof or foot खूर किंवा नखी.
२० Heel खोट किंवा टांच.

## भाग चौथा.

### Body of middlepiece मधला भाग.

२१ Withers कुकूद किंवा वसवंड ह्म० मानेचा अंत प्रदेश व स्कंद किंवा खांद्याचे मधील भाग.
२२ Back पाठ.
२३ Ribs पंजर किंवा बरगडी.
२४ Circumference of the chest or girth तंगाचे जागेचा घेर.
२५ Loins कंबर किंवा कटी
२६ Croup or cruptur लेंडी.
२७ Hip कमरेचा खवाटा.
२८ Flank कुसवा किंवा कोठा किंवा पोट.
२९ Sheath कोष.
३० Root of the Dock or tail शेपटीचें मूळ.

## भाग पांचवा.

### Hind-quarter मागील भाग.

३१ Hip-joint, round, or whirl-bone कमरेचा सांधा किंवा ढुंगण.
३२ Stifle-joint मांडीचे वरचें समोरचे चपटें हाड किंवा कमरेचा सांधा मिळतो तेथील हाड.
३३ Lower thigh or gaskin खालची मांडी.
३४ Quarters मांडीचा मागील वरचा भाग.
३५ Hock मागील पायाचा गुडघा.
३६ Point of the hock मागील पायाचे गुडघ्याचें टोंक.
३७ Curb place मागील पायाचे गुडघ्याचे जोडाखालचा भाग.
३८ Cannon-bone गुडघ्या खालील नळी.
३९ Back sinew क्यानन बोनचे नळाचे मागील हाड.
४० Pastern or fetlock-joint मनगट किंवा पायबंदाची जागा.
४१ Coronet तळवा.
४२ Hoof or Foot खूर किंवा पाय किंवा नखी.
४३ Heel खोट किंवा टाच.
४४ Spavin-place मागील पायाचे गुडघ्याचे समोरचें हाड.

ए – मोलरटीथ —————— दाढा

बी – एड – क्यानाइन किंवा टस्क —— सुळेदात

सी – आय – इनसिझर्स —————— छेदकदंत अ. चावण्याचे पुढचे दात

ई – अ‍ॅटलस —————— शिरधरास्थी

जी – ऑरबिट —————— डोळ्याचे वर्तुळ अ. अक्षिकोश

एम् – क्यार्नीफॉर्मक्यार्टीलेज ( कुर्चा ) —— खाद्याचा ततूमयरज्जू ( हा पाचरी सारिखा असतो )

एन् – एन्सीफार्मक्यार्टीलेज ( कुर्चा ) —— खाकेजवळचा ततूमयरज्जू

ओ – कोराकॉइड प्रोसेस ऑफ स्क्यापुला —— खांद्याचे साध्याचे हाड

पी – स्पाईन —————— कणा

क्यू – क्यार्टिलेज ( कुर्चा ) —————— ततूमयरज्जू किंवा टोक

आर – ट्रोक्यांटर मेजॉर —————— उर्वस्थीच्या वरच्या डोक्याबरचा उंचवट, ढुंगणाचे मीठें टोक

एस – सबट्रोक्यांटरियन क्रेस्ट —————— ढुंगणाचे लहान टोकाचा उंचभाग

टी – ट्रोकलिया —————— मागील पायाच साध्याचे हाड अ. खालच्या डोक्यावरचा संधीभाग

यू – एक्सटर्नल कॉन्डाइल —————— संधीजोडणारचा उंचवटा

व्ही – पटेला —————— वाटी

डब्ल्यु – हॉकजॉइंट —————— मागील पायाचे गुडघ्याचे बाहेरचे टोंक

| | |
|---|---|
| १ क्रॅनियम | मस्तक संबंधि हाड. |
| २ लोवर जॉ | खालचा जबडा |
| ३ सर्व्हिकल व्हर्टिब्रि | मानेचे मणके. |
| ४ डार्सल व्हर्टिब्रि | पाठिचे मणके. |
| ५ लंबर व्हर्टिब्रि | कंबरेचे मणके. |
| ६ सेक्रम. | माकड हाड |
| ७ कॉकसिजिल व्हर्टिब्रि | शेपटी च्या दांडीचे मणके. |
| ८ स्टरनम्. | छातीचें हाड. |
| ९ ट्रुरिप्स. | खऱ्या बरगड्या |
| १० क्यार्टिलेज ऑफ ट्रुरिप्स | खऱ्या बरगड्यांचीं टोकें किंवा ततूमय रज्जू. |
| ११ फॉल्स रिप्स | खोट्या बरगड्या |
| १२ क्यार्टिलेज ऑफ फाल्स रिप्स | खोट्या बरगड्यांचीं टोकें किंवा ततूमय रज्जू. |
| १३ स्क्यापुला, १४ ह्युमिरस | खांद्याचीं हाडें. |
| १५ रेडियस् | हाताचें हाड किंवा दंडाचें हाड |
| १६ एल्बो | खाका |
| १७ असपिसिफॉर्म | गुडघ्याचें मागील हाड |
| १८ २१, १९ २२, २० २३ स्यापल बोनूस. | गुडघ्यांची हाडें |
| २४ लार्ज मेटे स्यार्पल बोन | पाय किंवा तंगडी यांचें हाड } तंगडीचीं हाडें. |
| २५ आउटर स्मॉल ,, ,, | मागील तंगडीचें हाड. } तंगडीचीं हाडें. |
| २६ इनर स्मॉल मेटे क्यार्पल् बोन | बाहेरील तंगडीचा लहान भाग } तंगडीचीं हाडें. |
| २७ २८ सिसिमाइट बोन्स | मणगटाचीं हाडे |
| २९ ऑसमग्न्याम्गिनिस | मणगटाचें हाड |
| ३० ऑसकारोनिया. | स्कंधाचें आरभीचें हाड |
| ३१ आस्विडिस | आगठ्याचें हाड किंवा नख्याचें टोंक |
| ३२ वुइग ऑफ पिडल बोन | नेवराचें हाड |
| ३३ ३४ ३५ ३६ ऑस इनोमिनेटम् | ढुंगणाचीं हाडें |
| ३७ फिमर | ढुंगणाखालचें हाड. |
| ३८ टिबिया | मांडीचें हाड. |
| ३९ ऑसस्यालीसीस | मागील पायाच्या गुडघ्याचीं हाडें. |
| ४० आस्त्रेगेलस् | मागील गुडघ्याचें हाड. |
| ४१ ४२ ४३ ४४ टारसल बोनूस | मागील गुडघ्याचीं हाडे |
| ४५ लार्ज मेटे टार्सल बोन. | मागील तंगडीच्या पुढील हाड. |
| ४६ आउटर स्मॉल मेटे टारसल बोन् | मागील तंगडीच्या बाहेरील हाड |
| ४७ इनर स्मॉल मेटे टारसल बोन् | मागील तंगडीचें मागील हाड |

इंग्रजींत घोड्याच्या अवयवांचे पांच भाग केले आहेत ते:-—

**पहिला भाग**—डोकें. ( ह्यांत तोंड, नाकपुडी, कपाळ, जबडा आणि मस्तक इतके अवयव येतात. )

**दुसरा भाग**—मान. ( ह्यांत शेंडी, गळा, कंठ ( घसा ) इतके अवयव येतात. )

**तिसरा भाग**—मानखालचा. ( ह्यांत खांदा ( फरा ), खांद्याचें टोंक, च्छाती, बाहू, कोंपर, दंड ( भुजापासून कोंपरापर्यंत ), हात (गुडघ्या पर्यंत), गुडघा, गुडघ्याखालील नळी आणि त्या मागील हाड, नेवर, खूर ( नखी ) आणि टांच इतके अवयव येतात.)

**चौथा भाग**—स्कंधदेश. ( ह्यांत खांद्याचा सांधा, पाठ, पंजर ( फासळ्या किंवा बरगड्या), तंग, कंबर ( कटी ), लेंडी, कमरेचा खवाटा, कोठा, कोश आणि शेपटीचें मूळ इतके अवयव येतात. )

**पांचवा भाग**—इतर अवयव. ( ह्यांत ढुंगण ( कंबरेचा सांधा म्हणजे श्रोणी फलक ), स्टाईफल् जाइंटस, मांड्याचा खालचा भाग ( जंघा ), कार्टर ( मांडीचे खालचा सांधा ), गुडघ्याचे दरम्यानचा भाग, दाबाची जागा, मागील पायाचे स्नायू, मागील पायाचे दुसरे स्नायू, मागील पायाचा नेवर, मागील पायाचा तळवा, मागील पायाचा खुर, मागील पायाची टांच, मागील पायावरील पहील हाड ( हाक अवयवा समोरचे ) इतके अवयव येतात )

---

## घोड्याचीं शारिरीक हाडें.

घोड्याचे शरिरामध्यें कोणत्या ठिकाणीं किती हाडें आहेत तें समजण्याकरितां त्याचे अवयवांतील विभाग व त्याचे पोटीं जीं स्थानें आहेत तीं सांगून त्या प्रत्येक स्थानांत किती हाडें आहेत तें सांगतों:—

# भाग पहिला ( डोकें ).

### मस्तक संबंधी.

**फ्रन्टलबोन**—कपाळाचें हाड एक १. **पॅरिटलबोन्न**—मेंदू जागचीं खालवरचीं हाडें २. **अक्मिपिटलबोन्स**—कपाळाचे माग च्या भागाचें हाड १. **टेम्पोरलबोन्स**—कानपट्टीचीं दोन कानांचें मिळून हाडें ४. **इथिमोडलबोन**—मेंदूसंबंधी हाड १. **स्पिनोडलबोन**—नाक आणि तोंड यांचे दरम्यान भितीप्रमाणें असणारें हाड १ **इयरबोन्स**—कानांचीं हाडें ४, एकूण हाडें चौदा १४ असतात

### चेहऱ्यासंबंधी.

**नेझलबोन**—नाकाचें हाड. **सुपिरियर मॅक्झलरीबोन**—वरचे दांत राहाण्याचें हाड. **इनाफिरीयल मॅक्झलरीबोन**—हनवटीचें हाड. **मेलरबोन**—दाढा राहाण्याचें हाड. **लयाक्रिमलबोन्स**—डोळ्याचीं हाडें. **पलेटाइनबोन्स**—टाळूचीं हाडें. **सुपरियरटरमिनेटेडबोन**—नाकाचें हाड. **इनफिरीयरटरमिनेटेडबोन**—नाकाचें हाड. **ओमरबोन**—नाकासंबंधी हाड. **लोअरजॉ**—खालच्या जबड्याचें हाड. **टिथ**—दांत*४० चाळीस **असहाईड**—जिभेचें हाड, एकूण हाडें एकूणसाठ ५९ असतात.

---

# भाग दुसरा ( धड ).

या भागांत कणा, च्छाती व बास्ति इत्यादि आहेत.

### कण्यासंबंधी.

**सरव्हिकलव्हार्टिब्रीई**—मानेचा कणा हाडें ७. **डार्सल**—पाठीचा कणा हाडें १८. **लम्बर**—कमरेचा कणा हाडें ५, एकूण हाडें तीस ३० असतात. परंतु कोठें कमरेचीं हाडें सहा सांगितलीं आहेत ह्मणून एकंदर एकतीस ३१ होतात.

---

* घोडीस दांत ३६ असतात. तीससूळेदांत ४ मुळींच नसतात.

**थोरॉक्स**—च्छाती.

**रिब्स**—बरगड्या दोन्ही बाजू मिळून छत्तीस ३६ व उराचें हाड १, एकूण एकंदर हाडें सदतीस ३७.

**पेलव्हिस**—बस्ति.

**असइनमिनेटा**—जंवा अगर कुल्याचीं हाडें २. **सॅक्रम**—माकडहाड १. **काक्सिझीनबोन्स**—शेपटीचे दांड्याचीं हाडें तेरा १३ पासून अठरा १८ पर्यंत किंवा कोठें शेपटीचीं सतरा हाडें सांगितलीं आहेत ह्मणून एकंदर हाडें एकवीस २१ किंवा बावीस २२ समजावीं.

---

# भाग तिसरा (इतर अवयव).

## पुढील भाग.

**शोल्डरबोन्स**—खांद्याचीं हाडें २ (स्कॅप्युला व ह्युमरस.)

**आर्मबोन्स**—हाताचीं हाडें २ (रेडिअस व अल्ना.)

**बोन्स आफ दी निल**—गुडघ्याचीं हाडें.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| रो०–रांग १ | स्काफाइड. लूनर. क्यूनिफार्म. ट्रॅपिझ्यूम. | रो.-रांग २ | फिसिफार्म ट्रॅपिझाइड असमॅगनम अनसिफार्म | एकंदर हाडें ८. |

हीं हाडें गुडघ्याच्या दोन्ही रांगांचीं समजावीं.

**१ लार्ज मिटॅकरपलबोन** } लेग-बोन्स } एकूण तंगडीचीं हाडें ३ तीन.
**२ स्माल मिटॅकरपलबोन्स**

**सिसॅमाइडबोन्स फेटलाग**—नेवराचीं हाडें २ दोन.

**पॅस्टर्न**—पायबंदाचे ठिकाणचें हाड १ एक. **कारोनेट**—सुंभाचा टोप हाड १ एक.

काफिन.
नॅव्हिक्यूलर. } **फूटबोन्स**—सुंभ किंवा खूर हाडें २ दोन.

एकंदर हाडें एकवीस २१.

### मागील भाग.

**फिमरव्हैचबोन**—ढुंगणाचें हाड १ एक. **पटेलास्टाइफल-बोन**—मांडीचे वरच्या भागाचें हाड १ एक.

टिबिआ
फिबिटा } **थायबोन्स**—एकूण मांडीचीं हाडें २ दोन.

असट्रॅगलस
असकॅलमिज
क्यूबाबाइडबोन्स } मिळून मागले पायाचा गुडघा हाडें ६ सहा.

**हाक**—गुडघ्याचे खालीं लागून ९ नऊ हाडें आहेत तीं एकंदर एकूणास १९. तीं जशी पुढील पायाचे गुडघ्याचे खालीं असणारे हाडाविषयीं वर नांवें दिलीं आहेत त्याप्रमाणें ह्मणजे लेग्ज वगैरे नऊ ९ हाडें दिल्याप्रमाणें समजावी. मागील पायासत मिटॅटार्सल ह्मणतात.

# अवयव परीक्षा.

## घोड्याचा पुढील भाग.

**१ मस्तक**—मस्तकात ज्यास्त कमी मेंदु असलेल्या मानानें घोड्याचें धैर्य व त्याचे मानसिक गुण असतात. यास्तव त्याचें मस्तक रुंद असावें म्हणजे तो धैर्यवान असतो कपाळा खालील भाग हा फक्त त्याचा सुंदरपणा किंवा उत्तम अथवा नीच जातीचे अवलादीचा तो आहे हें दाखवितो.

**२ नाकपुड्या**—ह्या फार काम करणाऱ्या घोड्याच्या रुंद असाव्यात ह्मणजे त्यास श्वासोश्वास करण्यास चांगलें सांपडतें.

**३ जबडा**—हा रुंद असावा ह्मणजे गळ्यांतील वायूस बरोबर

मोकळ्या रीतीनें फिरतां येईल. जबडा रुंद नसल्यास डोकें मानेवर जसें वांकलें जावें तसें वांकलें जाणार नाहीं.

४ **डोळे**—डोळ्यांत दोन लक्षणें पहाण्यासारखीं आहेत. एक त्याचा स्वभाव आणि दुसरें त्याची शरीरप्रकृती. घोड्याची शरीर-प्रकृती हल्लीं कशी आहे व पुढें नवीच राहील किंवा नाहीं हें डोळ्यावरून समजतें. डोळे पाणीदार आणि मोठे असे असले ह्मणजे घोडा चांगल्या स्वभावाचा आणि चांगले प्रकृतीचा असून पुढेंही त्याची प्रकृति चांगली राहील असें समजावें.

५ **कान**—हे फार आंखूड व लांब नसावेत, मध्यम असावेत आणि शेंवटाकडे आणीदार असावेत, तुटके नसावेत.

६ **मान**—ही मध्यम लांबीची असून भरदार आणि मज्जायुक्त (मांसल) असावी. ती डोक्याकडे बारीक होत होत गेलेली असून कानाजवळ थोडी बांकदार असावी. स्कंधाचा सांधा आणि ऊर यांचे मधील मानेच्या खालचा भाग वर्तुळ असावा.

७ **गळा**—हा फार रुंद नसावा. घोड्याचा गळा फार रुंद असल्यास अथवा त्याचे घशापाशीं वळण असल्यास तो खिंकाळणारा असतो.

८ **खांदा**—जर घोडा बसण्याकरितांच पाहिजे असेल तर त्याचे खांद्याच्या गुणांकडे विशेष लक्ष पोंचविलें पाहिजे. खांदा नीट उभा असला ह्मणजे घोड्यास पाऊल लांब टाकतां येत नाहीं व तो चालतांना अडखळतो त्यामुळें त्यास लवकर चालतां येत नाहीं. अशा प्रकारचा खांदा नसून याखेरीज भिन्न प्रकारचा असेल तर वर बसणाराला त्रास होणार नाहीं. खांदा नीट असून जर तो मांसल आहे तर तो घोडा गाडी ओढण्याच्या किंवा ओझें वाहण्याच्या उपयोगीं पडतो. खांदा तिरका असेल तर खोगीर योग्य जागीं राहात नाहीं पुढें येतें, व बसणाऱ्याचा झोंकही

पुढें जातो. असें झालें ह्मणजे घोड्याचा वेगही कमी होतो. परंतु केवळ तिरकाच खांदा असावा असें नाहीं. त्याची मज्जा पुष्कळ व वरचें टोंक नेमस्त रीतीनें वाढलें असून तें फार मांसल नसावें. घोड्याचे खरे हाताची लांबी खांद्यावर अवलंबून असते. कधीं कधीं खांदा तिरका असून खरा हात आंखूड व नीट आणि कोंपराचे टोंकालगत असतो, हा एक दोषच आहे. जेव्हां कोंपर आंत वळतो तेव्हां बरगड्यास घांसतो, तेणेंकरून घोडा वेगानें चालत नाहीं. त्याचे हात लांब आणि मांसल असले ह्मणजे तो वेगानें चालतो.

९ **गुडघा**—हा रुंद आणि विस्तीर्ण असून खालीं बारीक होत गेलेला असावा. गुडघ्याखालील तंगडी लांब असावी.

१० **नेवर**—चालतांना नेवर पंचेचाळीस पासून साठ डिग्रीपर्यंत असावा. नेवर उचलतांना जमिनीशीं ४०।६० अंशाचा कोन होतो.

११ **कुकुद**—खांद्याचें टोंक ह्मणजे वमचंड हें उंच असून पातळ असावें आणि त्यावर थोडेसें मांस असावें तें इतकें कीं, त्याजवरचीं हाडें दिसूं नयेत. कुकुद उंच असल्यास खोगीर मागें राहील अशी कल्पना केल्यास ती बरोबर नाहीं; कारण चालतांना खोगीर त्यावर आपटून त्याजवर त्याचें घर्षण होईल, यास्तव तें फार उंच नसावें. खांदा जसा असावा तसा असेल तर कुकुद वाईट बरा पाहण्याची जरूर नाहीं. पाठ आणि मान यांचे दरम्यानचा त्याचा उंच भाग नसला तरी चालेल.

१२ **च्छाती**—ही लहान मोठी असेल त्या मानानें घोड्याचे अंगीं पाचनशक्ति असते आणि त्याच मानानें त्याचा फुप्फुसही असतो, यास्तव च्छाती रुंद असावी. फारच मोठी च्छाती असली तर तिजपासून खांदा व हात यांस अडथळा होईल, कारण ते दोन्ही बरगड्याला लागतील; यास्तव च्छाती फार मोठी अस-

ल्यास वेगानें घोडा चालण्यास फार अडथळा आहे. गाडीकरितां घोडा रुंद च्छातीचा असावा. त्याचा मधला भाग ह्मणजे पाठ आणि कंबर हा भाग फार जड नसून हलका असावा; तसा नसल्यास घोडा पहिलेच धांवण्यांत थकून जातो.

घोड्याचे इतर भाग अचळपचळ असावेत ह्मणजे काम करण्यापासून त्याची शक्ति कमी होणार नाहीं व तो कृशही होणार नाहीं. शर्यतीचे व शिकारीचे घोड्याची च्छाती मध्यम रुंद असून पाठ आंखूड असावी.

खांद्याचे हाडाची लांबी आणि मान, कुल्ले (टिऱ्या) ह्यांचे हाडांची लांबी खांद्याचे लांबीपेक्षां ज्यास्ती असावी, जर कमी असेल तर धांवण्यांत घोडा अडखळेल.

घोड्याच्या खालच्या भागापेक्षां वरचा भाग (पोटापासून वरचा भाग) आंखुड असावा, पोटापासून खालीं पायाकडे लांब असावा, पोटापासून कंबरेपर्यंत आंखुड असावा, पण असा घोडा मिळणें कठीण आहे. पाठ खोल असावी ह्मणजे ककुदापाशीं खोल होऊन कमरेकडे चढत जावी.

कमरेचा सांधा अरुंद असल्यास तेथें मांस ज्यास्ती असतें, आणि त्या योगानें कंबर आणि पाठ मजबूत दिसते, असे घोडे शिकारीस चांगले. ज्याची कंबर वांकलेली असेल तो पुष्कळ ओझें नेण्याच्या उपयोगी पडेल.

## घोड्याचा मागील भाग.

स्टैफल जॉइंट याची लांबी ज्या मानानें असेल त्या मानानें घोड्याचें पाऊल जवळ किंवा लांब पडेल. कमरेचा सांधा कोठें आहे हें बरोबर समजत नाहीं. ह्यामुळें कमरेपासून स्टैफल जॉइंट

पर्यंत किती लांबी आहे हें समजण्यास जड पडतें, परंतु हें समजण्यास पुढें लिहिल्याप्रमाणें मार्ग आहे, ह्मणजे पंधरा हात व तीन इंच घोड्याची उंची असल्यास चोवीस इंच स्टैफल जॉइंट भरेल असें समजावें.

खालची मांडी तितकीच ह्मणजे स्टैफल जॉइंटा• इतकीच लांब असावी. परंतु स्टैफल जॉइंटापासून मांडीचे सांध्यापर्यंत तिची लांबी मोजली तर घोडा चांगला उंच जातीचा शरीरानीं सुदृढ असल्यास ती अठ्ठावीस इंच भरेल पण ओझें वाहणारे घोड्यास इतके लांबीचे शरीर भाग असण्याची जरूर नाहीं; कारण इतके घोड्याचें लांब पाऊल पडण्याची अवश्यकता नाहीं. ओझ्याच्या घोड्याची खरी ( वरची मांडी ) इतर घोड्याच्या वरच्या मांडीप्रमाणें-च लांब असते, परंतु त्याची खालची मांडी फार आंखूड असते.

घोड्याचे कुल्हे मांसल असतात, आणि ते तसे नसले तर त्यांच्या हातून कांणतेंही काम चांगलें होणार नाहीं. घोड्याची परीक्षा कुल्ह्यावर आहे. कुल्हे एकाशीं एक लागलेले असावेत ह्मणजे मलद्वाराचा खालचा भाग पोकळ ( मध्यें फट नसावी ) असल्यास तो घोडा वाईट समजावा. सांधे मजबूत आणि मज्जायुक्त असावेत. मागल्या भागांत महत्वाचा भाग मागल्या मांडीचा सांधा हा आहे. तो चपटा असून त्यास मांस ( चर्बी ) नसावी. त्याचा सांधा उतरता असावा. त्याची लांबी व आंखूडपणा हा माडीचे मानाप्रमाणें असतो. त्यावरून क्याननबोन ह्मणजे गुडघ्याच्या नळीचा मागील भाग त्या मानानें लांब असतो.

## अश्वाचे अवयवांचें मान.

**मुख**—साडेतीन व्रिही ( साळी ) चा एक अंगुळ अशा चोवीस अंगुळांचा एक हात ( हस्त ) या प्रमाणानें उत्तम अश्वाचे मुखाची

लांबी २२ अंगुळें, मध्यम अश्वाचे मुखाची २० व कनिष्ट अश्वाचे मुखाची १८ अंगुळें असते.

**मान**—उत्तम अश्वाची मान ५६ अंगुळें, मध्यम अश्वाची ४० अंगुळें आणि कनिष्ट अश्वाची ४० अंगुळें अगर त्याहून कांहीं कमी इतकी लांब असते.

**ऊर, पाठ आणि कंबर**—उराची लांबी ३३ इंच असावी. पाठ आणि कंबर हीं प्रत्येक उत्तम अश्वाचीं २२ अंगुळें, मध्यम अश्वाचीं २० अंगुळें आणि कनिष्ट अश्वाचीं १८ अंगुळें अशीं असतात.

**पोट**—उत्तम अश्वाचे पोटाची लांबी ८४ अंगुळें असते.

**कान**—कर्ण ह्मणजे कान हे उत्तम अश्वाचे ७ अंगुळें व मध्यम अश्वाचे ६ अंगुळें लांब असतात.

**टाळु**—उत्तम अश्वाची टाळु ६ अंगुळें, मध्यम अश्वाची ५ आणि कनिष्ट अश्वाची ४ अंगुळें लांब असते.

**खांदा, लिंग व वृषण**—उत्तम अश्वाचा खांदा २४ अंगुळें, लिंग २४ अंगुळें व वृषण ४ अंगुळें लांब असतें.

**गुद ह्मणजे मार्गस्थान**—उत्तम अश्वाचे गुदद्वाराची लांबी २४ अंगुळें असते.

**पुच्छ**—पुच्छ दंड ( शेपटीचा दांडा ) हा सूक्ष्म व सरळ असून उत्तम अश्वाचा २० अंगुळें, मध्यम अश्वाचा १८ अंगुळें आणि कनिष्ट अश्वाचा १६ अंगळें लांब असतो.

**पोटऱ्या व मनगट**—उत्तम अश्वाच्या पोटऱ्या २२ अंगुळें आणि कनिष्टाच्या १४ अंगुळें उंच असतात व मनगट चार अंगुळें असतें.

**खूर**—उत्तम अश्वाचा खूर ७ अंगुळें परिमाणाचा लांब असतो मध्यम अश्वाचा ६ अंगुळें आणि कनिष्टाचा ५ अंगळें असतो.

**उंची व लांबी**—उत्तम अश्वाची लांबी त्याचे डोळ्याचे कोंप-
ऱ्यापासून शेंपटीच्या मुखापर्यंत ५ हात असते. मध्यमाची ४ हात आणि कनिष्ठ अश्वाची साडेतीन हात असते.

घोड्याची उंची त्याच्या खुराच्या टोंकापासून ककुदापर्यंत मोजावी. ही उंची लांबीच्या प्रमाणानेंच असते. ह्यावरून पाहतां घोड्याची लांबी ७५ इंच आणि उंचीही पंचाहत्तरच इंच असते.

इंग्रजींत घोडा मोजण्याचें प्रमाण हातावरच आहे, परंतु तो हात ४ इंच लांबीचा असतो. ह्या प्रमाणानें उत्तम घोड्याची लांबी (शेंपटीचे मुळापासून डोळ्याच्या टोंकापर्यंत) ८० इंच व उंची (खुरापासून खांद्यापर्यंत) ६३ इंच असते.

## अवयव मोजण्याची दुसरी रीत.

१ घोड्याची लांबी मोजणें ती नेत्राचे कडेपासून पुच्छमुखा पर्यंत मोजावी व ती पांच हात असावी. २ घोड्याची उंची मोजणें ती खुरापासून कानाचे मध्यापर्यंत मोजावी व ती पाच हात असावी. ३ तोंड (मुख) ३२ बोटें लांब असावें. ४ परस्पर दोन्ही कानांमधील अंतर ६ बोटें असावें. ५ पाठ ५६ बोटें लांब असावी. ६ पुच्छाच्या दांड्याची लांबी २० बोटें असावी. ७ खूर व ८ कान यांची लांबी सात सात बोटें असावी. ९ घोड्याची मान, १० च्छाती व ११ कंबर या प्रत्येकांची लांबी छप्पन बोटें असावी. व १२ पाय व मांड्या यांची लांबी छत्तीस बोटें असावी.

# आवर्तांविषयीं.

पाण्यांतील भोंवऱ्याच्या आकृतीप्रमाणें केशाच्या रचनेची जी आकृती असते त्यास आवर्त अथवा भोंवरा असें ह्मणतात. घोड्याच्या बऱ्या वाईट खोडी समजणें त्या ह्या भोंवऱ्यांवरून समजल्या जातात.

घोड्यानां एकंदर ९६ भोंवरे (आवर्त्त) असतात. त्यांत वीस उत्तम आणि बाकी राहिलेले ७६ वाईट होत.

आवर्तांचे त्यांच्या आकार मानानें साधारण सात भेद आहेत ते असेः—शतपादी, मुकुल, संघात, पांडुक, अर्धपांडुक, शुक्ती आणि अवलीद.

गोमेच्या आकाराप्रमाणें किंवा केंशासारखा ज्याचा आकार असतो त्यास शतपादी ह्मणतात.

जाईच्या कळीप्रमाणें भोंवरा असल्यास त्यास मुकुल ह्मणतात.

केंशांचा पुंजका जमून जो भोंवरा होतो त्यास संघात ह्मणतात.

पादुकेच्या आकाराचा जो भोंवरा असतो त्यास पांडुक ह्मणतात. अर्ध पादुकेच्या आकाराचा भोंवरा असल्यास त्यास अर्ध पांडुक ह्मणतात.

केंश स्पष्ट असून त्यांत शिंपीसारखा जो आकार असतो त्यास शुक्ति ह्मणतात. ती सामान्य खोडी आहे.

शुक्तीच्या भोंवऱ्यांचा एकत्र संचय असल्यास त्यास अवलीद ह्मणतात.

---

# आवर्तांचे इतर भेद.

१ कमलासारखा, २ अंगावर जिभेनें चाटलें असतां जसे केंश होतात तशा आकाराचा, ३ शेवंतीच्या फुलासारखा, आणि ४ वेणी सारखा, असे भोंवऱ्यांचे इतर भेद आहेत.

# आवर्त गुण.

प्रपाण ह्मणजे वरचा ओंठ ह्यावरील भोंवरा, व सृक्किणी (ओंटाचें शेवट) ह्या ठिकाणचा भोंवरा हे उत्तम होत. ज्या घोड्याच्या कपाळावर चार, तीन किंवा दोन आवर्त ह्मणजे भोंवरे असतात तो घोडा फारच उत्तम होय. घोड्याच्या कपाळावर एकावर एक अशा क्रमानें तीन भोंवरे असल्यास त्यांस निश्रेणी ह्मणतात, ते उत्तम समजावेत. शीर आणि केशांत ह्मणजे केंशाचा शेवट ह्या दोहोंच्या मध्यभागीं जो भाग असतो त्यास स्रुव ह्मणतात, त्या भागीं असलेला आवर्त उत्तम समजावा. घंटा बंधनापासून कंठाचे खालीं नऊ अंगुळावर आणि हृदयापासून वर जें स्थान असतें त्यास निगाळ ह्मणतात. आणि त्या निगालावर असलेल्या आवर्तास देवमणी असें ह्मणतात. तोही उत्तम समजावा.

कर्णाचें मुळ, बाहू, केशांत आणि मस्तक ह्या ठिकाणी असलेले भोंवरे उत्तम समजावेत. मस्तकावर असलेला भोंवरा फारच उत्तम होय. ज्या घोड्याच्या उरावर चार किंवा तीन आणि कंठावर एक असे भोंवरे असतात तो घोडा उत्तम समजावा. अश्वाच्या रंध्र स्थानीं ह्मणजे पोट आणि नाभी यांचे अंतरावर किंवा उपरंध्राचे वरच्या बाजूवर असलेला आवर्त उत्तम समजावा. या भोंवऱ्यास क्षेम किंवा मेखला असें ह्मणतात. पाठ, कंबर, नेत्र, ओष्ठ, ओष्ठप्रांत (जिभळ्या), मुख, पोट, कुशी ह्यांवर असलेले भोंवरे उत्तम होत.

घोड्याच्या वरच्या ओंठावर एक, ललाटावर एक, आणि रंध्र, उपरंध्र व वक्षस्थळ या ठिकाणीं दोन दोन असलेले आवर्त ध्रुवावर्त होत. ते उत्तम समजावेत.

अश्वाचें प्रपाण, कपाळ, ऊर, डोकें, रंध्र, उपरंध्र ह्या ठिकाणीं भोंवरे असावेत ह्मणून सांगितलें ते सर्व मिळून दहा असल्यास उत्तम

होत. ह्या अवयवांपैकीं एकावर तरी भोंवरा असावा. त्यांत देवमणी असला तर फारच उत्तम.

वीर मित्रोदयांत काहीं विशेष सांगितलें आहे तें असें:—ज्या अश्वाच्या कपाळावर दोन उजवेकडे मुरडलेले आवर्त असतात तो अश्व उत्तम समजावा. मुकुलाकृति दोन भोंवरे ज्याच्यां स्तुवावर असतात तो अश्व उत्तम समजावा.

ककुद (वरवंड) सोडून पूर्वभागांत कोठेही असलेला आवर्त उत्तम समजावा.

ज्याच्या कंठांतील आवर्त शुक्तीच्या आकृतीचा असतो तो उत्तम समजावा.

ज्याच्या पूर्वभागीं मस्तकाचे ठिकाणीं शिप, पताका ह्या आकृतींचे निश्रेणी (३ भोंवऱ्यांची ओळ) असून पाठीवर मेखळा (एक चिन्ह) आहे तो अश्व उत्तम समजावा.

केशांत या ठिकाणीं आणि अश्वाच्या दोन्ही डोळ्याच्या मध्यें शिंपीमारखे भोंवरे असतात ते उत्तम होत.

कंठावर रोचमान (श्रीवर्धन) हें चिन्ह आहे, किंवा उरावर चार भोंवरे आहेत तो अश्व उत्तम समजावा

ज्याच्या बाहूचे ठिकाणीं शुभ्रवर्ण दोन भोंवरे असतात तो बाहू भूषणें धारण करणारा होय व तो उत्तम समजावा.

घोड्याच्या कपाळावर चार दिशेस चार अंस भोंवरे असतात त्यास चतुरंग ह्मणतात. तो अश्व उत्तम समजावा.

ज्याच्या कानावर जाईच्या 'कळीसारखे दोन आवर्त प्रदक्षिणाकार असतात तो उत्तम समजावा.

ज्याचे वक्षस्थलावर किंवा ललाटाचे ठिकाणीं बिल्व, वृक्ष, स्वस्तिक, वर्धमान, गदा, पक्षी, नखींतील भोंवरा, नांगर, चक्र, शंख,

वज्र, खड्ग, धनुष्य, मत्स्य, चंद्र, सूर्य, पताका आणि मुसळ इत्यादि आकाराचे शुभ भोंवरे असतात तो अश्व उत्तम समजावा.

घोड्याचें कपाळ, मस्तक, मान, हृदय, पादपक्ष, मनगट, नाभि, स्कंभ, पार्श्व ( दक्षिणोत्तर बाजू ), गळा, तोंड, उदर, रंध्र व त्रिक ह्मणजे पूर्वी सांगितलेलीं तीन स्थानें इतके टिकाणीं मिळून बारा भोंवरे असावेत.

नासिकाग्राचे ठिकाणीं, कपाळावर शंखस्थानीं, कपाळाचे ठिकाणीं आणि मस्तकावर आवर्त असल्यास ते उत्तम समजावेत. ज्याच्या ललाटावर दोन आवर्त असतात आणि तिसरा मस्तकावर असतो तो अश्व उत्तम समजावा.

अश्वाचे कपाळावर दोन आवर्त असतात, त्यांस चंद्र सूर्य ह्मणतात. तो अश्व उत्तम समजावा.

अश्वाच्या उजव्या गंडस्थलावर जो भोंवरा असतो त्यास शिव ह्मणतात. तो अश्व उत्तम समजावा.

ज्यास कर्णमूळाचे ठिकाणीं एक व उरावर एक असे भोंवरे असतात त्यास इंद्राक्ष किंवा विजयावर्त ह्मणतात. हे उत्तम होत.

अश्वाच्या स्कंधावर किंवा पार्श्वभागीं असलेले आवर्तास पद्मसंध ह्मणतात, ते उत्तम समजावेत.

अश्वाच्या तालूचे ठिकाणीं जो आवर्त असतो त्यास मुकुल ह्मणतात, तो उत्तम समजावा.

घोड्याचे अंगावर दहा भोंवरे खालीं सांगितलेल्या स्थळीं असावेत त्यांपैकीं एक कमी असल्यास किंवा एक ज्यास्ती असल्यास घोडा अल्पायुषी ह्मणून समजावा. हे दहा भोंवरे आणि शिवाय तीन ध्रुव घोड्याच्या अंगावर पहावेत तीं ठिकाणें खालीं लिहिल्याप्रमाणें:—

मस्तकावर दोन, छातीचे दोन्हीकडे दोन. कशीच्या दोन्ही बाजूस जेथें डाग देतात ती जागा सोडून दोहींकडे दोन, पायावर दोन, ओंठावर एक आणि कपाळावर एक इतक्या ठिकाणी मिळून दहा भोंवरे असावेत.

छातीवर दोन, कपाळावर दोन, वरच्या ओंठावर दोन आणि दोन्ही कुशीवर दोन असे भोंवरे असल्यास उत्तम समजावेत. हें आठ भोंवऱ्याचें लक्षण होय.

तीन भोंवरे एके ठिकाणीं असून जर ते उजवेकडे असतील तर तें उत्तम चिन्ह समजावें.

जर दोन भोंवरे एका बाजूवरच ह्मणजे उजव्या किंवा डाव्या बाजूवर असतील तर ते उत्तम समजावेत.

ज्याचे डोळे मोठे, कान मोठे, हिंमणें मोठें, चाल जलद व चिनओल, आयाळीस केंश फार असून अत्यंत वेगवान, बळकट व स्वामीचे आज्ञेंत वागणारा असतो तो अश्व युद्धास योग्य जाणावा.

मान लांब; डोळ्याजवळील जागा, कंबर व छाती रुंद; माड्या व गुढघे वाटोळे; शरीर शोभिवंत; ओंठ, जिव्हा व तालू अरक्त; अंगाची कातडी व केंश मृदु; खूर वाटोळे; दृष्टि सन्मुख, कान, पुच्छ व ओंठ लहान; अशा गुणानीं युक्त जो घोडा तो राजगृहीं असावा. तो शत्रूचा नाश करील.

ज्या घोड्याचा स्वर थोरले नौबतीसारखा, अगर शंखासारखा. अगर मेघासारखा, अगर हत्तीसारखा गंभीर असून मृदंगासारखा मधुर आहे तो घोडा उत्तम होय.

ज्या घोड्याचे पायाचे खूर काळे व गुठा शामवर्ण असून जो मुत्र करिते वेळीं त्याचा मुत्र पुढील पायाजवळ पडतो, जो दातानी नेहमी लगाम चवळतो, ज्याचा खांदा कोंबड्याचे खांद्यासारखा आहे, व

मांड्या रानडुकराचे मांड्याप्रमाणें बळकट आहेत तो घोडा उत्त असून बहुत चालणारा होय.

**मेखलांकीत**-अग्रभागाचे ठिकाणीं जे चांगले भोंवरे असतात त्यां मेखलांकित ह्मणतात.

**चिंतामणी**-ज्याच्या खुरावर लांब केंश असतात त्या अश्वा चिंतामणी ह्मणतात.

**देवमंगळ**-कटीवर, उरावर, शिरावर व कपाळावर मिळून चा पांच भोंवरे असतात त्यास देवमंगळ ह्मणतात.

**आष्टमंगळ**-जो घोडा पांढरा किंवा बोर, अगर कुमाईत, किंवा जर्द रंगाचा असून त्याचे चारी पाय, शेंपूट, ऊर,तोंड आणि डोक्यावरील केंश,वृषण, शिश्न हे पांढरे आहेत त्याला अष्टमंगळ ह्मणतात.

**कपाली**-दोन्ही खुरावर नवाच्या आंकड्याप्रमाणें आणि कमळाकृति भोंवरे असल्यास त्यास कपाली ह्मणतात.

**पंचकल्याणी**-जो एक रंगी असून ज्याचे चारी पाय आणि तोंडाचा मध्यभाग पांढरा असतो त्यास पंचकल्याणी ह्मणतात. सर्व रंग तांबडा असून बाकीचीं वर सांगितल्याप्रमाणें चिन्हें असल्यास त्या अश्वासही पंचकल्याणी ह्मणतात.

**कुमाईत तुरंग**-ज्याचा सर्व अंगाचा रंग तांबडा असून डोळे मोठाले, दांडी, आयाळ, गुढघे, पाय आणि कान ह्यांचा रंग काळा असतो त्यास कुमाईत तुरंग ह्मणतात.

**शामकर्ण**-सर्वांग शुभ्र आणि कान काळे त्या अश्वाला शामकर्ण ह्मणावा.

**शीतमंगल**—ह्मणजे दोन्ही बाजूस कुशीखालीं शंखाप्रमाणें किंवा कमळाच्या फुलाप्रमाणें अथवा बांगडीप्रमाणें दोन भोंवरे असतात तो घोडा फार चांगला आहे. त्याचा धनी नेहेमीं संपत्तिवान राहील.

**कृष्णावर्त**—ह्मणजे घोड्याचे सर्व अंगांपैकीं एका ठिकाणीं शंखाप्रमाणें भोंवरा असतो तो फार चांगला आहे. धनी संपत्तिवान राहील व नफा फार होईल.

**सुवर्णपाद**—ह्मणजे छातीवर इतके केंश आलेअसावेतकीं, ती छाती झांकून जावी. ' तसेंच एका पायास किंवा चार पायांसही केंश असावेत.

**गरुडपक्ष**—ह्मणजे घोड्याचे दोन्ही कुशींवर दोन भोंवरे असतात. तो घोडा खरेदी घ्यावा. ह्यावर स्वार होऊन जो लढाईस जाईल तो सलामत परत येईल. त्याचा धनी संपत्तिवान राहील.

**कांबीआयाळ**—ह्मणजे घोड्याच्या डोसकीचे केंश इतके असतात कीं, त्यानीं डोळे झांकले जातात व आयाळ व दांडी इतकी लांब असते कीं, ती जमिनीवर पडते. असा घोडा फार चांगला व शुभदायक असतो.

**दिव्यपक्ष**—ह्मणजे एक रंगी घोडा असून त्या घोड्याच्या आंगावर कोठंही भोंवरा नसावा. असा घोडा चांगला असून तो आपले धन्यास लढाईंतून सलामत आणील.

## भोंवऱ्यावरून देवता नामनिर्णय.

१ कपाळीं भोंवरा तेथें अग्नि राहतो. २ नाशिकीं भोंवरा तेथें वायु राहतो. ३ खोकींत दोहींकडे दोन तेथें श्री गणपति व कार्तिकवीर्य राहतो. ४ मस्तकावर दोन तेथें चंद्र सूर्य. ५ छातीवर दोन तेथें अश्विनीकुमार. ६ खांद्यांत दोन बाजूस तेथें कार्तीवीर्य. ७ कमरेवर दोन तेथें विष्णु महादेव. एकूण दहा भोंवरे ज्याचे आंगावर तो घोडा धृवअश्व महाकल्याणकारक होय.

**निश्रीनीअश्व**-ह्मणजे ज्या घोड्याचे कपाळावर ओळीनें खालींवर तीन भोंवरे आहेत. ह्याच्या योगानें पागेंत अश्ववृद्धि होते.

**कंकणाश्व**-ह्मणजे ज्या घोड्याचे मानेवर तीन भोंवरे असतात. तो अश्व कल्याणकारक होय.

**चिंतामणीअश्व**–ज्या घोड्याचे कंठावर भोंवरा आहे त्यास चिंतामणी अश्व ह्मणतात. तो इच्छिले पदार्थ देतो.

**सूर्यअश्व**–ह्मणजे ज्या घोड्याचे पाठीचे कण्यावर भोंवरा तो. हा अश्व कल्याणकारक होय.

**मेखलीअश्व**- ज्या घोड्याचे उदरावर दक्षिणेकडे आवर्त असतो त्यास मेखली अश्व ह्मणतात. तो संपदा देतो.

**जयमंगल**-ह्मणजे ज्या घोड्याचे आंगावर पांच भोंवरे किंवा दोन चार शिरावर, ओंठावर किंवा कपाळावर व ऱ्हदयीं व अपानावर असतात. हा अश्व रणांत गेला असतां जय येईल यांत संशय नाहीं.

**भूमंगल**–ह्मणजे ज्या घोड्याचे उरावर भोंवरे चार पांच असतात किंवा सारे कंठाचे ठिकाणीं असतात त्यास अथवा ज्या घोड्याचे कंठीं कमलाचे फुलासारखा किंवा पत्रासारिखा एक किंवा दोन बाजूस दोहीकडे दक्षिणेचे बाजूनें फिरणारे आवर्त असतात त्यास ह्मणतात. असा घोडा नळाचे घरीं होता.

**देवमणीअश्व**—घोडा ह्मणजे ज्या घोड्याचे ऊर सोडून वरभागीं कंठाचे खालीं भोंवरा असतो तो. हा अश्व सुखदायक होय.

**श्रीवृक्षीअश्व**—ह्मणजे ज्या घोड्याचे छातीवर चार चहूंकडे व कंठाचे ठिकाणी चार असे आठ भोंवरे असतात. तो घोडा राजगृहीं सतत संपदा देतो.

ज्या घोड्याचे कंठावर तीन व खुरावर चार असे सात भोंवरे असतात तो राजास सुख देतो.

---

# अशुभ (वाईट) अवर्ताविषयीं.

घोड्याच्या अश्रुपातस्थानीं, तसेंच हनुवटी, गंडस्थळें, ऱ्हदय,

कंठ, प्रोथ ( वरच्या ओंठाचा वरचा भाग ), शंख ( कटाक्षापासून दोन अंगुळावरचा भाग ), कटी, गुढघे, मुष्क ( अंड ), व नाभी या ठिकाणीं असलेले भोंवरे वाईट समजावेत.

ककुद, गुद, डावी कुक्षि, डावा पाय, घोणा, नाकपुडी, भिवई, लोचनावर्त, खांदा, गळा ह्या ठिकाणीं, त्याचप्रमाणें ग्रंथी, कूर्च, कलाकूर्च, काकस्थान, क्रोड, आसन, ऱ्हदय, त्रिक, पुच्छमूल, खूर इतक्या ठिकाणीं भोंवरे असल्यास ते वाईट ह्मणून समजावेत. घोड्याचें प्रपाण, कपाळ, ऊर, डोकें, रंध्र, उपरंध्र इतक्या ठिकाणीं मिळून अगदींच भोंवरा नसल्यास हें वाईट लक्षण समजावें. ज्याच्या पाठीचे कण्यावर एक आवर्त असतो त्या अश्वास सूर्य अशी संज्ञा आहे. तोही वाईट ह्मणून समजावा. अश्वाचें मुख व कंठ ह्या ठिकाणीं एक आवर्त असल्यास तो वाईट ह्मणून समजावा. गुढघ्यावरील आवर्तास प्रवाल ह्मणतात. तो वाईट समजावा. मेंढ्रनलावर ( शिश्नाचे तळीं ) असलेला आवर्त, तसाच त्रिवळीच्या ठिकाणीं असलेला आवर्त वाईट समजावा. घोड्याच्या पुच्छ प्रदेशावरील आवर्तास धुमकेतु ह्मणतात. तो वाईट समजावा.

एका बाजूकडे वरील भोंवऱ्यांपैकीं एकच भोंवरा असल्यास वाईट समजावा. मांडीवर भोंवरा असल्यास किंवा शिश्नाचे ठिकाणीं असल्यास वाईट. मांडीवरचे भोंवऱ्यास जंघावर्त ह्मणतात.

## खोडींविषयीं.

**१ शृंगी**— शेंडींत किंवा कानाचे अंतरांत मासाचा खिळा दिसतो त्यास ह्मणतात. शिंगासारखें चिन्ह ह्मणजे आंगठ्याप्रमाणें किंवा जांभूळ, बोर, कोय, हिरडा ह्यासारखे केशांची रचना दग्धचर्मवत असते त्यास ह्मणतात. व शेंडींत भोंवरा असल्यास त्यासही शृंगी ह्मणतात, परंतु ती बहुमतानें खोड नाहीं.

२ **अंजनी**—घोडा एक रंगाचा असून त्यावर कोठें तरी त्याशिवाय इतर रंगाचा टिकला असल्यास त्यास ह्मणतात. कोणी तिला चांदणी असेंही ह्मणतात.

३ **द्वयखुरी**—ज्याचे खूर बैलाच्या खुराप्रमाणें त्रिवळीयुक्त व मध्यें खोलं असे असतात त्या खोडीस द्विखुरी ह्मणतात. खुरावर खुराचा आकार रेखांनीं दर्शित असतो.

४ **कुखावर्त**—घोड्याच्या दोन्ही कुशीवर भोंवरे असतात त्यांस कुखावर्त ह्मणतात. त्यांत एका कुशीवर ( उजवे किंवा डावे ) असेल तर वाईट समजावा. दोन्हीकडे असल्यास चांगला समजावा.

५ **एकांगुळ**—( एक मंडलिया ) एक डोळा गारोळा आणि एक डोळा पांढरा असें असल्यास त्यास एकांगुळा किंवा फारषी भाषेंत हफीर ह्मणतात.

६ **त्रिकर्णी**—तीन कान असल्यास त्रिकर्णी ह्मणतात. दोन कानांपैकीं एक चिरल्या सारखा दिसतो किंवा एका कानास देंठ फुटल्याप्रमाणें असतो त्यालाच त्रिकर्णी ह्मणतात.

७ **थनी**—घोड्याच्या उरावर स्तनाकृति मांस असल्यास त्यास थनी ह्मणतात. व अंडा जवळ स्तनासारखे घोडीच्या स्तनाप्रमाणें आकार असतो त्यासही ह्मणतात.

८ **हीनदंती**—ज्यास पांच दांत आहेत तो हीनदंती होय.

९ **अंडावर्त**—घोड्याचें वृषण ज्या जागीं पोटास लागतें त्या जागीं किंवा वृषणावर भोंवरा असल्यास त्यास अंडावर्त ह्मणतात तो साधारण आहे.

१० **अधिकदंत**—ज्यास सात दांत असतात त्यास ह्मणतात.

११ **काळवदन**—सर्व अंगावरचा सारखा रंग असून ह्मणजे एक रंगी असोन तोंडावर काळा पट्टा किंवा काळें तोंड असतें, असें असल्यास त्यास काळवदन किंवा काळमुखी ह्मणतात.

१२ **विक्राळ**—दोन्ही दांतांचे बाहेर वांकडा दांत असतो त्यास ह्मणतात, किंवा खालचे लांब आणि वरचे आंखूड दांत असल्यास त्यासही ह्मणतात.

१३ **पंचनखी**—घोड्याचे छातीवर पांच रेघा असतात त्यास ह्मणतात, किंवा पायाचे तळावर पांच उभ्या रेघा असतात त्यासही ह्मणतात.

१४ **कराळ**—खालचे दांत वरच्या दांताला जिंकतात व दोन दांताचे बाहेर एक वांकडा दांत असतो, वरील दांत लांबट असून खालील आंखूड असतात. यामुळें जबडा मिटला असतां दांतांस दांत लागत नाहींत फट राहाते.

१५ **अहीमुख**—सर्पासारखें ज्याचें तोंड तो अहीमुखी ह्मणून समजावा.

१६ **तुटपट्टा**—घोड्याच्या तोंडावर पांढरा मुखपट्टा असून तो दोन ठिकाणीं तुटला असेल तर त्यास तुटपट्टा असें ह्मणतात.

१७ **वाणिया**—घोड्याच्या आंगावर तीन चार अंगुळें लांब नीट रेघा असतात परंतु त्या भोंवऱ्याच्या आकृतीप्रमाणें नसतात त्यास वाणिया ह्मणतात.

१८ **त्रिशिंग**—कपाळावर त्रिकोनाकार तीन भोंवरे असल्यास त्यास त्रिशिंग ह्मणतात.

१९ **आसनखऊ**—पाठीवर जीन घातलें असतां जिनाखालीं जो भोंवरा झांकला जातो त्यास आसनखऊ ह्मणतात.

२० **सर्पिण**—लगाम देतांना जो घोडा जीभ बाहेर काढतो त्यास आडवी सर्पिण ह्मणतात.

२१ **कृष्णांजनी**—एक रंग असून त्याच्या डाव्या कुक्षी खालवर किंवा ऱ्हदयावर काळा टिळा असल्यास त्यास कृष्णांजनी ह्मणतात.

२२ **खानखऊ**—खांद्यावर भोंवरा असल्यास त्यास खानखऊ ह्मणतात.

२३ **गोमीपांच**—गोमेचें लक्षण आवर्ताचे लक्षणांत सांगितलेंच आहे. ती गोम एक वीत अगर दोन विती लांब असल्यास वाईट. तिला कोणी गंगापाट असें ह्मणतात. तोंडावर अथवा पाठीवर किंवा मस्तकावर गोम असल्यास वाईट. ह्या गोमेचें तोंड घोड्याच्या तोंडाकडे असल्यास वाईट. शेपटीकडे असल्यास उत्तम. तसेंच खालीं तोंड असल्यास चांगलें, व वरती तोंड असल्यास वाईट. पायावर गोम असून तिचें तोंड वर असल्यास वाईट. खालीं असल्यास उत्तम.

२४ **हरिणांग**—घोडा एक रंगी असून त्याच्या पाठीवर शुभ्र रंग असल्यास त्यास हरिणांगी ह्मणतात.

२५ **पितअंजनी**—घोडा एक रंगी असून त्याच्या उजव्या छातीवर किंवा मांडीवर पिंवळा टिकला असल्यास त्यास पितअंजनी किंवा पद्मांजन ह्मणतात.

२६ **काखावर्त**—एका बगलेंत भोंवरा असल्यास त्यास ह्मणतात.

२७ **सारभूकण**—नाकपुड्याच्या आंतील बाजूस पांढरे एक किंवा अनेक ठिपके असल्यास त्यास सारभूकण ( सारभाजन ) ह्मणतात.

२८ **एकांडी**—ज्यास एक अंड असतें त्यास एकांडी ह्मणतात. आणि ज्याचें आंड एकीकडे लोंबत असतें त्यास ही एकांड ह्मणतात.

२९ **काळांजनी**—एक रंगी असून त्याच्या डाव्या कुशीच्या खालवर किंवा ऱ्हदयावर काळा टिळा असल्यास त्यास ह्मणतात.

३० **अंगावर्त**—घोड्याचे पुढील पायाचे फऱ्यावर उजवेकडे किंवा डावेकडे भोंवरा असतो त्यास अंगावर्त ह्मणतात.

३१ दाढशृंखळ--दाढांबरावर बाहेरच्या अंगास किंवा गालावर भोंवरा असल्यास त्यास ह्मणावा.

३२ पुसावर्त—पुच्छाजवळ जो भोंवरा असतो त्यास ह्मणतात.

३३ श्वेतांजनी—घोडा एक रंगाचा असून त्याचे फासोळीला किंवा कुशीवर पांढरा ठिपका असल्यास त्यास श्वेतांजनी ह्मणतात. तसेंच एकरंगी पांढरा घोडा असून त्यावर तांबडी टिकली असल्यास त्यास रक्तांजनी ह्मणतात.

३४ लेंडावर्त--अस्वळीचे पुच्छा सारखें ज्याचें पुच्छ असतें त्यास ह्मणतात. असें शेंपूट होण्यास त्याचे शेंपटास असणारे मणके इतर घोड्याचे शेंपटाचे मणक्यांपेक्षां कमी असतात.

३५ शुन्यमस्तक—दोन्हीं कानांजवळ मस्तकाचे मागें आसपास भोंवरे नसल्यास त्याला ह्मणतात.

३६ हृदावर्त—उरावर भोंवरा असला तर त्यास ह्मणतात. चार अंगुळे लांब असा भोंवरा पेशबंधा खालचे ठिकाणीं असल्यास त्यासही हृदावर्त ह्मणतात.

३७ नासावर्त—नाकावरील भोंवऱ्यास नासावर्त ह्मणतात. तो उजवेकडे असल्यास जनावर्त आणि डावेकडे असल्यास नासावर्त ह्मणतात. नाकापाशीं फुगा किंवा चामखीळ असल्यास ती खोड गणली जाते.

३८ पोटावर्त—उदरावर भोंवरा असल्यास त्यास ह्मणतात. ही सामान्य खोड आहे.

३९ तळावर्त—मागचा पाय पुढचे पायाला चालतांना लागतो त्यास ह्मणतात.

४० शिळावर्त—जानूवर ( गुडघ्यावर ) भोंवरा असल्यास त्यास ह्मणतात.

४१ **नेत्रावर्त**—डोळ्यावरील डावे बाजूवर किंवा डोळ्याचे खालवर भोंवरा असल्यास त्यास ह्मणतात.

४२ **भाळलोचन**—ज्याचें आयाळ ( मानेवरचे केंश ) दोहीकडे पडतात त्याला ह्मणतात. कोणी त्यास अयाळवळचणही ह्मणतात.

४३ **व्याघ्रकांत**—एकरंगी घोडा उन्हांत बांधला असतां वाघा सारखा चकाकतो त्यास ह्मणतात. आणि ज्याचे अंगावर वाघाचे पट्या सारख्या रेघा असतात त्यासही व्याघ्रकांत ह्मणतात. अशा खोडीचा घोडा जरद्या रंगाचाच असतो.

४४ **कृष्णटाळू**—ज्याच्या टाळूवर काळे ठिपके असतात किंवा वर भोंवरा असतो, तो कृष्णटाळू ह्मणून समजावा. तो घोडा काळ्या रंगाचा असल्यास, कृष्णटाळूचा दोष नाहीं.

४५ **कपिमुख**—खालचा ओंट लांब आणि वरचा आंखूड असे ओंठ असल्यास कपिमुख ह्मणतात. ही खोड सामान्य आहे.

४६ **जानूवर्त**—जानूवरील भोंवऱ्यास शिळावर्त ह्मणतात आणि जंघेवर ( मांडीवर ) भोंवरा असल्यास त्यास जानूवर्त ह्मणतात.

४७ **आर्जळ**—( चित्रभंगी ) एकरंगी घोडा असून पुढील किंवा मागील ( डावा किंवा उजवा ) पाय पांढरा असल्यास चित्रभंगी ( आर्जळ ) ह्मणतात.

४८ **कर्णमूळ**—कानाचे पाठीवर भोंवरा असल्यास त्यास कर्णमूळ ( ग्रीध्र ) ह्मणतात.

४९ **शिंपला**—कमळा सारखा किंवा मोत्याचे शिंपल्यासारखा भोंवरा असल्यास त्यास शिंपला ह्मणतात. ही सामान्य खोड आहे.

५० **पंचनखी**—ज्याच्या चार पायांपैकीं कोणत्याही एका पायाला फाटा फुटल्यासारखे चरणाची आकृति असते त्यास ह्मणतात

५१ **मेंढमुख**—ज्याचें तोंड मेंढरासारखें आहे त्यास ह्मणतात.

९२ **खरमुख**—गाढवा सारखें तोंड असल्यास ह्मणतात. हें क्षण साधारण आहे.

९३ **राघामुख**—ज्याचें तोंड राघूसारखें आहे त्यास ह्मणतात. ा साधारण खोड आहे.

९४ **कौस्तुकी**—घोड्याच्या गळ्याखालीं लोंबणारें कांतडें (पोळी) सल्यास त्यास कौस्तुकी ( गळ लोंबीका ) ह्मणतात.

९५ **हयभंग**—घोडा एक रंगी असून त्याच्या पाटावर पांढरा ठपका असल्यास त्यास ह्मणतात.

९६ **केरसुण्या**—जो घोडा आपलें शेंपूट डावे किंवा उजवे ाजूला नेहमी धरतो त्यास ह्मणावा.

९७ **मध्यदंती**—घोड्याला दांत सहा असतात त्यांतील मधला ांत मोठा असल्यास त्यास मध्यदंती ह्मणतात आणि एक लहान अ-ल्यास महानदंत ह्मणतात.

९८ **खुटीउपाड**—घोड्याचे उजवे गुढघ्याखालीं भोंवरा असल्यास यास खुंटीउपाड ह्मणतात आणि डावे गुढघ्याखालीं भोंवरा असल्यास यास खुंटीगाढ ह्मणतात.

९९ **अश्रुपात**—घोड्याचे डोळ्या खालीं भोंवरा असल्यास त्यास णतात.

१० **सेनाभंजन**—घोड्याचे मागील चौकावर भोंवरा असल्यास यास ह्मणतात. या खोडीस दळभंजन अशीही संज्ञा आहे. पाळावर पांढऱ्या केंसांत तांबडे केंश असल्यास त्यासही दळभंजन णतात परंतु त्याचा आकार आंगळ्याच्या बाहेर आलेला नसावा.

११ **ढाशी**—जो नेहमीं ढासतो त्यास ह्मणतात.

१२ **पोटसूळ**—ज्याचें नेहमीं पोट दुखतें त्यास ह्मणतात.

१३ **खळतो**—जो नेहमीं रेतं गाळतो त्यास ह्मणतात.

६४ **रातांधळ**—ज्यास रात्रीं दिसत नाहीं त्यास ह्मणतात.

६५ लीद खातो, ६६ माथेशूळ, ६७ पडमुत, ६८ रक्त मुततो, ६९ पाण्यांत बसतो, ७० चऱ्हाटें खातो, ७१ डसतो, व ७२ बुजतो. याखेरीज इतरही आणखी खोडी आहेत त्या १ उतरड, २ चिमटा, ३ डंकी, ४ बोंबल्या, ५ एका अंगावर झुलणें, ६ बसला असतां उठतांना गुढघे टेकून उठणें ह्या होत.

याशिवाय कांहीं कारणां पासून ज्या खोडी लागतात त्या खालीं लिहिल्या प्रमाणें:—

१ **मगरूरी करणें**—ही खोड लहानपणांत फार मारल्यानें किंवा घोड्यांचे तंव्यांत नेहमीं राहिल्यानें उत्पन्न होते.

२ **फार हिंसणें**—घोडीजवळ घोड्यास नेहमीं बांधल्यानें उत्पन्न होते.

३ **भित्रेपणा**—ही खोड वाईट दील असल्यानें किंवा पुकारा व आवाज यापासून उत्पन्न होते.

४ **उड्यामारणें**—स्वारीचे वेळेस उजवे व डावेकडेस पळविल्यानें. पाठीवर जखम असतां स्वारी केल्यानें किंवा लहानपणांत नेहमीं अथवा जास्ती स्वारी केल्यानें होते.

५ **पळण्याची खोड**—फार मारण्यापासून किंवा बंदुक, ताशा वगैरेंचा आवाज ऐकण्या पासून उत्पन्न होते.

६ **लाथ मारणें व भांडखोरपणा करणें**—स्वभावजन्य आहे.

७ **पुढें आलेले जिनसावरून उडून जाणें**—लगाम हलका दिल्यानें किंवा ममरेज लाविल्यानें होते.

८ **चावणें**—अगुतीं गुळ खाण्यास दिल्यानें ही खोड लागते.

९ **दोनपायांवर उभें राहणें**—लगाम प्रथम ढिला सोडून नंतर एकदम ओढल्यानें घोडा दोन पायावर उभा राहतो.

१० **नालबंदी करूं न देणं**—पहिले नालबंदीचे वेळेस घोड्यास इजा झाली तर तो दुसऱ्यांदां करूं देत नाहीं.

याप्रमाणें घोड्याच्या वाईट खोडी विषयीं ठळक वर्णन दिलें आतां याशिवाय विशेष खुलासेवार खोडी विषयींचें वर्णन खालीं देतों तें असें:—

**पंचवाख**—घोड्यास छातीवर पांच रेखा असल्यास त्यास ह्मणतात. ही सामान्य खोड आहे.

**बांधरीनाख** किंवा **हरिनाख**—ह्मणजे दोन्ही कानांमध्यें आणि शेंडांमध्यें भोंवरा असल्यास त्यास ह्मणतात.

**उपानयन**—घोड्यावर स्वार बसला असतां घोडा पुढचे दोन्ही पाय वर करितो त्या खोडीस ह्मणतात. ही खोड फार वाईट आहे व ती कधीं जात नाहीं.

**जीनपाठक**—घोड्याचा सर्व रंग एकसारखा असून पाठ पांढरी असल्यास ह्मणतात. तो वाईट समजावा.

**तंगावर्त**—तंगाखालीं वाटोळा भोंवरा असतो त्यास तंगावर्त ह्मणतात.

**मांडवर्त**—मांडीवर उजवेकडे किंवा डावेकडे भोंवरा असल्यास त्यास ह्मणतात.

**चित्री**—ज्या घोड्याच्या अंगावर सफेत ठिपके होतात त्यास चित्री किंवा चित्ता असें ह्मणतात. त्यास कधीं कधीं घोडा फुलला असेंही ह्मणतात.

**शाखी**—घोड्याच्या दोन्ही कानांपैकीं एक कान मोठा असून घट्ट उभा असतो त्याला शाखी अथवा शाख ह्मणतात. तो वाईट समजावा.

**दोसीना**—घोड्याचे ऱ्हदयावर मध्यभागीं दुसरे रंगाची रेघ असल्यास त्यास ह्मणतात.

**रुईकांती**—एक रंगी घोड्यास एका ठिकाणीं तांबडा अरुणोदयासारखा तांबूस रंगाचा ठिपका असतो त्यास ह्मणतात.

**जंबावर्त**—मांडीवर किंवा शिश्नावर भोंवरा असल्यास त्यास जंबावर्त ह्मणतात.

**पंचपर्व**—ज्या घोड्याचे चार पायांपैकीं कोणत्याही एका पायास फरगड्याची ( सरड्याची ) आकृति असते त्या घोड्यास पंचपर्व ह्मणतात.

**गुदक**—ज्याचे पायांचीं कांतडीं रक्तवर्ण असतात त्यास गुदक ह्मणतात. तो वाईट होय.

**पापवर्ण**—कंठदेशीं रेषा असेल तो पापवर्ण समजावा. तो वाईट होय.

कंठस्थानाचे मध्य हाडावर भोंवरा असल्यास तो स्वामीचे स्त्रियेस नाशप्रद होतो.

जो घोडा नेहमीं लाळ गाळतो तो वाईट समजावा.

## इतर वाईट भोंवऱ्यांविषयीं.

१ **असलि**—हा भोंवरा डोळ्यावर असतो तो चांगला व डोळ्याखालीं असल्यास वाईट.

२ **यक्रब**—हा भोंवरा जबड्यावर असेल तर चांगला. खालीं असेल तर वाईट.

३ **सार्फान**—कानाचे मागें मध्यावर असेल तर वाईट.

४ **सिपलक**—एका कुशीवर असल्यास वाईट. दोन कुशीवरचा उत्तम.

५ **सिंगन**—हे भोंवरे दोन्ही कानांचे आंत असतील तर वाईट.

६ **कनइसालि**—कानापासून निघून पाठीकडे मानेवर गेला असेल तर चांगला व मानेपासून कानाकडे गेला असल्यास वाईट.

७ च्छपरखट किंवा जनाजा—हा जिनाचे खालीं असतो.

८ इतलसार—हा भोंवरा कुल्यावर असतो.

९ डंखउजाड—तोंडाचे खालीं पायापर्यंत जो भोंवरा जातो तो.

१० संगिनमाक—हा भोंवरा आयाळींत छपून राहतो.

११ कुलुंज—मागील पायाचे कोन एकास एक लागतात तो स्वारीस वाईट.

१२ सफादारा—मागील पाय फार फैलावून चालतो अयब नाहीं.

१३ गातदार—घोड्याचा सुंभ जोड्यासारखा असतो अयब नाहीं.

१४ मुराषा—घोड्याचे मागील पाय कोंबड्याचे पायाप्रमाणें नीट असतात तो चांगला.

१५ चवडासुंभ—थाळीप्रमाणें रुंद सुंभ असतात तो स्वारीस वाईट.

१६ मुत्लककूलफेदान—पुढील दोन पाय पांढरे असतात. मोंगल लोक त्याला अयब समजतात.

१७ मुत्लकूललर्जेन—मागील दोन पाय पांढरे असल्यास अयब.

१८ मलकूलयेसार—पुढचा व मागचा डावा पाय सफेत असतो तो अयब आहे.

१९ मुलकूलयोजान—पुढील व मागील उजवा पाय पांढरा असेल तर चांगला.

२० मुलारत—पुढील डावा पाय सफेत असणें वाईट आहे. उजवा जर पांढरा असेल तर बरा.

२१ चारगुल—सबजा रंगाच्या घोड्याचे उजवे पुठ्यावर चारगूल असेल तर पंजाबांत व नेपाळांत अयब समजतात.

२२ खालदार—पांढरे रंगाचा घोडा असून काळे केंश त्यांत मिश्र असतील तर अयब आहे.

२३ चबदस्त—तीन पाय पांढरे व पिवळे रंगाचा घोडा असून त्यांत काळे केंश असल्यास अयब.

२४ सिकल—पुढील उजवा पाय व मागील डावा पाय पांढरा असेल तर वाईट.

२५ गोवस्तान—गाईसारखी ज्या घोड्याची छाती तो देखण्यांत खराब परंतु अयब नाहीं.

२६ काच्छि—ज्या घोड्याचे पाठीवर खाश तो देखण्यांत उत्तम.

२७ तवरंगु—हत्तीसारखा पुठ्ठा असतो तो अयब नाहीं.

२८ तस्मागर्दन—चारीतर्फे मान फिरवितो तो वाईट.

२९ औमिकम—हरणासारख्या रंगाचा जो घोडा तो चांगला.

३० मर्दजान—गुडघ्यांत दुसरें हाड राहतें तो खराब.

३१ मोथेवाला }
३२ चपरहद्दी } —हे दोन्ही खराब आहेत.

३३ पोतेअलग—ज्या घोड्याचे अंड अलग असतात तो वाईट. व त्यावर केंश असल्यास वाईट.

३४ पोपेला—ज्या घोड्यास पुढील दांत नसतात तो अयबाचा आहे.

३५ पेरमोन—ज्याचे कान मोठे व मनुष्याचे डोळ्यासारखे डोळे असतात तो खराब.

३६ अकबपेसानी—पानासारखा टिळा कपाळावर असतो तो वाईट.

३७ माहिरू—कपाळावर तिनकोनी पट्टा असेल तर अयब नाहीं.

३८ ढपल—कपाळावर वाटोळा टिळा मोठा असतो तो चागला.

३९ सिलारपेसानि—कपाळावर चक्रासारखा लहान वाटोळा टिळा असतो तो चांगला.

४० मिकाल—कपाळावर दोन अंगुळा येवढा रुंद नीट लांबट पट्टा असतो तो चांगला.

४१ खुंटेउखाड—मागील पायाचे जोडावर गुडघ्याखालीं जो भोंवरा असतो तो वाईट. पुढील पायाचे जोडावर गुडघ्याखाली असतो तो चांगला त्यास खुंटेगाड असें ह्मणतात.

४२ चांदसुरज—डोळ्याचे खालीं एक व डोळ्याचेवर दोन असे भोंवरे असल्यास व ते वरच्या दोन भोंवऱ्यांपैकीं एक मोठा व खालचाही मोठाच असतो, परंतु खालचे दोन्हीं भोंवरे मोठे असल्यास चांगले.

४३ गजदंत—गजासारखा (हत्तीसारखा) तोंडा बाहेर सुळादांत येतो तो वाईट.

४४ चक्रावळ—ज्या घोड्याचे मुंभावर ही खोड आहे तो अयब होय.

उंटाचे दांतासारखे ज्याचे दांत तो वाईट.

ज्याचें कपाळ उंच तो वाईट.

गाईचे मुंभासारखे ज्याचें मुंभ तो चांगला.

उभ्या उभ्यानें झोंप घेतो तो चांगला.

चालतांना जीभ काढतो तो वाईट.

पाणी पितेवेळीं पाण्यांत तोंड फार बुडवतो तो वाईट.

दाणा खाऊन कांहीं ठेवीत नाहीं तो वाईट.

घोड्याचे अंडावर गाईसारखे थान ह्मणजे सड असतो तो वाईट व त्यावर केंश असतात तो वाईट.

एक आंड व अंडांत अगदीं कोय नसते तो वाईट.

ज्याची काळी जीभ तो वाईट.

झुलतो तो बरा परंतु दोन बाजूनीं झुलावा ह्मणजे चांगला. एका अंगानें झुलल्यास वाईट.

बेडाफोड भोंवरा छातीवरचे भोंवऱ्यास ह्मणतात तो वाईट.

**टीप**—ज्याचे पागेंत आठ घोड्यांहून ज्यास्त घोडे असतील त्याम घोड्यांचे खोडीची बाधा होत नाहीं असें कित्येकांचें ह्मणणें आहे परतु खोडीचा घोडा ठेवूं नये हें उत्तम.

# शालिहोत्रे अश्वमहादोष परीक्षा.

ज्याम वमवंड आहे तो, काळ्या जिभेचा, ज्याचें मुख आणि टाळू कृष्णवर्ण आहेत तो, भयकर, दंतहीन, शृंगयुक्त, अधिक दंताचा, एका अंडाचा किंवा अधिक अंडांचा, अंडहिन, कंचुकी, माजरासारखे ज्याचे पाय आहेत तो, वाघाचे रंगाचा, तीन कान असलेला, दोन खुरांचा, ज्यास स्तन आहेत असा, जुळ्यासहित झालेला, वामन (फार ठुणगा), कावळा किंवा तित्तिर पक्षी यांच्या रंगाचा, वानरासारखे ज्याचे डोळे आहेत तो, मुमळचिन्ह ( ज्याचा एक पाय भिन्न रंगाचा ) आहे तो, आणि वृपणाच्या ठिकाणीं अंडवृद्धी आहे तो. याप्रमाणें चिन्हांचे घोडे कल्याणेच्छुनें त्याग करावेत. कारण त्याच्यावर बसणारा स्वामी नाशास पावतो व धनहीन होतो.

# विष्णु धर्मोतरे विशेषः

जातमुष्क ( विषमआंड ), मनुष्याचे रंगाचा, गाढव, कावळा व भस्म या वर्णांचा, कावळ्यासारखे पायाचा, गर्दभाप्रमाणें ज्याचें बळ आहे तो, ज्याच्या मानेवरील केश काळे आहेत तो, अतिशय काळे रंगाचा, वांकडा, पांढऱ्या पायाचा, आवर्तांनीं वियुक्त, व अशुभ भोंवरे आहेत तो, असे हे अश्व वर्ज करावेत.

# पुंड्रकाविषयीं.

घोड्याचे प्रपाणावर जो पांढरा पट्टा असतो त्यास पुंड्रक ह्मणतात. शिंप, शंख, तरवार, धनुष्य, नांगर, मुसळ, गदा, कमल, चक्र, अंकुश ह्या सारखे पट्टे अश्वाचे कपाळावर, मस्तकावर, मुखावर आणि प्रोथावर असल्यास उत्तम समजावेत. चतुष्कोन पुंड्रक उत्तम होत. ते पुंड्रक, शंख, मत्स्य, हात्ती, वज्र, कमळ, ध्वज, चामर या सारख्या आकृतीचे असतील तर उत्तम समजावेत.

वर सांगितलेल्या ठिकाणीं सांखळी, फांसा शूळ आणि अग्नि यासारखे पुंड्रक ह्मणजे पट्टे असल्यास ते वाईट होत. त्यात प्रोथाचे ठिकाणीं असल्यास फारच वाईट. कावळा, गृध्र, घड, सर्प, कोल्हा आणि कर्क यांच्या आकृतीचे काळे, पिंवळे व तांबडे पट्टे ( पुंड्रक ) वाईट समजावेत. वांकडे गेलेले, चित्र विचित्र सांखळीसारखे, शूल व फांसा या सारखे पुंड्रक अश्वाच्या कपाळावर डावेकडेस असल्यास वाईट समजावेत. निळे, काळे, अति सूक्ष्म व भस्माच्या रंगाचे पुंड्रक वाईट ह्मणून समजावेत.

# ललाम ह्मणजे टिक्के याविषयीं.

अश्वाच्या कपाळावर जो नक्षत्राप्रमाणें टिळा असतो त्यास ललाम ( टिपका ) असें ह्मणतात. हे ललाम पांढऱ्या घोड्या शिवाय इतर रंगाचे घोड्याचे पहावेत.

चंद्र, सूर्य, मत्स्य अथवा कवच यांच्या आकृतीचा टिक्का (ललाम) असल्यास उत्तम समजावा. ज्या अश्वास नदींतील भोंवऱ्याच्या अथवा कासवाच्या पाठीच्या आकृतीचे ललाम असतात तो अश्व उत्तम समजावा. ज्यास हत्ती, घोडा, किंवा बैल यांच्या आकाराचा ललाम.

असतो तो उत्तम. शिवाय घोड्याचे कपाळाचे ऊर्ध्व भागीं उजवे बाजूस ललाम असल्यास तोही उत्तम समजावा.

ज्यास कावळ्याच्या पाया सारखे किंवा गोमेसारखे ललाम असतात तो अश्व वाईट ह्मणून समजावा.

ज्याचा ललाम छिन्नभिन्न, फिकट, अर्धाबारीक, मिश्र रंगाचा वाईट, पुसट, कांहीं काळा दिसणारा असा असतो तो वाईट होय.

मनुष्यांनीं ललामावर आपला आंगठा ठेविला असतां तो ललाम झांकला जाऊं नये, झांकला गेला तर तो ललाम वाईट होय व त्या ललामांत मिश्ररंगाचे केंश असले तर त्याला दळभंजन ह्मणतात. हा वाईट होय.

---

# पुष्पाविषयीं.

अश्व ज्या रंगाचा असेल त्याच रंगाचे अश्वाच्या शरीरावर अस्पष्ट व सूक्ष्म आणि वाटोळे असे बिंदु ( गुल ) असतात त्यांस पुष्पें ह्मणतात. तीं अश्वाच्या केंश समुदायांच्या स्निग्धतेवरून व प्रसन्नतेवरून जाणावीं.

हीं पुष्पें कोठें कोठें असलेलीं उत्तम समजावीं याविषयीं:—

अश्वाचें प्रपाण (वरचा ओंठ) यावर चार पुष्पें असल्यास उत्तम. तशींच प्रोथ ( वरच्या ओंठाचा वरचा भाग ) ह्यावरील , ललाट ( कपाळ ) ह्यावरील, भिंवई वरील, सृक्किणीवरील आणि चिबुकावरील पुष्पें उत्तम समजावींत. घोड्याच्या दोन्ही खांद्यावर पुष्पें असल्यास उत्तम होत. मुखावर पुष्प असल्यास उत्तम. बाहूवर असलेलीं पुष्पें, तशींच रंध्रावरील पुष्पें, घोड्याच्या वाम ( डाव्या ) भागावरचीं पुष्पें उत्तम समजावींत. उरावरचीं, पाठीवरील व

मुष्कावरील पुष्पें उत्तम समजावीं. सर्व आंगावर सारखीं पुष्पें असल्यास तो घोडा फारच उत्तम समजावा.

---

## वाईट पुष्पाविषयीं.

अश्वाचे घोणेवरील, गळ्याखालील, अश्रुपातस्थानीं असलेलीं, घंटास्थानाचीं, गुडघ्यावरील, व पोट, खाक, कंबर, मान, व्हदय, नाभी, जंघन ( मांड्या ), अपानद्वार किंवा मुत्रद्वार, पोटऱ्या, गळा, कूर्च, मूत्रकोश, स्फिकस्थान व कान इतके स्थानीं पुष्पें असल्यास वाईट ह्मणून समजावीं.

---

## पुष्पांच्या रंगाविषयीं.

घोड्याच्या ककुदावर पांढरीं पुष्पें असलीं तर तीं उत्तम समजावीं. ज्या रंगाचा घोडा असेल त्याच रंगाचीं त्यावर पुष्पें असल्यास उत्तम समजावीं. पांढऱ्या रंगाचे घोड्यावर पांढरीं, स्निग्ध आणि सम अशीं पुष्पें असल्यास उत्तम समजावीं. घोडा तांबडा असून त्यावरील पुष्पें तांबडीं असल्यास उत्तम समजावीं. घोडा कृष्णवर्ण असून पुष्पेंही कृष्णवर्ण असल्यास उत्तम; परंतु इतर रंग असून त्यांत रक्तवर्ण, पीतवर्ण आणि कृष्णवर्ण पुष्पें असल्यास तीं वाईट ह्मणून समजावीं.

कृष्णवर्ण घोडा असून तांबडीं पुष्पें असल्यास तो वाईटच समजावा. तीं पुष्पें धुरकट रंगाचीं असल्यास वाईट ह्मणून समजावीं. श्वेतवर्ण अश्वास कृष्णवर्ण किंवा रक्तवर्ण पुष्पें असल्यास वाईट.

---

# आयुष्याविषयीं.

## अश्व क्षेत्र परीक्षा.

अश्वाचें आयुष्य दहा दशा ह्मणजे ३२ वर्षे असतें. प्रत्येक दशा तीन वर्षे. सत्तर दिवसांची होते. घोड्याचीं योग्य फळें सांगण्यास दहा स्थानें आहेत तीं अशीं:—१ मुख, २ ललाट ( कपाळ ), ३ मानेपासून खांद्यापर्यंत, ४ ऊर, गुडघे, कंठ आणि वसवंड, ५ आसन ( पाठ ), ६ कटी, ७ स्फीक, ८ फलक, ९ जंघा आणि १० कूर्चसंधी.

वरील दहा स्थानीं पूर्वी सांगितलेल्या भोंवऱ्यांपैकीं शुभ भोंवरे असल्यास त्या अश्वाचें वरील प्रमाणानीं आयुष्य आहे असें समजावें. सदर्हू स्थानीं वाईट प्रकारचे भोंवरे असल्यास तितकें प्रत्येक दशेच्या प्रमाणानें कमी आयुष्य जाणावें.

जसें मनुष्यास शंभर वर्षे आयुष्याचें प्रमाण आहे तसें खेचरास वीस, हत्तीस शंभर, गाईस २४, उंटास २५, कुत्र्यास सोळा, बकऱ्यास बारा, हरण व रोही यांस सोळा, ह्मशीस बावीस, कोल्ह्यास पंचवीस, कृमी सात दिवस, मक्षिका ह्मणजे माशीस १४ दिवस आयुष्य असतें त्याप्रमाणें घोड्यास ३२ वर्षे नियमित आहे.

---

# आयुष्याच्या लक्षणांविषयीं.

जे घोडे उत्तम संस्कारानें युक्त असून आंखूड कानाचे असतात व ज्यांचा स्वर, डोळे व स्वभाव यांस दीनता कधीं नसते ते अश्व चिरायुषी होत.

घोणा ( नाकपुड्याच्या मधला भाग ) मोटा, शरीरानें स्थूल, व ऊर रुंद व तेजस्वी असलेले अश्व दीर्घायुषी होत.

ज्याचे कानाचे शेवटास पिळजें असतां शेंदरासारखी कांति दिस-

ते, जे आपले ग्रास कधीं विखरीत नाहींत, जे आकाश हुंगतात ते अश्व दीर्घायुषी होत.

ज्याच्या कुशीवर घट्टे पडलेले असतात, जे जलप्रवाहाच्या समोर उभे राहून पाणी पितात, ज्यांच्या जिव्हेचे अग्र कमळाच्या पानासारखे असतात, ज्यांचे दांत मोत्यासारखे व लिंग निर्मळ असतें, जे हिंसतांना शेपूट हालवतात, ज्यांचा घाम सुगंधी, नखें दर्पणासारखीं व रोम बळकट असतात ते सर्व अश्व दीर्घायुषी होत.

ज्या अश्वाच्या प्रोथावर (वरच्या ओंठाचा वरचा व कानाचे खालचा भाग) तेजस्वी, खोल व लांब अशा विस्तीर्ण रेषा असतात तो दीर्घायुषी होय.

ज्याच्या प्रोथावर डावेकडून आलेल्या छत्र, चामर, भृंग, तलवार. शंख, अंकुश, शिंप, वज्र, गदा आणि ध्वज या आकारांच्या आंखूड रेषा असतात ते अश्व अल्पायुषी समजावेत.

श्रीवृक्ष ( नारळाचें झाड ) व स्वस्तिक यांच्या सारख्या ज्यांच्या प्रोथावर रेषा असतात ते अश्व दीर्घायुषी होत.

प्रोथावर प्रोथाच्या आकाराची रेषा असल्यास त्याचें आयुष्य दहा वर्षे समजावें.

ही वरील रेषा ज्याची अंगुळ मात्र आहे तो बारा वर्षे वांचतो. ज्यास चार अंगुळें रेषा असते तो तेरा वर्षे वांचतो.

ज्या अश्वाच्या प्रोथाच्या अग्रभागीं वांकड्यावर गेलेल्या दोन रेषा असतात ते अश्व चवदा वर्षे वांचतात.

जो घोडा नेहमीं उजव्या बाजूवर निजतो व ज्यास मूत्र कधीं थोडें व कधीं फार होतें तो फार दिवस जगत नाहीं.

जो घोडा शरीराचे पुढचे भागाचे ठिकाणीं वांकलेला, स्थूळ गुडग्याचा असून ज्याचे डोळ्याचें कूट स्थूल असून डोळे ताठ असतात तो अल्पायुषी जाणावा.

ज्या अश्वाचे प्रोथावर ह्मणजे वरच्या ओंठाचा वरचा भाग व नाकाचे खालील भाग या ठिकाणीं एक अंगुळ लकेर असेल तर तो घोडा एक वर्ष, तीन अंगुळें असल्यास तीन वर्षें आयुष्य जाणावें. उजवीकडे दोन लकेरी असल्यास चार वर्षें व डावीकडे दोन असल्यास पांच वर्षें, चारपेक्षां कमी किंवा ज्यास्ती असल्यास सहा वर्षें, दोन अर्ध्या व एक पुरी असल्यास आठ वर्षें, बारा जव लांब प्रमाणानें दोन लकेऱ्या असल्यास नऊ वर्षें, एक जवा येवढी असेल तर दहा वर्षें, डावे नाकपुडीचे डावेकडे एक लकेर जवासारखी असल्यास अकरा वर्षें, दोन लकेरी नाकाखालीं जायफळा येवढ्या लांब असल्यास तेरा वर्षें, ओंठावर तीन लकेऱ्या तुर्की लोकांचे टोपी सारख्या असल्यास चौदा वर्षें, नाकाचे उजवीकडे एक लकेर असल्यास बारा वर्षें, चार असल्यास सतरा वर्षें, डावेकडे चार असल्यास अठरा वर्षें, उजवीकडे चार असल्यास एकोणीस वर्षें, पांच असल्यास वीस वर्षें, त्या पांचांपैकीं एक लहान असल्यास एकवीस वर्षें, छत्राप्रमाणें एक लकेर असेल तर तेवीस वर्षें, एक लकेर झाडाची डहाळी ह्मणजे फांदीप्रमाणें असल्यास चोवीस वर्षें, मनुष्याचे डोळ्याप्रमाणें असल्यास पंचवीस वर्षें, तीन आडव्या व एक उभी रेषा असल्यास सवीस वर्षें, बदामाप्रमाणें असल्यास सत्तावीस वर्षें, एक लकेर नारिंगाप्रमाणें असल्यास अठावीस वर्षें, जवसाप्रमाणें असल्यास तीस वर्षें, चंद्राप्रमाणें असल्यास बत्तीस वर्षें याप्रमाणें घोड्याचें आयुष्य समजण्याविषयीं सामुद्रिक लक्षण आहे.

---

## अन्ययुक्ती आयुष्य जाणणें.

ज्या घोड्याचे नाकावरील रेषा चार बोटें लांब तो तेरा वर्षें वांचेल. ज्याचे अर्धे नाकावर रेषा व शिरा दिसतात त्यास आयुष्य

वर्षे दहा. ज्याचे कानावर रेघा तीन बोटें लांब असतात तो पांच वर्षे वांचतो. ज्याचे तोंडाकडील भाग सखल, मागील भाग उंच, गुडघे मोठे, डोळे खोल व डोळ्याचे पापण्यांची उघड झांक स्तब्ध असते त्यास आयुष्य थोडें राहातें असें समजावें.

---

## चिरंजीव घोड्याची परिक्षा.

जो घोडा मोठ्या कानाचा, मोठ्या शरीराचा, मोठे शब्दाचा, मऊ आंगाचा व तेजस्वी असतो तो फार दिवस वांचतो. ज्या घोड्याचे कानाचा शेंडा पिळला असतां तेथील रंग तांबडा शेंदरासारखा दिसतो तो बहुत दिवस वांचतो. ज्याचे कानावरील रेघा स्पष्ट व बहुत केंसाच्या व वांकड्या असतात तो बहुत दिवस वाचतो. जो आकाशाकडे हुंगतो, सूर्याकडे पाहतो, ज्याच्या कुशी, काखा व कंबर हीं मोठीं असतात, जो निद्रा बहुत घेत नाहीं तो फार दिवस वांचतो. जो पुढील वैरण न विसकटतां जीभेनें तोंडांत घेतो, कंटाळा करीत नाहीं व ज्याचें शिश्न आंखूड असून कपाळ मोठें असतें तो अश्व फार आयुष्याचा जाणावा.

---

## दांतावरून घोड्याचें वय पाहण्याची रीति.

घोड्याच्या खालच्या दांतांत दोन मुळे दातांमध्यें सहा दांत असतात. ते सहाही दांत पांढरे असल्यास घोडा एक वर्षाचा आहे असें समजावें. काळे तांबडे असल्यास २ दोन वर्षांचा समजावा. दोन पंक्तींमध्यें मध्यभागीं जे दोन दांत असतात ते सदंश होत. सदंशाच्या दोन बाजूचे मध्यम होत. मध्यमाच्या दोन बाजूचे ते अंत्य होत. सदंश पडून पुन्हां आले असले तर २ वर्षांचा, मध्यम पडून पुन्हां आले असले तर ४ वर्षांचा, अंत्य पडून नवे आले

असले तर ५ वर्षांचा, सदंश काळे असतील तर ६, मध्यम काळे असल्यास ७, आणि अंत्य काळे असल्यास आठ वर्षांचा घोडा ह्मणून समजावें. सदंश पिंवळे असल्यास ९ वर्षांचा, मध्यम पिंवळे असल्यास १०, आणि अंत्य पिंवळे असल्यास ११ वर्षे झाली ह्मणून समजावें. सदंश पांढरे असल्यास १२ वर्षे, मध्यम पांढरे असल्यास १३, आणि अंत्य पांढरे असतील तर १४ वर्षांचा घोडा झाला असें समजावें. सदंश कांचवर्ण असल्यास १५वर्षे, मध्यम कांचवर्ण असल्यास १६, आणि अंत्य कांचवर्ण असल्यास १७ वर्षे वय समजावें. सदंश मधासारखे असल्यास १८, मध्यम मधासारखे असल्यास १९, आणि अंत्य मधासारखे असल्यास २० वर्षे वय समजावें. सदंश शंखासारखे असल्यास २१, मध्यम शंखासारखे असल्यास २२, आणि अंत्य शंखासारखे असल्यास २३ वर्षे झालीं ह्मणून समजावें. सदंश सच्छिद्र असले तर २४, मध्यम सच्छिद्र असल्यास २५, आणि अंत्य सच्छिद्र असल्यास २६ वर्षे झालीं ह्मणून समजावें. सदंश दांत हालत असल्यास २७, मध्यम हालत असल्यास २८, आणि अंत्य हालत असल्यास २९ वर्षे झालीं ह्मणून समजावें. सदंश पडले असले तर ३०, मध्यम पडले असले तर ३१, आणि अंत्य पडले असल्यास ३२ वर्षांचें वय समजावें.

---

## घोड्याच्या दांतावरून वय ओळखण्याची रीत २ री.

हे प्रकार नऊ आहेत. त्या प्रत्येक प्रकारास व्यंजन असें ह्मणतात. तीं व्यंजनें खालीं लिहिल्याप्रमाणें:—

१ कालिका. ३ शुक्ल.
२ हरण्या. ४ काज्य.

५ मीनक्षाला.
६ शंख.
७ छिद्र.
८ चलन.
९ पतीत.

कालिका व्यंजन ह्मणजे दांतांवर काळा रंग असतो. हा रंग ३ वर्षे पर्यंत असतो. तो कधीं पांच वर्षे व कधीं कधीं आठ ८ वर्षेपर्यंत राहतो.

हरण्या व्यंजन ह्मणजे दांतांवर हरणाच्या कांतडच्या सारखा रंग येतो. हा रंग ३ वर्षांपासून ७ वर्षांपर्यंत असतो.

शुक्ल व्यंजन ह्मणजे तांदुळा सारखा रंग दांतांवर येतो. हा ११ वर्षांपासून १४ वर्षांपर्यंत असतो.

कांज्य व्यंजन ह्मणजे दांतांवरचा रंग कांचे सारखा होतो व थोडा पांढरा व हिरवा असतो. हा रंग १४ वर्षांपासून १७ वर्षांपर्यंत असतो.

मीनक्षाला ह्मणजे माशांच्या कांतड्या प्रमाणें रंग असतो. हा आठरा वर्षे पर्यंत राहून पुढें फिरतो.

शंख व्यंजन ह्मणजे शंखा सारखा दांतांवर रंग येतो. तो २० पासून २२ वर्षांपर्यंत असतो.

छिद्र व्यंजन ह्मणजे दांतांमध्यें छिद्रें असतात. हीं छिद्रें २१ वर्षां-पासून २६ वर्षे पर्यंत असतात.

चलन व्यंजन ह्मणजे सर्व दांत हालूं लागतात. हें २६ पासून २९ वर्षेपर्यंत असतें.

पतीत व्यंजन ह्मणजे सर्व दांत पडतात. हें २९ वर्षांपासून ३२ वर्षांपर्यंत असतें. पुढें घोडयास आयुष्य नाहीं.

---

## वय ओळखण्याची रीत ३ री.

जन्मापासून १॥ वर्षपर्यंत घोड्याचे दांत पांढरे असतात, त्या नंतर

काळमर होतात. ते दोन वर्षे पर्यंत काळमर राहतात, पुढें घोड्याचा एक दांत पडला तर घोडा दोन २ वर्षें नऊ महिन्यांचा झाला ह्मणून समजावें. दोन पडले तर ३ वर्षांचा आहे असें समजावें.

घोडा निर्बळ असल्यास हजार दिवसांनंतर त्याची वाढ खुंटते, ह्मणजे पुढें उंच वाढत नाहीं.

हिंदवी घोडा चवथा दांत पडला असल्यास चार वर्षांचा झाला ह्मणून समजावें. दोन सुळे दांत पडले असल्यास ५ वर्षांचा झाला असें समजावें.

अरबी घोडा १७८० दिवसांनंतर वाढत नाहीं, त्याची वाढ खुंटते.

घोडीचें वय दांतावरून समजत नाहीं. डोळ्याजवळ केंस फार असतात. शेंडी जवळचें हाड निघतें. केंसांत व त्वचेंत फरक होतो. यावरून घोडीचें वय समजण्यास मार्ग आहे. घोडीस सुळे दात नसतात.

शिंगरास एक महिन्याचे पुढें दोन दांत येतात. च्यार दांत आले ह्मणजे च्यार महिन्यांचें शिंगरूं झालें. सहा दांत आले ह्मणजे सहा-पासून आठ महिन्यांपर्यंत शिंगरूं झालें. पुढें एक वर्षाचे होईपर्यंत बारा दांत निघतात. केव्हां केव्हां खालचे दोन व वरचे दोन असे च्यार दांत उपजतांच निघतात. कित्येकांस पंधरा दिवसांनीं निघतात. दोन सव्वा दोन महिन्यांनीं बाजूचे दांत निघूं लागतात. एकंदर वर्षांत चोवीस दाढा येतात. खालचे व वरचे जभड्यास दोन्ही बाजू मिळून सुळे ४ आणि दांत १२ व दाढा २४ मिळून सर्व दांत चाळीस असतात.

घोड्याच्या सुळे दांतावर जे खळगे असतात ते आठ वर्षें उमरीचा घोडा झाला ह्मणजे नाहींसे होतात. वरचे चार दात व पुढील ह्मणजे खालचे यांची खूण एकदम नाहींशी होते असें नाहीं, थोडे अंतरानें होते. दांतावरचीं चिन्हें नाहींशीं झालीं ह्मणजे वयाची परीक्षा होणार

नाहीं, तेव्हां दांताचे लांबी वरून अथवा रंगावरून सुमारानें वय क-ळेल.कारण दांतांत फटी पडतात व हिरड्यापासून दांत सुटूं लागतात.

घोड्याचे वरचे सहा दांत व खालचे सहा दांत यांना चावण्याचे दांत ह्मणतात.त्यांचे जवळील दोन्ही बाजूंस खालचे वरचे मिळून चार सुळे दांत असतात. ते कोणतेही पदार्थास कापण्याचे उपयोगी पड-तात.दाढा सहा प्रत्येक बाजूस खालवर मिळून दोन्ही जबड्यास चोवीस असतात. दाढा व सुळे दांत ह्या दोहोंचे दरमियान फट असते तिला इंग्रेजींत बार असें ह्मणतात. शिंगरूं उपजलें ह्मणजे दोन खा-लवर दांत मात्र असतात. कांहीं दिवसांनीं पुढील चार दांत दिसूं लागतात. एक महिन्यांत तिसरा दांत निघतो. त्यापुढें दोन महिन्यां-नीं आणखी पुढील चार दांत निघूं लागतात. सहा महिन्यांत सुळे दांत निघतात. व त्याच सुमारास चौथी दाढही उत्पन्न होते. खाण्याचे योगानें दांतांचे चिन्हांत बदल होणें आहे ती तीन वर्षे पर्यंत होत अ-सते.सोळा महिन्यांपासून वीस महिन्यांपर्यंत पुढील चार व दुसरे रा-हिलेले दांतांचे खळग नाहींसे होतात. अडीच किंवा तीन वर्षांत पहिले दांत पडून दुसरे नवीन येऊं लागतात. दुधाचे दांत पांढरे व आखूड असतात. हिरडी वाटोळी असते. पहिले दांत पडून दुसरे खेपेस दांत निघतात ते मोठे असतात व त्यास पांढरेपणा कमी असतो. पुढील चार दांत पहिल्यानें पडतात आणि नवे येतात. दु-सरे दांत साडे तीन किंवा चार वर्षे पर्यंत पडण्याची व उगवण्याची रीत आहे व असे झाल्यानंतर दाढा दिसतात. सुळे दांत साडेचार किंवा पांच वर्षांत पडून नवे येतात. पुढील चार दांत पडून येतात ते-व्हां त्या दांतावर दुधाचे दांतांवर ज्याप्रमाणें खळगा असतो त्याप्रमा-णें खळगा असतो व खाण्याचे योगानें ते पुढें नाहींसे होतात. खालचे जबड्याचे पुढील दांतांवर जे खळगे असतात ते पांच किंवा सहा वर्षांत नाहींसे होतात आणि सुळे दांतावरचे खळगे आठ किंवा सात वर्षांत

नाहींसे होतात. वरचे जबड्याचे पुढील दांतांवरच्या खुणा खालच्या दांतांप्रमाणें बदल होतात परंतु त्यांस अवकाश मात्र जास्त लागतो.

खालचे वरचे बारा दांत हे शिंगरूं उपजतांच नसतात. दोन, तीन, पांच, सहा व सात या दिवसांत वरचे व खालचे चार दांत निघतात. एक महिन्यापासून दोन महिन्यांपर्यंत आणखी खालवर चार दांत निघतात. चार महिन्यांपर्यंत खालचे वरचे मिळून आठ आणखी त्यापुढें चार दांत बारा महिनेपर्यंत निघतात. मिळून बारा महिन्यांत बारा दांत येतात. दुसरे वर्षी दांतांचा रंग शिंपल्या प्रमाणें पांढरा होतो. पुढें लांबट व रुंद दांत होतात. जे दांत एक महिन्या पासून दोन महिन्या पर्यंत निघतात त्यांना रुबया असें ह्मणतात. हे दात तीन किंवा साडेचार वर्षांत पडतात, ह्मणजे घोडा चौसाला झाला असें समजावें. त्यापुढें सनया दांत दोन, तीन, चार, पांच, सहा व सात दिवसां पर्यंत जे निघतात ते पडतात, तेव्हां घोडा पंच झाला असें ह्मणतात. सहा वर्षांपुढें दांतावर पिंवळेपणा येतो. काळ्या लकेरी दांतावर पडतात तेव्हां सात वर्षांचा झाला. नंतर दांतांचा रंग पांढरा होतो तेव्हां आठ नऊ वर्षांचा घोडा झाला असें समजावें. रुबया दांत काळी लकेरी जाऊन पिंवळे होतात व लाल व जर्द रंग होतो तेव्हां बारा वर्षांचे वयाचा घोडा झाला असें समजावें. दहा दांत रुबया वगैरे सारखे होतात तेव्हां वीस वर्षें झालीं. तीस किंवा पस्तीस वर्षें वयाचे वेळेस दगडासारख्या रंगाचे दांत होतात व पुढें ते पडतात.

---

## दंतपरिक्षा.

दांतांवरून घोड्याचें आयुष्य ज्ञान कळतें. घोडा उपजतांच जे पहिले दांत असतात ते दुधाचे दांत होत. त्यानंतर पुढें सोळा किंवा बारा महिन्यांनीं सर्व दांत फुटतात. त्या योगानें त्याचें वय समजतें. दुहेरी एकास एक लागून आलेले दांत

खालीं व वरती असल्यास तो घोडा नाशकारक होय. चौथे वर्षीं चार दांत पडले किंवा पांचवे वर्षीं सहा दांत पडले तर तो घोडा पांच वर्ष जगणार असें समजावें. पांचवेच वर्षीं सहा दांत निघाले तर तो कालिको नामक घोडा यम सदनीं नेईल असें समजावें ह्मणून तो उपयोगी नाहीं. त्याचप्रमाणें सातवे वर्षीं व चौथे वर्षी किंवा आठवे वर्षी दांत उत्पन्न झाले तर तोही कालिको नामक होय, ह्मणून तो नववे वर्षीं दांत आल्यास ते अकरावे वर्षापर्यंत पडण्याचा संभव आहे. अकरा वर्षानंतर सतरा वर्षांपर्यंत जे दांत येतात ते पांढरे काचेच्या रंगासारखे असतात व ते वीस वर्षे पर्यंत तसेच राहातात. वीस वर्षानंतर पुढें शखासारखा दांत होऊन त्यावर मक्षीकेसारखे ठिपके पडतात. ते शंखासारखे शुभ्रही राहातात. तो अश्व तेवीस वर्षे वांचतो. तेवीस वर्षांनंतर सर्व दांत गळले अगर सव्वीस वर्षानंतर सर्व दांत पडूं लागले तर ते बत्तीस वर्षेपर्यंत पडतात. पुढें घोड्यास आयुष्य नाहीं.

घोड्यास मांजराचे दांतांसारखे दांत येतात तेव्हां त्यास मांजरा इतकेंच आयुष्य समजावें. जेष्ट अथवा आषाढ महिन्यांत किंवा मीन, कर्क, सिंह, संक्रांतींत घोडी पसवली तर तें शिंगरूं चांगलें चालणारें अथवा धांवणारें होत नाहीं.

# अश्व शाला.

पूर्वाभिमुख किंवा उत्तराभिमुख अशा निष्कंटक व पाषाणरहित स्थळीं अश्वशाळा बांधावी. ती अपवित्र जागीं नसावी. ती शाळा विटबंदी व अगदीं कोरडी असावी. अश्वशाळेंत घोड्यासमोर एक मोठा वानर व सवत्स गाय आणि पांढरा कोंबडा हे नेहमीं टेवावेत ह्मणजे घोड्यास दृष्टीविकार होत नाहीं. तशाच शेळ्याही कांहीं

ठेवाव्यात. सदंश, शफबंध, मानबंध, कीलकबंध, वाशी, दात्र, कुठार, कठाह आणि कुडत्र हे पदार्थ व अश्वास लागणारीं सर्व औषधें नेहमीं अश्वशाळेंत असावींत. रात्रीं पागेंत दीप सतत ठेवावा, जागळ करणारे लोक शस्त्र घेऊन तेथें असावेत. शाळेंतील अंगण वाळूनें भरलेलें असावें ह्मणजे अश्वास चालण्यास व लोळण्यास उपयुक्त होईल. देवस्थान, स्मशान व उखर जमीन याठिकाणीं व मालकाचे घराचे दक्षिणेस व पश्चिमेस अश्वशाळा केली असतां वाईट आहे.

सर्व जातींचे घोड्यास एकसारखें ठाण योग्य होईल असें नाहीं. ज्या एका घोड्यास जें ठाण मानवतें तेंच दुसऱ्या घोड्यास मानवत नाहीं असा प्रकार होत असतो. अश्वशाळेंत "व्हेंटिलेशन" वारा नेहमीं खेळतां असावा, व ठाणाला जितकी जागा पाहिजे आहे तितकी अवश्य असावी. अश्वशाळेंत चांगला उजेड असावा. बसावयाचा घोडा, शर्यतीचा घोडा, गाडीचा घोडा, शिकारीचा घोडा व वळू घोडा ह्या प्रत्येकांचें ठाण निरनिराळे असावें. हे घोडे एकमेकांच्या दृष्टीस पडूं देऊं नयेत. कारण प्रत्येकाचे जे निरनिराळे गुण असतात ते एकमेकांस लागतात. घोड्याचें ठाण घोडीच्या जवळ कधींही नसावें एवढेंच नाहीं तर तें इतकें लांब असावें कीं, त्याला घोडीचा वास सुद्धां येऊं नये. तो घोडीजवळ नेहमीं असल्यामुळें त्यास घोडीचा वास लागून वाईट गुण लागतील ह्मणजे तिजविषयींची इच्छा त्याचे मनांत उत्पन्न होऊन ती पूर्ण न झाल्यामुळें त्यास कांहीं रोगही लागतील.

घोड्याच्या ठाणाची जागा अगदीं कोरडी असावी. ओलसर किंवा लोणा लागलेली बिलकूल नसावी, आणि याच कारणासाठीं अश्वशाळेचा पाया दगडांनीं चांगला मजबूत खोल बांधलेला असावा. भिंती चांगल्या सुमारें एक हात रुंदीच्या असाव्यात, ह्मणजे जमिनीला ओल येणार नाहीं व लोणा लागणार नाहीं. ठाणाखालून नाळा किंवा पाण्याची मोरी व दुसरे कांहीं घाणेरे पदार्थ गेलेले नसावेत. ज्या घो-

ज्यास अंधारांत काम करण्याची संवय आहे त्याच्या ठाणांत दिव्या-चा प्रकाश कमी असला तर चांगला. झोंपेचे वेळेस त्यास अंधारच पाहिजे. अश्वशाळेचें तोंड दक्षिणेकडे किंवा उत्तरेकडे करावें अशा विषयीं भिन्न मतें आहेत. कोणाचें मत दक्षिणेकडे नसावें असें आहे. त्याचें कारण दक्षिणेकडे उन्हाळ्यांत उन्हाचा फार उपद्रव होतो, आणि उत्तरेकडे तोंड केलें असतां थंडीच्या दिवसांत थंडीचा उपद्रव होतो. पूर्वेकडे तोंड असावें किंवा पश्चिमेकडे तोंड करणें प्रशस्त आहे. ठाणाची जागा प्रत्येक घोड्यास १० फूट लांब आणि ६ फूट रुंद आणि जमिनीपासून छपरापर्यंत १० फूट उंच इतकी असावी, ह्याहून कमी नसावी. दरवाजा ४ फूट रुंद व ७ फूट उंच ह्याहून कमी नसावा. कोणत्याही जनावरास सूर्य किरणें अंगावर पडणें हि-तकारक आहे, त्याचप्रमाणें घोड्यासही आहे. पूर्वेकडे तोंड केलें असतां सूर्य किरणें पडतात ह्मणून अश्वशाला पूर्वाभिमुख असावी. ती शाळा बहुत करून घराजवळच असावी कारण धन्याची नजर घोड्याव-र नेहमीं राहील. घोड्याच्या मोत्तदारांनीं अश्वशाळेंत रात्रीं नेहमीं राहवें. अश्वशाळेंत मोत्तदारास निजण्यास व घोड्याचें सामान ठे-वण्यास जागा ठाणा खेरीज पृथक असावी.

---

## अश्वशालेचा दुसरा प्रकार.

अश्वशाळा ( पागा ) चौसोपी असून मध्यें चौक असावा ; तो इतका मोठा असावा कीं, घोड्याचे पिछाडीच्या मेखा ठोकल्या जाऊन कांहीं मैदान, घोडे जाण्यास अथवा येण्यास खुलें असावें. मध्यभागीं चंदी, रातब, डंका, निशाण, सामायन, वगैरे ठेवण्या-साठीं एक लहानशी इमारत असावी. प्रत्येक घोड्याच्या ठाणा-मध्यें कमरे बरोबर भिंत एक विटी असावी. ठाणाची जागा प्रशस्थ,

फरशी, स्वच्छ, उंच व एकसारखी असावी. मुतारी झांकण्याचे तख्ते जमिनी बरोबर असावेत. ठाणांत अक्षयी गवताचा बिछाना असावा. घोड्याची अघाडी, दवासन व पिच्छाडी तंग नसतां बेताची असावी ह्मणजे घोड्यास उठण्या बसण्यास अराम राहील. गळेपेंडे, ठाणपट्टा व मुजामे नरम असावेत. पागेस एक मोठा व दुसरा लहान दरवाजा असावा. बाहेर दोन्ही दरवाज्याजवळ दोन आड (कुवे) असावेत. पागेपाशीं पागेचे खासदार, भंगी, भिस्ती आणि उंट राहण्याच्या जागा असाव्यात. मागच्या दरवाज्याबाहेर गवताच्या गंजीस जागा अलग असावी. मोठ्या दरवाज्यावर स्वार अथवा अधिकारी यांनां कारण परत्वें राहण्यास बंगला असावा.

पागेस डंकेवाला, निशाणदार, शालिहोत्री, दाणेकरी, भिस्ती, चांभार, जिनगर, मशालजी, शिंगाड्या, भंगी, एकेक असून शिवाय खासदार दर घोड्यास असावा.

पागेंत अघाडी पिच्छाडी तोबरा, खरारा वगैरे सामायन लावण्यासाठीं तट असावे. पागेंत घोड्यांस दृष्ट न लागावी ह्मणून एडका आणि वानर हे एकेक ठेवण्याची चाल पडली आहे.

---

# दोन चार घोडे राहण्याजोग्या तबेल्याविषयीं.

तबेल्याची जागा घराचे दक्षिणेस किंवा पश्चिमेस असावी. ईशान्येस घोड्याचा तबेला बांधूं नये. घोडे बांधण्याची जागा किंचित् उतरती असावी. घोड्यास धुण्याची जागा जेथें केली असेल तेथें पाणी तुंबूं देऊं नये. लहानशी मोरी बांधून पाणी जाईल अशी सोय करावी. मोरी बांधण्यांत दहा फुटास दोन इंचाचा स्लोप (उतरण) ठेवावा, व त्या ठिकाणीं एक लहानसा हौद बांधावा. घो-

त्याचे तोंडावर वारा येऊं नये यासाठीं त्याचे तोंडासमोर भिंत असावी. तबेल्यांत घोड्याचे पिछाडीचें आंग मोकळें असावें; त्या ठिकाणीं चार फूट रुंद, सात फूट उंच असा दरवाजा ठेवावा. दरवाज्यास फळ्या लावूं नयेत. तबेल्याला उजेड असावा. तबेल्यांत प्रत्येक घोड्यास दहा फूट लांब व सहा फूट रुंद अशी जागा असावी. तबेल्याची उंची बारा फुटांची असावी. तबेल्यापुढें ह्मणजे घोडा बाहेर काढण्याचे दरवाज्यासमोर चार फूट रुंदीची पडवी असावी. नेटिव लोकांत घोडे मोकळे ठेवीत नाहींत, बांधलेले असतात सबब त्यांचा मूत्र एक जागीं जमल्यानें जागा खराब होऊन घोड्यास इजा होईल, सबब घोडा मुतण्याचे ठिकाणावर एक फूट औरस चौरस चुनेगच्ची हौद करून त्यांत तितक्याच बेताचें मांडें राहील, आणि तें मांडें काढण्यास व ठेवण्यास आंकडे टेवून त्यावर छिद्राची लांकडी फळी ठेवावी कीं, जेणेंकरून घोड्याचा मूत्र भांड्यांत येईल. याप्रमाणें सोय केली असली ह्मणजे घोड्याचा मूत्र एक ठिकाणीं जमल्यावर काढून टाकण्यास सुलभ पडेल. घोड्याचे जवळ त्याची लीद, मूत्र व कचरा टाकण्याची जागा करूं नये, केली असतां त्यापासून चिलटें, मत्सर वगैरे होऊन घोड्यास डसतील व दुर्गंधीपासून घोड्यास कांहीं तरी अजार उत्पन्न होईल. घोड्याची लीद पडली ह्मणजे तात्काळ वरचेवर मोत्तदारानीं काढून नेमले जागीं खत सांठविण्याचे जागीं टाकावी.

---

## घोड्याची चाकरी करणें.

घोडेवाल्यानें सकाळीं सहा वाजण्यापूर्वीं उठावें. घोड्याचे शेजेचें ह्मणजे निजावयाचें गवत नेमले ठिकाणीं नेऊन ठेवावें. रात्रीस घोड्यानें लीद केली असेल ती काढून खताचे जागीं टाकावी.

हात धुऊन घोड्याचे आंगावरील झूल काढून घडी घालून ठेवावी. नंतर ब्रूस घेऊन घोड्याचें डोकें, मान व खांदा पुसून स्वच्छ करावा. त्यानंतर खरारा करण्यास आरंभ करावा. खरारा मळ निघत नाहीं असें होईपर्यंत करीत असावा. तें काम पुरें झाल्यावर घोड्याचे मागचे पाय ब्रुसानें साफ करावेत, त्यानंतर घोड्याचें सर्व आंग हाताळीनें पुसून नंतर रुमालानें पुसावें, असें केल्यानें घोड्याचे आंगावर बिलकूल मळ राहणार नाहीं. नंतर लागलीच त्याची झूल त्याजला घालावी. पुढें घोड्याचे डोळे, नाक, कान व मळद्वार हीं नीट पुसावींत. आयाळ व दुम विंचरावी. पहिल्यानें कोरडी नंतर पाण्याचा हात लावून विंचरावी. खूर धुऊन काढावेत. पाय पुसावेत, डाग असतील ते धुवावेत अगर पुसावेत, पाय धुणें ते ऊन पाण्यानें साबण लावून धुवावेत. खूर धुण्याचें व पाय पुसून डाग काढण्याचें काम खरारा करण्यापूर्वी करावें. वसंतऋतु व पावसाळा यांमध्यें हाताळीनें आंग पुसण्याची जरूर आहे. ब्रूसानें पुसलें तरी चालेल. घोडा तबेल्यांतून बाहेर फिरविण्याकरितां काढण्याची वेळ येईल तेव्हां मानेचे ह्मणजे आयाळीचे व दुम ह्मणजे शेंपटीचे केंसावरून ब्रूस फिरवून साफ करावें. घोड्याचे खूर कोणी ऊन पाण्यानें नुसते धुतात, कोणी तेलाचा बोळा वर चोळून मग धुतात. परंतु तेल लावणें चांगलें नाहीं असें कोणीं ह्मणतात. नेटिव लोकांत घोड्यास हातांनीं व मनगटांनीं पाणी लावून फार चोळतात, तेणेंकरून त्याची लव फार वाढत नाहीं. ही रीत चांगली आहे व असें केल्यानें घोड्याच्या शिरा उत्तम चोळल्या जाऊन त्याचें आंग हलकें होतें. जसें मनुष्यास आपलें आंग दाबून घेण्यापासून सौख्य होतें तसें घोड्यासही होतें. घोडा काम करून बाहेरून फिरून आला ह्मणजे तो स्वच्छ असल्यास त्याचे पाय मात्र चांगले धुवावेत आणि चाकरी करून बांधावा.

घोडा फार थकला असेल किंवा भिजला असेल किंवा घाणेरा होऊन आला असेल तर मध्यम ऊन पाण्यानें धुऊन चांगला पुसून कोरडा करावा व त्याजवर झूल घालावी व त्याचे पुढील व मागील पायांचे गुडघ्यावर फलाणीचे कपडे बांधावेत, परंतु जर हवा उष्ण असेल तर फलाणीचे कपडे बांधण्याची जरूर नाहीं, उघडे राहूं द्यावे. घोडा थंडकाळामध्यें धुवावयाचा असेल तेव्हां तबेल्यापुढें जी पडवी असते त्यांत धुवावा. उन्हाळे दिवसांत बाहेर उघडे जागेंत धुवावा.

मोतादारानें घोड्याचे सुंभाकडे फार लक्ष्य ठेविलें पाहिजे, ह्मणजे घोडा बाहेरून फिरवून आणला ह्मणजे त्याचे नाल पहावेत, ढिले झाले असतील अगर त्यांचे खिळे निघाले असतील तर नवीन नालबंदी करवावी. कोठें खडा वगैरे अडकला असेल तर तो काढावा आणि सुंभावर मळ बसला असेल तर तो धुऊन काढावा. सुंभ फार कठीण झालें तर आठवड्यांतून एक वेळ एक हिस्सा तार ( डांबर ) व तीन हिस्से शेण एकत्र करून त्यास लावावें, व तें सुमारें एक प्रहर राहूं द्यावें नंतर धुऊन काढावें ह्मणजे कठीणपणा जाऊन त्यास मृदूपणा येईल.

---

# घोड्याची चाकरी करणें व हांकणें याविषयीं.

कोचमीन चांगल्या स्वभावाचा असावा. त्याचें काम जबाबदारीचें आहे. कारण यजमानाचा विश्वास त्यावर असतो. एक कोचमीन दोन घोड्यास संभाळूं शकतो. तीन तासांहून ज्यास्ती वेळ त्याच्यानें घोड्याचें काम होऊं शकणार नाहीं. गाडी साफ ठेवणें

☞ टिप--चाकरीविषयीं आणखी प्रकार वळू घोड्याचे प्रकरणांत पहावेत.

वगैरे काम फार आहे, गाडी परत आल्यावर लागलीच धुतली पाहिजे, नाहीं तर रंग व वारनीस बिघडेल. याच कामामागें लागलें तर घोड्याची अनास्था होते, ह्मणजे घोड्याचे पाय धुतले नाहींत व मालीस केली नाहीं तर त्याला थंडी होईल, व त्याचे खूर तडकतील. तीन घोडे असले तर एक मदतीस मनुष्य पाहिजे. घोडेवाल्यानें घोड्याजवळ असावें हें घोडेवाल्यास अवश्य आहे.

शिकारीचे घोड्यास चाकरी करणारा हुशार, व माहितगार मनुष्य पाहिजे. घोडा किती वजन घेऊन जाईल हें त्याजला ज्ञान पाहिजे व तो पळणारा मनुष्य असला पाहिजे.

---

# घोड्याचे चाकरीस लागणारें सामान.

१ गवत वजन करून देण्याचा कांटा. २ शेजेचें गवत गोळा करण्याचें फावडें. ३ झाडू ( खराटा ). ४ लीद काढण्याची टोपली. ५ बकेत पाणी पिण्यास. ६ चाळणी दाणा चाळण्यास. ७ माप शेर पावशेर. ८ खरारा. ९ ब्रूस. १० पाण्याचा ब्रूस. ११ फणी मानेचे केंस विंचरण्याची. १२ पायाचा मळ काढण्याचा आंकडा. १३ स्पंज पाय धुण्यास. १४ कांतड्याचा तुकडा पुसण्याकरितां. १५ पेटी सामान ठेवण्याची. १६ कातरी. १७ मोन्हकी ( पुंजी ). १८ झूल. १९ फ्लानेलचा तुकडा अजारी किंवा पाय ओले असतील तेव्हां बांधण्यास. २० अघाडी ह्मणजे गळ्यांतील वाखाचें पेंडे व पिछाडी ह्मणजे पिछाडीचें पाय बांधण्यास वाखाचें पेंडे. २१ मेखः तीन पुढल्या दोन व पिछाडीस एक. २२ साबण, ज्या दिवशीं घोड्याचें सर्व अंग धुवावयाचें असेल त्या दिवशीं अंगास लावण्याकरितां. २३ तोबरा दाणा देण्यास.

---

## बिछाना.

घोड्यास रात्रीं बिछाना केला पाहिजे तो मुख्या गवताचा करावा. गवत दाट पसरावें. लिदीनें किंवा मूत्रानें रात्रीस खराब होईल तें गवत सकाळीं चांगळें निराळें ठेवून मलमुत्रानें माखलेलें खताचे जागीं टाकावें. दर आठ दिवसांनीं नवें गवत बिछान्यास घेत जावें. उन्हाळे दिवसांत सेजेकरितां समुद्राची बारीक वाळू पसरली तर हितकारक होईल. एकशेंतीस पौन्ड गवत एका घोड्याचे सेजेस बस्स होईल. वाळू सहा इंच जाडी पसरावी. लांकडाचा भुसा लांकूड वेरून पडतो तो मिळेल तर त्याचीही सेज करावी. वाळूप्रमाणें सहा इंच जाड पसरावा.

---

## व्यायाम.

अश्वास व्यायाम करविल्यानें त्यास स्थिरत्व येतें. भार सोसण्याचें सामर्थ्य, शीघ्र गति, अग्नि दीपन व तेज इत्यादि गुण अश्वास प्राप्त होतात. सत्व, नम्रता, प्रीति, निर्दोषता, निद्रा, हिनता, वेग आणि स्वाराचे मनाप्रमाणें चालणें हे गुण घोड्यास नित्य वहनापासून येतात.

जो अश्व उत्तम आवर्त्तांनीं व गति, छाया, बल, शील, गंध, वेग, वर्ण, आणि स्वर यांनीं युक्त असून कपाळीं पुंड्रयुक्त आहे तो बसण्यास फार उत्तम समजावा.

---

## व्यायाम आणि काम घेणें याविषयीं.

अश्वाच्या सर्व गुणांत वेग हा उत्तम गुण आहे. हा गुण वहनानें प्रकाशित होतो ह्मणून अश्वास वहनक्रियेचा राता नित्य

ठेवावा. वहनकालीं अश्ववेत्यानें अश्वावर बसावें ह्मणजे त्याचें बळ वृद्धिगत पावतें. आरोहण केल्याशिवाय जे अश्वाचे गुण ते अवगुण समजावेत. अश्वास वाहणें व प्रीतिपूर्वक सोडणें हीं पथ्यकारक आहेत. उत्तम, मध्यम आणि कनिष्ट इत्यादि कोणत्याही प्रकारचे अश्वास नित्यवहन पाहिजे. रूप, भोंवरे, गति, छाया, सत्व, रंग, वय आणि बळ हे सारे गुण वेगहीन अश्वास असले तरी निरर्थक होत. गतिपेक्षां रंग श्रेष्ट, रंगापेक्षां स्वर श्रेष्ट, स्वरापेक्षां सत्व श्रेष्ट, कारण सत्वांत सर्व गुण येतात.

---

# व्यायाम आणि काम घेणें याविषयीं

## वहानकाल.

उत्तम (ब्राह्मण) अश्वास प्रातःकाळीं, मध्यम (क्षत्रिय) अश्वास प्रहर दिवस गेल्यावर, कनिष्ठ (वैश्य) अश्वास मध्यानकाळीं आणि शूद्रास (अति कनिष्ठास) रात्रीं वहन करावें. भाद्रपद आणि अश्वीन या महिन्यांत अश्वावर भार घालूं नये व मार्गास नेऊं नये, कारण तेव्हां त्याचें पित्त क्षुब्ध झालेलें असतें. श्रावण व भाद्रपद महिन्यांत कार्य पडल्यास किंचित मार्ग क्रमण करावें. हेमंत, शिशिरऋतूंत त्यास योग्य वहन व क्रमण करावें आणि वसंत ऋतूंत पाहिजे तितकें वहन व क्रमण करावें.

बाल, वृद्ध, कृश, रोगी, ज्यास तेल दिलें आहे तो, ज्याचा कोठा अगदीं भरलेला किंवा अगदीं रिकामा आहे त्या अश्वास, तसेंच गर्भिणी अश्विनी (घोडी) ह्यांस चालवूं नये. घोड्यास कोस दोन कोसावर विष्ठा मूत्र करवावें. त्यास पाहिजे तसें पाणी व चारा द्यावा, असें न केल्यास दोष होतात. त्याचें शरीर सुस्त व जड होतें, घर्म फार येतो, मुत्र रोधल्यास अश्व सर्व कर्माविषयीं अस-

मर्थ होतो. त्याचें शिश्न बधिर होतें. रक्तमेह होऊन त्यास फार इजा होते. सावली येतांच उभा राहतो. त्यास पुष्कळ ताडन केलें तरी पाऊलभर चालत नाहीं. अश्व भारानें किंवा पुष्कळ चालण्यानें श्रमी झाला असता त्यास चालवू नये. चालून आलेल्या घोड्याचें खोगीर एकदम काढूं नये. त्याचा घाम जिरून तो स्वस्थ झाला ह्मणजे त्याचीं मागील व पुढील बंधनें सोडून नंतर खोगीर काढावें, आणि त्याचें आंग मर्दन करून धुराळ्यांत लोळवावें. नंतर स्नान पान व भोजन हीं क्रमानें करवावीं, नाहीं तर रक्तादिदोष उत्पन्न होतात. हृद्रोग, वात, व शूळ, उदक पानानें शांत होतात. रक्त पित्त झालें असल्यास गूळ पाणी द्यावें. रक्त पित्त व वात यावर शर्करायुक्त उदक द्यावें. मध व अजागत्र याचा रस अश्वास दिला असतां सर्व रोग जातात. तसेंच मातू, तूप व दूध अश्वास द्यावेत. अश्वास मुखादीक भागाचे ठिकाणीं खाजवावें ह्मणजे संग्रामाचे वेळेस तो खाजवणाराचें स्मरण ठेवून इमानानें वागतो.

## घोड्यास नाल बांधणें.

नाल बांधणें ते घोडा दोन वर्षांचा झाला ह्मणजे बांधवावेत. ज्याचें सुंभ गाजरे ( नरम ) आहे त्याला दगडांतून चालतां येणार नाहीं, सबब त्यास इतर घोड्यांपेक्षां लवकर नाल बांधावेत. नाल बांधणें ते दरमहा नवीन बांधीत जावेत. जरी नाल पडला नाहीं तरी महिन्याचे महिन्यास नाल बांधीत जावेत, कारण त्याची नखी वाढत असते आणि त्यामुळें तो ठेंचाळतो.

नालाची संवय न लावतां तसेंच घोडे दगडांतून वगैरे फिरविले असतां त्यांचें सुंभ कठीण होऊन त्यांजला दगड, खडा, कांटी वगैरेंची कांहीं इजा होत नाहीं. परंतु अशी संवय ठेवण्यापेक्षां नाल

बांधण्याची संवय ठेवली तर चांगली. नाल बांधते समयीं त्याची नख फार कापून जिव्हाळी लागूं देऊं नये. महिन्याचे आंत ज्यास्ती का मामुळें किंवा कच्चा नाल बांधला गेल्यामुळें हलूं लागला किंवा पडल तर लागलीच पुनः नवीन नाल बांधावेत.

टिप—वळू घोड्याचे प्रकरणांत नाल बांधण्याविषयीं विशेष लिहि आहे ते पहावें व त्याप्रमाणें करावें.

# पोषणविधी.

श्रेष्ठ, मध्यम आणि कनिष्ट अश्वास देशकाल व शक्ति पाहू. औषध किंवा चारा अगर चंदी देण्याकरितां वजनाचें कोष्टक.

गुंजा ८ = १ मासा.
मासे १६ = १ कर्ष.
कर्ष ४ = १ पल.
पलें ४ = १ कुडव = १ पावशेर पक्का.
कुडव ४ = १ प्रस्थ = २पौन्ड किंवा १ शेर पक्का.
प्रस्थ ४ = १ आढक.
आढक ४ = १ द्रोण.

उत्तम अश्वास भाद्रपदांत उडीद २ आढक ( ८ शेर पक्के ) द्यावेत, त्याचा चतुर्थांश मध्यमास ह्मणजे ( २ शेर ), त्याचा चतुर्थांश कनिष्ठास ह्मणजे ॥ शेर द्यावेत. याचप्रमाणें तांदूळ, हरबरे, व्रीही ( साळी ) द्यावेत. मार्गशिर्षांत जोंधळे वरील प्रमाणानेंच द्यावेत. चैत्र महिन्यांत सातू उत्तमास ४ आढक ( १६ शेर पक्के ), मध्यमास त्याचा चतुर्थांश ( १ आढक = ४ शेर ) आणि कनिष्टास त्याचा चतुर्थांश ( १ शेर ) द्यावेत. माघ महिन्यांत चणे ( हरबरे ) उडदाच्या प्रमाणाप्रमाणें द्यावेत, आणि वैशाखांत मुग हेही चण्याच्या प्रमाणाप्रमाणेंच द्यावेत.

पर्जन्यकाळीं अश्वशाळेंत अश्व नेल्याबरोबर त्यास क्रियाक्रम (चाकरी) करूं नये. पहिले १०।१२ दिवस तेल घालून पथ्य द्यावें. नंतर वर्षारंभी पांच पलें (१ पावशेर) निंब द्यावा. उत्तम अश्वास ७ दिवस सुंठ, ओवा व सैन्धव हे गोमूत्रांत मिसळून तो स्वस्थ असेल तेव्हां पाजावेत. हरीतकी क्षालन (हिरडे भिजत घालून त्याचें पाणी तेलांत मिसळून) द्यावें. आधीं पांच हिरडे द्यावेत, दुसऱ्या दिवशीं १० हिरडे अशा क्रमानें पांच पांच वाढवून शंभर होईपर्यंत प्रतिदिवशीं चारावेत. मध्यमास ८० पर्यंत आणि कनिष्टास ६० पर्यंत चारावेत. भाद्रपदमासीं हिरडे आणून दहा दिवस ठेवून त्यास वास देऊन मग चारावेत. लसूण व गुग्गुळ हे पहिला प्रहर गेल्यावर दुसऱ्या किंवा तिसऱ्या प्रहरीं द्यावेत. पहाटेस आणि मध्यान्हकाळीं भुस काढलेले सातू देऊन संध्याकाळीं पुन्हां अनुवासन द्यावें. जे दिवशीं अभ्रामुळें सूर्योदयही दिसत नाहीं ते दिवशीं अश्वास पाणी पाजूं नये. त्यास फिरवून दिवसाचे आठवे भागांत भोजन घालावें. पिंपळी, शृंगवेर, चित्रक, मिठ आणि अभया दारूंत मिसळून त्यास पाजावी.

---

# शरत्कालांतील पोषण.

शरदृतूंत (अश्वीनमासीं) अश्वाचें सेवा कर्म करूं नये. केवळ कोंवळ्या गवतांनीं व सातूंनीं त्याचें पोषण करावें. तळ्यावर नेऊन पाणी पाजावें व धुवावें. फार तप्त झाल्यास त्यास बस्तिकर्म करावें. पाण्यांत भिजलेले सातू खाण्यास घालावेत. या ऋतूंत दुधानें मिश्रित पदार्थ अश्वास द्यावेत, ह्मणजे रक्तपित्ताचा नाश होतो. काश्मरी, अग्रफल, मुस्ता, बोर, कुटकी, वाळा, साखर, प्रियंगु, मधु, पडोळे, त्रायमण हीं ११ औषधें दारूंत अश्वास द्यावीत. अतिशय

श्वास सोडणारे अश्वास तालवृक्षाचें पाणी पाजावें व विस्तीर्ण पाण्यां
पोहवावें. शरदृऋतूंत दूध मिसळून आणि मांस घालून साळी द्या
व्यात. त्यांत कांहीं अम्ल पदार्थ घातल्यास हरकत नाहीं. या ऋतूं
शुक्ल ३ स अश्वशाला ही चटया आणि कमलादिकांनीं आच्छादि
करून सूर्याचें ऊन न लागे अशी तजवीज करावी.. सूर्य अस्ता
गेल्यावर मग अच्छादन काढावें. नंतर निंबाचीं पानें व तूप आणि
गुग्गुळ यांचा काढा त्यास द्यावा व त्याचें चांगलें रक्षण करावें
खरारा करणें व उदवर्तन आणि फिरवणें हें सर्व रात्रीसच करावें. पूर्व
मिरें व तूप देऊन कार्तिकमासीं घोड्याची शीर टोचावी. ती उरा
वरची, कूर्चावरची किंवा ओंठावरची यांपैकीं कोणतेही एका ठि
काणची एक किंवा दोन टोचाव्या नंतर मंजिष्टा, मध, कुष्ट, प्रियंगु
त्रायमाण, एल्का, पिंपळी, कुटकी हे समभाग करून दारूंतून त्यास
कल्क करून द्यावेत.

---

## हेमंतऋतूंतील घोड्याचे पोषणविधी.

हेमंत ऋतूंत अश्वाचें मुख व बस्ति या ठिकाणीं तेल लावून शीर टोचावी. नंतर ऋतुमानाप्रमाणें त्यास प्रतिपान द्यावें ह्मणजे उडीद खाण्यास द्यावेत ते अगदीं पुष्पित कीड लागलेले नसावेत. पुष्पित उडीद रक्तशांत करणारे व फलयुक्त उडीद मांसवृद्ध करणारे आहेत. पुष्पफळावांचून मात्र ते दोषी होत.

हेमंतऋतूस आरंभ झाल्यापासून तीन दिवस पाणी पाजूं नये. नंतर आठ दिवस एक दिवसा आड पाणी पाजावें. पुढें रोज एकदां पाणी पाजावें. या रीतीनें या ऋतूंत पाण्याचा क्रम ठेवावा. ताजी दारू आणि मीठ किंवा तेल हे अश्वास प्रशस्त आहेत. रात्रींचा एक प्रहर गेल्यावर सुवासित केलेले उडीद द्यावेत अशा क्रमानें तीन स-

तकें गेलीं असतां एका दिवसा आड त्यास फिरण्यास काढावें. श्रम होऊन घाम येई पर्यंत त्यास फिरवून मठ, माष ( उडीद ) द्यावेत, ते फार कठीण किंवा अगदीं शिजलेले नसावेत. उडीद खाऊन त्यास शूळ झाल्यास " शूलाध्यायांत " सांगितल्या प्रमाणें त्यास उपचार करावा. त्रिवृत, लोध्र आणि मीठ हे पदार्थ तुळशी सहित पाण्यांत टाकून ते अश्वास हेमंतऋतूंत पाजले असतां प्रशस्त होत.

---

# शिशिर पोषण.

शिशिर ऋतूंत तीन दिवस प्रतिपादन देऊन त्याच्या जठराग्नीच्या मानाप्रमाणें भोजन द्यावें. घामेजलेले फलमाष, चाकवत, तिळाचें तेल आणि मीठ मिसळून केलेली पेज अश्वास द्यावी. या ऋतूंत प्रतिपादन एक द्यावें, असें केल्यानें अश्वाचा श्लेष्मा ( कफ ) प्रकोप पावत नाहीं. या ऋतूंत अश्वास मोहन आणि वाहन एका दिवसा आड करवावें. खाणें झालें ह्मणजे अनुपानांत दारू पाजावी. सुंठ, मिरे, पिंपळी, वावडिंग, हिंग, वेखंड, सुरवा, बडिशेप आणि पांच क्षार हे दारूंत मिश्र करून तें प्रतिपादन शिशिर ऋतूंत द्यावें ह्मणजे जठराग्नि प्रदिप्त होऊन कफ दोषाचा नाश होतो. अश्वास या ऋतूंत २ सप्तकें जाई पर्यंत वहन करूं नये. आरंभीं पांच दिवस पाणी देऊं नये. पुढें दोन सप्तकें जाई पर्यंत एक वेळ पाणी द्यावें. तिसरे सप्तकांत अश्वास किंचित वहन करावें. चौथ्या सप्तकांत त्याच्या शक्ती प्रमाणें वहावें. पुष्पित व फल युक्त असे सातू दिले असतां पुष्टि, बल व आरोग्य यांची वृद्धि होते.

---

# वसंत ऋतूंतील पोषणविधी.

अश्वास वसंत ऋतूंत त्याच्या शरीर मानाप्रमाणें ३ किंवा २ दि-

वसांनीं मीठ द्यावें. व्योष, लोध्र, वावडिंगे, क्षौद्र व सैंधव हे दारूंत घालून तें प्रतिपान पाजावें.

हेमंत, वसंत व शिशिर ह्या ऋतूंत घोड्यास सहा दिवस उन्हांत बांधावें.

---

## ग्रीष्म पोषण.

या ऋतूंत घोड्याची जागा छायायुक्त असावी. दररोज तीन वेळ स्नान पान करावें. दिवस मावळीचें मूळ दुधांत घालून तें प्रतिपान द्यावें. अश्व अशक्त असल्यास मांस रस मिश्रित पाजावें. सातूचा भात, दही आणि थोडें सैंधव हें भोजन द्यावें. कुकुटीमूळ आणि ककु हें मिसळून प्रियंगु, पिंपळी, रोध्र, मद्य आणि विश्वभेषज हे पदार्थ दारूंत मिसळून द्यावेत.

---

## सामान्य पोषण.

देशादेशाचे ठिकाणीं भिन्न भिन्न प्रकारचीं पुष्कळ गवतें आहेत, ह्मणून अमुकच गवताची याद येथें नांववार सांगितली नाहीं. ग्रीष्म आणि शरद् या ऋतूंत घोड्यास ओल्या प्रदेशावर बांधावें, आणि अन्यकाळीं शुष्क स्थळीं बांधावें. कोणत्याही काळीं आणि कोणत्याही रोगावर अश्वास दुर्वा ( हरळी ) फार हितावह आहे. अश्वास स्वस्थ असतांना मात्रा भरबस्ती द्यावी. तेल कालमानाप्रमाणें पांच सहा दिवसांनीं द्यावें. व्योष, जिरें, सैंधव, बीज, सौवर्चल, यांचें पाणीं द्यावें. हळद, पूतीक, भारंगी, शिग्र, कुबेरक, गोमूत्र, पिष्ट यांचा गोळा प्रातःकाळीं द्यावा ह्मणजे अग्नीचें दीपन व बल व तेज यांची वृद्धि होते. वरील गोळा दारूंत दिला असतां तो पाचन करितो.

घोड्यास धान्य ऋतूप्रमाणें कोणचें द्यावयाचें तें वर लिहिलें आहे. गवताविषयीं नियम सांगवत नाहीं. विलायती गवत, हरळी, कडबा व सुकें गवत, गव्हांचा भुस्सा यांवर त्याचें पोषण होईल. जवस ह्मणजे आळशी याची पेंड दाण्यांत मिश्र करून दिली असतां ती घोड्यास दास येत्ये त्यावर सुखावह होईल. गाजरें, मुळा, बटाटे या प्रकारचे कंद चारले तर त्याजवरही त्याचें पोषण होईल परंतु एकाच कंदावर पोषण होऊं शकणार नाहीं त्यांत दुसरे योग्य धान्यांचें मिश्रण पाहिजे.

घोड्यास दाणा सकाळीं सात वाजतां, अकरा वाजतां दुपारीं, व तीन वाजतां तिसरे प्रहरीं व सायंकाळीं सात वाजतां याप्रमाणें एकंदर जो दाणा देणें असेल त्या मानानें चार वेळ सारखे प्रमाणानें इंग्लिश लोक देतात. नेटिव लोक सकाळीं सात वाजतां व सायंकाळीं सात आठ वाजतां मिळून दोन वेळ देत असतात. केव्हां केव्हां घोड्यास फार श्रम झाले असतील तर किंवा फार मजल झाली तर दोनप्रहरीं बारा वाजल्यावर दाणा देत असतात.

घोड्याला गवत दिवस रात्र मिळून प्रहरा प्रहरानें देत जावें. दाण्याप्रमाणें गवतही वजन करून द्यावें. घोड्यास पाचन शक्ति फार असते. तो हरळी किंवा गवत सुकें पंधरा पौन्ड रात्र व दिवस मिळून खाऊं शकेल. ओलें गवत जास्त लागेल. ज्या घोड्यास दाणा भरपूर असेल त्यास गवत फार लागत नाहीं. तसेंच रतीब ह्मणजे खुराक ज्या घोड्यास असेल त्यासही गवत कमी लागतें.

पश्चिम देशचे जे घोडे असतात ते पुष्कळ मेवा ह्मणजे खजूर वगैरे खातात. त्यांस बहुतकरून जव, मठ, बाजरी, भुस्सा, गहूं हे एक ठिकाणीं मिळवून खावयास देतात. त्यांस हिरवें व सुकें

गवत व उंटाचे व दुंम बकऱ्याचें दूध पिण्यास देतात.

उत्तर देशांत बरसातींत व गरमीचे दिवसांत आणि हिंवाळ्यांत तूप, साखर, गूळ हे जिन्नस खावयास देतात. पूर्व देशांत उत्तर देशाप्रमाणेंच पदार्थ खावयास देतात. दक्षिण देशांत कुळिंत, मठ, उडीद व बाजरी देतात. परंतु मुख्य हरबरे देण्याची वहिवाट प्रशस्त आहे. उत्तर देशाप्रमाणें तूप, साखर, गूळ, दूध वगैरे रतीबही देतात.

## सामान्य पोषण.

सर्व ऋतूंत कोरडे सातूची चंदी द्यावी त्यापासून त्यास अरोग्य आहे. सातू न मिळाल्यास हरबरे किंवा मटकी द्यावी हें धान्य दहा व पित्तनाश करतें. मका धान्य मिळाल्यास त्याची डाळ द्यावी, अथवा त्याचें पीठ करून त्याची भाकरी तेल घालून द्यावी, ती पुष्टकारक व उत्साह देणारी आहे. मका न मिळाल्यास मुग धान्याचे घांस त्यांत तेल घालून द्यावेत. सातू न मिळाल्यास त्याचा भुसा द्यावा. सातूपेक्षां दुसरें धान्य घोड्यास उत्तम नाहीं सातूचे योगानें रोगग्रस्त घोडा असल्यास तो पुष्ट होतो.

---

टिप—घोड्यास चंदी, वैरण व पाणी पिण्यास देणें आणि त्यास मालीश करणें व आंगधुणें यांजविषयीं वळू घोड्याचे प्रकरणांत जे नियम सांगितले आहेत तेच लागू करावेत.

## वसंतऋतु ( चैत्र वैशाख. )

ह्या ऋतूंत अश्वास रक्त काढल्यास दररोज एक पावशेर गोमुत्र व हिरडा तेलांत चारावा ह्मणजे तो सर्व रोग दूर करणारा व गुणकारक होतो. दुसरा उपाय—मटक्याची डाळ करून उन्हाळ्यांत घोड्यास द्यावी अथवा त्याचें पीठ करून त्याचे रोट तेलांत घालून द्यांवेत ह्मणजे घोड्यास उत्साह राहून तो अरोग्य असतो. घोड्यास हरबरे व जव यां खेरीज दुसरें पुष्टकारक धान्य नाहीं. घोड्यास

लंघन पडलें तर ह्मणजे त्यास दाणा न मिळाला तर तूप द्यावें, तूप न मिळाल्यास गाईचें किंवा बकरीचें दूध पाजावें. ह्या ऋतूंत त्यास लोणी चारल्यानें तो पुष्ट होतो. अरण्यांत किंवा दुष्काळात घोड्यास जें मिळेल तें गवत द्यावें, ह्यावेळीं तें अमुकच जातीचें असलें पाहिजे असें कांहीं नाहीं. वसंतऋतूंत घोड्यास सदोदीत हिंडवावें. त्यास ठाणावर बांधून ठेवूं नये, ठेविल्यास त्याचा उत्साह नाहींसा होऊन त्यास आळस येतो. ह्या दिवसांत घोड्यास लिंब व मीठ द्यावें, लिंब न मिळाल्यास तेल व मीठ द्यावें, तेल न मिळाल्यास तूप द्यावें.

## ग्रीष्मऋतू ( जेष्ट आषाढ. )

या काळांत त्यास रोज हरळी चारावी व च्छायेत बांधावें व तूप चारावें ह्मणजे त्या योगें त्याचा संताप जातो. पाण्यांत बाजरीच्या पिठाच्या गोळ्या करून देत जाव्या. रक्त काढणें आल्यास तें ह्या दिवसात काढावें.

## वर्षाऋतु ( श्रावण भाद्रपद. )

घोड्यास ऊन पाण्यानें धुणें व दारू पिण्यास देणें हे रोगहरक उपाय होत. वर्षाकाळात नवें पाणी दिलें तर तें बळ नाहींसें करतें ह्मणून नवें पाणी देऊं नये. मुकटल्या जवाचा चारा घोड्यास नेहमीं द्यावा त्यानें रोग जातो व तेज येतें. दूध व जवाचा चारा दिल्यानें घोडा पुष्ट होतो. व यापेक्षां मटकीही त्यास सर्वदा पुष्टता करते आणि दहा व पित्त यांचा नाश करते ह्मणून ती देत जावी. या ऋतूंत घोड्याकडून प्रवास करवूं नये. त्यास विहिरीचें पाणी पिण्यास द्यावें. कडू तेलानें स्नान घालावें व त्यास स्वच्छ जागेत बांधावें. एक दिवसांत दोन पल ( ४ तोळे ) मिठ खाण्यास द्यावें दारू दिल्यानें निरोगी राहतो. उष्णोदकानें घोड्यास स्नान घातलें असतां त्याचें शरीर तेजस्वी रहातें.

### शरदऋतु (आश्विन कार्तिक.)

या दिवसांत घोड्यास रात्रीं दररोज एक शेर प्रमाणें दूध तापवून द्यावें. त्यास सकाळीं नदीचें किंवा सरोवराचें पाणी सातूचें पिठ मिळवून पाजावें. वाईट पाणी कधीं पाजूं नये. या ऋतूंत तूप एकदां पाजावें व सातूची चंदी सात दिवस द्यावी.

### हेमंतऋतु (मार्गशिर्ष पौष.)

शिरसाचे तेलानें स्नान घालावें व निवांत ठिकाणीं बांधावें व चार तोळे मिठ सकाळीं द्यावें ह्मणजे त्याणें घोड्याचा मुखरोग जातो.

दुसरा उपाय-उडीद शिजवून द्यावेत व निवांत ठिकाणीं बांधावें. तूप किंवा तेल हें जवाचे पिठा बरोबर एक वेळ केंव्हां तरी या ऋतूंत परमीत प्रमाणानें चारावे. ऊन पाण्यानें घोड्यास धुवावें व दारू पिण्यास द्यावी ह्मणजे त्याचे सर्व रोग जातात.

### शशिऋतु (माघ फाल्गून.)

या ऋतूंत घोड्यास उडीद शिजवून द्यावेत व निवांत ठिकाणीं बांधावें. त्यास जवा बरोबर तूप किंवा तेल परमित प्रमाणानें द्यावें.

दुसरा उपाय-सातूचें गवत चारावें, गोडें किंवा शिरसाचें तेल पावशेर तीन दिवस किंवा बारा अथवा एकवीस दिवस याप्रमाणें द्यावें. हरबऱ्याची डाळ किंवा मसूरा सगळ्या द्याव्यात. ह्याप्रमाणें दिलें असतां घोडा फार सुखी राहील. जवाचा चारा पुष्टिकारक आहे. दूधही पाजणें झाल्यास ह्या ऋतूंत पाजावें, तें चांगलें पुष्टीकारक आहे. जवाची चंदीहि पुष्टकारक आहे.

---

## वळू घोड्याविषयीं.

१. वळू घोडा करावयाचा तो शक्तिवान, निरोगी, चांगल्या स्वभा-

याचा व त्याची अवलाद चांगली असावी. घोडा देखणेदार असावा. म्हातारा झाला असतां त्याजकडून घोडी काढवूं नये. घोडी वृद्ध आणि घोडा तरूण किंवा त्याचें विरूद्ध ह्मणजे घोडा वृद्ध आणि घोडी तरूण याप्रमाणें असल्यास त्याजपासून जी संतति (शिंगरूं) होईल ती अशक्त होईल. आईबापाचे जे बरे वाईट गुण असतात तेच शिंगरास लागतात, या करितां आईबाप चांगले गुणाचे असावेत. बहुतकरून वळू घोडे अरबी जातीचे असतात. कारण अरबी पेक्षां उत्तम घोडा हल्लीं कोणताच नाहीं. दक्षिणेंतील भिवरथडी व मानदेशी घोडे वळू करण्यासारखे चांगले असतात. परंतु त्यांच्या मध्यें इतर जे गुण असावयाचे ते कमी असतात. फक्त देखणे व शरिरानें दृढ हे गुण चांगले असतात. वळू घोड्यास खुराक देत असावा. कारण मादवान्या त्यांजकडून काढविल्यानें त्यांचें विर्य कमी होऊन ते अशक्त होतात. मादवान्या काढविणें त्या सकाळीं सात वाजतां किंवा सायंकाळीं पांच वाजतां काढवाव्या व तिजला दुसरे दिवशीं तो घोडा दाखविला पाहिजे. कारण एक वेळ घोडा दिल्यानें केव्हां केव्हां घोडीस गर्भ धारण होत नाहीं.

२. वळू घोड्यास विर्य वृद्धि होण्यास औषध-भुई कोहळे १ शेर आणि कवस कुहिरीचें बी १ शेर एकत्रकरून त्यांचें चूर्ण करावें. हें गाईचे अर्धमण दुधांत घालून आटवावें आणि त्याचा खव्यासारखा घट्ट गोळा करावा. त्यांत १ शेर तूप व २ शेर साकर घालून तो सात दिवस द्यावा. हें औषध सुकूं द्यावें आणि नासेल ह्मणून त्याजकडे वरचेवर पहात असावें.

३. घोडा घोडीस दिला आणि लागलीच त्यास चासणी मिळाली नाहीं तर अंगास थंडपणा येऊन वारंवार घाम येतो, शक्तिहीन होतो, खाणें अगदीं कमी होतें तेव्हां त्यास उपचार-हिरडे, बेहडे, आ-

वळकठी, सुंठ, मिरे, पिंपळी, सराटे, भद्रमोथा, भुईनिंब व वावडींग हीं सर्व औषधें प्रत्येक ९ टाक प्रमाणें घेऊन त्यांत पाणी ९ शेर घालून अष्टमांश काढा करावा. त्यांत मध नऊ टाक घालून पोटांत द्यावा; असें सात दिवस केलें असतां घोडा हुषार होईल.

४. रोग व व्यंगाविषयीं मागें जो अभिप्राय लिहिला आहे तो वंश परंपरेचे प्रकारचे रोगांविषयीं तर अधिक लागूं आहे. ज्या मादीचे पायांचे नळ्यास मोत्रा असेल त्या मादीची औलाद घेणेंच झाली तर ज्या वळूच्या नळ्या अगदीं साफ असतील तो वळू तिस दिला पाहिजे. नर व मादी या दोघांस मोत्रे असले तर त्यांचे औलादीस मोत्रा जरूर होतो नाहीं तर त्या औलादीस मेहनत पडली ह्मणजे तो होतोच होतो. शक्य असेल त्या प्रमाणें रोगी पायाची औलाद घेऊं नये आणि वळूस इतर पुष्कळ काम असेल तेव्हां रोगी माद्या तशाच फार रोड किंवा औलाद घेण्याविषयीं इतर रीतीनें उपयोगी असणाऱ्या माद्या रद्द कराव्या.

वंश परंपरेचे रोग बहुतकरून असतात ते मोत्रा व चक्रावळ व मुठींत हाड वाहाडणें व वेरहड्डी व शेंबा हे आहेत.

---

## वळू घोड्यांचा उपयोग.

वळू घोड्यास किती माद्या द्याव्या त्यांची संख्या अशी कीं, एका घोड्यास पांच दिवसांत एक मादी पुरे, अधिक माद्या दिल्यानें त्याचे शक्तीचा क्षय होईल. परंतु या मर्यादे प्रमाणें चाललें तर माद्यांचे मालक दुरून बहुधा येतात त्यांची निराशा होईल. यास्तव या मर्यादे प्रमाणें अगदीं बरोबर चालणें केव्हां केव्हां कठीण पडतें. तथापि घोड्यास फारच वारंवार माद्या दिल्या तर त्यांपैकीं थोडक्याच माद्या सबर होतात ही गोष्ट लक्षांत

ठेविली पाहिजे. आणि ही गोष्ट मुळींच घोडे न मिळाल्याप्रमाणेंच मालकांस निराशेची आहे. या खेरीज घोड्याचे शक्तीची नुकसानी होते. त्याचे नांवास बट्टा लागतो, माद्यांस घोडा देण्याचें काम फार चाललें असेल तेव्हां घोड्यास जास्ती चंदी किंवा बाजरीच्या भाकरींत पौष्टिक पदार्थ घालून त्या द्याव्यात. जे घोडे थंडे झाले असतील त्यांस अगदीं विसावा दिला पाहिजे; आणि जरूर असेल तर ते अगदीं बरे होत तोंपर्यंत त्यांस औषधोपचार करावा आणि मग त्यांस माद्या देणें त्या फारच कमी द्याव्या.

मादीस दोन वेळां घोडा देणें असें करणें जरूर असो किंवा नसो तथापि असें करण्याची चाल आहे. बरोबर ह्मटलें ह्मणजे तीन किंवा दोन दिवसांचे अंतरानें पुनः घोडा देण्यास काढावा. परंतु एतद्देशीय लोक दूर दूर ठिकाणांहून येतात त्यांस फार दिवस क्वचित थांबता येतें. यास्तव मादीस दोन दिवस सतत किंवा एकाच दिवशीं प्रातःकाळीं व सायंकाळीं बहुधा घोडा द्यावा लागतो. असें केल्यानें घोड्याची नुकसानी होते, व मादीचा ही बहुधा उपयोग होत नाहीं. तथापि माद्यांचे मालकांस नाराजी करून पाठवून देण्यापेक्षां असें करणें बेहत्तर आहे.

माद्या पसवल्यानंतर लवकरच त्यांस घोडे देण्याची चाल पुष्कळ ठिकाणीं आहे आणि असें करण्यास हरकत नाहीं, असें केल्यानें माद्या चांगल्या सबर होतात अशी पुष्कळांची समजूत आहे. वळू घोडा पसंत करणें तें हजर झालेले मादीचे मालकास सांगावें. परंतु असें करतां येत नाहीं, कारण घोड शाळेंत जो घोडा सर्वांहून मोठा असतो तोच एतद्देशीय लोक बहुतकरून पसंत करतात, आणि असें झाल्यानें तो लौकरच निरुपयोगी होतो. वळू घोड्याबद्दल फी देण्यास लोक राजी होण्याचे दिवस पुढें कदाचित येतील. तेव्हां आवडते

वळूबद्दल जास्ती फी ठरवून मग त्या लोकांस घोडे पसंत करूं दिले असतां चालेल, परंतु तसें आतां करतां येत नाहीं, आणि जेव्हां करण्यांत येईल तेव्हां सरकारी वळू घोडे मागण्यासाठीं माद्यांचे मालक न येत असें न होई असे रीतीनें हळूं हळूं व फार सावधगिरीनें केलें पाहिजे. ज्यांचे स्वाधीन वळू घोडे असतात त्यांजकडेसच माद्यांसाठीं घोडे पसंत करण्याचें काम हल्लीं बहुतकरून राहिलें पाहिजे. कोणते मादीस कोणता घोडा योग्य हें बरोबर ठरविण्याची माहिती व हुशारी या लोकांस क्वचित असते. यामुळें हल्लीं घोडे देतात ते बहुतकरून पाळीप्रमाणें नेहमीं देतात. मादी कशीही असो तें मनांत न आणितां ज्या घोड्याची पाळी असेल तो घोडा देण्यासाठीं बाहेर काढतात. परंतु योग्य विचार करून वळू घोडा पसंत करणें फार जरूर आहे. यास्तव खालीं लिहिलेल्या गोष्टी सुचविल्या आहेतः-

सूचना १ ली–नुसते घोड्याचे कुवतींकडे लक्ष दिलें पाहिजे मादीपेक्षां घोडा कांहींसा मोठा असला तर चालेल. परंतु फार मोठा असला तर त्यापासून जोखीम होते आणि कांहीं उपयोग होत नाहीं, मादीस दुखापत कदाचित होते. तिला काढविल्याचें फळ बरोबर होत नाहीं, कारण औलादीची कद मादीचे कदीप्रमाणें बहुतकरून होते, नराचे कदीप्रमाणें होत नाहीं.

सूचना २री–मादी आणली असेल तींत कोणते गोष्टीचें मोठें व्यंग आहे तें पहावें आणि त्याच गोष्टी विषयीं जो वळू घोडा चांगला असेल तो निवडून काढावा. उदाहरण–मादीचा पुठ्ठा नाजूक, लांबट व पोंचेरा असेल तर नराचा पुठ्ठा आंखूड, मजबूत व कांहींसा वर उचलेलाही असावा. या देशाचे बहुतेक माद्यांचे मागले पाय नाजूक व फेंगडे असतात त्याप्रमाणें मादीचे मागले पाय वांकडे असतील तर ज्या वळू घोड्याचे मागचे पाय सरळ असून नळ्या मोठ्या व जाड असतील तसा पसंत करावा.

प्रत्येक नरांत व प्रत्येक मादींत कांहीं तरीं एखादें मोठें व्यंग असतें. यास्तव एकाच व्यंगाची मादी व नर असूं नयेत. अशी तजवीज केल्यानें औलाद व्यंग रहीत होण्याचा संभव आहे

सूचना ३ री-मादीची उत्पत्ति कशी झाली आहे याविषयीं विचार केला पाहिजे. एका जातीची मादी व दुसरे जातीचा नर यापासून झालेल्या पसू घोड्या आतां पुष्कळ येऊं लागतील; आणि या देशांतील घोड्यांची उत्पत्ति कायमची सुधारण्याचा आपला मोठा भरंवसा पसू घोड्यांचे औलादीवर आहे यास्तव असे पसू घोड्यांची उत्पत्ति कशी झाली आहे त्याकडे विशेषेंकरून लक्ष दिलें पाहिजे.

रीति ह्मटली ह्मणजे एका जातीची मादी व दुसरे जातीचा वळू घोडा यापासून औलाद झाली ह्मणजे ज्या जातीचा वळू घोडा प्रथम दिला असेल त्याच जातीचा वळू घोडा त्या औलादी माद्यास पुढें देत जावा. उदाहरणः-या देशाचे मादीस अरबी वळूपासून शिंगी झाली असेल तिस घोडा देणें तो अरबी वळू दिला पाहिजे. विलायती वळूपासून शिंगी झाली असेल तर तिस विलायती वळू दिला पाहिजे. असें करीत गेलें ह्मणजे कांहीं पिढ्या झाल्यावर या देशांत घोड्यांची औलाद शुद्ध व कायमची होईल परंतु असें न केलें व वारंवार बिजांत फेरफार केला तर मिश्र जातीची औलाद होईल व ती कधीं कायम राहणार नाहीं. सरकारी वळू बहुतकरून अरबी असतात. यामुळें या नियमाप्रमाणें त्यांचे औलादीविषयीं चालण्यास अडचण पडणार नाहीं. परंतु विलायती वळू फार थोडके असतात. सबब त्यांचे औलादीविषयीं या नियमाप्रमाणें चालण्याची सक्ती करतां येत नाहीं. मोठे कदीची औलाद होण्यासाठीं प्रथम विलायती वळूची औलाद घेऊन मग त्या औलादीस अरबी वळू दिल्यानें केव्हां केव्हां

फायदा होतो. परंतु जरूरीमुळें किंवा खुशीनें असें करण्यांत येईल तेव्हां पुष्कळ पिढ्यांपर्यंत अरबी वळू देत गेलें पाहिजे.

सामन्य नियम ह्मटला ह्मणजे एका जातीची मादी व दुसरे जातीचा नर असें प्रथम असणें अवश्य आहे. ही गोष्ट कबूल झाल्यावर पुढें औलाद शुद्ध ठेवण्याकडे लक्ष दिलें पाहिजे. आणि या कारणासाठीं एकाच जातीचे आणि शक्य असेल तेव्हां एकाच वंशाचे वळूचा नेहमीं उपयोग केला पाहिजे. कारण बिजाची वारंवार बदलाबदली केली तर त्यापासून मिश्र जाती झाल्यावांचून राहणार नाहींत आणि ती औलाद निरुपयोगी व निःसंशय नाहींशी होणारी आहे.

---

# वळूघोड्याची सामान्य जतन करण्याबाबद.

**खाणें**—या घोड्यांस चांगली नुसती चंदी व वैरण पोटभर दिली पाहिजे. प्रत्येक जनावरास चंदी देणें ती त्याची कद, उमर, बांधा व पाचक शक्ति पाहून व ऋतु कोणता आहे तें व तो किती खर्ची पडतो तें मनांत आणून दिली पाहिजे. मोठे बयाचे घोड्यांस तरण घोड्यापेक्षां बहुशः अधिक चंदी पाहिजे. तसेंच ज्या घोड्यांस घोड दौडींत फार घातलें असेल त्यांस ज्या घोड्यास घोड दौडींत घातलें नसेल त्याहून जास्ती चंदी पाहिजे. जे घोडे भरपूर खर्ची पडत असतील त्यांस त्यांच्यानें जिरवेल तितकी चंदी दिली पाहिजे. चंदी अधिक झाली तर घोडा पोहोटी करतो आणि तिला घाण येते. असें झालें ह्मणजे चंदी कमी करून कांहीं दिवस मामूल वैरण शिवाय कांहीं ओला चारा व भुसा दिला पाहिजे असें समजावें. बद्ध कोष्ट झालें असेल तेव्हांही सदर्हू प्रमाणेंच केलें पाहिजे. मध्यम कदींचे अरबी घोड्याचे चंदीची सीमा ६ रत्तल आणि इंग्लंद देशांतील किंवा इंग्लिश वसाहतींतील मोठे घोड्यांचे चंदीची सीमा १२ रत्तल

समजावी. ज्या ज्या प्रकारचें धान्य देण्यांत येत असेल तें सर्व मिळू-न चंदीची ही सीमा समजावी.

**चंदीचे भेद**—या इलाख्यांत चणे देण्याची चाल फार आहे, आणि एकंदरीनें विचार केला तर ही चंदी सर्वांहून चांगली वाटते. परंतु दक्षिण भागात कुळथी देतात ती बहुत अंशीं चण्या सारखीच चांगली आहे परंतु ती उकडून दिली पाहिजे.

बाजरी केव्हां केव्हां देतात आणि ती देण्यास हरकत नाहीं. बाजरीच्या भाकरी करून तिंत पौष्टिक पदार्थ घालून त्या दिल्यावर थंडे झालेले घोडे ताजे व कुवतदार होतात.

**मट**—हेंही पौष्टिक व उपयोगी धान्य आहे. मठ भरडून चांगले भिजविले पाहिजेत, ते न भिजले तर त्यापासून अपाय आहे

सातू देण्याचा बहुधा कमी प्रकार आहे. चंदी ह्मणून नुसते सातू कधीं देत नाहींत, परंतु केव्हां केव्हां चण्या बरोबर ते दिले असता घोडे ताजे होतात.

**कोंडा** ( गव्हाचा )—कोंड्याचा खिचडा चांगला उकडून दिला असतां तो सारका प्रमाणें उपयोगी पडतो. घोडा भरपूर खर्ची पडत नसेल तेव्हां चंदीचे काहीं अंशाचे ऐवजीं तितकेच वजनाचा कोंडा दिला असतां चालेल परंतु कोंडा कचित चांगला उकडतात. चांगला न उकडलेला कोंडा पुष्कळ दिला तर त्यापासून बद्ध-कोष्ठ होऊन पोटशूळ होण्याचें भय आहे.

**वैरण**-सुकलेलें गवत व कडबा व हारळी या वैरणी निरनिराळे ठि-काणीं व निरनिराळे ऋतूंत निरनिराळ्या प्रकारच्या असतात. घोड्यास सर्वोत्कृष्ट मिळणारी वैरण कोणती हें नेहमीं फार लक्ष लावून ठरवि-लें पाहिजे रोजचें वैरणीचें मान घोड्याची कद व वैरणीचा प्रकार पाहून कमजास्त ठरविलें पाहिजे. १९ रत्तलांपासून २९ रत्तलांपर्यंत

रोजचें सामान्य मान आहे. कडबा सर्व वैरणीपेक्षां अधिक पौष्टिक आहे. सुकलेली हारळी त्याहून कमी पौष्टिक आहे आणि सुकलेलें गवत सर्वांपेक्षां कमी पौष्टिक आहे. घोडे मुशाफरी करीत असतील तर वैरणीची नासाडी होते यास्तव नित्याचे मानापेक्षां त्यांस जास्ती वैरण त्यावेळीं दिली पाहिजे.

**ओलाचारा**—लुसर्न ( विलायती गवत ) व गाजरें हीं मिळत असतील तेव्हां थोडकीं थोडकीं दिलीं असतां घोडे निरोगी राहतात. घोडे अजारी किंवा अशक्त झाले असतील तेव्हां हीं अधिक दिल्यास चिंता नाहीं. मायः लुसर्न १० रत्तलांहून जास्ती देऊं नये, व गाजरें ५ पांच रत्तलांहून जास्ती देऊं नयेत. घोडे अजारी वगैरे असतील तेव्हां हीं दुपट द्यावींत.

गाजरानें घोडा थंडा होतो अशी एतद्देशीय लोकांची समजूत आहे परंतु ही खरी असण्याचा संभव नाहीं. तथापि त्यांच्या पोकळ समजुती वारंवार मनास आणाव्या लागतात.

ओली हारळी शुद्ध खचित मिळेल तर ती फार चांगली आहे परंतु असें कधीं घडत नाहीं. गवत कापणारे भेळलेली ओली हारळी आणतात ती भयकारक आहे यास्तव ती वर्जणें बेहत्तर आहे.

**मसाला**—घोड्यांचे एतद्देशिय मालकांस व मोत्तदारांस मसाले देणें फार आवडतें परंतु ते नेहमीं किंवा वारंवार देणें घोड्यास फार अपकारक आहे. घोड्यांस चेतना होण्यासाठीं व त्यांची कुवत वाढविण्यासाठीं मसाले देतात आणि त्यापासून याप्रमाणें फळ कांहींवेळपर्यंत कदाचित झालें तर होईल. परंतु शेवटीं त्यापासून त्यांची शक्ति फार कमी होते. घोडा अजारी असल्या वांचून मसाले कधीं देऊं नयेत. आणि तेव्हांही देणें ते वैद्याची सल्ला घेऊन मात्र द्यावेत.

**मीठ**—मीठ फार हितकारक आहे आणि ते घोड्यांस दररोज

द्यावें. घोड्याचे मर्जीस येईल तेव्हां त्याणें मीठ चाटावें ह्मणून सैंधवाचा खडा त्याजपुढें ठेवणें ही मीठ चारण्याची सर्वांहून चांगली रीति आहे. परंतु ही न चालली तर १। तोळा मीठ दररोज त्याचे चंदींत द्यावें.

**सामान्य सूचना**—अन्नांत केव्हां केव्हां थोडका फेरफार करणें मनुष्या सारखें घोड्यासही योग्य व सुखावह आहे. परंतु फेरफार करणें ते एका एकी व मोठे करूं नयेत.

**पाणी**—पाणी शुद्ध व गोडे देण्याविषयीं जपणें अवश्यक आहे. वाहते ओढ्याचें किंवा विहिरीचें पाणी मिळेल तर दुसरें देऊं नये. सांचलेलें पाणी चालेल तोंपर्यंत वर्ज करावें. घोड्यांस चंदी देण्यापूर्वीं पाणी नेहमीं देणें हें अवश्य आहे. चंदी दिल्यानंतर पाणी देणें फार भयकारक आहे व तसें केल्यानें पुष्कळ घोडे मेले आहेत. या गोष्टी विषयीं एतद्देशिय लोकांची समजूत बहुतकरून उलटी आहे व या विषयीं ते फार आग्रही आहेत. परंतु या बाबतींत त्यांच्या पोकळ समजुती कधीं कबूल करूं नयेत. वर सांगितल्याप्रमाणें मोत्तदारांकडून करविण्या विषयीं सक्त तजवीज ठेवणें जरूर आहे.

उन्हाळ्यांत घोड्यांस दिवसांतून तीन वेळां पाणी द्यावें, ह्मणजे एकदां सकाळीं फिरून आल्यावर, मग सकाळचे ११ वाजतां ( चंदी देणें ती बारा वाजतां द्यावी ); आणि पुनः सायंकाळीं फिरूंन आल्यावर द्यावें. फारच गर्मी असेल त्याजागीं व फार गर्मीचे ऋतूंत रात्रीस घोडा शेजेस येण्या पूर्वीं आणखी पाणी दिलें असतां तें त्यास मोठें सुखावह होईल. हिवाळ्यांत दिवसांतून दोनदां पाणी दिलें असतां पुरें ह्मणजे सकाळचे व संध्याकाळचे चंदीचे वेळाचे अर्धा कलाक अगोदर द्यावें. सकाळीं पाणी देणें तें फारच थंड देण्यांत येऊं नये ह्मणून तजवीज ठेवावी. सगळ्या पेक्षां चांगली रीति ह्मटली ह्मणजे गोडे पाण्यानें मोठें पिप नेहमीं घोड्याजवळ ठेवावें.

**व्यायाम** ( फिरावयास नेणें )—सरकारी वळू घोड्यास व्यायामाची जरूरी आहे परंतु तिजकडे बहुधां दुर्लक्ष होतें. व्यायाम न झाल्यानें घोड्यांस अन्न बरोबर पचत नाहीं. ते रोड होतात. अजारी नसणारे प्रत्येक घोड्यास सकाळीं व सायंकाळीं निदान एक तास चांगले जलद कदम कदम न्यावें, अथवा शक्य असेल तेव्हां कांहीं अंतरावर त्यास फिरावयास नेणें बेहत्तर आहे. दिवसांतून दोनदां चार चार मैल फिरावयास न्यावें अथवा सकाळचे ९ मैल आणि सायंकाळीं ३ मैल न्यावें. मोत्तदार चांगला व विश्वासू असेल तेव्हां घोड्यास फिरावयास नेतेवेळीं त्यास त्यावर बसूं दिलें तर फायदा आहे, परंतु त्याणें घोड्यास नुसतें कदम कदम नेलें पाहिजे.

**मालीश करणें**—घोड्याचे मालिशीकडेही देखरेख ठेवली पाहिजे. घोडा अगदीं निरोगी व ताजा राहण्यास अन्न व व्यायाम अवश्य आहे तशी मालिशही अवश्य आहे. मालीश करणें ती मुख्यत्वें करून घोड्याचे ब्रुसानें व हाताळीनें करावी. जातवंत घोड्याचे पातळ कातडीवर खरारा करणें जरूर नाहीं, तो केल्यानें दाहा होऊन नुकसान होतें. चांगले मालिशीची परीक्षा ह्मटली ह्मणजे चकचकीत पांघरूण घेऊन त्यानें मालिश केलेल्या घोड्याचे केश उलटे घांसले असतां त्या पांघरुणास डाग पडूं नये व आयाळींत व शेपटांत मळ असूं नये.

**धुणें**—धुण्याची चाल निरुपयोगी व भयकारक आहे. मालिशींचें काम धुतल्यानें कधीं होत नाहीं ह्मणून धुणें निरुपयोगी आहे. धुतल्यानें घोड्याचे सांधे धरण्याची व कुमरी व शेंबा व बरसाती व ग्रीस ( पायांचे खुरींत रस उतरतो तो ) वगैरे रोग होण्याची भीति आहे ह्मणून धुण्याची चाल भयकारक आहे. धुण्याविषयींही मोत्तदार फार आग्रही असतात. धुतल्यानें मेहनत वाचते असें त्यांस वाटतें. फिके, करडे व पांढरे घोड्यांचे आंगावरील डाग धुवन काढण्या वि-

षयीं मोत्तदार मवृत होतात, परंतु त्यांस इतर रंगाचे घोड्यांपेक्षां जास्ती जोखीम आहे. कारण वर लिहिलेले रोग होण्याची त्यांस जास्ती भीति आहे. घोड्यास धुणें ही चांगली गोष्ट आहे असें पुष्कळ अंमलदार वगैरे यांचें मत आहे, परंतु ही त्यांची चुकी आहे. घोड्याचीं कांतडीं खरोखर स्वच्छ करण्यासाठीं धुणें हा उपाय व्यर्थ आहे हें जरा विचार केला असतां सहज लक्षांत येईल. बाहेरील मळ केंशातून काढून टाकणें इतकें मात्र धुण्यापासून होतें. आंगाचा मळ व दारणा काढून टाकणें हा मालिशीचा हेतु आहे. परंतु घोड्यास धुतलें असतां त्याच्या कांतडीवर आंगचे मळाच्या व दारणाच्या खपल्या पूर्वीं पेक्षां अधिक घट्ट बसतात. धुतल्यापासून भय आहे हें पुष्कळ वर्षांचे अनुभवावरून सिद्ध झालें आहे.

या देशांतील सरकारी सर्व तबेले फार उघडे असतात. घोड्यास धुतल्या नंतर त्याला पुसून कोरडें करण्याकडे मोत्तदार दुर्लक्ष करितात यास्तव घोड्यास वारा न लागे अशी बरोबर तजवीज ठेवणें बहुतकरून अवश्य होतें; आणि या मुळें सदरीं लिहिलेलें भय उत्पन्न होतें. आपली मेहनत वाचावी ह्मणून मात्र मोत्तदार घोड्यास धुतात. परंतु धुण्याचें काम बरोबर केलें तर मामूल मालिशीपेक्षां तें अधिक मेहनतीचें आहे. कारण घोड्यास धुतल्या नंतर त्याचे सुरक्षीतपणासाठीं त्याला प्रथम पुसून अगदीं कोरडा केला पाहिजे. मग त्याजवर भुरका घालून त्याला थोडासा घाम येई तोंपर्यंत त्यास दुडकी चालीनें चालविलें पाहिजे. मग त्याला पुनः पुसून कोरडा करून बारिक भुरकी घालून व त्याचे कातडीची उष्णता स्वाभाविक उष्णतेप्रमाणें होई तोंपर्यंत त्यास फिरविलें पाहिजे.

खूर साफ वगैरे करणें हें मालिश करण्याचा मुख्य भाग आहे. खुरांतून कचरा दिवसांतून निदान दोनदा उकरून काढला पाहिजे

आणि ते नेहमीं स्वच्छ व कोरडे राखिले पाहिजेत नाहींतर रोग खचित होईल. त्यांत ज्या घोड्याची नालबंदी नियमानें होत नसेल त्यास तर विशेषें करून रोग होईल असे प्रसंगीं नालबंदी न करणें हितावह आहे. परंतु बहुतेक विलायती घोडे आणि ज्या घोड्याचे खूर नाजूक किंवा चापटे असतात त्या सर्व घोड्यांस नालबंदी केलीच पाहिजे; आणि ती महिन्यांतून एकदां शक्य असेल त्या प्रमाणें नेमानें केली पाहिजे व चांगल्यांत चांगला जो नालबंद सांपडत असेल त्याला बोलाविण्याची तजविज ठेविली पाहिजे. चांगले मोठे नाल बसविण्याची व खुराचे बाहेरचे आंगास कानसीनें न घासूं देण्याची आणि तळवा व पुतळी न सोलूं देण्याची तजवीज घोडे स्वाधिन असणारे मनुष्यांनीं ठेवली पाहिजे.

# पसू घोड्या.

## पसू घोड्या काढण्यापूर्वी त्यांची जतन करण्याबाबद.

पसू घोड्यांविषयीं घोड्यांचे एतद्देशीय मालक थोडकाच विचार करतात. त्यांस फारच लठ्ठ दमाल होऊं देऊं नये कारण तशा झाल्या असतां त्या बहुतकरून सबर होत नाहींत. तसेच त्यांजवळून फार काम घेऊं नये व त्यांस अर्ध्या उपाशीं मारूं नये व रोड होऊं देऊं नये, याखेरिज दुसरी कांहीं तजवीज ठेवणें जरूर नाहीं. वर सांगितलेल्या दोन्ही प्रकारच्या स्थितीपेक्षां जी मादी चांगलें अन्न व मोकळी हवा व पुष्कळ व्यायाम असल्यामुळें चांगलें स्थितींत असते ती मामूल वेळीं हातेणास येण्याचा व ती काढविली असतां सबर होण्याचा व कष्ट पडल्यावांचून किंवा जोखीम झाल्यावांचून निरोगी शिंगरूं पसवण्याचा अधिक संभव असतो.

**मादी काढविल्यानंतर तिची जतन**—मादी सबर असेल त्या

वेळीं तिला पोटभर खाणें दिलें पाहिजे, परंतु मर्यादे बाहेर देऊं नये. तिला पुष्कळ चालीनें फिरवावें परंतु फार पळवूं नये. तिला वाईट हवा लागूं न देतां पुष्कळ मोकळी हवा दिली पाहिजे. पहिले साहा महिनेपर्यंत तिजजवळून मामूल काम घेण्यास हरकत नाहीं. पुढें तीन महिनेपर्यंत काम घेणें तें हलकें व हळूं हळूं घेतलें पाहिजे. शेवटले दोन महिने पर्यंत नुसते फिरविण्यापेक्षां किंचित् जास्ती असलें ह्मणजे पुरे. परंतु तिला जितकें अधिक फिरविलें तितकें बरे पडेल. कांहीं प्रांतांत सबर माद्यांस त्यांत विशेषें करून ज्या माद्या मोठ्या किंमतीच्या असतात त्यांस उजेड व हवा न लागे अशा कोंडून ठेवतात त्यांस फारच खाऊं घालतात व त्यांस फार फिरवित नाहींत. परंतु ही रीति खालीं लिहिलेले रीतीपेक्षां मादीस व पुढें होणारे शिंगरास अधिकच नुकसानकारक आहे, ह्मणजे सबर घोड्यास चरण्यासाठीं जंगलांत मोकळें सोडून देण्याचे रीतिपेक्षा अधिक नुकसानकारक आहे. माद्यांस चरण्यासाठीं जंगलात सोडणें हें बहुतकरून त्यांस अर्धे उपाशीं मारणें आहे

**पसवणें**—पसवते वेळा माद्यांस एकल्या ठेवणें हें इतर सर्व गोष्टींपेक्षां अधिक जरूरीचें आहे. मादीस खुलाशाची जागा असली व तिचे वाटेस कोणी न गेलें ह्मणजे तिचें पसवणें यथास्थित होतें. मदत क्वचितच लागते आणि अज्ञानानें कारणावांचून मदतीस गेलें असतां नुकसान होतें आणि कदाचित शिंगराचे जिवास जोखिम होते.

**पसवल्या नंतर**—निरनिराळे ठिकाणीं निरनिराळ्या पुष्कळ मनःकल्पित तजविजी घोडीचे व नवीन उपजलेले शिंगराचे हितासाठीं लोक करितात. त्यांपैकीं कोणत्याही तजवि[illegible] असून नुकसानी आहे असें मला माहित नाहीं, यास्तव हठी सर्वां[illegible] बलवत्तर आहे. तित

घोडा द्यावा आणि अनुवासन करून सात दिवस ती घोडी फिरण्यांत ठेवावी. नंतर कुडव (पावशेर), बेल फळाचें चूर्ण (२ पावशेर), माक्षिक ( सोनामुखीचें भस्म ) आणि दूध आढकभर इतके पदार्थ एक शेर तेलांत शिजवून त्यांत मध मिसळून तें घोड्यास पाजावें. या महातेलाचा शेरभर अंश घोडीच्या योनींत बारा बोटे जाईपर्यंत घालावा. मग अघाडा, वेखंड, बेल, शिंगरुबिज, लसूण, त्रिफळा, पिंपळी, अश्वगंधा आणि मोहऱ्या हे पदार्थ त्या तेलांत मिसळून तें घोडीस पाजावें त्या नंतर यावक व मीठ पाणी पाजावें. बेलाचें चूर्ण आणि दही व खिचडीही द्यावी पिंपळी, त्रिफळा, शिंगरुबिज, आघाडा आणि नागरमोथे ह्यांचे चूर्ण करून, तेलांत टाकावें व त्यांत वेखंड, मिरे, मोहऱ्या, मिसळून तें अश्विनीच्या बस्तीच्या ठिकाणीं लावावें (मर्दन करावें) नंतर दही आणि यावक घोडीस द्यावें. या प्रकारें प्रयोग केला असतां अश्विनी गर्भिणी होते.

शीतपक्क, मेंढू आणि त्रिफळा हे द्रोणभर घेऊन कढवावेत व त्यांतील चतुर्थांश राहिल्यावर एक आढक तूप, वाघाटी, नागरमोथे, चिकणी भोई, कोहळी, जिवक, कर्षक, ज्येष्टमद, उपलसरी हे पदार्थ चूर्ण करून त्यांत टाकावेत आणि मंद विस्तवावर कांहीं वेळ ठेवावें त्याचें अनुवासन व प्राशन केलें असतां वंध्येसही संतति होते. रक्तरोहिडा, कूट, माक्षिक, कुटकी आणि वावडींग, हे एकत्र करूनत्याचें मर्दन करावें, मगत्याचा पोळी करून अश्विनीचे योनींत घालावी. नंतर अश्वाचा योग करून पाण्यांत तिचें डोकें बुडेल अशा स्थळीं तिस स्नान घालावें. असें केलें असतां घोडी गर्भिणी होईल.

**गर्भिणीचें लक्षण**—योनींत अश्वाचें विर्यग्रहण करतेवेळीं तृप्तता. व नेत्राचे ठिकाणीं व्याकूळपणा अशीं अश्विनीस चिन्हें दिसतात. जी अश्विनी संयोगकाळीं ताडण करील, मुकाट्यानें उभी राहून काम

विकार रहीत असल्यामुळें अश्वाचा परित्याग करील, अश्व येतांच पुच्छानें आपली योनी बळकट अच्छादन करील किंवा त्याम पाहतांच जी पळून जाईल ती अश्विनी गर्भिणी आहे असें समजावें.

जिची योनी अधोभागीं शून्य असते, जी नेहमीं तेजस्वी असते जिचा गंध उत्तम येतो, जिच्या पार्श्व भागाचेठायीं कांहीं लेप दिल्यासारखें दिसतें, ती गर्भिणी होय.

जिचे शरिरावर शोभा दिसते, जी पुष्ठ असते, जी आनंदयुक्त असून मंद चालते व बसतांना श्वास टाकिते, जिच्या रोमाच्या ठिकाणीं स्वच्छता व दाट रंग, क्षमा, शांती व अश्वाविषयीं निरिच्छा असते ती घोडी गर्भिणी आहे असें समजावें. अश्विनीस गर्भ धारणानंतर पहिल्या व दुसऱ्या महिन्यात मांसाचे ठिकाणीं शोभा प्राप्त होते, ३ रे व ४ थे महिन्यांत पक्क मांसाची वृद्धि होते, ५ वे व ६ वे महिन्यांत त्वचे वरील रोम प्रसन्न दिसतात, सातवे व आठवे महिन्यांत योनी विस्तिर्ण होते, नववे महिन्यात पाय व त्याचे खालचे भाग वृद्धि पावतात आणि दहावे व अकरावे महिन्यात अश्विनी प्रसूत होते.

दहा मादवान्या ह्मणजे पसू घोड्या कार्टविण्यास एक नर ह्मणजे वळू घोडा बस आहे. रब्बीचे हंगामीं व बरसातींत घोडी कार्टाल्ली असतां शिगरूं शक्तीवान होतें. हे महिने घोडीस हात्याण करण्याचे नसतात, सबब घोडीचे अंगांतून ह्मणजे योनींतून पाणी व रक्त जात असतें हें लक्ष्यांत ठेवावें. घोडीस गर्भ ठरल्यावर तिजवर घोडा चढूं देऊं नये, चढला असतां गर्भास इजा होईल किंवा घोडी गर्भ टाकून देईल. जेव्हां घोडी गर्भ टाकिते तेव्हां पुन्हां गर्भ राहण्याकरितां तिचा कोठा औषधें देऊन साफ केला पाहिजे. घोडीस गर्भ राहिल्यावर कदाचित घोडा चढला तर जरा जलद तिजला चालवावें परंतु तिजवर बसून चालवूं नये. तिच्या छातींतून पाणी जाऊं लागलें तर

(ह्मणजे घाम येऊं लागेल तर) छातीवर मेंदीचा पाला वाटून लावावा. पसवण्याचे वेळेस घोडीची छाती काळी पडते ती मेंदीचा पाला लावल्यानें काळी पडणार नाहीं. घोडी पसवल्यावर तिचे शरीरांतील वार वगैरे बराबर पडली नाहीं तर तिस औषध द्यावें. क्वचित समयीं घोडी पसवली असतां दोन शिंगरें होतात, परंतु तीं वाचत नाहींत, तथापि केव्हां केव्हां वांचतात. कित्येक घोड्या पसवल्यावर शिंगरास जवळ येऊं देत नाहींत ह्याचें कारण असें कीं, लहानपणीं घोड्या काढल्या असतात किंवा प्रसुत वेळीं त्यांस वेदना फार होतात हें होय.

घोडी काढविणें ती नऊ वर्षांचा घोडा व पांच वर्षांची घोडी झाली ह्मणजे काढावी. तीन वर्षांचे आंत घोडी मुळींच काढवूं नये. तीन वर्षांचे पुढें व पांच वर्षांचे आंत घोडीस गर्भ राहिल्यास शिंगरूं अशक्त होतें.

**घोडीस गर्भ राहत नाहीं त्यास औषध**—भुई कोहळा, केळीच्या मुळ्या, पत्री झाडाची मुळी, बिब्याचें आंतील बीज, हीं अर्ध शेर प्रमाणें घेऊन, गाईचें दूध दोन शेर आणि साकर८८८९ त्यांत मिसळून तें दोन सतकें द्यावें. घोडा कमी पडला असेल किंवा विर्यहीन झाला असेल तर त्यासही हें औषध द्यावें ह्मणजे त्यास पुरुषत्व येऊन घोडीशीं संग करण्यास शक्ति येते. मादवान शिंगरासाठीं भरविण्याच्या मादवानीला विण्याचे अगोदर तीन दिवस रुपच्याळ मासळीचें पाणी द्यावें तें असें कीं, मासळी कपाऱ्यांत अशी शिजवावी कीं, पाणी व मासळी एक होऊन जावी. नंतर वस्त्रगाळ करून तें पाणी मादवानीला पाजावें, ह्मणजे तिचे आंतील सर्व कोठा निर्मळ होऊन, शिंगराला हाडी, मुत्रा, आंड होत नाहीं. परंतु वसंत ऋतूमध्यें घोडीस घोडा द्यावा जर तसें नसेल तर रात्रीं किंवा पहाटेस द्यावा,

अगर सकाळीं व संध्याकाळीं दोन वेळा द्यावा नंतर दुसरा घोडा त्या मादवानीचे नजरेस न येईल असें करावें. तसें न केलें तर शिंगराचा रंग दुसरा होईल. जेव्हां घोडी गर्भ धरिते तेव्हां तिजवर सारा दिवस स्वारी करूं नये व तिस हिरवें गवत आणि सकाळीं व संध्याकाळीं नवे हरबरे दळून मऊ करून चारावेत. तिस दुसऱ्या घोड्यापासून जपून आणि दूर ठेवावें व महिने मोजीत असावें. पूर्णमास होण्याची इच्छा ठेऊन अकरा मासांपर्यंत जपावें. बारावा मास लागेल तेव्हां एक आठवडा पर्यंत तूप दररोज १ शेर प्रमाणें देत असावें ह्मणजे तिचीं आंतडीं रुंद होतील. हातांत धरून मादवानीला दररोज फिरवीत असावें ह्मणजे विण्याचे वेळेस सुलभ पडेल.

# अश्वोत्पत्ति.

घोडी हत्याणावर ( माजावर ) आली ह्मणजे तिला घोडा दिल्यावर लागलेंच तिच्या समोर चांगला घोडा उभा करतात, व तिचे आगावरून ह्मणजे कानापासून दांडीपावेतों पाण्याची धार ओतीत आणितात तेणें करून तिच्या आंगास अगोस्नी ( शाहारी ) येऊन ती आंग झाडते. असें करण्याचें कारण हेंच आहे कीं, आंग झारल्यानें तिच्या गर्भाषयांत जें रेत गेलें असतें तें ठरतें. नंतर ह्या ठिकाणीं मातीवर घोड्याचें शेष रेत पडलें असेल त्यांत थोडें पाणी कालवून चिखल करून तो तिचे पुठ्यावर सारविनात तेणें करून ओटा बसून घोडी योनींतून रेत बाहेर काढून टाकीत नाहीं.

घोडीस घोडा दिल्यावर वर लिहिलेली कृति करून नंतर घोडीवर बसून कोणी कोणी तिस भरधांव धांववितात व तेणें करूनही ती योनींतून रेत काढून टाकीत नाहीं. कोणी कोणी तिच्या दांडीस ( शेपूस ) बोरीची फांदी लावतात. तिचे कांटे आंगास न टोंचावे ह्मणून ती

आपलें निरण आवळून धरते तेणें करून रेत बाहेर येऊं शकत नाहीं आणि गर्भ ठरतो.

घोडीस घोडा दिल्यावर दिलेला घोडा घोडीस न दाखवितां एकीकडे काढून तिला चांगला घोडा दाखवितात. याचें कारण त्या घोड्याच्या आकृती प्रमाणें अथवा रंगा प्रमाणें शिंगरूं व्हावें हें होय. चांगला घोडा न मिळाल्यास त्याची तसबीर दाखवितात. तेणेंकरून तिची च्छाया होणाऱ्या शिंगरास येते. याज करितां घोडीस घोडा देते वेळेस कुत्रे घोडी समोर येऊं देत नाहींत. कारण कुत्र्याचे छातीवर भोंवरा असतो. या साठीं घोडीनें कुत्रे पाहिले असता शिंगरास छातीवर भोंवरा होतो तो घोड्यास मोठा अयव आहे असें मानितात. त्या खोडीस त्दृदावळ असें ह्मणतात. याच प्रमाणें गाढव घोडीनें पाहिलें असतां गाढवा सारखे मोठाले कान होणाऱ्या शिंगरास होतात. अशा सबबी वरून कोणतेंच जनावर घोडा देते वेळेस घोडी समोर येऊं देत नाहींत.

ज्या जातीचें शिंगरूं आपणास पाहिजे आहे त्या जातीचा घोडा जर देण्यास मिळत नाहीं तर तो घोडा खळला असतां त्याचें जें रेत जमिनीवर पडलें असेल तें घेऊन यावें आणि त्यांतील माती, कचरा काढून त्यांत थोडा साळीचा कोंडा कालवून तें तापत्याचे लहान पिशवींत भरून ती पिशवी घोडीच्या गर्भाषयांत हातानें ठेऊन द्यावी आणि तो घोडा अथवा त्याचें चित्र तिला दाखवावें ह्मणजे त्या प्रमाणें शिंगरूं होतें. आतां ही पिशवी ठेवते वेळीं घोडी मात्र ऋतूवर असली पाहिजे. कदाचित् ऋतूवर नसली तर तिच्या शेजारीं एक दोन दिवस दुसरा घोडा बांधावा ह्मणजे ती ऋतूवर येते. मग ह्या प्रमाणें थैली ठेवावी.

शिंगरास हिरवा रंग खेरिज करून जो रंग आला पाहिजे त्या-

गाचें कापड पिशवीचें असावें. हा योग स्वतः अनुभवून पहाणारे बडोदें मुक्कामीं एक दोन गृहस्थ आहेत.

### घोडी पसविल्यावर शुभअशुभ पहाणें.

जी घोडी रात्रौ उत्तम वेळा चौथे प्रहरीं पसवते ती धन्यास संपत्तिकारक होते. श्रावण महिन्यांत घोडी पसवली तर ती धन्याच्या आयुष्याचा व सुखाचा नाश करिते. रात्रौ पहिले प्रहरीं पसवली तर धन्याचे बंधूस वाईट, दोनप्रहर रात्रीं पसवली तर धन्याचा नाश व तिसरे प्रहरीं रात्रीं पसवली तर धन्याचे पुत्राचा नाश होतो. मूळ नक्षत्रावर किंवा वाईट वेळावर अथवा तिथीवर घोडी पसवली तर ती धन्यास दैन्य आणतें श्रावण महिन्यात पसवलेली घोडी घरीं न ठेवतां ब्राह्मणास द्यावी. इतर महिन्यांत घोडी दिवसा पसविल्यास शिंगराचा थोडा कान चिरावा ह्मणजे त्यास दिवसा पसविल्या बद्दल बाधा होत नाहीं असें प्राचीन लोक ह्मणतात.

## सूतिकोपचार.

गर्भ बाहेर निघाल्या नंतर ऋतुमाना प्रमाणें थंड किंवा उष्ण उदकानें त्यास सिंचन करावें. नंतर आईचे स्तनास लावून त्यास धरून पाजावें. गर्भ बाहेर पडत नसल्यास अथवा जरायु ( पिशवा ) निघत नसल्यास खालीं लिहिलेल्या औषधाचा उपयोग करावा. ज्योतिषमती, तंजवति, शंखपुष्पी, शतावरी ( मावरी ), भारंगी, कागोली आणि लांगलिका हीं औषधें समभाग करून घ्यावीं व त्याचें मोहऱ्या सहीत चूर्ण करावें. नंतर तें अश्विनीचें शिर, कंठ आणि पुच्छ या ठिकाणीं लावावें. चांगली जळपिंपळी, बेलफळ आणि सुंठ याचें चूर्ण करून पाण्यांत पाजावें. या उपायांनीं गर्भ लवकर पडतो. नंतर पुढें सांगितलेल्या प्रतिपादनांनीं तिचा कोठा शुद्ध करावा.

सैंधव, मद, सुंठ, मिरे व पिंपळी यांचें पानक पुर्वान्ही पाजावें. पोष्टिक दारू, घृष्टि, गुळ आणि तेल यांचें पानक पुर्वान्ही द्यावें. तापवलेली मद अथवा तेल, पाणी आणि तूप यांचें पानक द्यावें. या योगानें योनी आणि कोठा शुद्ध होतो. कोठ्यांत कफ आणि मळ किंवा रक्त हे मिश्रीत होऊन गर्भ निश्चतेवेळीं तिच्या उदरांत वायू भरतो. याकरितां अश्विनी प्रसूत झाल्यावर तिला तूप पाजावें. जव, हरळी, यावक व तूप हें तिस पथ्य द्यावें. दहावे दिवशीं अश्विनीस तिच्या शिगरा सहीत स्नान घालावें.

घोडी पसवली ह्मणजे शिगरूं घोडीस पिऊं देऊं नये. प्रथम एक पैसाभार लोणी, एक पैसाभार गुळ आणि सवागीची राख हरबऱ्या येवढी भाजून व बिबव्याचे तेलाचीं फुलें चार हीं सर्व मिळून शिगरास चाटवावीं नंतर शिगरास पाजण्याकरितां घोडीकडे सोडावें.

**प्रसुतीनंतरचा उपाय**—व्याल्या नंतर ९ शेर तुरी शिजवून त्यांत अछेर तुप व मद अछेर घालून एक टांक बोळ घालावा आणि तें तीन दिवस मादवानीस प्रथम वेळीं द्यावें. दुसरे दिवशीं आडीच शेर गुळाची दारु पाजावी. दररोज हरबऱ्याचे ऐवजीं गहूं शिजवून द्यावेत,तीन दिवस गुजरल्यावर कांहीं दिवसांनीं हरबरे शिजवून द्यावेत. या देशांत मादवानीस सहा दिवसा नंतर धुतात, त्याचे अगोदर धुऊं नये, कारण वायूचें भय असतें. संपुट व सुंब याला धुवावें. या सहा दिवसांत पाणी तापवून पिण्यास द्यावें. दिल्ली मध्यें हवा गरम आहे, तेथें सहा दिवसां नंतर तिचें तोंड धुतात. नंतर गुळ, तुप, सुंठ व मिरे यांचा कणकेमध्यें शिरा करून ह्मणजे शिजवून आमली प्रमाणें पातळ करून पाजावा, ह्मणजे तिचा आंतील कोठा स्थीर राहील.

घोड्याला मादवानीवर सोडल्यानें घोडा कमी पडला असतो आणि मादवानीवर उडूं शकत नाहीं. त्याला पौष्टिक दिलें पाहिजे त्यास उपाय-कवस कुहिरीचें बीज पांच शेर, भुईभेट ह्मणजे भुईकोह-

ळा, लसुण पांच शेर हे तीन जिन्नस एके ठिकाणीं करून दूध व तांदूळ यांमध्यें शिजवावे व त्याचे सात हिस्से करावे. आणि दररोज एक हिस्सा तूप व साखर यांत द्यावा असें सात दिवस करावें ह्मणजे घोड्याला पुरुषत्व इतकें येईल कीं, तो १०० मादवानी बरोबर. संग करूं शकेल व हें औषध तीन दिवस रात्रीं व तीन दिवस सकाळीं साखर व तूप यात मिसळून दिलें तर पुरुषत्व कमी झालें असल्यास अधिक होईल.

घोडी पसवल्यावर तीस तीन दिवसपर्यंत देण्याचा मसाला:— हळद आतपाव, अजवान आनपाव, कात छटाक, लसूण आतपाव, गुळ पावशेर, तेल पावशेर, बाळतलिंबाचा पाला मुठभर हे सर्व पदार्थ बारीक करून गुळांत व तेलात गोळ्या कराव्या. घोडीस तसदी देऊं नये. एक गोळी शिंगरूं होतांच द्यावी दुसरी दुसरे दिवशीं द्यावी आणि तिसरी गोळी तिसरे दिवशीं संध्याकाळीं द्यावी. नंतर दाणा द्यावा. दाणा हरबरे वाळलेले सुके व घासही सुका द्यावा. बारा दिवसपर्यंत ऊन पाणी पाजावें व सावलींत बांधावें.

ज्यावेळीं शिंगरूं पोटांतून बाहेर येईल त्यावेळीं शिंगराचें सुंब सुरीनें कापावें व पाय बांधावे ह्मणजे पाय वाकडे तिकडे होणार नाहींत. तीन चार दिवस शिंगरास निजवून ठेवावें, उभें राहूं देऊं नये, व दररोज पाषाणभेदाचें चाटण द्यावें. हें चाटण दोन महिनेपर्यंत सारखें देत जावें. जेव्हां तीन महिने होतील तेव्हां हिरडा गाईचे मुतांत भिजवून दररोज अर्धा दिरीम हिरडा व अर्धा दिरीम सेंदेलोण मिळून द्यावें व पाषाणभेद चाटणही देत असावें. जेव्हां चार महिन्यांचें होईल तेव्हां दररोज एक दिरीम हिरडा व एक दिरीम सेंदेलोण द्यावें. अशा प्रमाणानें दर महिन्याला जास्ती करीत जावें. पांच महिने झाले ह्मणजे शेळीचें दूध लावावें. गाईचें दूध शिंगरास वाईट आहे. एक वर्षाचें होईल तेव्हां एकशेर तूप व

नाहीं तरी त्यास कांहीं बाहेरचें अन्न देण्याचें तेव्हांपासून सुरू केलें पाहिजे. ज्यांस सामर्थ्य असेल ते लोक दुधांत भिजविलेली चंदी देतात. कोणी नुसती चंदी देतात किंवा नुसतें दूध देतात. कोणी मिळेल ती नुसती वैरणच देतात. काय द्यावें व किती द्यावें याविषयीं नियम ठरवितां येत नाहीं. परंतु शिंगरांस चांगलें खाऊं घातलें आणि त्याचप्रमाणें त्याजवळून योग्य व्यायाम करविला तर त्यापासून नुकसान होणार नाहीं. पशू घोड्यांस व शिंगरांस या देशांतील उत्तम वैरण ह्मटली ह्मणजे हर्याळी आहे. ही पुष्कळ ठिकाणीं शेतांत खुरपून काढण्यासारखी फार होते व पिकास नुकसान करते आणि ही हर्याळी उपयोगी आहे व राखून ठेवणें योग्य आहे अशी या देशचे लोकांची समजूत झाली तर त्यांचे पिकास व त्यांचे शिंगरासही मोठा फायदा होईल.

व्यायाम—घोड्यांची औलाद करणारे एतद्देशीय लोक शिंगरांकडून व्यायाम करवितील तर फारच करवितात नाहीं तर मुळींच करवीत नाहींत असें आढळण्यांत आलें आहे. पैकेवाले व घोड्यांचे शोकी परंतु रूढी धरून बसणारे काठेवाडांतील तालुकदार व गृहस्थ लोक आपले शिंगरांस पुष्कळ खाऊ घालतात आणि बंद करून ठेवतात. त्यांत बहुत करून त्यांस अंधारे तबेल्यांत किंवा घरांत बंद करून ठेवतात. यामुळें त्यांची शरीरें ढिल्लदमाल होतात. पाय लहान व नाजूक होतात; आणि त्यांस कामास लावलें ह्मणजे त्यांचे पाय खोडदार होतात. दक्षिण देशांतील गरीब शेतकरी लोक आपले शिंगरांस पुरें खाऊं घालीत नाहींत. त्यांस अगदीं मोकळे सोडून देतात. यामुळें तीं जनावरें खुजट होतात, परंतु त्यांचे हातपाय मोठे मजबूत होतात. हीं जनावरें दिसण्यांत चांगलीं नसतात परंतु कामाला चांगलीं असतात. या दोन वहिवाटी दोन प्रकारच्या आहेत.

यांचें चांगलें मिश्रण झालें पाहिजे. जे आपले शिंगरांस हल्लीं चांगले खाऊं घालीत असतील त्यांणीं तसेंच करीत जावें परंतु त्यांस पुष्कळ मोकळीक द्यावी. आणि तीं जन्मल्या दिवसापासून त्यांस कामांत लावण्याचा वेळ येई तोंपर्यंत त्यांजकडून व्यायाम करवावा. जे आतां आपले शिंगरांस उपाशी मारीत असतील त्याणीं त्यांची मोकळीक कमी न करतां त्यांचे खाण्याकडे थोडका पैका खर्च करावा.

शिकविणें—शिंगरांस बंद जागेंत वाढविलें असतां आणि त्यांजकडून व्यायाम न करविला असतां त्यांचा बहुधा मोड होतो. जें लहान शिंगरूं खाऊन अगदीं बसलेलें असेल त्यास एकदम लादलें अगर त्यावर स्वारी केली तर त्याचे हातापायांस कांहीं तरी नुकसानी होणारी आहे. ज्या ठिकाणीं अशी वहिवाट आहे तेथील पुष्कळ घोडे रोगी असतात, त्याचें कारण हेंच आहे. शिंगरें मोकळीं ठेविलीं व त्यांजकडून व्यायाम करविला असतां त्यांचीं हाडें व नसा घट्ट व मजबूत होतात. यास्तव एतद्देशीय लोक जितके कोंवळे वयांत बहुधा शिकवूं लागतात तितके कोंवळे वयांत असे शिंगरांस शिकवूं लागलें असतां फारसें नुकसान नाहीं. एतद्देशीय लोक शिंगरांस फारच कोंवळ वयांत बहुधा शिकवूं लागतात यांत संशय नाहीं. कायदा (लगाम) फार आवळून व पाय बांधून त्यास शिकविण्याची रीति आहे. तिजपासून फार नुकसान होतें, आणि पुढें चांगलें होणारे पुष्कळ शिंगरांची खराबी होते. त्यांचे हातापायांस इजा होऊन ते नुकसान पावतात व आखडतात, आणि स्वाभाविकरीत्या त्यांचे पाऊल पडावें तसें पडत नाहीं.

पसू घोड्यांस अडाणी रीतीनें पाय बांधून सोडतात तेणेंकरून पुष्कळ पसू घोड्या कायमच्या नुकसान पावतात व त्यामुळें ... किंमत कमी होते.

**शिंगे व शिंग्या यांची विक्री**—या देशांत घोड्यांची कायमची चांगली औलाद होण्याची आशा खालीं लिहिलेले गोष्टीवर आहे ह्मणजे बाहेरून आणलेले वळू घोड्यापासून झालेल्या शिंग्या औलाद घेण्यासाठीं राखून ठेवणें व त्यांचे बाप ज्या जातीचे व ज्या मिजाचे असतील त्याच जातीचे व त्याच मिजाचे त्यांस घोडे देणें या गोष्टीवर आहे. यास्तव जे लोक घोड्यांची औलाद करीत असतील त्यांणीं आपल्या शिंग्या राखून शिंगे मात्र विकावे असें होण्याविषयीं होईल तितकें उत्तेजन त्यांस दिलें पाहिजे.

**खच्ची करणें**—शिंगे विकण्यांत न येतील तेव्हां त्यांस खच्ची करण्याचें त्यांचे मालकास समजाविणें ही मोठी अगत्याची गोष्ट आहे. यापासून अनेक मोठे फायदे आहेत. खच्ची केलेले शिंगे मोठाले घोडे होतात. ते गरीब व फार उपयोगी होतात, आणि त्यांचा वळूप्रमाणें उपयोग करण्याचें बंद पडतें, हा सर्वांहून मोटा फायदा आहे. या देशांत विचारपूर्वक योजनेवांचून माद्यांस नर देण्यांत येतात हें निरनिराळ्या औलादी खराब होण्याचें एक मुख्य कारण आहे यांत संशय नाहीं. खच्ची करण्याची चाल शेंकडो वर्षांपासून इंग्लंड देशांत चालू झाली आहे. ही चाल सर्व ठिकाणीं चालू झाली तर निवडक व जातवंत वळू खेरीज इतर नरांचा उपयोग होणार नाहीं. आणि या देशचे घोड्यांचे औलादींत चांगला परिणाम लवकर दिसून येईल.

मिश्र जातीचे घोड्यांचा वळूप्रमाणें उपयोग विशेषें करून होऊं देऊं नये, कारण शुद्ध जातीचे घोड्यांपासून मात्र चांगली औलाद होणारी आहे.

---

## किशोरोपचार.

शिंगरू लहान असतांना त्याच्या आंगावरून व डोक्यावरून

हात फिरवून त्याला माणसाची संवय लागेलसें करावें. असें के-
ल्यानें त्याचे मनांत भीति राहाणार नाहीं. लहानपणीं शिंगरास
जुलाब होतात तेव्हां त्याला तांदुळानें धुवण द्यावें, व एक ड्राम
अफूचा अर्क दिवसांतून एकवेळ देत जावा, व त्यास उन्हांत
बांधावें. शिंगरू जन्मलें ह्मणजे त्यास एक महिनापर्यंत मोकळें
राहूं द्यावें दोरी वगैरे लावूं नये. पुढें गळ्यास दोरी लावून आईज-
वळ बांधावें, व गवत खाईल तर घालावें. घोडीस शिंगरू सहा
महिनेपर्यंत पाजावें. पुढें तिचें दूध सोडावें व दूध सोडल्यानंतर
त्याला चांगलें खाण्यास देत असावें. शिंगरास थंडी होऊं नये व
थंड काळांत त्याचे आंगांत गरमी राहील असें करावें. शिंगरू
लीद करीत नाहीं व डोळे लाल झाले किंवा दाणा खात नाहीं
तेव्हां त्याजला जुलाब दिला पाहिजे. शिंगरू जन्मल्या नंतर
त्यास द्यावयाचीं औषधें खालीं लिहिल्याप्रमाणें:—

क्षौद्र (मध) लोणी मिश्र करून शिंगरास पाजावें. याप्र-
माणें महिना झाल्यावर मग भोजन घालावें तें-गव्हाचें अन्न किंवा
यवाचें अन्न दुधांत शिजवून तूप व मध घालून शिंगरास चारलें
असतां प्रशस्त होय; अथवा मातृ व मध आणि दूध हे मिश्रीत
करून त्यास द्यावेत ह्मणजे पुष्टीकारक होईल. अशा योगानें केलें
असतां शिंगरें वृद्धि पावतात आणि बळवान होतात, आणि शरी-
रांतील अग्निदोष व प्रकृतिदोष शांत होतात. हे दोष बाळपणीं
तसेच शरिरांत राहिले असतां घोड्यास व्याधी उत्पन्न होते.

शेण, मीठ, मूत्र आणि माती हे पदार्थ एकत्र करून त्यांचा
लेप घोड्यास केला असतां मक्षिका, डांस याचा नाश होऊन
शिंगरास सुखदायक होतो.

शिंगरास छटाक लोणी दररोज चारावें त्यांत पाणी नसावें.
याप्रमाणें एक महिना करावें. याशिवाय हरभऱ्याची नेमस्त डाळ

संध्याकाळीं भिजत घालून सकाळीं कोरडी करून ती वाटावी आणि त्यांत गुळ किंवा साखर घालून ती द्यावी. गवत हिरवें दोन महिनेपर्यंत चारावें.

शिंगरास बळ व पुष्टी येण्यास औषध—हिरडे, सुंठ, पिंपळी, पिंपळमूळ, आस्कंदाचें मूळ, इंद्रावणीचें मूळ, हळद, वेखंड व वावडींग हीं सर्व औषधें समभाग घेऊन त्यांचें वस्त्रगाळ चूर्ण करून प्रति दिवशीं लोणी ९ टांक घेऊन त्यांत २ मसकपर्यंत देत जावें. हें औषध ४।५।६ महिन्यांचे शिंगरास देण्यास उपयोगीं आहे.

शिंगरास दूध पाजितात त्यामुळें अजीर्ण व अतिसार उत्पन्न होतो त्याजवर उपचार—आंब्याची साल, जांभळीची साल व पांगाऱ्याची साल या तिन्ही साली पाण्यांत वाटून त्यांचा पावशेर रस व दहीं पावशेर एकत्र करून पोटांत दोन दिवस द्यावें.

शिंगरास कोरडी ढांस लागते यामुळें तें अगदीं कृष होतें त्यास उपाय—आडुळसा व भारंगी यांच्या पाल्याचा रस पाण्यानें काढावा, आणि शिंगराच्या नाकांत नस्य घालावें. याप्रमाणें एक सतक करावें. अथवा पावशेर प्रमाणें सात दिवस द्यावें.

घोडा चारा खातो परंतु खातांना घशांत आडकतो यामुळें त्यास खोकला येऊन ढांस लागते त्यास उपाय—आल्याचा रस १ शेर, गाईचें दूध तापऊन थंड झालेलें एक शेर घेऊन व सूंठ ६ तोळे घेऊन वस्त्रगाळ करावी. ही पूड रस व दूध यांत कालवून नाकांत नस्य घालावें. नस्याच्या योगानें गळा मोकळा होऊन चारा चांगला गिळला जाईल.

ढांसीस दुसरें औषध—सापाची कात २ तोळे गाईचे लोण्यांत कालवून तीन दिवस पोटांत द्यावी.

शिंगरूं एक वर्षाचें होईल तेव्हां त्याला लगाम देऊन हातांत धरून दररोज दोन वेळ फिरवावें. दुसऱ्या हातीं अवगी देऊन

मागें खुळखुळा वाजवावा ह्मणजे घोड्याला चालण्याची उमेद येईल. ज्या ठिकाणीं घोडा हुकूम अमान्य करील त्या ठिकाणीं अवगीनें इशारा करावा. कांहीं दिवसांनंतर मंडळावर धरावा. दोन वर्षांनंतर सामान घालून स्वारी करून हळू हळू फिरवीत असावें. घोड्याला आपल्या बरोबर सलगी करावी, ह्मणजें घोड्याचें व स्वाराचें मन एक होईल. नंतर त्यावर स्वार होऊन अथवा त्यास हातांत धरून मंडळावर फिरवावें.

## तांडिंगेपण.

लहानपणीं शिंगरास पुष्कळ हिंव लागनें, त्या योगानें पाय आखडतात त्यास उपचार—प्रथम त्यास २० डाग * द्यावेत. ते येणेंप्रमाणें.—प्रत्येक पायास दोन प्रमाणें चारी पायास आठ, कानाखालीं मानेचे दोन्ही बाजूस दोन दोन, डोळ्याखालीं तोंडावर दोन्ही बाजूस दोन दोन, आणि गुदाचे दोन्ही बाजूस दोन दोन असे वीस डाग द्यावेत. नंतर लसूण, हिंग, हिरडे, टाकळी, वावडींग, बेखंड, भारंगी हीं प्रत्येक ७ टाक प्रमाणें घेऊन चूर्ण करून गुळांत कालवून १२ दिवस द्यावींत. मग चाऱ्ही पायास सांध्यास तेल लावून मर्दावें, वर विटाचा शेक द्यावा व उन्हांत बांधावें. डाग देणें हा उपच्यार दुसरे भागांत पहा.

## शिंगरू तयार होण्याकारतां खुराक.

शिंगरास दोन महिने आल्या नंतर आनपाव लोणी किंवा त्याच्यानें पचवेल इतकें दररोज दोन महिने पर्यंत द्यावें. पुढें पावशेर प्रमाणें लोणी चार महिने पर्यंत द्यावें. एक किंवा दोन वर्षपर्यंत

* टिप — डाग देणें हा उपचार शस्त्रचिकित्सा भागांत पहा.

सकाळीं एकवेळ पोटभर दूध पाजीत जावें. दूध पाजल्या नंतर पाणी बारा वाजतां पाजीत जावें. एक महिन्याचे शिंगरास एकशेर, दोन महिन्यांच्या शिंगरास दोनशेर, याप्रमाणें दोन वर्षेपर्यंत दूध पचेल इतकें वाढवावें. हरभऱ्याची फसल आंबीसुद्धां द्यावी. व हिरवें गवत मिळेपर्यंत द्यावें.

दुधाची क्षीर द्यावी. ती क्षीर करण्याची रीति—दूध चारशेर किंवा शिंगरास पचन होईल इतकें घेऊन त्यांत गव्हाचा भरडा पावशेर किंवा आतपाव टाकून शिजवावें. ही क्षीर चाळीस दिवस पर्यंत सकाळीं द्यावी.

रात्रीस दूध चारशेर आणून त्यांत पावशेर गहूं टाकून तें मिश्रण दोन तीन महिने पर्यंत सकाळीं द्यावें. जर हा खुराक पचला नाहीं तर शेपा एकशेर, अजवान एकशेर, सुंठ एकशेर, काळें मीठ पावशेर, काळी मिरची एकशेर, व राई एकशेर हीं सर्व कुटून गोळा करावा आणि तो मोठ्या घोड्यास पावशेर व लहान शिंगरास आतपाव याप्रमाणें रतीब दिल्यावर द्यावा ह्मणजे त्यास चांगलें पचन होत जाईल.

हरभरे भरडून रात्रीस भिजवून दररोज सकाळीं द्यावेत, किंवा मूग शेरभर भिजवून त्यांत गूळ शेरभर घालून चार दिवस द्यावेत. नंतर आक्रेर मूग घेऊन ते शिजवून त्यांत दीडशेर गूळ किंवा साखर घालून द्यावेत, याप्रमाणें रतीब चढवावा. मोठे घोड्यास दोनशेर मूग व दोनशेर गूळ याप्रमाणें द्यावें. लहान घोड्यास एक शेर मूग व एक शेर गूळ किंवा साखर पचेल इतकी द्यावी. अजवान एकशेर, मुहानें बीं एकशेर, राई एकशेर, पापडखार अर्धाशेर, लाल मिरच्या अर्धाशेर, सुंठ अर्धाशेर, मीठ काळें अर्धाशेर, काळी मिरची ( मिरें ) अर्धाशेर, बडीशोप अर्धाशेर या जिनसा कुटून

बलगाळ कराव्यात आणि दाणा देण्याचे पूर्वी त्यांपैकीं पावशेर द्याव्यात. हें औषध अनुभवलें आहे.

हरभरे भाजून त्यांत गूळ किंवा साखर घालून द्यावेत. प्रथम घोड्याचें पोट साफ म्हणजे जुलाब देऊन शुद्ध करून नंतर सदरचा अगर कोणताही इलाज द्यावा.

आंब्याचा रस द्यावा, तो असा कीं, साळीचा भात एकशेर शिजवून त्यांत पन्नास आंब्याचा रस घालून नंतर एकशेर साखर किंवा गूळ त्यांत घालून दररोज द्यावा. चाळीस दिवसपर्यंत असा क्रम चालवावा म्हणजे घोड्याचा रंग चांगला होईल. पिंपळमूळ, कुटकी, मिरें, वावडींगें, राई व बच्य हीं सर्व औषधें दोन दोन तोळे घेऊन बारीक करून मधांत मिळवून रोज छटाक प्रमाणें हा मसाला रस दिल्यानंतर द्यावा.

लहान करडाची मुंडी तुकडे करून त्यांत मूग घालून शिजवावी. त्यांत तूप पावशेर आणि गरममसाला, लाल मिरच्या व मीठ हीं थोडथोडीं घालावींत. असे प्रकारें मूग तयार झाले म्हणजे मोठे घोड्यास दोनशेर व लहान घोड्यास एकशेर या मानानें द्यावेत.

उडदाची डाळ एकशेर व लहान करडाची मुंडी एक हे निरनिराळे शिजवून मुंडींतील हाडें काढून टाकून तें दोन्हीं एकत्र करावें. नंतर त्यांत मसाला मिळवून व तूप घालून तें चाळीस दिवस पर्यंत द्यावें.

दाणा दिल्यावर सुंठ, बडीशोप, मिरे व मीठ हे समसमान घेऊन कुटून तें मिश्रण चार पैसेभार बाजरीचे पिठांत द्यावें

कंदज आळेर घेऊन बारीक कुटून तो रात्रीं चका दह्यांत भिजत घालावा, आणि सकाळीं एकशेर साखर घालून दुबळे घोड्यास द्यावी. याप्रमाणें चाळीस दिवसपर्यंत क्रम ठेवावा. नंतर कंदज एकशेर,

साखर एकशेर, गव्हाचा भुसा पावशेर हीं रात्रीस दुधांत भिजत घालून सकाळीं त्यांत मसाला टाकून तीं द्यावींत. तो मसाला येणेंप्रमाणें:—वावडींगें आछेर, बेदाणा आछेर, आलें पावशेर, किंकाबर पावशेर, मेथी आछेर, मिरे आछेर, पिंपळपान तीनपाव, पिंपळमूळ आतपाव, काळीं जिरें आतपाव, कुटकी आतपाव, हिंग आतपाव, काळें मीठ आतपाव, आहळीव आछेर, गुगुळ पावशेर, मिरच्या पावशेर, पांढरें मीठ खाण्याचें पावशेर, भांग पावशेर, हळद पावशेर, सागरगोटे आतपाव, सोहागी आतपाव, तेलिया आछेर, सेंदेलोण व जवखार पावशेर, हीं सर्व बारीक करून प्रत्येक दिवशीं छटाक किंवा आतपाव लहान घोड्यास द्यावींत, आणि मोठे घोड्यास पावशेर द्यावींत.

साग तरूठ एकशेर शिजवावें. शिजण्यास पाणी ज्यास्ती घालावें. बाजरीचें पीठ शेरभर घेउन नंतर तें त्यांत मळून सकाळीं द्यावें. शिजते वेळेस तेल पावशेर टाकावें. नंतर मसाला द्यावा तो:— राई एकशेर भाजून, खुरासणी ओंवा एकशेर भाजलेला, फुटाणे भाजलेले अगर डाळें अर्धाशेर, भांग पावशेर भाजलेली, मीठ व कापुरकचरी आछेर हीं सर्व बारीक करून दररोज छटाक देणें.

ओले हरभरे ह्मणजे फसल ह्मणतात ती ज्या दिवसांत देतात त्या दिवसांत दाणा देऊं नये. हरभऱ्याची आंब फसलीचे आंगीं असते सबब दांत आमतील तर गवत कधीं कधीं द्यावें. ऊन पाण्यानें धुवावा. सुंठ आतपाव, वावडींगें आतपाव, बाळचरिंदा पावशेर, ल्यायकुनिया आतपाव, अजमोदा आदपाव, अजवान आतपाव, खुरासनी ओंवा छटाक, किरमानी ओंवा छटाक, राई आतपाव, हिरडा अकबरी एक, खाण्याचें मीठ छटाक, सेंदेलोण छटाक, नुडीखार पावशेर, अंबेहळद आतपाव, हे जिन्नस बारीक करून ए-

कत्र करावे आणि त्यांतून दररोज एक मुठभर रात्रीस घोड्यास द्यावेत. या प्रमाणें तीन, सात, दहा किंवा पंधरा दिवस पर्यंत करावें.

# घोडा दुबळा झाला तर त्यास पुष्ट होण्याचे उपाय.

( १ ) गरमीचे दिवसांत दाणा खाण्यास देण्याचा प्रकारः— हरभरे भाजलेले दोन शेर दळून त्यांत गूळ किंवा साखर एक शेर घालून मळावें आणि तें चार घटका राहूं देऊन सकाळीं द्यावें, याप्रमाणें च्याळीस दिवस पर्यंत करावें. गवत विलायती द्यावें, ओलें मिळाल्यास चांगलेंच.

( २ ) हलवन दोन शेर, गूळ पांच शेर, तूप पांच शेर, हळद पांच शेर, लसूण आछेर, ( प्रथम लसूणांत तूप घालून भाजावें ) या सर्वांचें मिश्रण करून दररोज सकाळीं पावशेर पासून आछेर पर्यंत च्याळीस दिवस पावेतों द्यावें म्हणजे घोड्यास रंग चांगला येईल.

( ३ ) हळद पांच शेर, मेथी पांच शेर (अर्धकच्ची भाजलेली), राई पांच शेर (अर्धकच्ची भाजलेली), अजवन पांच शेर, खुरासणी ओंवा, पांच शेर (हरभरे अर्धकच्चे भाजलेले) दहा शेर, हे सर्व जिन्नस एकत्र करून तें हरभऱ्याचे पिठांत मिळवावेत. नंतर त्या पैकीं आछेर रात्रीस गाईचे किंवा म्हशीचे आछेर दुधांत भिजत घालून सकाळीं द्यावेत.

( ४ ) हल्वासीवा छटाक, कोरपड पावशेर, हळद छटाक, काळें जिरें आतपाव, हे सर्व पावशेर तुपांत तळावेत नंतर त्यांत पावशेर गूळ घालून च्याळीस दिवस पर्यंत द्यावें. तें दररोज देणें तें सदरीळ प्रमाणें नवें करून द्यावें.

( ५ ) दहा शेर मोहडयाचीं फुलें व गूळ दहा शेर, हीं दोन्ही मिळवून एकवीस दिवस एकजिव होई पर्यंत ठेवावीं. नंतर प्रत्येक दिवशीं त्यांतून आर्धा शेर घेऊन त्यांत आर्धा शेर बाजरीचें पीठ घालावें, आणि लसूण पाकळ्या आतपाव सोलून त्यांत घालून चारावें, ह्मणजे खाणें जिरेल.

( ६ ) राई दोन शेर आर्धीकच्ची व आर्धी भाजलेली एकत्र करावी आणि त्याचें पीठ करावें. नंतर कपेरी मीठ तीनपाव, छटाक पापड-खार, उडदाचें पीठ चार दाम ( एक तोळा ) घेऊन तें सर्व एकत्र करून च्याळीस दिवस पर्यंत किंवा दोन महिने किंवा चार महिने पर्यंत द्यावें.

( ७ ) अजवान दोन शेर घेऊन तो भिजे पर्यंत त्यांत नरमुत्र घालावा. त्यांतून सहा सात मासे घेऊन गव्हाचे पिठांत द्यावा. अजवान दररोज सहा सात मासे काढून पुन्हां त्यांत नरमुत्र घालावा.

( ८ ) मठ ( मटकी धान्य ) दोन शेर मोठे घोड्यास, शेरभर लहान घोड्यास, या प्रमाणानें घेऊन त्यांत पावशेर तूप घालून शिजवावेत. मसाला व मिरच्या घालून च्याळीस दिवस पर्यंत द्यावेत आणि चांगलें हिरवें गवत चारावें.

( ९ ) एक किंवा दोन शेर मठ घेऊन पाण्यांत भिजवून सकाळीं संध्याकाळीं द्यावेत. तुरीची चूण शिजवून द्यावी किंवा कच्ची चूण भरडून भिजवून द्यावी. खाण्याचें मीठ पावशेर भाजून, बडीशोप पावशेर भाजलेली, कचरी पावशेर भाजलेली, अजवान भाजलेला पावशेर खारबच्य पावशेर, राई पावशेर, काळें मिरें छटाक हीं सर्व बारीक करून दाणा दिल्यावर द्यावीं. दुसरें, बाळाहिरडे पावशेर व काळें मिरें पावशेर हे दोन्हीं मिळून द्यावेत.

(१०) मीठ खाण्याचें पावशेर भाजलेलें, काळें मीठ पावशेर, बाळहिरडे पावशेर, बडीशोप पावशेर भाजलेली, कचरी भाजलेली पावशेर, अजवान भाजलेला पावशेर, घोडबच्य पावशेर, राई पावशेर भाजलेली, काळे मिरें पावशेर आर्धे भाजलेलें व आर्धे हिरवे (कच्चे) हीं सर्व एकत्र करून कुटावीं आणि दाणा दिल्या नंतर त्या मिश्रणापैकीं आतपाव दररोज देत जावें.

(११) खाण्याचा अजवान पावशेर, काळें मीठ पावशेर, भांग छटाक, लसूण आतपाव, सेंदेलोण आतपाव, साबर मीठ आतपाव, खाण्याचें मीठ आतपाव, वावडींगें पावशेर, इंद्रजव पावशेर, काळींजिरें पावशेर हीं सर्व घेऊन बारीक करून दाणा दिल्यावर मुठभर द्यावींत.

(१२) आसकंद आर्धाशेर, सेंदेलोण आतपाव, काळें मीठ आतपाव, बच्य आर्धाशेर, सुंठ आर्धाशेर, काळीं मिरें आर्धाशेर, कुटकी आर्धाशेर, लेंडी पिंपळी पावशेर हीं सर्व बारीक करून दाण्याचे अगोदर दररोज आतपाव प्रमाणें च्याळीस दिवस द्यावींत.

(१३) अजवान एकशेर व खाण्याचें मीठ एकशेर हे दोन्ही एका (मडक्यात) घालून त्यांत नरमूत्र घालून जमिनींत पुरून ठेवावें. मग काढून महामासे घेऊन दाण्यामध्यें द्यावें.

(१४) मेथी दोनशेर, राई एकशेर, अजवान आर्धाशेर, लसूण एकशेर, हळद एकशेर, खाण्याचें मीठ दोनशेर हें सर्व एकत्र करून नरमूत्रांत किंवा बकरीचे मूतांत भिजवावें. मूत्र इतका घालावा कीं, औषधाचेवर चार बोटें येईल. नंतर ती हांडी (मडकें) बंद करून तें औषध छायेंत सुकवावें, वाळल्यावर दाणा देते वेळेस मुठभर घालून चारावें म्हणजे पोटांतील कृमी जातील व घोडा पुष्ट होईल. घोडा जर तोबऱ्यात खाणार नाहीं तर त्यास हातानें चारावें.

(१५) भिरयाची त्वच्या छटाक, चिंचेची त्वच्या (टरफल) छटाक, कुटकी छटाक, हळद छटाक, खारबच्य छटाक, वावडींगें

छटाक, लसण छटाक, मिरची छटाक, हिंग तीन तोळे, सैंदेलोण दहामासे, खाण्याचें मीठ छटाक, काळें मीठ दहामासे, सांबरी मीठ दहामासे, करंज बीं दहामासे भाजून सर्व एकत्र करून कुटून अलमगीरी पैसाभार बाजरीचे पिठांत द्यावें व मोठे घोड्यास दोन पैसेभार द्यावें.

( १६ ) हर्लीम व बर्लीम यांची माल व चिचच वरील टरफल, अजमोदा, अजवान, देवदार, बोळ, पाथरी मीठ, राई हीं सर्व पावशेर प्रमाणें घेऊन कुटून गुळाचे पाण्यांत घालून सात दिवसपर्यंत लहान घोड्यास दररोज आतपाव व मोठ्या घोड्यास पावशेर याप्रमाणें द्यावीं.

( १७ ) गुगुळ वजन एक पैसाभार, हळद पावशेर, पिंपळमूळ व पिंपळपान एक पैसाभार भाजून, मेथी भाजलेली चार पैसेभार, राई भाजलेली दोन पैसेभार, बांगडखार दोन पैसेभार, काळीं मिरें एक पैसाभार हीं सर्व औषधें बारीक वस्त्रगाळ करून तीन वर्षांच्या जुन्या आधशेर गुळांत मिळवावींत आणि आवळ्या येवढा गोळा दररोज रात्रीस द्यावा. याप्रमाणें सात दिवसपर्यंत द्यावा, ह्मणजे घोड्याची मिजास चांगली राहील. घोड्यास दाणा पचत नसेल किंवा खावबत नसेल तर हा मसाला द्यावा.

( १८ ) लाल मिरच्या आधशेर, सोहाने बीं आधशेर, काळीं मिरें आधशेर व बादान आधशेर हे सर्व बारीक करून पाण्यांत कढवून संध्याकाळीं मुठभर द्यावे ह्मणजे घोडा दाणा फार खाईल.

( १९ ) काळीं मिरें पावशेर, अजवान पावशेर, सजीखार पावशेर, जूखार, व खोरबच्च पावशेर, हळद पावशेर, कुटकी पावशेर, सुंठ वस्त्रगाळ पावशेर, बावडींगें पावशेर, हिंग एक तोळा भाजलेला, सोहागी नऊ मासे भाजलेली, फटकी दोन तोळे भाजलेली हे सर्व बारीक करून आतपाव दाणा देण्याचे अगोदर द्यावेत.

( १० ) लसूण आळेर व गुगुळ आतपाव हे दोन्ही एकत्र करून त्यांतून दररोज सकाळीं आतपाव देत जावें.

( ११ ) हिरडा, बेहडा, राई, मेथी, हळद, लाल मिरच्या व खाण्याचें मीठ हे सर्व सारखे घेऊन नरमुत्रांत घालून दररोज आतपाव द्यावेत ह्मणजे घोडा जलद तयार होतो.

## घोड्याचे रंग चांगले होण्यास उपाय.

( १ ) ज्वारमुली एकशेर, हळद पावशेर, काळीं जिरें पावशेर व कोंकणी मीठ खाण्याचें पावशेर हे सर्व बारीक करून सात दिवस पर्यंत जमिनींत पुरून ठेवावेत. नंतर काढून नरमुत्रात भिजवून सात रोज द्यावें. सदर्हू औषध वाळूं देऊं नये. वाळूं लागल्यास नरमुत्र घालावा.

( २ ) गाईची चरबी एकशेर, खाण्याचें मीठ एकशेर, तूप एकशेर, कोरफड एकशेर, हळद एकशेर व फुटाणे एकशेर हे एकत्र करून एका मडक्यांत घालून सात दिवस पर्यंत जमिनींत पुरून नंतर बाहेर काढून दररोज पावशेर सकाळीं देत जावें. पुढें वाढवीत वाढवीत आछेर पर्यंत वाढवावें. याप्रमाणें दोन महिने पर्यंत द्यावें ह्मणजे रंग चांगला होईल.

## घोड्याच्या आंगावरील केश झडण्याविषयीं.

सर्व देशांत घोड्याच्या आंगावरील केश वर्षांतून एकवेळ झडून पडतात. थंड देशांत वर्षांतून दोन वेळ पडतात. परंतु दुसरे वेळेस शरदऋतूंत केश पडतात ते सर्व आंगावरील पडत नाहींत: पोटाखालचे व पायावरचे उन्हाळ्यांत गळल्यावांचून जे राहिले

असतात ते अगदीं राठ व लांब होऊन गळून पडतात. या समयास घोड्याचा रंग आणि तजेला कमी होतो. घोडा काळ्या रंगाचा असला तर तांबूस रंगाचा होतो आणि कुमाईत रंगाचा असल्यास पिंवळा किंवा वाळूचे रंगासारखा होतो. मानेवरील केश ( आयाळ ) आणि दांडीवरचे केश फार वाढले ह्मणजे गळून पडतात. अती थंड देशांत घोड्याचे केश वाढले ह्मणजे कातरण्याची चाल आहे परंतु ती या देशांत नाहीं.

---

## चाबूकस्वाराचीं लक्षणें.

अश्वांचीं लक्षणें व शिक्षा इत्यादिक जो जाणतो त्यास अश्वाध्यक्ष ह्मणावें. अश्वांच्या शिक्षेचे प्रकार जाणणारा आणि त्यांच्या रोग चिकित्से विषयीं प्रवीण असा अश्वाध्यक्ष पृथ्वीपतीस (राजास) प्रशस्त होय. क्षेत्र ( देश ), मास ( काळ ) आणि अश्वांची दशा ( अवस्था ) या तिहींचें ज्ञान ज्यास आहे अशा वैद्यानें हे सर्व जाणून योग्य फल सांगावें. घोडेस्वार रागीट नसावा. उताणा किंवा कुबडा बसणारा नसावा, तसाच खालीं मुख करणारा नसावा.

---

## जयदेव कृते.

स्थूल देहाचा, मूर्ख, भितरा, उत्कंठीत, चंचळ बैठकीचा आणि अयोग्य स्थानीं चाबूक मारणारा जो स्वार त्याचा घोडा धांवत नाहीं ह्मणजे त्याच्या आज्ञेंत राहत नाहीं. ज्याची कंबर हालते व ताडन करतांना ज्याचे हात वर जातात त्या मनुष्याचें वाहन अश्व नाहीं ह्मणजे तो घोडेस्वार नव्हे. ज्याच्या मांड्या शूल रोगानें आखडल्या आहेत, जो त्रिक ह्मणजे मुख, पार्श्वभाग आणि कटि या तीन ठिकाणीं चंचळ आहे व जो नेहमीं ताडन करण्याविषयीं

उद्युक्त आहे अशा स्वाराचा घोडा त्याच्या आज्ञे प्रमाणें वेगानें धांवत नाहीं. ज्याचें आसन दृढ, अश्वाचें स्वरूप जाणणारा, जितमुष्टि ह्मणजे अनीन धरण्याविषयीं ज्याची मूठ स्वाधीन आहे, ज्यास आळस व त्रास नाहीं आणि जो स्थिर तो, या प्रमाणें सहा गुण ज्यांस आहेत ते घोडेस्वार होत. जो संक्षेपेकरून घोड्याचें मन जाणत नाहीं त्यानें घोड्यांस कितीही ताडन केलें तरी ते त्याच्या मना प्रमाणें चालत नाहींत. ज्यांणी आपल्या बुद्धींत अश्व वाहनाचें विशेष ज्ञान व उत्साह ठेविला आहे ह्मणजे अश्वावर कसें बसावें या विषयीं ज्ञान असून ज्यांच्या मनांत बसण्याची हौस आहे असे लोक सुखानें कांहीं आयास न पडतां अश्वास स्वाधीन करतात.

---

## शार्ङ्धरे.

सत्यवादी, बळकट ( दृढ आसनाचा), अश्वाचें स्वरूप जाणणारा, योग्य स्थानीं ताडन करणारा आणि उद्योगी जो आहे तोच घोडेस्वार होय. उपायांनीं घोड्याचें चित्त जाणत नसून जो अश्वास वाहन करतो त्या घोड्याचे पाठीवर बसलेल्या त्या मनुष्यास घोडाच वाहवितो. कोणी वाहक ( स्वार ) अश्वाची इच्छा जाणतो. कोणी बुद्धिमान त्याच्या कृति समजतो. तसेंच कोणी अश्वाचे गुण जाणतो आणि कोणी त्याचें तत्व समजतो. कोणी एखादा बुद्धिमान दोन्ही ह्मणजे गुण व तत्व किंवा इच्छा व कृति समजतो. मंद बुद्धीला दोन्हीही समजत नाहींत. कोणी वाहक शास्त्रावांचूनही अभ्यासानें आणि स्वाभाविक गुणानें वरील गोष्टी जाणतो. ज्याला अश्वाच्या कृति माहीत नाहींत अथवा अश्वाचे रोग किंवा खोडी नाहींशा करण्याचा उपाय जो जाणत नाहीं अथवा घोड्याचा वेग सहन करण्याविषयीं जो असमर्थ आणि उदासीन अशा प्रकारचा स्वार

योग्य नाहीं. अश्वाविषयींचे सर्व उपाय माहीत असून त्याचें मन जाणणारा, शुद्ध, दोष ( खोडी ) नाहींसे करणारा, अश्वाचे ठिकाणीं गुण उत्पन्न करण्याविषयीं तत्पर व त्याच्या कर्मा मध्यें ( चाकरी मध्यें ) कुशल असा स्वार हा अश्व वाहनास योग्य होय.

---

## तथाच जयदेवकृते.

स्वारानें घोड्यावर बसून त्याच्या कानांच्या चलन वलनावर लक्ष्य देऊन अश्वाचें मन जाणावें आणि प्रथम त्यास हळू हळू चालवावें. घोड्यावर बसला असतां वांकडा, उताणा किंवा कुबडा होत नाहीं, खालीं तोंड करीत नाहीं व ताठ होत नाहीं असा जो स्वार तो घोड्यास उत्तम रीतीनें चालवितो. ज्याच्या मांड्या व पाय स्थीर आहेत आणि मान दक्षिणोत्तर होत नाहीं, पार्श्व ( पाठ ) आणि कंबर इतक्या ठिकाणीं जो उच्च ( ताठ ) आहे तो स्वार योग्य होय.

## तथाच नकुल कृतविशेषः

जो नियमानें वागणारा, हातांत चपळता आहे, व क्रोधाग्नि रहित असून सत्व गुणांत ज्याची बुद्धि स्थिर आहे, ज्याच्या आंगांत पराक्रम आहे, जो शास्त्रार्थाचें तत्व जाणतो, तसाच योग्य वेळीं तांबूल भक्षण करणारा, अशा स्वाराकडून अश्वांस शिक्षा करणें राजादिकांस प्रशस्त होय. ज्याचे पाय चंचळ असून पुष्ट आहेत त्याला घोडेस्वार ह्मणावें बाकी इतर मनुष्यें केवळ अश्वास भार देणारे होत.

अश्वशास्त्र जाणता, धैर्यवान, बलवान, उत्साही, आणि ज्याच्या सर्व अंगांत सुंदरपणा असून ज्यानें थंडी, उष्ण, आळस व निद्रा हीं जिंकिलीं आहेत, अश्वाची खाण्याची व फिरण्याची वेळ, त्याचें बळ

(शारीरीक व मानसिक शक्ति), वेग, शरीर व रोगादिकांचे उपाय यांस जो जाणतो, घोडा श्रमी झाल्यास उपचार कोणते करावे हें जाणत असून युद्धक्रियेंतही जो प्रवीण आहे, दुष्ट अश्वांचें दमन करण्याविषयीं दक्ष, सर्व क्लेश सहन करणारा आणि शुचि असा स्वार प्रशस्त होय. ग्रास ( तृण ), काष्ट, जल हें समजण्याविषयीं, परक्याचें व्यूह अवलोकन करण्याविषयीं, आणि परचक्रांत प्रवेश करण्याविषयीं व त्यांतून निघण्याविषयीं जो कुशल तो अश्ववेत्ता ह्मणजे स्वार योग्य होय. रणभूमि, सैन्यस्थान व शस्त्रें यांचें तत्व जाणतो व हस्तलाघव ज्यास आहे, चक्र खड्ग, भाला आणि शक्ति या आयुधांस धारण करण्याविषयीं जाणणारा तोच अश्ववाहक होय असें तत्ववेत्ते लोक ह्मणतात.

---

## तथा नकुल कृतेविशेषः

ज्याचे कमलपत्रा प्रमाणें मृदु पाय आहेत, अश्वाच्या कर्णावरच ज्याची दृष्टि आहे, ज्याची कंबर कधीं चंचळ होत नाहीं, जो अश्वाचें हृदय व गति जाणतो, व यथायोग्य ताडन करतो असा जो अश्ववाहक तो राजे लोकांस मान्य होतो.

---

## घोड्याचे गतीविषयीं.

जो घोडा गुढग्यास उजवे घालून करतालानें सोळा लोटिका वाजविण्यास जितका वेळ लागतो तितक्या वेळांत २०० शें हात जमीन चालून येतो तो उत्तम समजावा. तितक्याच वेळांत जो १९० हात चालून येतो तो मध्यम; व १८० हात चालून येतो तो कनिष्ट समजावा.

२ रें प्रमाण—मात्रा ह्मणजे आठ लघु अक्षरें उच्चारण्याला जो वेळ लागतो त्यास ह्मणतात. अशा सोळा मात्रेंत जो घोडा १०० धनुष्यें ( ४ हात ह्मणजे एक धनुष्य ) या मानानें लांब जमीन चालून परत येतो तो उत्तम घोडा समजावा. आठ मात्रांत १०० धनुष्यें चालून जातो परंतु पुन्हां आठ मात्रांत परत येववत नाहीं तो मध्यम समजावा. ज्याला १०० धनुष्यें चालून जाण्याला नऊ मात्रांचा काळ लागतो तो कनिष्ट समजावा. जो घोडा १०० धनुष्यें जागा सोळा मात्रांत धांवत जातो तो उत्तम, तितकी जमीन धांवत जाण्याला ज्यास वीस मात्रा लागतात तो मध्यम; आणि २४ मात्रांस तितकी जागा लागल्यास तो कनिष्ट असें समजावें.

अश्वाचे ठिकाणीं दोन प्रकारचे वेग आहेत एक नैसर्गिक आणि दुसरा भयजन्य. धारेवर घोडा योजला असतां प्रेरणे वांचून जो त्याचा अविच्छिन्न वेग असतो तो नैसर्गिक वेग आणि चाबूक वगैरे मारल्यानें जो वेग उत्पन्न होतो तो भयजन्य वेग होय.

अश्वाचे वेग तीन प्रकारचे आहेत उत्तम, मध्यम आणि कनिष्ठ. उत्तमात तीन प्रकार आहेत उत्तमोत्तम, उत्तम मध्यम व उत्तमाधम. याप्रमाणेंच मध्यमांत तीन प्रकार आणि कनिष्टांतही तीन प्रकार असे एकंदर नऊ प्रकार वेगांत आहेत.

उंच पाय उचलून विभक्त पणानें टाकून लौकर व रमणीय जी अश्वाची गति ती प्रशस्त होय. उन्मत्त झालेला हत्ती, वाघ, हंस व वानर या सारखी अश्वाची गति ती स्वामीस उत्तम समजावी. जो शीघ्र चालणारा असून विलासानें पुढचे पाय उचलून मस्तकाचीं अग्रे हलवीत मुंगसासारख्या आकृतीनें चालतो त्याची ती नकुली गति (मुंगसा सारखी) प्रशस्त होय. जो आपल्या खुराग्रांनीं हृदयास स्पर्श करीत प्रफुल्लित पायांनीं जमिनीवर विस्तव असल्या प्रमाणें तीस जलदीनें स्पर्श क-

रून जलदीनें चालतो त्या गतीस नैत्तिगी गती ह्मणतात. तोंड उचलून श्वास सोडीत पायावरचे केश न हालवितां मोरा प्रमाणें विलास युक्त चालतो त्याची ती मयूरी गती होय. ह्या वर सांगितलेल्या गति उत्तम समजाव्या.

कावळ्या सारखी किंवा चक्रवाक पक्ष्या सारखी गति असून पाय सारखे पडत नाहींत शफे बाहेर पडतात आणि आडखळत असल्यामुळें बसणाऱ्यास कांहीं मौज वाटत नाहीं ती गति वाईट ह्मणून समजावी.

जो अश्व दूर पाऊल टाकून जमिनीस स्पर्श करतो इतक्यांत पुन्हां उचलतो आणि गति त्वरित असून आनंदी असा अश्व भद्रगति होय. बैल, हत्ती, सिंह आणि वाघ या प्रमाणें चालणारा अश्व उत्तम समजावा. अश्वाची गति संकीर्ण ( मिश्र ), वक्र, भ्रष्ट व अत्यंत ऊर्ध्व अशी गति असते ती निंद्य होय. घोड्याचे गतीचें सरासरी मान दोन मिनिटात एक मैल जाण्याचें आहे असें शर्यतीच्या दाखल्यावरून दिसून येतें असें इंग्लिश पुस्तकांत आहे.

---

# शिक्षणाविषयीं.

## घोड्यास गति शिकविण्यास जागा कशी असावी याविषयीं.

अठरा धनर्ष्ये लांब असें अश्व फिरण्याचें मंडळ असावें. ती जमीन पाण्यानें भिजलेली, कठीण, खडकाळ आणि तृणकाष्टादिकांनी युक्त अशी जमीन रंगभूमीस वर्ज होय. समान व सपाट असून किंचित मृदु असलेली अशी जमीन रंगभूमीस ( मंडळास ) उत्तम समजावी. जेथें खिळे, अस्थि, कांटे, वाळू किंवा चिखल आहे

आणि उंच सखल असून ज्यांत खळगे आहेत अशा भूमीवर घोडा चालवूं नये. घोड्यांस उष्ण ऋतूंत शिकविणें प्रशस्त होय.

हेमंतादि तीन ऋतूंत अश्वावर आरोहण करावें. ग्रीष्मादि तीन ऋतूंत अश्वावर आरोहण करूं नये.

मंडळावर घोड्यास नेण्याकरितां स्वारानें वर बसावें. प्रथम हळू हळू तो अश्व एक कोशभर न्यावा. जातांना खालीं दृष्टि करून पहावें. आधीं उजवेकडे लगाम धरावा. घोडा जर उजवा पाय उचलून अगोदर टाकील किंवा डावेकडे धरलें असतां जर पुढचा पाय टाकील तर तो दृढ आसनाचा समजावा. पुनः पुनः मागें तोंड फिरवील तर तें वाईट लक्षण समजावें.

अश्व पाहून आसन बळकट करून स्वारानें त्याच्या तोंडावर व पायावर चाबुकाचा प्रहार करून कोपयुक्त करावें नंतर जमिनीवर सव्यापसव्य (उलटपालट) मंडळावर धरावा. बसल्या बरोबर एकदम अश्वास मारूं नये. ताडणापासून भय प्राप्त होतें आणि भयापासून मोह उत्पन्न होतो. यामुळें घोड्यास स्वारांनीं लगाम मात्र वर धरून चालवावें. अशा प्रकारें प्रति दिवशीं चालविण्याचा अभ्यास ठेवावा.

स्वारानें शंभर हाताच्या मंडळावर अश्वास उजवे व डावेकडून फिरवावें. मंडळ, चतुष्कोन, गोमूत्राकृति, अर्धचंद्राकार व नागपाशा सारखे (कटावर) अशा पांच प्रकारांनीं भ्रमण करवावें ह्मणजे घोड्यास कष्ट पडणार नाहींत.

स्वारानें घोडा बिन दर्द असतां त्यास भय दाखवावें व तो भयभीत असतां त्यानें भय हरण करावें हें मुख्य अश्ववहनांत रहस्य आहे.

अठरा धनुष्यें लांब असें मंडळ असावें ह्मणून पूर्वीं सांगितलेंच आहे त्यावर घोडा मंडळाकृति फिरवीत असतां पांच धनुष्यें लांबीपर्यंत संकोच करीत असावा. मग गोमूत्राकृति मंडळावर, नंतर अर्धचंद्राकृति मंडळावर या प्रमाणें धरावा.

## लगामाविषयीं.

घोड्याचा लगाम फार लठ्ठ किंवा फार बारीक, अतिशय जाड व कठीण नसून प्रमाणानें सात बोटें लांब असा करावा.

क्षिप्ता, शिथिला, उत्तरवती, मंदा, वेहायली, विक्षिप्ता, एककरा, अर्धकंदरा, समा, कीर्णा, विभक्ताअत्यूक्षिप्तपतला, उधृता, व्यारूढा आणि गोकर्णिका या प्रमाणें लगामाचे चवदा प्रकार आहेत असें जयदेवानीं वर्णन केलें आहे.

पुष्पवती, गोकर्णी, रुलोरुला, तूला, वृषा, नामखंडी, पुष्पधरी, दृढमुष्टि, चतुरतनी, द्विहस्ती, एकहस्ती आणि शुभगा या प्रकारचे बारा लगाम जयदत्तानीं सांगितले आहेत.

---

## धारेविषयीं अति त्वरीत गति.

धारा पांच प्रकारच्या आहेत. त्या विक्रमा, पुलका, पूर्णकंठी, त्वरीता आणि नीललंबा अशा नावानीं प्रसिद्ध आहेत. त्यांचीं नावें अश्वशास्त्रांत निराळींच सांगितलीं आहेत. गतिपला, चतुष्का, मध्यजवा आणि पूर्णवेगा अशीं नांवें आहेत.

नकुलकृत अश्वशास्त्रांत वरच्या गतींतील दुसऱ्या गतीस फुला, चौथीस वेगमंधी आणि पांचवीस वेगवती ह्मणतात.

जयदत्ताचे मताप्रमाणें या पंचधारा लघु, मंदा आणि दीर्घा या तीन प्रकारच्या आहेत मिळून एकंदर पंधरा होतात.

## वेदीका.

अश्व धारेवर धरण्यास मैदान कसें असावें त्या वेदी ( मैदानें ) तीन प्रकारच्या आहेत उत्तम, मध्यम आणि कनिष्ट. शंभर

धनुष्यें लांब ती उत्तम, ९० धनुष्यें लांब ती मध्यम, आणि ८० धनुष्यें लांब ती कनिष्ट समजावी. एक धनुष्य ह्मणजे चार हात. ह्या वेदीचे नऊ प्रकार आहेत. ते नऊ प्रकार दुष्ट अश्वाच्या दमनासाठीं आणि इतरांस चाल शिकविण्यासाठीं आहेत. ते नऊ प्रकार येणेंप्रमाणें:—

१ समोन्नता ( सपाट व उंच ).

२ विषमा ( उंच व सखल ).

३ विकिर्णा ( उखरवाखर ).

४ शुद्धा ( निर्मळ )

५ नताग्रा ( पुढें उतरती ).

६ तृणा ( वल्लींनीं आच्छादित अशी ).

७ पाषाणा ( मोठे मोठे पाषाणांनीं युक्त ).

८ लघुपाषाणा ( लहान दगड असलेली ).

९ पार्श्वोन्नता ( दोन्ही बाजूस उंच ).

जो सुशिक्षित अश्व सर्व विधीचे ठिकाणीं निशंक असतो तो उत्तम जाणावा.

जो घोडा धांवतांना उरांत भरीव दिसतो, तो चालणारा होय. जो पुष्ट दिसतो, तो मध्यमानक. ज्याचीं अंगें सर्व सुंदर दिसतात, तो आलीढ आणि त्याहून अन्य अश्व प्रत्यालीढ होय.

मागले व पुढले पाय जमिनीवर ठेवून पुढचे पायावर तोल देऊन ज्याचें ठाण असतें तो पुरुपाश्व होय.

घोड्यास लघुत्व ( अल्पाकृति ) मातृ दोषानें येतें. पितृ दोषानें वेगांत मंदता येते आणि दुर्बलता ही स्वामीच्या दोषानें येते. अश्वास स्वतः दोष कोणताच नाहीं.

स्वारानें अश्वावर बसून किंवा न बसून त्यास वाम दक्षिणभेदानें फिरवावें. अश्वावर बसतांक्षणींच एकदम त्यास ताडन करूं नये. ताडनापासून भय आणि भयापासून मोह प्राप्त होतो. प्रातःकाळीं स्वारानें अश्वावर बसून त्वरीत गतीनें लगाम उंच धरून चालवावें. दुसरे दिवशीं मंद गतीनें चालवावें. घोडेस्वारानें अश्वाशीं राजनीतींतील चार उपाय करावे लागतात. प्रथम साम उपाय म्हटला म्हणजे त्यास अश्वासन देणें, दुसरा दाम त्याचा काळ संभाळणें, तिसरा दंड त्यास ताडन करणें, आणि चौथा भेद म्हणजे त्यास आज्ञा करणें हे होत. ह्या चौहोंची योजना यथाकाळीं करावी.

जो घोडा आपल्या जिभेच्या तळीं लगाम नेतो तो इतर शेंकडों दाव्यांनीं बद्ध केला तरी जमिनीवर पाडतो. त्यानें तसें केल्यास जिव्हाग्रंथीस दोन्ही वल्गानीं ( लगामाच्या दाव्यानीं ) बद्ध बांधून हळू हळू ग्रंथी भेदन करावें. जो घोडा वर तोंड करून त्याळ सोडतो त्याचा लगाम पोकळ असावा.

अश्वाचे दक्षिण म्हणजे उजवे लगामाचे दोरीस ग्रहण केलें असतां मागला पाय पुढें करतो. डावेकडे धरला असता उजवा पाय पुढें करतो याप्रमाणें शिक्षा लाविली असता स्वाधीन होतो व आसन दृढ होतें. तोंड फिरविणें हा घोड्याचा स्वभावच आहे. त्यावेळेस पायानें दाबून आसन दृढ करावें.

शिंगरास बहुत करून आरंभीं साधा लगाम लावावा लगामानें त्याचे तोंडास इजा होऊं देऊं नये. घोडे लगामानें व मंत्रजानें स्वाधीन होतात सबब कांटे लगाम घालूं नये.

स्वारास घोड्याची नरमी, सक्ति, गरिबी, मगरूरी, भारीपणा व हलकेपणा, जोर, दम व जलदी हें समजणें जरूर आहे. घोड्यास बाजार, गल्ली व समुदाय म्हणजे मनुष्याचे दाटीचें ठिकाण, समुद्र,

नहर, नगारखाना या ठिकाणीं व हत्ती, वाघ, उंट, चित्ता, अस्वल वगैरे भयंकर जनावरें त्यास दाखवून त्याअवर घोडा न भितां जाईल असा धिटपणा त्याचे आंगीं येण्याविषयीं त्यास शिकवावें. स्वारानें मजबूत बसून मांडींत आवळावें. दौडते वेळेस लगाम खेंचून पाहिजे तिकडे वळवावें, पाहिजे तेव्हां उभा करावा, याप्रमाणें शिकविलें पाहिजे. घोड्यास नरमी व सक्ती दोन्ही प्रकारें वागवावें. कारणपरत्वें सक्ती करावी व कारणपरत्वें नरमीही करावी. कित्येक घोड्यांस खुशामत आवडते, कित्येकांस आवडत नाहीं. घोड्यास नेहमीं मारण्याची संवय लावूं नये. नेहमीं मारलें असतां वाईट खोड लागते. घोड्यावर बसल्यानंतर एकदम त्यास धांववूं नये. उजवे व डावेकडे फिरण्यास त्यास शिकवावें. लगाम ढिला सोडून चांगला चालेल तर बेहत्तर आहे, नाहीं तर लगाम खेंचून चालवावा. पळतां पळतां एकदम घोड्यास उभें करूंनये, दमा दमानें उभा करावा. एकदम उभा केल्यास स्वार घोड्यावरून पडतो. घोडा शक्तीवान असला तर लगाम जुमानीत नाहीं यासाठीं नवाद ह्मणून एक औषध आहे तें अर्धे पैसा भार व साखर अर्धा पैसा भार, साबूण दोन तुकडे, चार लिंबाचा रस, अफू एक खर्द याप्रमाणें जिन्नस घोडींचे मुतांत टाकून त्यांत लगाम घालून कढवावा आणि तसा केलेला लगाम तोंडांत दिला असतां घोडा जोर करणार नाहीं.

घोड्यास चाली शिकविणें त्या दुडकी, सात्रक, तुर्की व रहिवाल ह्या शिकवाव्यात. या शिवाय घोड्यास नाचावयास शिकविणें, बोलावयास शिकविणें, बाजीवर उभा करणें, ऊंची दौड, तुळंग व लंगुरी, अशा तऱ्हेच्या चाली आहेत.

घोडेस्वारांनीं प्रथम घोड्यावर जीन ठेवणें तें आपल्या समोर ठेववावें ह्मणजे घोड्यांत कांहीं अवगुण असतील ते त्यास कळून येतील.

पुढें स्वार होऊन बाहेर हलक्याच चालीवर न्यावा, गांवा बाहेर मैदानांत गेल्यावर उलट पालट फिरवून पहावा. व कोरडाही मारून पहावा ह्मणजे घोड्याचे अंगांतील चांगले व वाईट गुण असतील ते कळून येतील. घोडा फिरवितांना त्याचें तोंड छातीकडे व मान आणि कान खडे ह्मणजे, उभे असावेत. दुडकी चाल मोर चालतो त्याप्रमाणें शिकविली पाहिजे. घोडा दौडतांना त्याचें तोंड खुलें राहिलें पाहिजे. आनिन वाजत रहावी, गर्दन मोरा सारखी धरावी, दिल खुषीनें काम करील असें शिकवावें व घोड्याचें तोंड नरम ठेवावें. घोड्यास चाल शिकवणें आहे तेव्हां घोड्याचा जेरबंद ढिला ठेवावा अगर लावूं नये. घोड्यास चुचकारून त्याचें तोंड वर ठेवून लगाम ओढून घेतला पाहिजे. दोन्ही हातांनीं दोन्हीं वागा धराव्या. मागें हटून बसावें, कमरेचा धक्का देत जावा. बसणारानें आपलें शरीर दोन्ही बाजूस रोळीत जावें ह्मणजे चाल लागेल.

दुसरी रीत—घोड्याच्या लगामाच्या दोन्ही कड्यांमध्यें कादणी लावावी आणि ती पायांचे मधून घ्यावी व घोड्याचे छाती बराबर उभे राहून मागें अवगी वाजवून कुदवावा व पुढें रागून चालवावा.

सात्रक चाल शिकवणें ती अनिर्नामअटका द्यावा आणि दौडतांना दिलासा द्यावा. लंगुर डावा जमवावा.

उंची दौड—ह्मणजे घोडा आपले शरीराचा भाग तोलून उडतो, आणि सर्व शरीर समेट करून बनावट करून मागील पाय हातभर उंच उडवून उडतो. हुकमी व हलक्या तनविजीनें उडविण्यास शिकवावा.

घोड्याचें शिंगरू बरेंच मोठें ह्मणजे एक वर्षाचें झाल्यावर खांबास दिलें बांधीत जावें तें असें कीं, जेणेंकरून त्या शिंगरास खांबासभोंवतीं फिरतां यावें. 'ज्या कारणानें खांबास बांधावयाचें

ती काढणी गळेपट्ट्यास बांधावी. तेथें एक भोरकडी असावी ह्मणजे त्या काढणीस पीळ पडूं लागला असतां निघून जाईल. नंतर त्या शिंगराचे मागें शिकविणारानें हातांत कोरडा घेऊन तें शिंगरू त्या खांबा सभोंवती उजवी आणि डावी प्रदक्षिणा करील अशा रीतीनें रोज हांकीत जावें. असें आठ पंधरा दिवस फिरविल्यानें त्याजला मंडळावर फिरण्याची संवय लागेल. शिंगराच्या पुढील पायांत लोंच ( उचलून पाय टाकणें ) असा सिकवावा जर वाटेल तर त्याचे पुढले पायांनां गुडघ्यावर लोंबते दोन खडे बांधावे तेणेंकरून नीट पाय टाकले असतां ते खडे पायांच्या नळ्यांस लागतात आणि वांकवून ( उंचून ) टाकलें तर नळीस लागत नाहींत.

पुढें या घोड्याचे ( या रीतीनें तयार झालेल्या शिंगराचे ) चवकड्याचे कड्यास काढणी बांधून ती काढणी चवकड्या जवळ हातीं धरून मंडळांत पाव कदम टेहळवून तो हें काम शिकला ह्मणजे काढणीस ढील देऊन दुडकी करावा. सारखा फिरूं लागला ह्मणजे काढणीच्या इशाऱ्यानें वाढवावा. दोरीचे इशाऱ्यावर न वाढल्यास अवगीचे अवाजानें वाढवावा, परंतु अवगी व अवगीवाला घोड्याचे नजरेस न येतां काढणीवाल्याचे मागें रहावें. घोड्यास वाहाढणें आणि घटणें समजुतींत आलें ह्मणजे त्यास मुलायन व दुडकी रसीतच (दोरींत) फिरवावा. घोड्याचीं सर्व आगें मुलायन होऊन जेरबंदास ढील टाकून वाढता घटता सारखा फिरूं लागला ह्मणजे सात्रक करावा. मंडळांत प्रथम सात्रक करण्यांत घोड्याचे पाय मिळवून घ्यावे. पाय मिळविणें ह्मणजे मंडळाचे आंतल्या बाजूचे पाय वाढते राहावे आणि बाहेरच्या बाजूचे घटते रहावे. हा अभ्यास पुन्हां हें काम विसरणार नाहीं इतका करावा. ह्याचप्रमाणें घोड्यावर बसून काढणी बांधल्या शिवाय त्याकडून पक्का अभ्यास करवावा. मग उभे पाळींत ह्याचा जेरबंद किंचित पो-

कळ करून हलकेपणानें दुडकींत वाढवावा. याप्रमाणें सारखा फिरूं लागला ह्मणजे त्याच जेरबंदावर अनीन गांठून हलकी मुलायन दुडकी करावी. ह्यांत घोड्याची गर्दन खमदार होऊन पायांना लोंच करून हलकेपणानें सर्व जेरबंद नरम करून तोंडांतील चवकड्यास खेळवीत•असून त्यानें ( घोड्यानें ) पैत्र्यावर अति उल्हासानें फिरत असावें.

स्वाराचे मर्जीप्रमाणें इषारा समजून घोडा काम देऊं लागला ह्मणजे त्यास उभ्या पाळीवर सात्रक करावा. पहिल्यानें वाढती सात्रक चपेटून द्यावी. तींत घोड्याचीं व स्वाराचीं सर्वआंगें शुद्ध राहून घोडा वेगानें सारखा वाढला ह्मणजे घटवून घोड्याच्या शरीराचा थाट न बिघडतां मुलायन हलकी सात्रक करावी.

मग साफ जागेवर प्रकारानें ( कंपासानें ) सारखें असून मोठे ळ ह्या अक्षराचे आकृती ह्मणजे इंग्रजी 8 आठाच्या आंकड्या प्रमाणें दुहेरी मंडळ करावें. त्या मंडळाची खूण घोड्यास आणि स्वारास चांगली दिसेल अशी असावी. पहिल्यानें डावे मंडळावर घोड्याचें डावें अंग वाढतें ठेवुन पाव कदमापासून पल्या पावेतों क्रमानें वाढवावा आणि याचप्रमाणें क्रमानें घटवून पुन्हां पाव कदमावर आणावा. तसेंच उजवे मंडळावर त्याचे उलट ह्मणजे उजवे पाय मिळवून घ्यावे. परंतु वाढण्या घटण्यांत घोड्यास तेजी न करूं देतां स्थितीवर ठेवावा.

नंतर दुहेरी मंडळावर घोड्यास टेहळवून सात्रक करावा. घोड्यावर पाय बदलण्याचे जागीं स्वारानें आपले अंगाचा कळ देऊन पाय बदलावा, न बदलल्यास जोडाचे ठिकाणीं दुडकी करून मोटेनें पाय मिळवून घ्यावा. तसेंही करून न बदल्यास चपेटून तेजीनें वाढवावा ह्मणजे पाय बदलील. हें काम आल्यावर मिठी सात्रक दुहेरी मंडळावर सुरू करावी. तींत घोड्यानें मुलायमीनें व हलकेपणानें

आपले शरीराची बनवट करून गर्दन खम्दार ठेवून थुतनी च्छातीस मिळव राहून दांडी हरपेंत्र्यास झळकत राहील असें करावें. या कामांत स्वारानें आसन फार मुलायन ठेवून अनिनींत युक्तीनें घोड्यास गांठलें पाहिजे. याचप्रमाणें मिठीसात्रक जावें परंतु जातांना उजवे पायानें आणि येतानां डावे पायानें यावें. या प्रमाणें पावकदमापासून पल्यापावेतों पाय बदलणें स्वाराचे हुकमांत असले ह्मणजे या कामांत घोडा तयार झाला असें समजावें.

## घोड्यास पल्ला देणें.

सारखे जागेवर पन्नास हातांचे आंत तीन खुणा कराव्या आणि घोड्यास खुणेच्या समोर उभा करून पल्ला तेर्जानें चपेटून हांकून पहिल्या खुणेवर रोखावा. कुचावर दबून उभें राहून तसाच पुन्हां हांकावा. दुसरे खुणेवर त्याचप्रमाणें करून पुनः तेथून शेवटीं ज्या ठिकाणीं रोखावा तेथून मागले पायांवर पालटून यावें ह्मणजे हें काम तयार झालें.

## अढाई चाल शिकविणें.

अढाई ह्मणजे घोडा उभा राहातो तो एक भाग धरून त्याच्या दीडभाग जागा मोजून खुण करावी. आणि घोडा उभा असतो त्याच जागेहून घोड्यास नीट तेर्जानें हांकून खुणेबाहेर न जातां मागले पायांवर तसाच उलटून आणावा. असे दहावीस फेरे करून घोडा दिलावर (तेर्जानें न आणतां) सोहलतीनें काम देईल तर फेरांत उत्तम झाला. यांत स्वाराची पठडी उत्तम रहावी.

## घोड्यास तळबाग शिकविणें.

१ घोड्याचे दोन्ही बाजूंचे चवकड्यास काढण्या बांधून, डावे बाजूची काढणी घोड्याच्या पुढच्या' पायांतून उजवे बाजूस घ्यावी.

आणि ती व उजवे बाजूची मिळून दोन्ही काढण्या आपल्या हातांत घेऊन घोड्याची अनिन ढिली करून तोंड खाली करूं द्यावें. नंतर काढणीचा इशारा करावा ह्मणजे पाय उचलूं लागेल. यांत घोड्यास वाढूं न देतां घटल्या पैऱ्यावर चारही पाय वेगळाले उचलून किंचित चालता रहावा. आणि नथन्याचा फुरफुराट पैऱ्यास चालू राहून अति तेर्जानें त्यानें आपले शरीराची बनावट करावी यास तुळंग असें ह्मणतात.

२ घोड्याचा जेरबंद थोडा तंग करून काढणी लावावी आणि तिचा हात पहिले पेक्षां उंच ठेवून घोड्यास दोरीचे इषाऱ्यावर उचलावा. घोड्यानें छाती तोलून गरदनेस स्वत देऊन छातीस शुनती लावावी आणि कुंच्यावर दबता राहून पुढले पाय वेगळाले स्थिरतेनें उचलून लोंच करून हलकेपणानें ठेवीत असावे व दर पैऱ्यास नीट चालता रहावा यास धम्माल ह्मणतात.

३ घोड्याचा जेरबंद थोडा तंग करून अनिन ढिली करावी. नंतर काढणी लावून ती हातांत घ्यावी आणि हात कार्हीसा उंच ठेवून घोड्यास उचलावा. घोड्यानें इषाऱ्यावर गरदनेस पेंच देऊन आपले शरीराची बनावट करून मागले पायांच्या कुंच्यावर दबून तेर्जानें पुढले पाय दोनही बरोबर उचलून पुढें नथन्याबरोबर अति लोंचानें व हलकेपणानें जमिनीवर टेकून लागलेच उचलावे. दर पैऱ्यास तेर्जानें छाती तोलून सुरेख चालता रहावा. आणि दर पैऱ्यास तेर्जानें उचलून निचा येतांना फिरून येत असावा. यास बैठकीचीं घरें ह्मणतात.

हें तळचागाचें काम झाल्यावर घोड्यावर बसून हीं सर्व कामें (मागें सांगितलेलीं) अनिनीच्या इषाऱ्यानें करावीं. या कामाच्या वेळीं बैठकीचा प्रकार असा आहे कीं, आसनांत हलकेपणा ठेवून

पोटरीचे दाबानें काम घ्यावें. आणि अनिनीचे दोन्ही हातांबरोबर स्वारानें आपले छातीचे सुमारास उंच भरून घोड्यास अनिनींत गाठून आसनांत उचलावा ह्मणजे काम चांगलें देईल.

आतां पूर्वी घोड्याचीं जीं कामें [ पट्ठा, अढाई इत्यादि ] चांगलीं केलीं असतील तीं पुन्हां साफ करावीं. कारण पूर्वींच्या कामांत घोडा पसरलेला काम करतों आणि तळबागे नंतर सिमटून छाती तोलून फार चांगलें काम देतों. ह्या सर्व कामांपेक्षां स्वारानें मिठी-सात्रकीची मेहनत फार करावी. तेणेंकरून घोडा कायम होऊन सर्व कामें देईल. मिटीसात्रकीची मर्यादा अशी आहे कीं, घोड्याचे पुढले पाय सात्रक आणि मागचे ढुडकीचे रहावे ह्मणजे हिची सिमा झाली.

## पादगामचाल.

घोडा चवड चाल वाहडती चालून मानेस खमदार ठेवून पायास लोंच करील आणि चेहरा दोन्हीं बाजूंस डोलता राखील असा शिकवावा. ह्या चालीस दुगामा असेंही ह्मणतात.

## रहेवालचाल.

घोड्याचा जेरबंद ढिला करून चालवावा. नंतर पुढचे पायांवर लक्ष ठेवून घोडा जो पाय उचलील त्या बाजूचे कल्यावर नरम झटका देऊन थुतनी त्या आंगाकडे यावी. याप्रमाणें दोन्ही पायांवर लक्ष ठेवून दोन्ही बाजूंच्या कल्यास झटके देऊन घोड्यास डोलूं द्यावा. नंतर जेरबंद तंग करून घोडा मागचे कुंच्यावर दबून सिना ( छाती ) उचलून पायांस लोंच करून मतवालेपणानें चालेल असा अनिनींत गाठून फार वाढूं न देतां तिच्या इषाऱ्यावर चालवावा.

## उंचाफेर.

या फेराचे, बागधारी, लंगरू, लंगडी, आणि उंच उडणें असे

चार भेद आहेत. पहिल्यानें जेरबंद ढिला करून तोंडांतील चवकडा किंचित पोकळ ठेवून वहाडती मात्रक हकावा त्या मात्रकींत घोड्यानें एकीकडचे पैत्र्यास वाढून दुसरे आंगाकडील पाय घट्ट ठेवून वहाडतें रहावें. असे अनिर्नीत झटके देऊन उंचा करावा. याप्रमाणें दोन्हीं अंगें साफ करावीं. वहाडण्यांत जशी पुढले पायाची देंव्हड तशीच मागले पायांची देंव्हड राहिली पाहिजे. या फिरण्या स्वारास अनिर्नीत दम ठेवावा लागतो. अशा रीतीनें घोड्यास देंव्हड चालीची आदत झाली ह्मणजे तो उंच्या फेराचें काम शिकविण्यास लायक होतो.

## बगधरी.

घोड्याचा जेरबंद थोडा तंग करून त्यास अनिर्नीत गाठून तेजीनें उचलून वाहडता घ्यावा. त्यांत घोड्यानें गरदन खमदार ठेवून पायास लोंच करून तेजीनें सारख्या घेरांत वाहडतें राहून फार उंचा न होतां मध्यम तऱ्हेवर फिरत असावें. या फेरांत स्वारानें नीट बसून आसनांत पोंचेपणें न राहतां घोड्यावर चपेट घेऊन काम घ्यावें.

## लंगरू.

घोड्याचा जेरबंद मानेच्या अंदाजानें तंग करून देंव्हड मात्रक सुरू करावी. तींत आसनांत किंचित ढील देऊन अनिर्नीस मुळायन झटका देऊन उंची करावी. स्वारानें दर पैत्र्यांत उंचे होण्यांत घोड्यास अनिर्नीत गाठून पैत्रा घटवून एकसारखा ठेवावा घोड्यानें आपला खबसुरत थाट ठेवून व छाती तोलून तोंड मोकळें ठेवून फार संतोषानें असावें. असे स्वारानें त्याचे शरीराकडे लक्ष देऊन काम घ्यावें. नंतर कांहीं दिवस घोड्यास सोहलत देऊन कल्लोल करूं लागला ह्मणजे त्यास सोडून फेर सुरू करावा. आणि अनिर्नीत गांठून मुळायनीनें उचलावा ह्मणजे घोडा हलकेपणानें फिरूं लागेल. या

फिरण्यांत घोड्याचीं सर्व अंगें नरम राहून दर पैत्र्यावर नखऱ्यानें चालतांना दांडी मोकळी ठेवील असें स्वारानें करावें.

## लंगडी.

घोड्यांचा जेरबंद तंग करून उभेपाळींत पावकदम चालवून अनिनींत गांठून घोड्यास सिमटण्याची समजूत करावी. नंतर उबाळ करून उंचा होऊं लागला ह्मणजे बैठकीचे घरांतून मुलायमीनें उंचा करून वाहादवावा. यांत दर पैत्र्यास अनिनीच्या झटक्यानें घोड्याचे गर्दनीस लचका येऊन थुतनी छातीस लागत राहवी व पायास अति लोंच करून बगलांतून पाय निवत असावे आणि मागील कुंच्यावर दबून दर पैत्र्यास उचाळ करून अति लोंचानें पाय सुबकीनें जमिनीवर ठेवीत असावे आणि मागले पायाची देव्हड व दांडी दर पैत्र्यास झळकत राहून फिरावा ह्या फेरांत स्वारानें आसनांत मुलायमी असून हात शुद्ध असावा आणि शरीरास ताठा न ठेवतां घोड्याचे तोलावर किंचित् झुकतें राहून घोड्यास फिरवावा.

## उंचें उडणें.

घोड्यास देव्हड्यानें उंचा करून वाढता घ्यावा, तो दहा वीस वेरें गेला ह्मणजे नीट झटक्यानें वाढवावा, एकसारखा उंचा जाऊं लागला ह्मणजे त्यांत स्वारानें अनिनीस मुलायमपणें गाठून घोड्यास स्थिरतेनें उतरावा. उंचे होण्यांत आसनांत आणि अनिनींत सिमटून तराऱ्याची सरत न होतां लांबटपणानें वाढून जमीन चालत असावी. व स्वारानें हुकमावर उंच्या घरांत पलटून यावें. या कामांत स्वारानें पटडी पक्की ठेवून अनिनीचा तोल संभाळला पाहिजे. एकादा घोडा अनिनीच्या झटक्यानें उंचा न झाल्यास काहाडणींत उंचा करून नंतर बसून संभाळून घ्यावा.

### अधरपट चाल.

घोड्यास बैटकीचे परांत उंचा करून जिकडे पालटविणें असेल ती बाग ओढून पालटवून घ्यावा.

---

## तयार झालेला घोडा विघडल्यास सुधारणें.

घोडा फेरांत बिघाड करूं लागल्यास स्वारानें क्रोध न करतां घोड्याचें सामान तपासून पहावें. कमण्यांत त्याचे कानस्यास चिमटा आला असेल किंवा दुसरे सामायनात कमजास्ती असल्यास ठीक करून फिरवावा. त्यांतही न फिरला तर घोड्यास सोहलत द्यावी आणि दुसरे दिवशीं सोडून मुलायमीनें फिरवून पहावा. स्थितीवर असल्यास बरें नाहीं तर किंचित कग्डा करावा. त्यात घोड्यानें रागांत येऊन तेजी केली तर दररोज अस्तमान पासून त्यावर सामान ठेवून प्रातःकाळ पावेतों स्वार बसून अथवा नुसता ठेहलवावा ह्मणजे नीट होईल.

## घोड्यास कारणपरत्वें मारण्याची जागा व शिक्षा.

स्वारानें घोड्यावर बसून कोणाशीं भाषण न करतां आसन कठीण करून समय विशेषीं मारणें झाल्यास एकवारच पण मोठ्यानें मारावें, वारवार मारूं नये.

१ घोडा हिंसल्यास खांद्यावर मारावें.

२ स्खलत असल्यास कुशीच्या खालीं मारावें.

३ कांपत असल्यास पुढच्या दोन्हीं पायांच्यामध्यें मारावें.

४ आडरस्त्यानें जाईल तर जिकडे जात असेल त्या बाजूस तोंडावर मारावें.

५ वांकडा तिकडा चालूं लागल्यास मानेवर मारावें.

६ भ्याला असतां छातीवर मारावें.

७ रागांत आला तर दांडीचे सुळावर मारावें.

८ धांवला असतां दोन्ही गुडघ्यावर मारावें.

९ लवकर चालत नसल्यास कंबरेवर मारावें.

हीं कारणें झालीं असतां या या ठिकाणीं न मारून अन्य ठिकाणीं मारलें तर घोडा बिघडून पुनः सुधारण्यास कठीण पडेल.

## लाताऱ्या घोड्यास शिक्षा.

घोडा लाथ मारीत असल्यास त्यास पक्क्या भिंतीपुढें मागले पायानें उभें करावें आणि मागें एका मनुष्यानें सावधगिरी ठेवून घोड्यास इषारत करावी, ह्मणजे तो घोडा त्या मनुष्यास ज्या लाथा मारील त्या भिंतीवर लागून घोड्याचे पायास लागेल, असें झाल्यावर त्या जनावरास वाटेल कीं, लाथा मारण्यानें पायांस इजा होते सबब लाथा मारण्याची संवय आपण टाकून द्यावी. असें त्यास वाटलें ह्मणजे तो लाथ मारण्याची संवय टाकून देईल.

## पाण्यांत बसणाऱ्या घोडयास शिक्षा.

कित्येक घोडे पाणी पहातांच अथवा पाणी पितांना पाण्यांत बसतात, त्यांस गळ्यांत किंवा छातीस कळीचा चुना फडक्यांत घालून बांधावा आणि पाण्यापाशीं न्यावा. घोडा पाण्यांत बसतांच तो चुना पाण्यानें ऊन होऊन घोड्याचें थोडें चामडें जळून कांहीं दिवस इजा

होईल ती बरी करावी. नंतर या शिक्षेनें पुढें तो घोडा पाण्यांत बसण्याची संवय टाकील.

## गुडघ्यानें उठणाऱ्या घोड्यास शिक्षा.

घोडा पुढच्या पायांचे गुडघे टेकून उठणें, ही खोड मोठी वाईट आहे असें शालिहोत्रांत सांगितलें आहे. व येणें करून घोड्यास बसल्यावर लवकर उठतां येत नाहीं. सबब ज्या घोड्यास ही खोड असेल त्याच्या गुढघ्यावर फडक्यांत घालून वाळूचे खडे बांधावे ह्मणजे तो गुढघ्यानें उठूं लागला असतां ते खडे गुढघ्यास रुपतात. या शिक्षे करून ती खोड ह्मणजे गुढघ्यानें उठणें घोडा सोडतो.

## बोंबलणाऱ्या घोड्यास शिक्षा.

ओंठावर ओंठ आपटण्याची खोड एखाद्या घोड्यास असत्ये तिस बोंबलणें असें ह्मणतात. ही खोड शालिहोत्रांत फार वाईट सांगितली आहे. ओंठ वाजवितेवेळीं लोखंडाचा गज तापवून त्याचा अथवा लांकडाचे कोलीतीचा चटका द्यावा. ह्या शिक्षेनें घोडा बोंबलण्याची खोड क्वचित टाकतो.

## घोडा चऱ्हाटें खातो त्यास.

घोड्यानें चऱ्हाटें खाऊं नयेत ह्मणून चऱ्हाटास त्याची लीद लावावी ह्मणजे चऱ्हाटें चावीत नाहीं.

## घोडा माती खातो त्यास.

दाण्यामध्यें थोडें मीठ घालीत जावें ह्मणजे माती खात नाहीं.

## जेरबंदास ओढून तोडतो त्यास.

जो घोडा जेरबंदास ओढ लावून ताणतो त्याच्या मोहड्या मध्यें नाकावर रुपेल अशा रीतीनें कवडी अथवा खडा घालावा ह्मणजे जेरबंद ताणीत नाहीं.

---

## ताडनप्रकार.

उत्तम अश्वास चाबूक फार मृदूपणानें मारावा. मध्यमास मध्यम आणि अधमास अति कठीण प्रहार करावा.

दंड करतेवेळेस तीक्ष्ण अश्वास मृदु असा एक प्रहार करावा. मध्यमास २ प्रहार आणि अधमास तीन कडक प्रहार करावे.

### दंड केव्हां करावा ह्याविषयीं.

अश्व चालण्याचे वेळीं बसेल, निद्रा घेईल, किंवा दुसरें कांहीं दुर्वर्तन करील, अश्विनीस उत्कंठेनें पाहील, अडखळेल, गर्वयुक्त गर्जना करील, भिईल, मार्ग सोडून जाईल, शिक्षेचा त्याग करील अथवा मनांत भ्रम पावेल, तर त्या त्या वेळेस अश्वास ताडन करावें. भ्रमिष्ट झाला असतां अन्य चित्त आणि गति भ्रष्ट होईल अशावेळीं ताडन करावें.

### केव्हां ताडन कोठें करावें याविषयीं.

घोडा हिंसत असतां त्याचे स्कंद व बाहू यावर त्यास प्रहार करावा असें उपवेशे ग्रंथांत सांगितलें आहे. कुशीवर प्रहार करावा असें नकूल ग्रंथांत व मस्तकावर प्रहार करावा असें जयदत्त ग्रंथांत सांगितलें आहे. घोडा बसेल किंवा झोंप घेईल तर तोंडावर, अडखळतांना जंघनावर कमरेच्या खालीं, भ्यालेला असल्यास कंठ प्रदेशावर प्रहार करावा असें उपवेशे ग्रंथांत, पोटावर असें नकूल ग्रंथांत, व पाठी मागें प्रहार करावा असें जयदत्त ग्रंथांत सांगितलें आहे.

हिंसतांना स्कंद, बाहू, कुशी आणि मस्तक यांवर ताडन करावें.

चालतांना निद्रा घेत असतां कटीवर ताडन करावें.

चालतांना दुर्वर्तन केल्यास मुखावर ताडन करावें.

घोडीस उत्कंठेनें पाहील तर स्कंध व बाहू यांवर प्रहार करावा.

अडखळल्यास जघनावर कंबरेच्या खालीं ताडन करावें.

भिईल तर कंठ प्रदेशावर, पोटावर अथवा पाठीमागें ताडन करावें.

मार्ग सोडून जात असल्यास तोंड, कंठ व पुच्छ या ठिकाणीं प्रहार करावा.

मनांत भ्रम पावेल तर पोट व अधरोष्ठ यांवर ताडन करावें.

शिक्षा टाकील तर अधरोष्ठावर प्रहार करावा.

कष्टानें चालेल किंवा पडेल तर पाहिजे त्या ठिकाणीं ताडन करावें.

गतिभ्रंश झाला असतां मानेवर ताडन करावें.

त्रासयुक्त झाल्यास कानाच्या मध्यें ताडन करावें.

चंचळ झाल्यास गुढघ्यावर ताडन करावें.

रागावला असल्यास उरावर ताडन करावें.

ह्या प्रमाणें अश्वास ताडन करावें. भलतेच वेळेस व भलतेच ठिकाणीं ताडन केलें असतां अश्व कोपयुक्त होतो आणि त्याचे मनांत पुष्कळ दोष उत्पन्न होतात ते दोष तो यावज्जीव बाळगतो.

अश्वास दंडानें वश करावें. चाबूक घेतल्या वांचून अश्वावर बसूं नये

अकाळीं दंड, लगामाची धरसोड आणि पाणी पाजणें यांपैकीं कोणताही प्रकार केल्यास घोड्याची गति कमी होते. सर्व लक्षणांनीं युक्त, निर्दोष, बलवान व सुशील असा अश्व कधींच धांवत नाहीं.

तीक्ष्ण अश्व एक चाबूक मारिला असतां धांवतात. मद्र अश्वास

दोन चाबूक मारले असतां ते धांवतात आणि मंद अश्व तीन चाबूक मारले असतां धांवतात. तीक्ष्ण, मद्र व मंद अश्वांचें धांवणें हाच वेग आहे.

घोड्यास मुळींच चालविलें नाहीं तर ते सर्व कर्मांमध्यें शक्त असूनही नाश पावतात. फार चालविलें तर तोंडाची ऐट सोडितात व अवयवांचे ठायीं शिथिल पडतात.

---

## घोडा खरेदी घेण्याविषयींचीं चिन्हें.

घोडा घ्यावयास गिऱ्हाईक जाईल तेव्हां त्यानें त्याचीं त्यावेळचीं लक्षणें पहावीं. उपजला दिवस समजला नसला तर प्रश्नावरून जाणावें. उत्तम चिन्हाची परिक्षा गिऱ्हाईकाची व घोड्याची समदृष्टि झाली ह्मणजे उल्हासानें त्यानें गर्जना करणें व हिंसणें हीं असून तो घोडा धन्यास लाभकारक होय. गिऱ्हाईकास पाहून उजवा हात पुढें करून हुंगेल व टाणावर उड्या मारील तर तो घोडा घेणारास संपदा देईल असें समजावें.

गिऱ्हाईकास पाहून लीद करी तरी सिद्धी सांगे. वाईट प्रश्नाची परिक्षा पाहून घोडा घेऊं नये. गिऱ्हाईकाची समदृष्टि झाली असतां पाय झाडला तर वर्जावा. गिऱ्हाईकाची समदृष्टि झाली असतां मुत्र करील तर धन्यास मृत्यु. मान झाडील तर घेऊं नये. गिऱ्हाईकास पाहिला तर मान झाडील किंवा जांभयी किंवा आंगमोड देईल तर दुर्लक्षणी. डावा पाय पुढें ठेवील तर व मुखांतून लाळ सांडील तर घेऊं नये तो वाईट करील. चिन्हें चांगलीं झालीं तर घ्यावा.

घोडा विकत घ्यावयास गेलें असतां जर आनंदानें शब्द करून विष्टा करील तर तो उत्तम समजावा.

घोडा विकत घ्यावयास गेलें असतां आणि घोड्यापुढें उभें राहिलें असतां जर तो डावा हात ( पुढचा पाय ) लांब करून तोंडांत चावत असलेला चारा खालीं टाकील तर तो वाईट ह्मणून समजावा. घोडा विकत घेतेवेळीं जर तो सुटेल तर वाईट समजावें. अंग कांपवील किंवा मूत्र करील अगर आपलें आंग लांब करून सुंभ फिरवील तर तो घोडा वाईट ह्मणून समजावा.

दिवमास घरीं घोडी पसवली तर घर व तें शिगरू व ती जागा विकत घेणारास व धन्यासही वाईट. तसेंच वाईट दिवशीं ह्मणजे सक्रांत वगैरे दिवशीं घोडी पसवली असल्यास तें शिगरू घेऊं नये. हें ओळखण्याची खूण अशी आहे कीं, त्या शिगराचा मालक त्याचा थोडा कान कांपीत असतो कारण कान कांपला ह्मणजे ती खोड अम्मळ कमी होते. घोडा विकत घेतेवेळेस बसलेला असेल तर तो घेऊं नये.

घोड्यावर बसलें असतां जर घोडा दोन्ही पाय वर करील तर ती खोड वाईट असून तसा घोडा घेऊं नये.

घोडा वाट चालत असतां दचकेल किंवा दोन्ही पायांचे नेवर एकमेकाशीं लागतील तर ती खोड वाईट आहे.

घोडा एक रंगी असून त्यावर पांढरे ठिपके उत्पन्न झाल्यास वाईट. घोड्यावर बसावयास गेलें असतां जर घोडा लाथ मारील तर तो वाईट. जर घोड्यास पोट दुखणें चार पांच दिवसांत होईल आणि औषधानें गुण न येईल तर ती खोड वाईट आहे.

घोडा खरेदी घेण्यास जाऊन घोड्यास उजवे हातानें धरून घोड्याचें तोंड पश्चिमेकडे करून पाहावें. जर घोडा त्यावेळेस आपली शेंपटी उजवेकडे करील आणि उजवा पाय आपटील तर तो घोडा उत्तम समजावा. जर त्यावेळेस डावेकडे शेंपटी

करील व डावा पाय आपटील तर तो वाईट समजावा. घोडा घेतेवेळेस जर तो वर पाहील तर उत्तम समजावा. पागेंत आणते वेळेस घोडा वर पाहून शब्द करील तर उत्तम लक्षण समजावें.

घोडा विकत घ्यावयाचा असतां जर तो एक वर्षाचा किंवा दोन वर्षांचा अगर तीन वर्षांचा असल्यास पुढें केवढा मोठा होईल, उंच किती होईल, सशक्त होईल किंवा अशक्त होईल हें पाहून विकत घ्यावा.

घोडा कोणते कामाकरितां घेणें आहे हें प्रथम पाहिलें पाहिजे. बसावयाकरितां, गाडीस जुंपण्याकरितां, शर्यती करितां किंवा शिकारी करितां यांतून ज्या कामास पाहिजे त्या कामास कसे प्रकारचा घोडा पाहिजे हें समजणें जरूर आहे.

बसावया करितां पाहिजे तर तो घोडा घोड्यावर बसणाऱ्याची स्वारी वाहूं शकेल कीं नाहीं हें पाहिलें पाहिजे. बसणाराची स्वारी त्याजला सहन होईल अशी शक्ति त्या घोड्यांत पाहिजे. घोडा देखणा असावा. रंग मालकाचे आवडीचा असावा. डोकें लहान, डोळे मोठे ढळढळीत, तोंड लहान, नाकपुड्या मोठ्या, मान थोडी बांकदार, खांदा पाठीकडे तिरकस व मांसल असावा. खांद्याला टोंक नसावें. शरिराचा बांधा वाटोळा व मांसल असावा. कमर खोल असावी. पाय व खूर नीट ताठ असावेत. मागचा भाग खोलगट ह्मणजे त्याचे कुले उंच असावेत. चारी पाय चांगले पिळदार असावेत. पाहिजे तिकडे उजवीकडे किंवा डावीकडे सहज फिरणारा असावा. चालण्यांत वरचे बसणारास आनंद वाटावयास योग्य असा असावा दुडकी चाल निर्भयपणानें व मोकळे मनानें चालणारा व सात्रक चाल सावकाश लगाम ओढल्या वांचून जाणारा असा असावा. खोगीर सरूं नये ह्मणजे खांद्यापुढें येऊं नये. एका आवरांत सात किंवा

आठ मैल दुडकी चाल चालेल तर बस आहे. मान ढिली आणि कमजोर नसावी. घोड्याचा खांदा नीट असेल तर गुडघ्यांत किंवा जाईंट स्टाक यामध्यें गरम राहून पडण्यास कारण होतो. घोडा ढिले-पायाचा, चिरडखोर, गरम स्वभावाचा व चमकणारा नसावा. ज्या घोड्यास फार मज्जा असेल तोंही पसंत नाहीं. जर्दा ( बदामी ) रंगाचा घोडा फार करून असा असतो. पायांच्या नळ्या बारीक असाव्या लठ्ठ असूं नयेत. खेचर जनावराच्या नळ्या ज्याप्रमाणें असतात तशा असाव्यात. घोडा डोकें वर करणारा नसावा.घोड्याचे पायाचे नळीवर गुळूम ह्मणजे मांस वाढलेलें नसावें.

गाडीकरितां घोडा पाहिजे तेव्हां बसण्या करितां असणारे घोड्यास ज्याप्रकारचे गुण पाहिजेत ह्मणून सदरीं सांगितले आहेत तसे तर गुण त्याच्यांत असलेच पाहिजेत परंतु खांदा थोडा नीट असला तर चालेल. त्याची उंची साठ बासष्ट इंच असावी. पाय बळकट व स्वभाव धीट असावा. गाडी लहान मोठी असेल त्या मानानें ती वाहण्यास तो समर्थ आहे किंवा नाहीं हें पहावें. त्याची मान इंद्रधनुष्या प्रमाणें कमानदार असावी.

शर्यती करितां घ्यावयाचे घोड्याचे आंगीं बसावयाकरितां घोड्याचे अंगीं जे गुण पाहिजेत त्या प्रमाणेंच असावेत.

शिकारी करितां घोड्याचें डोकें लहान, मान सडपातळ, खांदा तिरकस, पाठ व कमर बळकट व शरीराचा आकार खोलगट असावा. पाठीचा कणाही खोल पाहिजे. तोंडाचा वास चांगला असावा. मांडी उतरती असावी.खूर रुंद व नीट उभे असावेत.पाय नीट उभे असावेत. रोखून चालणारा नसावा. शिकारीचे घोड्याकडून हरणाची शिकार आठवड्यांत एक दिवस व कोल्ह्याची पंधरवड्यात तीन वेळ याप्रमाणें त्याजकडून काम घ्यावें जास्त घेऊं नये. साठ बासष्ट इंच पर्यंत घोडा उंच असावा. घोड्याची मान व पाय अशक्त नसावेत.

साधारण सर्व घोड्यांची मान अशक्त व पुढील पाय वांकडे, डोळे रोगी व पाय सुजीर व लंगडणारे व बेंबीचा रोग व मुंभांत रोग असे अवगुण असणारे घोडे विकत घेऊं नयेत.

---

## घोडा घेतेसमयीं अवयव परीक्षा करणें.

प्रथम घोड्याचें तोंड पाहून दांतांवरून तो तरणा आहे किंवा म्हातारा आहे हें पहावें. नंतर त्याची शेंडी धरून दोन्ही डोळे पहावे. डोळे मोठे तेजदार असावेत व त्यांस कांहीं विकार नसावा. कान फार लहान व फार मोठे नसावेत. ओंठ बारीक असून शोभिवंत असावेत. शीर मोठे व मान छातीपासून जाड व कानाकडे बारीक कमानदार असून चोहोंकडे फिरती असावी. खुब्रा व मुंभाचा तळवा एक दोरींत नीट असावा. खुब्रा तिरकस व लांब असावा. खांदा व खांद्याची नळी मोठी असावी. गुडघा रुंद व मोठा असावा. गुडघ्याच्या मागील बाजूचें हाड मोठें असावें. गुडघ्याची खालची नळी लांब असावी. मुंभाच्या मागलें हाड मोठें असावें. मुंभ फार लहान व फार मोठा नसावा. तो तरतरीत नीट किंवा बैठा नसावा. बरगड्या लांब व जाड असाव्यात. खांदा उंच असावा. कंबर फार लहान व फार उंच नसावी. फसल व कुल्हे यांच्या आंतले टोकांच्या मधील जागा थोडी असावी. कमरेचें हाड लांब व रुंद असावें. पुठा उतरता नसावा. गुदद्वार उघडें नसावें. मांडीचे वरचें व खालचें हाड मोठें असावें. मागील पायांच्या गुडघ्याचा सांधा मोठा असावा. गुडघ्याचें हाड मोठें असावें. मागील मांडीचे खालचे हाडावरील चपटें हाड व खुब्याचे आंतील टोंक दोरीसूत असावें. याप्रमाणें साधारण रितीनें घोड्याची परिक्षा करून घोडा खरेदी करावा.

---

## शर्यतीचे घोड्याची परीक्षा.

शर्यतीचे घोड्याचा खांदा उंच असावा व त्याची उंची पाठीचे कण्याचे मणक्यावर अवलंबून असून लांबीही कण्याचे मांसलतेवर अवलंबून असते. कण्याचे भागावरून त्याची शक्ति पुढील भागाचे अवयवाचें साधन आहे. खांदा मांसल असून पाय आंखूड असावेत. सुंभाचा जोड मध्यम असावा. बांधा आंखूड असून बरगड्या अगदीं जवळ जवळ असाव्यात व त्यांची लांबी पंधरा इंचापेक्षां कमी नसावी व सोळा इंचापेक्षां जास्त नसावी. काळीज व फुप्फुस हीं पैस राहण्या पुरती छाती मोठी असून खोलगट असावी. घोड्याचे अंगीं शक्ति वाढण्याची अवधी पांच वर्षांपासून आठ वर्षांपर्यंत असते ह्मणून आठ वर्षांचे आंत घोड्यास शर्यतीचे कामीं लावूं नये.

## गाडीचे घोड्याची परीक्षा.

गाडीस घोडा लावणें तो पांच वर्षांचे आंत नसावा. त्याचे डोळे व तोंड सुबक असावें. स्वभाव सौम्य असावा. स्वारी करण्याचे घोड्याचा स्वभावही सौम्य असावा. त्याचा आकार चांगी आंगानें सारखा असावा, ह्मणजे शिकारीचे घोड्या इतकी त्याची उंची नसावी. तो चांगल्या औलादीचा असावा. पंधरा हात*व एक इंच उंच असावा. चांगल्या औलादीचा घोडा चलाख असतो पण त्यास ओझें फार सोसत नाहीं. कम औलादीचा घोडा पंधरा हात उंच असला तरी चपळ नसतो व ओझें फार सहन करतो.

* टीप—एक हात = ४ इंच.

# घोडा विकत घेतेवेळची विशेष अवयव परिक्षा.

एक बाह्य व एक अभ्यंतर असे परिक्षेचे दोन प्रकार आहेत.

१ बाह्य परिक्षा.—घोड्याचे डोळ्यावरून त्याची धारणाशक्ति व बळ समजतें. त्याचे वहानावरून त्याची रीत, डोळे, कान, त्वचा, कृत्य व उत्सुकता ह्यांचें ज्ञान होतें. त्याचे परिपाठावरून स्वभाव, उत्साह आणि सुरक्षितपणा हे समजतात. वाईट औलादीच्या घोड्याचे डोकें मोठें असतें. भिवया आंखूड, डोळे लहान, पापण्या चिपचिपीत व जाड असतात. जर घोडा असा असेल तर त्याचे मस्तकांतील मेंदु लहान असतो ह्मणून त्याला उत्साह कमी असतो. चांगल्या औलादीच्या घोड्याचें डोकें लहान व कोनेदार असून दोन्ही भिवयांमधील भाग जितका रुंद असेल तितका चांगला आहे. त्यापासून त्याची चपळता व धूर्तता समजते. त्याचे ओंठ जाड असावेत. डोक्यापासून मुसकटापर्यंत त्याचा चेहरा चिंचोळा असावा. तोंड ओंठापर्यंत सकुमार व पातळ असावें. नाकपुड्या मोठ्या, पातळ, रुंद व उघड्या असाव्यात ह्मणजे तेणेंकरून त्याचा चेहरा सुंदर दिसतो व श्वासोश्वास चांगला घेतां येतो. नाकपुड्या मोठ्या असल्या ह्मणजे तो घोडा जलद धांवणारा आहे असें समजावें. मंद स्वभावाचे घोड्याच्या नाकपुड्या कधीं कधीं मोठ्या असतात. परंतु जलद धांवणारे घोड्याच्या नाकपुड्या कधीच कमी असत नाहींत. डोळ्याचा वर्तूळ मोठा व चकचकीत असावा. पापणीचा पडदा पातळ असावा. डोळे मोठे, टवटवीत, तेजस्वी व चंचल असून पापण्याचीं कांतडीं पातळ असावीत. जर डोळा लहान आहे तर आणि उघडझाप करतो आणि खोलगट आहे तर त्या घोड्याचे डोळ्यांत चिकट पदार्थ फार असतो व तेणें करून डोळा मुजण्याचा संभव आहे. कार्निया ह्मणजे डोळ्यांतील पातळ

पदार्थ ज्यापासून घोड्यास दिसतें तो लहान असून त्याचे अंगीं पांढरेपणा जास्त असल्यास तो हरामी घोडा आहे असें समजावें, व तो दिसण्यांतही बेढब दिसतो. कान आणीदार व रुंद असले ह्मणजे त्या घोड्यांत चांगली धमक असून त्याचा स्वभाव कसा आहे तो समजतो. अशा कान.चा घोडा खोडकर व खेळकर क्वचित असतो. परंतु तो कान पाडतो तेव्हां त्याचे मनांत कांहीं खोडी करणें ह्मणजे चावणें किंवा लाथ मारणें आहे असें समजावें. घोडा व्यायाम किंवा मजल करतो तेव्हां एक कान मागें व एक कान पुढें करतो व चोहोंकडे नजर फेंकतो ही खूण त्याचे शक्तीची व आंगांतलि धमकेची आहे. स्वारीचे घोड्याची मान लांब, पातळ व मस्तकाकडे बाकदार असून ती खांद्याकडे आणि छातीकडे जाड असावी. फार मांसल नसावी. छातींत व खांद्यांत घट्ट असावी. घोड्याचे मानेच्या लांबीवर त्याच्या दंडाची लांबी आणि शक्ति अवलंबून असते ह्मणून त्याचा खरा हात उचलून घेण्याची शक्ति दाखवितो. त्याचे स्नायु बळकट असावेत ह्मणजे चालतांना पाऊल मागें पुढें करण्यास त्याचे तंगडींत जोर असतो त्यामुळें तो ठेचळत नाहीं. घोडा भरधांव धांवतो तेव्हां त्याचे स्नायु जोरांत असतात व तोंड पुढें करतो तेव्हां मर्यादे बाहेर लगामाची अनि ओढून धरली तरी त्यास समजत नाहीं व तो खिकाळतो. घोड्याची मान लांब असल्यास डौलदार गाडीस तो अगत्याचा आहे. मान आंखुड असल्यामुळें त्याच्या लगामाच्या दोऱ्या वर केल्या तरी त्याचे मानेस बाक येत नाहीं. स्वारीचे घोड्याहून ओझें वाहणाऱ्या घोड्याची मान जाड असावी. स्कंददेश अयाळीचे अखेर असतो तो उंच कण्याचा असून बोम्डस आहे. मानेचे शेवटचे व पाठीचे पहिले कण्याचे मणक्यांत त्याची गति आहे. घोडा जेव्हां दुडकी चाल चालतो तेव्हां त्याचा पुढील भाग उंच होतो त्याला ज़िव्हर ह्मणतात. ज़िव्हरच्या बाहूची अशी लांबी असेल त्याप्रमाणानें घोडा वजन सोसतो.

बसवट उच असेल तर स्वस्थपणा व सुरक्षितेविषयीं चांगला, परंतु गर्यतीचे कामास अवश्यक नाहीं. घोड्याचा स्कंददेश (बसवट) ठेंगणा असल्यास त्याजवर खोगीर नेमल्या ठिकाणीं चांगले बसत नाहीं म्हणून सवदागर लोक खांद्याचा कमीपणा दिसूं नये म्हणून घोड्यांचें डोकें उच करून दाखवितात. घोड्याचा खांदा चागला वाईट असेल त्याप्रमाणें त्याचें चालणें चागलें वाईट असतें. चागलें चालणें हें त्याचे बळावर आहे खांदे खोल असावेत व ते स्कंद जोडाच्या गांठ खाळपासून मागें व पुढें तिरकस असावेत. लांब व तिरकस खांदा असला म्हणून घोड्याचें पाऊल लवचिकपणानें मोकळें पडतें व पुढील पायाची गति जलद असते. घोड्याच्या दोहींकडील खांद्याचीं हाडें कोनदार असावींत तुरक्या कड्याचा व तरतरीत खांदा होणें हें मुळ्याच्या (बसवटाच्या) तरतरीतपणावर आहे. खांदा लहान व तरतरीत असला तर त्याचे पाठीवरील ओझें पुढील पायावर पडतें, तेणेंकरून बसणारास हिसका बसतो व त्याचे पायास कदाचित इजा होते. जर दंडाची नळी लांब आहे तर त्याचे पाठीवर ओझें असलें तरी पाऊल पुढें टाकण्यास अडचण पडत नाहीं तथापि तो अडखळतो. चालताना पाठीवरील ओझें ठिकाणावर राहत नाहीं पुढें घसरतें. हा घोडा बसण्यास बरा वाटत नाहीं. वर सांगितलेल्या प्रकारची नळी ओझें वाहणारे घोड्यास फायदेशीर आहे तें कसें तर त्याचें तें ओझें गळानिपीवर पडतें व त्याचें खोगीर बरोबर बसतें व काम करण्यास गति पुष्कळ मिळते ओढ्याचे घोड्याची गति जलद असणें हें त्याचे गळानिवर जसा भार असेल तशावर अवलंबून असते. स्वारीचे घोड्याचा ऊर टोंकाकडे फार रुंद नसावा. तो रुंद असल्यास दुडक्या चालीस कुशल नसतो ओझें वाहणाऱ्या घोड्याचा ऊर रुंद असलेला चागला पुढील पायाच्या नळ्या नीट तरतरीत रुंद आणि छातीकडे अलग उतरत्या असाव्यात.' जर जवळजवळ आहेत तर तो

घोडा पायास पाय लागून दुखवण्याचा संभव आहे. पाय जवळजवळ होण्याचें कारण सुंभाचे खालचा भाग जें मनगट (पॅस्टर्न) तें अशक्त असतें किंवा दंडाचा जोड (एलबोजाइन्ट) वाईट असतो. ओझें वाहणारे घोड्याच्या तंगड्या क्वचित अलग असतात. स्वारीचे घोड्याच्या तंगड्या फार रुंद असतील तर त्यांचें चालणें घोळाचें असतें. घोड्याच्या तंगड्या दंडाचा जोड (एलबोजाइन्ट) पासून फेटलाग (सुंभ) यापर्यंत नीट खालीं दोरीसूत असल्या पाहिजेत. पायाचा आंगठा खांद्याचे टोंकाचे दोरीसूत असावा. जर तो दोरीसूत नसेल तर त्याचें चालणें जरी सुरक्षित असलें तरी मानगडीचें असतें. जर फार मागें असेल तर तो घोडा पडण्याचा संभव आहे. बाहू मोठे, रुंद, मांसल, लांब आणि गुडघ्याकडे चिचोळे असावेत. बाहू शक्तिवान असणें हें त्यांचे रुंदपणावर आहे. चालण्याची गति त्यांचे लांबीवर आहे. जर बाहू लांब आहेत तर शॉन्क (मांडीचे खालचें हाड) आखूड असतें. असा घोडा असला ह्मणजे शक्तिवान व जलद चालणारा असतो. जर नाचणारा व फांदणारा घोडा पाहिजे असल्यास त्याचे बाहू आखूड व शॉन्क लांब असावें. गुडघे मोठे, सपाट व पुढें मागें असावेत. जर गुडघे तंगड्या बरोबर सारखे ह्मणजे दोरीसूत असले तर त्यांस काफानिढ असें ह्मणतात. पॅस्टर्न (मनगट) हे खुराच्या व सुंभाच्या मध्यें असतें. मनगट लांब असलें ह्मणजे लवचीक असतें व दिसण्यांत चांगलें दिसतें. सात्रक चाल चालण्यास चांगलें, पण जितकें लांब तितकें कमजोर असतें व त्यामुळें लचक भरण्याचा संभव असतो. कदाचित त्यापासून पायाचे मागील नळीसही दुखापत होईल. मनगट तरतरीत उभें असतें तें दिसण्यांत चांगलें दिसत नाहीं ह्मणून घोड्यास व वरील स्वारास त्यापासून आनंद होत नाहीं. घोड्यास उपद्रव होतो ह्मणून मनगट तिरकस व लांब असेल तर चालीस चांगलें.

ओझ्याच्या घोड्याचें मनगट नीट असेल तर चांगलें. पाय (घोट्यापासून खुरापर्यंत) जमिनी बरोबर सपाट व स्थिर राहावेत व समोरा समोर दिसावेत. पाय वाटोळे, नरम, काळ्या रंगाचे असले तर चांगले परंतु त्यांजवर कांहीं डाग नसावा. टांच रुंद व तळवा मोठा असून अन्डाकृति असावा. पुतळी मोठी असून मजबूत असावी आणि दिवालीचा ह्मणजे नखीचा कांठ वेगळा दिसावा. ज्याचे खूर निरोगी आहेत ते आंगठ्यापासून चाळीस पंचेचाळीस डिग्री उंच असतात. पांढरे रंगाचे खूर नरम असतात. पायाची भिंत वर्तुळाकार असावी. त्याचा मागचा भाग पुढच्या प्रमाणें उतरता असावा. खूर उंचीस कमी असून बाजूकडे तिरकस असतील तर ते अशक्त असतात. दिवालीचें शिंग (नखीचे वरचा भाग) इतकें नरम असतें कीं, त्यास नालाचा खिळा सोसत नाहीं. टांच कमी, तळवा चपटा व दिवालीचे कांठ लहान आहेत अशा पायाचा घोडा काम करण्यास उपयोगी नाहीं. दिवालीचे शिंगास नाल बांधते वेळेस ते टोंचण्याचा संभव आहे तेणेंकरून घोडा लंगडा होईल. जर ते फार तरतरीत आहेत तर तळवा जाड व अन्डाकृति असतो. जर दिवाल उंच व टांचेकडे खोल असेल तर त्याचा परिणाम फार वाईट आहे. हा नाल करतांना कळत नाहीं. तरी तसले पायास गाम्रिनेस, सॅन्डक्रॅाक व कन्ट्राकशन वगैरे रोग होण्याचा संभव आहे. घोड्याची किंमत त्याचे छातीवर आहे. छाति चांगली नसेल तर लंग्ज यास जागा थोडी असते. सबब छाती रुंद असावी. छातीचा साचा त्याचे गळाचिरीचे घेगवर अवलंबून असतो. छाती रुंद नसल्यास घोड्याची पचन शक्ति चांगली नसते आणि दम चांगला घेववत नाहीं. थोडें पाणी जास्त झालें किंवा सात्रक जास्त चालला तर लागलेच जुलाब होऊं लागतात. वाटोळे छातीचा घोडा सुस्त, बळकट व नीट स्थितीनें राहतो.' तो जास्त लठ्ठ होतो पण सोशिक

असतो. जर छाती खोल असेल तर तो सोशिकपणास व भरधांव चालण्यास दमत नाहीं. कुशी चपट्या नसून खोल व वाटोळ्या असाव्यात. त्या चपट्या असल्यास पोट लोंबतें दिसतें. परंतु चपट्या कुशीचा घोडा थंड कामास उपयोगी आहे. पांठ नीट व लांब असावी. लांबीचें प्रमाण त्यास् कामास लावण्यावर आहे. सर्व कामा विषयीं घोड्याचें शरीर आंखूड असावें. आंखूड शरीराचा घोडा ओझें जास्त वाहील व कमी थकेल परंतु मंद चालेल. लांब पाठीचे घोड्यास जास्त ओझें सहन होत नाहीं व शक्ति कमी असते, परंतु चालीस जलद असतो. स्वारीचे घोड्याची पाठ खोल असल्यास तो अशक्त असतो. कंबर फार रुंद व फार मांसल नसून नीट असावी. घोड्याच्या पाठीचा व कमरेचा जेथें मिलाफ झाला आहे तेथें ह्मणजे कण्यांत कित्येक घोड्यांस खोड असते. जेथें कणा अकर्शण झालेला असतो त्या ठिकाणावर वरच्या आंगें बांक असेल तर ती वाईट खोड आहे. कारण घोड्याचें पाऊल सारखे पडत नाहीं व त्यामुळें वर बसणारास सुख होत नाहीं. ह्या घोड्याचे मागील पाय आंत येतात. घोड्याचा मागील भाग तपासण्याची फार सावधगिरी ठेवावी. कारण त्याचे हाडगताचे सांधे तपासल्या पासून त्याची शक्ति व गति समजते. त्याच्या मांसलतेवर, खोलीवर व रुंदीवर शक्तीचें ज्ञान होतें. ह्यांचबोन (मांडीचें हाड) रुंद नसेल तर शेपटीची मांडणूक खोलगट ह्मणजे गाडीचे घोड्याची सांगितली त्या प्रमाणें असते. जर मांडींत खोली व रुंदी नसेल तर त्याचे चालण्यांत मंदपणा आणि अप्रशस्थता असते. मांडी पसरट व रुंद असेल तर तो घोडा चांगल्या औलादीचा व त्या पासून बसणारास कधीं इजा होणार नाहीं ह्मणून समजावें. मागील पायाचे गुडघ्याचा जोड ( हाक जाइन्ट ) हा पातळ हाडाचा, रुंद व चपटा असावा. जितकें काळीज लांब असेल त्या मानावर त्याची रुंदी अवलंबून असते. हाक जाइन्टचे मागला भाग (असकं-

ह्मिज ) ह्याच्या शिरा बळकट असाव्यात ह्मणजे तंगड्या चांगल्या वळतात. जर गुडघ्याचा सांधा आंखूड व तरतरीत नीट असेल तर त्याचें पाऊल कमी पडेल, तें जर लांब आहे तर चांगलें वळून जलद पडेल. घोड्याचे मागील पांय त्याचे मागें उभे राहून पहावेत. त्याच्या मांड्या रुंद, सरळ व उतरत्या असाव्यात, त्याचा कल गुडघ्यावर किंवा मनगटावर आंत बाहेर नसावा, ह्मणजे सर्व शरिरावर सारखें वजन राहतें. राबलेल्या घोड्याचे मागले पाय जेव्हां तो उभा राहील तेव्हां समोरासमोर असतात. स्टायफल जाइन्टची दोरी जेथें पडते त्याच्या मागें तीन चार इंचाचे प्रमाणानें समोरासमोर उभे राहवें. जर या पेक्षां मागें असतील तर त्यास मागले पायाचा ह्मणतात. त्याचे मागीळ पायाचे वळणावर त्याची गति असते. लवणांत कमी किंवा जास्त होणें हें त्या घोड्याच्या मागीळ गुढघ्याचे ( हॉक जाइन्टचे ) लांबीवर आहे.

बरेच लोकांचा असा समज आहे कीं, घोड्यांचे विशेष रंगावर त्यांच्या बऱ्या वाईट गुणांचा संबंध असतो. तो असा कीं, त्यांचा अंगस्वभाव व चंचळपणा कामाला योजणेविषयींचा त्यांचे कातड्याचें रंगावरून समजतो. चांगले औलादीचे घोड्याचे जातींत कांहीं रंगाचे घोडे नसतात. परंतु साधारण औलादीचे घोड्यांत पुष्कळ तऱ्हेचे रंग असतात असें पुष्कळ वेळां आढळतें. परंतु तेही चांगल्या औलादीचे असावेत असें वाटतें कारण त्याच्या तऱ्हेतऱ्हेच्या रंगावर त्यांची किंमत वाढते असे रंग असणें हें त्याचे मागील पिढीवरून समजलें पाहिजे. घोड्यास कांहीं रोग किंवा चंचळपणा असणें हें त्याच्या आईबापाच्या प्रकृतीवर अवलंबून असतें; जसे त्याचे आईबाप यांचे गुण असतील त्याप्रमाणें त्याचे गुण होतात ह्मणूनच रंगही तसाच होईल. पुष्कळ वेळा असें समजण्यांत आलें आहे कीं, पांढऱ्या रंगाच्या तंगड्याचे घोड्यांस पायाचे रोग ( क्रॅक आणि ग्रिस ) हे

त्यांचे आईबापास होते ह्मणून त्यांस झाले. नेहमीं पांढऱ्या टांचेचे घोड्यास हे रोग होतात असें पहातों तरी माझें मत्त असें आहे कीं, पांढरे रंगाचा व रोगाचा कांहीं संबंध नाहीं तर पांढरे रंगाच्या तंगड्या अशक्त नसतात तर पांढरा रंगच कमजोर आहे असें समजावें. पांढऱ्या रंगाचे तंगड्यास कसलाही डाग सहज पडतो. तो डाग स्वच्छ करण्याकरितां घोडेवाला त्याचे पाय वारंवार धुतो परंतु तो कोरडे न करितां आपोआप सुकण्यास त्या तंगड्या तशाच ठेवतो असें वारंवार केल्यानें ओलसरपणा पासून सर्दी उत्पन्न होते व पायांतील चिकटपणा निघत नाहीं त्या योगानें ती जागा नरम व लवचिक होते. पुढें सूज येऊन त्याचे खूर फुटतात हा त्याचा परिणाम होतो. जरी धुवून कोरडे केले तरी पांढरे खुरांचा परिणाम असाच, कारण वारंवार ओले पाय करण्यानें खुरांचें शिंग कडक किंवा फुटिर होतें.

करडे रंगांत चार भेद आहेत ते असे. पांढरा करडा (मचना), तांबूस करडा ( उंबरा ), अबलक करडा व गोमाशे करडा. इतक्या रंगांचे घोडे चांगले असल्यामुळें त्यांस किंमत जास्त आहे परंतु त्यांचे केंश गळून पडण्याचे ऋतूंत वरील स्वाराचे कपडे खराब होतात. अबलक करडा हा लोकांना फार आवडतो. काळसर करडा हा पुष्कळ आवडतो. कारण त्याचा रंग पुष्कळ दिवस राहतो व हा रंग लोकांस फारच आवडत असल्यामुळें त्या रंगाची इतर रंगांपेक्षां फार सुधारणूक झाली आहे. अशा रंगाचे चांगले औलादीकडून घोड्या काढवितात.

चित्रविचित्र रंगाचा घोडा हलक्या फैटन गाडीस जरी जोडीचे एक रंगी असले तरी फार करून लावीत नाहींत. चेसनट तांबडा ( बोर ) रंगाचे घोड्यांत तीन जातीचे रंग आहेत ते कुमाईत, फिक्का अगर सावळा, आणि तेलीया किंवा तांबडा काळसर हे होत. फिक्या

रंगाचे घोड्यास पांढऱ्या रंगाचे केश असतात. त्याचा सर्व चेहरा व पाय पांढऱ्या रंगाचे असतात. त्याचा देखावा •प्रकाशित दिसतो. त्यावरून तो कमकुवतीचा दिसतो. तांबडा काळसर ( तेलीया बोर ) ह्या रंगाचा घोडा निरोगी आणि सोशिक असतो, परंतु जलद व शांत स्वभावाचा असतो. त्याचे खूर इतर रंगांचे घोड्यापेक्षां पाळथे व आंखडलेले असतात.

बे ( कुमाइत ) ह्या रंगाचे अनेक प्रकार आहेत ते असे ब्राइट बे, यलो बे, ब्रोन बे, डार्क बे, डॅप्लेड बे ( अवलक कुमाइत ) हा रंग निवडक आहे. तसाच गैरा कुमाइत ( ब्राइट बे ) हाही निवडकच आहे. ह्याची अयाळ व शेंपूट हीं काळ्या रंगाचीं असल्यास ह्यास चांगला समजतात. काळा कुमाइत ( डार्क बे ) ह्या रं-गाचे घोड्याची अयाळ व शेंपूट जाडे व तंगड्या काळ्या असतील तर तो घोडा अधिक चांगला समजावा. यलो बे अथवा ब्रोण ( पिंवळा किंवा तपकीरी कुमाइत ) ह्या रंगाचे घोड्याची औलाद आलीकडे बरीच प्रगट झाली आहे.

बदामी रंगाचा घोडा तऱ्हेवाईक लक्ष देण्यासारखा जरी दिसत नाहीं तरी चांगल्या औलादीचे चांगले असतात त्यांचा थाट कुमा-इना प्रमाणें नसतो परंतु ते बळकट असतात व उपयोगीही आहेत.

डार्कब्रोन ( काळा कुमाईत ) हा रंग असून त्याचें मुसकट काळें आहे तर त्या घोडयाचे चांगलेपणाची ही एक खूण आहे असें समजतात.

ब्लॅक ( काळे रंगाचा ) घोडा कावराबावरा असतो. रोगी, खोडकर आणि डोळपामध्यें वाईट इतके गुण ह्याचे अं-गांत इतर घोड्यांपेक्षां जास्त असतात. काळे घोड्याचे डोळ्यांतील बाहुली त्याला सुंदरपणा देते. त्याचें तोंड किंवा पार्श्वभाग हा जर ब्रोन ( तपकीरी ) रंगाचा आहे तर चांगला.

**अभ्यंतर परीक्षा.**—कितीही चांगला परीक्षवान निष्णात् असला तरी एकदम चांगली परीक्षा करितां येणार नाहीं. घोड्याची परीक्षा फार बारकाईनें केली पाहिजे. व ती कांहीं दिवस त्याचे सहवासावर केली पाहिजे. परंतु अशा करारावर घोडा विकत मिळणें कठीण ह्या साठीं जितकी चांगली परीक्षा होऊं शकेल तितकी मन लावून करावी आणि मग पसंती प्रमाणें घोडा विकत घ्यावा. कित्येक घोड्यास पाणी पाजल्यावर किंवा दाणा खाल्यावर किंवा दोन तीन दिवसानीं किंवा त्याचें ठाण बदलल्यानें ढास लागते. थोड्या दाशांचे घोड्यास खाण्याचा चांगला बंदोबस्त ठेवल्यास अगर जुलाब दिल्यास त्याचा ढास दहा पंधरा दिवस पर्यंत बंद राहते परंतु मग फिरून पहिल्यासारखी उत्पन्न होते. ह्या साठीं घोड्यास सहवासून पाहिल्या शिवाय खरेदी करूं नये. जो घोडा विकत घ्यावयाचा तो ज्या ठिकाणीं बांधतात तेथें मोठ्या सकाळीं जाऊन ठाणावर पहावा म्हणजे त्याचे पाय मुजीर आहेत कीं काय ताठपणा आहे कीं नाहीं हे समजेल. कोणताही घोडा तपासणें तो त्याजकडून काम घेण्यापूर्वी म्हणजे [illegible] थंड असतांना तपासावा. जर घोड्याचे पायात लंग असेल तर तो लंग काम करून आणल्यावर लागलाच तो अयब समजुनींत येणार नाहीं. जर घोड्याचे पाय मुजीर असले तर त्यास थोडा दुडकीवर चालवून व त्याचे पाय स्वच्छ करून सवदागर लोक त्याचा तो अयब दृष्टोत्पत्तीस आणूं देत नाहींत. सकाळच्या प्रहरीं तबेल्यांत तपासणें ही वेळ घोड्याचे अयब दृष्टोत्पत्तीस येण्याची आहे. घोड्यास दम्याचा अजार किंवा खोकल्याचा अजार किंवा (क्रिबबिटिंग) चावण्याची खोड व श्वासोश्वास कसे येतो वगैरे दुर्गुण उघडकीस येण्यास मोठे सकाळची वेळ चांगली असते. याकरितां जेव्हां कांहीं गोंगाट किंवा धामधूम नसेल तेव्हा तेथें घोड्यास तपासावें. अशा जागेंत व अशा वेळीं जर

न तपासता गडबडीचे टिकाणीं तपासला तर घोड्याचे पायांत थोडका लंगडेपणा असल्यास तो दिसून येणार नाहीं.

घोडा प्रथम महाजिक रीतीनें उभा करावा. तेव्हां तो आपले शरीराचा तोल दोन्हीं पायावर सारखा ठेवतो. जर पायांत कांहीं व्यंग असेल तर एक पाय पुढें मागें ठेवील व वारंवार पाय बदलील ह्मणजे एक पाय उचलून धरील व एक जमिनीवर ठेवील व मागले पाय पोटाकडे आणील ते अशा करितां कीं, पुढील पायांवर वजन कमी पडावें. अशा प्रकारें ज्याचीं चिन्हें दिसण्यांत येतील त्याचे खुरामध्यें कांहीं रोग असल्यास ते विना नाल काढल्या खेरीज समजणार नाहींत. नाल असताना पाय चांगले दिसतात. परंतु तेच पाय नाल काढून पाहिल्यावर दिवाळीचे शिंगाचा रोग कळून येतो. घोड्याची प्रकृति निरोगी आहे कीं नाहीं हें त्याचे श्वासोश्वासावर पाहावें. त्याच्या कुशीनें उडणें कमजास्ती किंवा सारखें आहे हें पहावें. निरोगी घोड्याच्या कुशी एका मिनिटात चार पासून आठ वेळा उडतात. एकंदर एका दिवसात एका मिनिटांत सहा वेळ कुशी उडतात आणि झोपल्या वेळेस एका मिनिटांत चार पेक्षां क्वचित जास्त उडतात. ह्या नियमाविरुद्ध जास्त उडूं लागल्या तर त्या घोड्यास ताप येणार आहे किंवा त्याचे लग्ज ( फुप्फुस ) बिघडले आहेत ह्मणून समजावें. जर घोड्याच्या भकाळ्या तापाच्या योगानें उडत आहेत तर त्यास पुढें सांगितलेलीं चिन्हें आलीं पाहिजेत. त्याच्या नाड्या जलद चालतील, तोंड गरम होईल, सुस्तपणा येईल आणि त्याचे रंगांत फिकेपणा येईल. जो निरोगी असतो त्याचे नाकपुड्याचा रंग टवटवीत असतो. अशक्त प्रकृतीचीं किंवा तापाचीं हीं चिन्हें दिसत नसतील आणि त्याच्या भकाळ्या नियमापेक्षां जास्त उडत असतील व हवा मध्यम आणि तबेला फार गरम नाहीं तरी त्याच्या भकाळ्या जास्त उडतात तर त्या घोड्यास थिकवुइन्ड-

चा अजार आहे असें समजावें. श्वासोश्वास जलद घेतो व सोडतो हें फार धांवण्याचें किंवा जास्त श्रमाचें काम पडल्यास होतें. परंतु नियमीत कामांत असते वेळीं जर त्याच्या मकाल्या आकस्मात जास्त उडतील व श्वासोश्वास जलदीने व श्रमानें सोडील तर त्यास ब्रोकन वुइन्डचा (धापा टाकण्याचा) अजार आहे असें समजावें आणि अशा अजारांत खोकल्याचाही अजार असतो तो समजणें कठीण आहे. खोकल्याचा अजार होण्याचा अमला ह्मणजे घोड्याचा गळा कोरडा राहतो. कारणपरत्वें चांगले व ब्रोकन वुइन्डचे घोड्यास कधींहि खोकला नसतो. खोकला समजणें हें त्याचे (वुइन्ड लॉरिंग्ज पाइप) घशाचे नळीचे कठीणपणावर आहे. कठीणपणा नसतांनाही ब्रोकन वुइन्डचा अजार होण्याचें चिन्ह तो अजार कुशी (मकाल्या) अनियमितपणानें उडाल्या ह्मणजे समजावें.

घोड्याच्या कुशीचे, डोक्याचे व शेंपटीचे केंस घोळले असतां अगर घोड्यानें इतक्या ठिकाणीं स्वतः चावले आहेत असें दिसेल तर त्या घोड्यास खरूज होण्याची भीती आहे. ज्या घोड्याची त्वचा खरबरीत आहे त्यास खरूज होतेच. अंधेर आहे अशा तबेल्यात घोडा बांधला असता तेथून तो उजेडांत आणते वेळेस कान चंचल करील, भ्यायल्यासें दाखवील, पाय उंच करील, व मागें हटेल तर जरी त्याचे डोळे चांगले दिसतात तरी त्याचे डोळ्यांत कांहीं अजार आहे असा संशय घेतला पाहिजे.

घोडा तबेल्या बाहेर आणून पहाते वेळेस तो आपले पाय स्थिर ठेवून मागले पायाचे मागील नळीवर ह्मणजे मागील गुडघ्याचे खालचे नळीवर व मनगटावर सारखें वजन ठेवून उभा राहिला पाहिजे. जर ते समयीं घोडा आपला पुढला भाग हालवील किंवा कांपवील तर त्याचे पायांत इजा आहे असें समजावें. अशा घोड्यास (आगी)

ह्मणून एक प्रकारचा अजार होतो. त्या अजाराचें चिन्ह दुसरें आणखी एक असें आहे कीं, तो आपला गुडघा बाहेर करतो व गुडघ्याचे मार्गे दावळा असतां वळवून आंत घेतो. आपले शरीराचा तोल आंगठ्यावर ठेवतो खुरावर ठेवीत नाहीं हेंही एक त्या रोगाचें चिन्ह आहे. घोडा लहान वयाचा असून बसायास शिकण्यापूर्वीं त्याचे गुडघ्याचा आकार वाईट असेल तर तो घोडा अशीं चिन्हें करतो. परंतु त्या शिवाय आणखी एक चिन्ह ह्मणजे त्याचे अवयव ( इंद्रियें ) कांपरीं असतील तर खचित त्यास पायाचा अजार होईल सबब तो घेऊ नये. पुढील पायाचे दोन खुरापैकीं एक खूर फार तरतरीत आहे तर तो पाय रोगी आहे असें समजावें. घोडा त्या पायावर आपला तोल ठेवीत नाहीं. ज्या घोड्याचा असा तऱ्हेवाईक अंगस्वभाव आहे त्याचे पायास रोग होऊं लागला आहेच असें समजावें. अशी आदत उभी राहाण्याची फार दिवसापासून आहे तर त्याचे पाय ( खूर ) कांहीं भिन्न आकाराचे असतात. त्याच्या खांद्याचे व बाहूचे स्नायु आंखडलेले ह्मणजे कमी आकाराचे असतात. घोड्याच्या पुढील तंगड्या बरोबर स्थितींत असाव्या. मनगट अशक्त नसावें व त्याचे वरचा भाग ( ह्मणजे सुंभ ) मोठा नसावा. खूर सारखे आकाराचे व त्यानें उभें रहाणें सारखे समोरासमोर असावें ह्मणजे चांगलें. घोड्याच्या स्वस्थ प्रकृतीची परीक्षा त्याचे श्वासोश्वासाचे स्थितीवर व डोळ्याचे तेजीवर व पापणीचे पातळ पड्यावरचे रंगावर आणि नाकपुड्याचे पातळपणावर आणि रंगावर आहे. हे रंग पांढरे, तांबडे व फिक्कट असतात. जर फार लालभडक रंग आहे तर त्याचें शरीर व प्रकृति प्रफुल्लीत असते. जर फिका पांढरटपणावर असेल तर त्याची प्रकृति अशक्त किंवा तो कमजोर आहे समजावें.

घोड्याच्या दोन्ही नाकपुड्या एका मागून एक दाबून पहाव्या, आणि त्यापासून श्वासोश्वास होण्यास कांहीं अडथळा आहे कीं काय

हें पहावें. त्याच्या नाकाचें टोंक बारिक नसावें. नाकपुड्यांतून श्वास जातां येतां शेंबूड निघेल तर त्यास थोडा खोकला व थोडी थंडी झाली आहे असें समजावें. नाडी जलद चालते. त्या बरोबर डोळ्यासही ईजा होते. त्याच्या खालचे जबड्याच्या शाखा तिव्र होऊन तेथील मासाचे गोळे मोठे होतात. त्या जरी नरम व चलन वळण होणाऱ्या आहेत तरी त्यास शेंबा ( पडसें ) ह्या पेक्षां जास्त अजाराचें चिन्ह नाहीं. कोणत्याही अजाराची परीक्षा करतांना त्याचे वयाचीही परीक्षा करावी.

तरूण घोड्याचें डोकें तपासते समयीं त्याच्या कपाळाच्या शिरा उष्ण, सुजलेल्या व नरम लागतील आणि नाकपुड्याचे पडदे तांबडे झालेले दिसतील व दोन्ही नाकांतून शेंबूड वहात असेल तर त्यास ताप व खोकला आहे असें समजावें. त्या शिवाय त्यास (स्ट्रॅंगल) चा अजार होईल असें अनुमान केलें पाहिजे. जर ताप व खोकला नसेल आणि फक्त डावे नाकपुडींतून शेंबूड वहातो आहे तो शेंबूड चकचकीत व चिकट असेल आणि जबड्याचे हाडाला मासाचा गोळा चिकटून राहिला असेल तर त्यास ग्लॅन्डर हा रोग होईल. नाकपुड्याचे पातळ पडदे व पांढरे फिक्कट रंगाचे दिसतील आणि त्याजवर उष्णतेंच फोड असतील तर त्यास ग्लॅन्डर रोग खास आहे असें समजावें. डोळ्यांतुन जें नाकाच्या नळींतून नाकांत पाणी येतें, त्या नळीचें द्वार तपासण्यास हयगय करूं नये. त्याचें चेहऱ्यावर किंवा डोक्यावर कांहीं चीर पडलेली नाहीं हें पहावें; जर असेल तर त्यास भयंकर रोग होईल असें समजावें. शेंडीची जागा पूर्ण कठीण स्थिर असावी व मानेला चिकटून असावी. जर पोकळ व ढिली असेल तर तो चांगल्या स्थितींत नाहीं. त्याचें कातडें नरम व तुळतुळीत असतें. त्याचे स्नायूस स्पर्श केला असतां ते कठीण लागतात. ह्यातांऱ्या घोड्याचें डोकें लहान होतें व चांगलें दिसतें. त्याचें रुप तेजस्वी दिसतें.

मान चांगली असते. वसवंड आंखूड असते. पाठ खोल असते. ओं-ठांवर सुरकुत्या असून पातळ असतात. खालचा ओंठ लोंबूं लागतो. तरूण घोड्याचा बांधा वाटोळा, घट्ट, तोंड टवटवीत, असतें वयातीत घोड्याचे नाकाचे हाडामध्यें केव्हां केव्हां खांडी पडलेल्या असतात. घोड्याचे छेदक दांत लागून व घट्ट असतील तर तो घोडा तरूण समजावा, व जस जसा तो वाढतो तसतसे त्याचे दांत लांब होतात व हिरड्या सुटूं लागतात.*प्रथम घोड्याचे डोळे पहावे ते चांगले असल्यास दुसरीं चिन्हें पाहून त्यांत कांहीं खोड न निघेल तर मग चालवून पहावा. साधारण चाल चालविल्यावर मग दुडकीवर चालवावा.दुडकी चालवतांना त्यास चाबूक मारूं नये, ह्मणजे त्याचे चालींत जे दोष असतील ते दिसून येतील. त्याचे चालण्याकडे ह्मणजे तो पाऊल कसें काय टाकतो याजकडे चांगलें लक्ष्य द्यावें व त्याच्यांत लंगडेपणा नाहीं याची खातरी करून घ्यावी. जर घोड्याचा पुढचा एक पाय अधू असेल तर तो आपलें डोकें चालतांना खालीं वर करतो. पूर्वी लंगडा घोडा असेल तर तो चांगल्या पायावर चालते वेळेस त्याचें डोकें खालतीं होतें. जेव्हां लंगडे पायावर ओझें पडतें तेव्हां डोकें वर करतो. त्याचा पाय लंगडा असल्यानें त्या पायाची गति मंद असते. दोन्ही पाय मृदु असतील तेव्हां त्याचे गतीची परीक्षा करणें कठीण आहे. परंतु त्याचें पाऊल तोकडें पडतें हें खचित आहे.

घोडा दुडकीवर चालतांना त्याची चाल जर चांगली असेल तर त्याचें पाऊल पुढें मागें चांगलें पडतें. दंड व गुढघा यापासून त्याची गति निघाली पाहिजे. मागले पाय घोट्याखालीं बरोबर आले पाहिजेत. त्यानें आपळे आंगठे जमिनीपासून नीट उठवले पाहिजेत; ह्याविरुद्ध जर दिसेल तर तो घोडा खोडकर आहे असें समजावें.

---

*टीप*—या संबंधी विशेष माहिती दंत परीक्षेचे भागांत पहावी.

दुडकीमध्यें पुढील पायांनीं हलका जावा व मागील पाय उत्साहानें टाकावे, शरिराचा तोल पुढें असावा. धरसोड करून चालेल तर तो घोडा नीट नाहीं, त्यास जरी शिकवलें तरी तो चांगला होणारा नाहीं. चांगलाही घोडा केव्हां केव्हां आडखळतो. त्याचें कारण चाबूक व ममरेज ह्यांची भीति होय. परंतु ही खोड त्यास फार दिवसांची असावी. अशा वेळीं तो चांगलें नीट चालतो कीं नाहीं हें पहावें. गाडीच्या घोड्याचें डोकें व शेंपूट घड्याळाचे पेंड्यूलम सारखें हालेल तर तो चांगल्या औलादीचा समजावा.

**घोड्याची दुसरी परीक्षा**—घोड्यावर बसून त्यास कठीण किंवा दगडी रस्त्यावरून चालवून पहावा. जर थोडा लंगडेपणा असेल तर तो त्यावेळेस कळून येईल. चांगला घोडा सरळ लाइनींत चालतो, गुडघा नीट वळवतो, स्थिरतेनें पाऊल सारखें न भितां टाकतो व डोकें हालवीत नाहीं त्याचे मागले पाय त्यानें चांगले रीतीनें उचलावे. व त्याची मुरड चांगली त्याच्या पोटा खालीं यावी. टेकडी चढतांना त्याचे पुढील पाय सारखे जातील व त्याचे मागील पायही त्याचप्रमाणें चालले पाहिजेत. सुंभाचा आंगठा फरकटूं नये. सात्रक चालतांना पाय उचलून जलदीनें चालावा आणि उसळून मांडी चांगली वळावी ह्मणजे मागील पायांचे तंगड्यांचा झोंक मागें राहूं नये तर तो घोडा चांगला चालेल. घोडा अशा रीतीनें चालला असतांना परीक्षकानें तो जेव्हां सात्रक चालींत त्याचे जवळ येतो तेव्हां त्याणें त्याचे श्वासोश्वासाची परिक्षा करावी. थिक्‌वुइन्ड अजाराचा घोडा श्वासोश्वास फार कष्टानें सोडतो आणि लवकर कासावीस होतो, भकाऱ्या जलद चालतात व फार उडतात आणि किंचित् ध्वनि निघतो. मेहनतीनें भकाऱ्या जशा उडतात तशा ह्या उडत नाहींत. नेहमीं ठाणावर रहाणारा, व ज्यास व्यायाम फार नाहीं, आणि शरिरानें फार लठ्ठ, त्या घोड्यास भरल्या पोटानें काम करतेवेळेस थिक-

बुइन्डचीं चिन्हें दिसतील. असेंही पहाण्यांत आलें आहे कीं, जो घोडा पुष्कळ खाऊन लठ्ठ झाला आहे त्या घोड्याचे श्वास मैल दोन मैल गेल्यावांचून किंवा पसिना (घाम) आल्यावांचून बरोबर वहात नसतात. ते जरी दुसऱ्या घोड्यांपेक्षां काम जास्त करण्यास लायक असतात तरी ह्या हरकतीमुळें तितकी मेहनत त्यांस होत नाहीं.

ज्या घोड्यास थिकवुइन्ड शिवाय (विझर) घरघर आणखी आहे, आणि दमेकरी मनुष्याप्रमाणें त्याचा आवाज घाईच्या वेळीं जसा निघतो तसा असेल तर तो वाईट आहे.

अशा विझर घोड्याचा स्वस्थ असतांनाही केव्हां केव्हां अवाज निघतो. घरघरीमध्यें आणखी एक प्रकार आहे त्यास पायर अथवा व्हिस्टलर ह्मणतात, ह्मणजे त्याचा अवाज पोंवा किंवा शीळ वाजवणें ह्यासारखा निघतो. ही खोड ह्मणजे हा अवाज विझरपेक्षां कांहीं बारीक व कर्कश आहे. हा मेहनत केल्यावरच दृष्टीस येतो. तो कांहीं वेळपर्यंत असतो. चढणीला जेव्हां सात्रक चालीनें घोडा जातो तेव्हां ही खोड असल्यास लागलीच कळून येते. व्हिस्टलरचा घोडा लवकर दमतो अगर हैराण होतो. ह्याकरितां व्हिस्टलरचा रोग असलेला घोडा कधीं विकत घेऊं नये.

रोअरिंग ह्मणजे एक तऱ्हेची घरघर आहे. जेव्हां घोडा काम करीत असतो तेव्हां ही खोड दिसण्यांत येते, स्वस्थपणांत येत नाहीं. मेहनतीचे वेळेस त्याचे श्वास जलद चालतात व अवाज वाढतो, हें जशी त्याची मेहनत असेल याप्रमाणें होतें. दुडकी चालण्यांतही असा शब्द निघतो.

सवदागर लोक ह्या खोडी दृष्टोत्पत्तीस न याव्या ह्मणून घोडा पहिल्यानेंच दवडतात व परत येतेवेळेस हलके सात्रकीनें आणतात ह्मणजे त्या वेळेस त्याचे श्वासोश्वास कमी होतात. हा रोग फुप्फुसयास

सूज असल्यानें किंवा श्वासोच्छ्वासाचे स्थितींत फेरबदल झाल्यानें होतो. केव्हां केव्हां काम घेतल्यावर किंवा स्वस्थपणांत आठवड्यांतून एखादे वेळेस हा दिसण्यांत येतो. यास्तव घोड्यास तपासणारांनीं त्यास जलद सात्रकीवर चालवून पहावा. धांवेचा घोडा तपासण्याची साधारण रीत ह्मणजे ज्या घोड्यास खोकल्याचा अजार असतो व त्यांत ज्या घोड्यास खोकल्याबरोबर ठसका असून कुंथणें व रेकणें असेल त्या घोड्यास तो अजार निश्चयानें आहे असें जाणावें. परंतु जर खोकला दृष्टीस पडत नाहीं आणि संशय असेल तर कसबी मनुष्याकडून त्याची तपासणी करावी. कारण साधारण अश्व असतात ते थोडके वेळांत कळून येत नाहींत.

घोड्याचे चालींत जर आपल्यास कांहीं संशय येण्यासारखीं चिन्हें असतील तर त्याचे सर्व शरीराचे भाग बारीक रीतीनें तपासावे. घोड्याचे कपाळावर किंवा गुडघ्यावर कांहीं भाजल्याचा किंवा क्षताचा डाग दिसेल तर त्या घोड्यास मेग्रिम ( मिरगी ) किंवा ( स्टॅगर ) वेड लागणें हा अजार पूर्वी आला होता असें समजावें. मान खरारा करून पहावी. गळ्याच्या शिरा बरोबर आहेत कीं नाहींत हें पहावें. खरारा करून किंवा चोळून पहावें ह्मणजे मानेच्या खालचे भागावर पुर्ता जोर पडून शिरा टवटवीत दिसतील व त्यावरून त्याची खरी स्थिती कळेल. चांगल्या शिरा असल्या ह्मणजे त्या हाताला लागतात व फुगीर दिसतात. जर त्या शिरांपैकीं एखादी कमी दिसेल तर त्यास पूर्वी स्टॅगर अगर अपोप्ल्याक्टीक हा अजार झाला होता असें समजावें.

खांद्याचा जोड व बसवंड खोगीरापासून दुखावलें कीं काय हें पहावें जर दुखावलें असेल तर त्या ठिकाणीं सूज व गर्मी राहते. पाठीला जर थोडी सूज असेल तर तो घोडा बरेच दिवस बसण्याचें उपयोगीं पडणार नाहीं. उडी मारून त्याजवर बसते वेळीं तो

उपायी (दोन पायांवर) उभा राहील. खांद्यावर कांहीं गांठ वगैरे झाली आहे कीं काय हें पहावें, जर त्याजवर भाजलेलें किंवा डाग दिलेलें चिन्ह असेल तर पूर्वीं तेथें दुखापत होती असें समजावें, व पायांत लंगडण्याची दर्द आहे असें नव्याण्णव वाटेनें आढळेल. टांचेस डागाची व वाटोळी निशाणी असेल तर खुरांत कांहीं रोग झाला होता ह्मणून समजावें.

ऊर व छाती नीट तपासावी. त्याजवर ब्लीस्टरानें किंवा डागानें किंवा पोतानें भाजल्याचें चिन्ह असेल तर त्या घोड्यास छातीचा किंवा फुप्फुसाचा सुजीरपणा हे दर्द पूर्वीं होते ह्मणून समजावें. पूर्वापार संबंधानें त्या घोड्यास भरसात्रक चांगला चालवून पहावा ह्मणजे त्यास नेहमींची ही खोट आहे कीं काय हें कळून येईल. अरुंद छातीचे घोड्यास तर अगत्य असें तपासलेंच पाहिजे.

गुडघा नीट तपासावा. प्रथम तो ज्या आकारांत असणार त्या आकारांत आहे कीं नाहीं हें पहावें. नंतर गुडघ्या वरचें कातडें निघालेलें होतें कीं काय हें पहावें. कातडें निघालेली खूण असल्यास अथवा डाग दिल्याची खूण असल्यास तो घोडा चालतांना ठेंचाळतो असें अनुमान करावें.

गुडघ्यांत अयब असण्याचीं पुष्कळ कारणें आहेत. पायाखालीं दगड वगैरे आला असतां तो अडथळा निवारण करण्याकरितां वांकडे तिकडे पाऊल टाकल्यानें किंवा उडी मारल्यानें गुडघ्यास दुखापत होते, अगर फार मेहनतीनें किंवा विशेष थकल्यानेंही दुखापत होते. गुडघ्यांतला अयब अलीकडचा आहे व त्याजवर विशेष डागाची वगैरे कांहीं निशाणी नाहीं असें जरी असेल तरी त्याचे दुसरे अवयव चांगले बारीक रीतीनें तपासावे. त्यास चालवून पहातांना त्याच्या तंगड्या, खूर, नालबंदीचे खिळे जवळ जवळ आहेत कीं काय व नाल फार घट्ट आहेत कीं काय हें पहावें. पायांत जो

घोडा नरम आहे त्याचा आंगठा फार लांब उघडा राहिला तर तो आडखळतो. नरम पायास कंट्रूकशन, ग्रामीलेमनेस, कार्न्स हे रोग असतात. डोळ्याचे वरचे भागावर मस्तकाचे ठिकाणीं डाग असेल तर तो डाग द्व्यअर्थी नसतो परंतु संशय घेण्यास कारणभूत आहे. घोड्यास साधारण होणाऱ्या रोगापैकीं कोणत्या रोगावर हा डाग दिला आहे ह्याचा निवाडा होत नसेल तर मिरगी किंवा स्टॅगर रोग झाला होता ह्मणून समजावें.

जर घोड्याचे गुढघ्यावर डाग लहान व बमबंद तरतरीत व खांदा आणि मनगट मांसल याप्रमाणें असेल तर त्या गुढघ्यांत काय खरें हें तपासणें फार कठीण आहे. असें आढळून येतें कीं, जखम झालेले ठिकाणावर इतके केंस येतात कीं तेथें जखम होती असें समजत नाहीं यास्तव बारीक रीतीनें पहाण्यांत जर डागाचें चिन्ह कळून येईल तर त्या ठिकाणीं शिवलें दिसतें व केंस तिरकस येतात त्यावरून किंवा गुढघा वळवून पाहिल्यावर काय गुप्त व्यंग आहे तें कळेल.

सॅक्रम ह्मणजे नळीचें हाड तपासण्याचें कारण वगैरेचे रोगाविषयीं आहे. यास्तव त्या ठिकाणीं भाजल्याची किंवा ब्लिस्टर लावल्याची खूण आहे कीं काय हें पहावें. पायाच्या नळीचें लवचीक हाड मोठें झालें आहे अथवा त्यांत लचक आहे कीं नाहीं हें तपासावें. नुसते डोळ्यावरून घोडा चांगला आहे असें समजूं नये. ज्या घोड्याचे पायावर केंस फार आहेत त्या घोड्याच्या तंगड्या विशेष करून तपासाव्या. घोड्याचे हात ह्मणजे तंगड्या गुढघ्या पासून खालीं चांगल्या सरळ आल्या पाहिजेत व त्या तंगड्याचें पुढील व मागील हाड ज्यास (सॅक्रम) ह्मणतात तीं दोन्ही हाडें चांगलीं आकारांत असावीं, कमजास्त नसावीं, हें सॅक्रम चपटें असावें. संधी बंधनाच्या शिरा अगदीं वेगळाल्या असाव्या व त्या हातास कठीण

लागाव्या व त्यांची रचना नीट असावी. नळीच्या मागील हाड जर मऊ लागेल आणि लवचीक शिरांचें वेष्टण सुजलेलें असेल व एके ठिकाणीं हाडासहीत गोळा झाला असेल तर तें फार वाईट आहे. असें असल्यास हाडाचीं बंधनें तुटलीं आहेत असें अनुमान करावें. जर अस्तिबंधनें चिकटलेलीं किंवा सिथील असतील तर तीं सुजलेलीं असून त्यात लचक राहते. जर नुकतीच दुखापत झालेली आहे तर पायास सूज, गरमी व लंगडेपणा जास्त असतो. उपचार केल्यास कांहीं कमी होतो परंतु त्या लवचीक शिरा जाड रहातात आणि मुजीर असतात. घोडा दिसण्यात चांगला दिसतो व बांधा नीट, चालण्यांत कांहीं अगत्र नाहीं असें असेल तरी तो कामास लावला असतां लंगडा होतो. ह्याकरितां हें पक्कें लक्षात ठेवावें कीं, बेरहडीचे रोगाविषयीं खरेदी घेणारानें खरेदी देणारावरून जिम्मा घेतली पाहिजे. बेरहडी मोठीच असेल तर पायाचे तगडीचा मागला भाग नीट नसतो. जर लहान आहे तर तें हातावरूनच कळतें. ह्या बेरहडीस औषध (बिनिवोडाईड आफ मर्क्युरी आ-इन्मेन्ट) एक ड्राम घ्यावें. व दोन तोळे डुकरांचें तेलही एका ठिकाणीं मिळवून बेरहडीवरचे केंस काढून त्यावर तें तेल चोळावें. इतकें चोळावें कीं त्यातून पाणी निघूं लागेल, नंतर चोळणें बंद करावें. दिवसातून एक दोन वेळ तेल लावल्यावर ऊन पाण्यानें फोमेनटेशन करून शेकावें. लहान मोठे मिटेंकॅरपलचे हाडाशीं संबंध असणाऱ्या ज्या तंतुमय शिरा ह्या धक्यानें किंवा लचकेनें दुखावल्या असता सूज उत्पन्न होऊन घोडा लंगडूं लागतो. जेव्हां त्या शिरा मुजीर असतात, व त्यावर गांठी वाढूं लागतात, व हाडावरील आणि शिरावरील पडदे कठीण होतात, तेव्हां घोडा लंगडतो. गांठी बसून सूज कमी झाली व हाडें जिकडची तिकडे निट बसलीं म्हणजे लंगडेपणा राहतो. याप्रमाणें बेरहडी-

ची उत्पत्ति आहे. ती पुन्हां उत्पन्न झाली तरी याच प्रकारानें होते. बेरहडी फार मोठी असेल व चालण्यास अडचण करीत असेल तर त्यास मार लागण्याचा संभव आहे. सबब असा घोडा घेऊं नये. जर गुडघ्यापाशीं बेरहडी आहे किंवा बंधनापाशीं आहे व त्यापासून चालण्यास अडथळा होतो किंवा साफ चालता येत नाहीं तर अशा प्रकारचा घोडा घेऊं नये. साधारण असल्यास ती त्याच्या शोभेस वाईट आहे. ज्या बेरहडी समजुतींत येत नाहींत त्या फार वाईट व त्यांपासून लंगडेपणा घोड्यास प्राप्त होतो.

घोड्याचे कोणतेही शरिराच्या भागावर डाग दिल्याची अथवा ब्लिस्टर मारल्याची निशाणी आढळेल तर विकत घेणारानें त्याची फार खबरदारी ठेवावी. कोणत्या कारणाकरितां व कोणत्या उपायावर डाग दिला आहे हें शोधण्याचा इलाज करावा. जर ब्लिस्टर लावलें असेल तर त्या ठिकाणचे केसांचा रंग पालटतो व केस अखूड अखूड राहतात. अशा जागा लवकर समजण्यांत येतात. त्यांचा चकचकीतपणा कमी असतो व केस राठ राहतात. फेटलागजाइन्ट गुडघ्याचे खालीं (मुठा) ही पाय वळण्याची जागा आहे. त्याचा बांधा जर घोटाळ्याचा असेल तर तेथें कांहीं तरी दर्द आहे असें समजावें व अशा घोड्यास बारकाईनें तपासावा.

दोन्ही पायाचे मुठे सारखे आहेत किंवा नाहींत तें पहावें. जर सारखे नसतील तर त्यांपैकीं एकास लचक आहे असें समजावें किंवा त्याचे लिगमेन्ट (हाडांचें बंधन) तुटलें आहे असें अनुमान करावें, व त्यामुळें तो भाग नेहमीं कमकुवत राहतो.

जर नुकतीच दुखापत झालेली आहे, तर ती जागा ऊन लागेल व दाबलें असतां दुखेल व त्या ठिकाणीं उपचार केल्याची खुणही दिसेल. जरी घोड्याचे पायांत लंगडेपणा नसेल तरी तो पाय

अशु आहे असें समजावें. जर फेटलाग ( मुट्ठा ) व पॅस्टर्न ( मन-गट ) ह्या ठिकाणीं सूज किंवा बधिरपणा असेल, तर त्या घोड्याचा पाय भंग पावणारा आहे असें समजावें व त्याचे खुरांत दर्द असल्याचें चिन्ह दिसून येईल. जरी त्याचा आकार चांगला दिसतो आहे तरी तो पुष्कळ चालल्यावर व वाईट नाल केल्यावर त्याच्यांत काय व्यंग आहे तें समजून येईल.

घोड्यास जर फार दिवसाची कांहीं खोड आहे तर त्याचे नाल दुसऱ्या तऱ्हेचे ह्मणजे जाड व दिवालीचे बाहेरचे बाजूपेक्षां आंतील अंगास अरुंद असतात. त्या नालाच्या मेखा सुंभाचे वरचे बाजूला व आंगठ्याच्या वर्तुळाकडे ठोकलेल्या असतात अथवा कान-शीनें नाल घासलेले असतात, व फार नालाचे पुढें वाढलेला ठेवतात.

ज्या घोड्याची च्छाति अरुंद असते तो घोडा आपले पाय जवळ ठेवून उभा राहातो, त्यापेक्षाही आणखी जवळ पाय ठेवणारा घोडा दिसेल तर त्याचे पाय भंग पावणारे आहेत असें समजावें. त्या घोड्याचे नाल बाहेरच्यापेक्षां आंतल्या बाजूला पातळ असतात.

जो चतुर मनुष्य आहे तो हे सर्व अयत्न झांकण्याकरितां नाल तऱ्हेवाईक बांधून त्याची लावणी करतो. आंतील आंगास नाल अरुंद व सुंभाचे बाजूने दिवालीकडे कमी जाड ठेवून कानस-तो जरी असें केलें नाहीं तरी त्याची नखी पॉलीस ( साफ ) करतो.

सुंभाच्या दोन बाजवा आहेत, त्यांपैकीं आंतील आंगास नाल बाहेरच्या आंगापेक्षां उतरते करतात व त्याचा आंगठा वरती दाखवितात. तंगडीमध्यें ओझ्याचा भार सोसण्याचा जो अशक्त-पणा आहे तो अशा योगानें दिसून येत नाहीं, परंतु पायांतील इजा नाहींशी होत नाहीं. लहानपणीं शिंगरास लवकर कामास लावतात ह्यामुळें त्यास ही इजा होते.

जर सुंभाचें वळण कांहीं पुढें आहे तर खचीत त्या पायास कांहीं दुखापत झाली होती असें जाणावें.

सुंभाचे जोडाचे ठिकाणीं खालचे वरचे केंस चांगले तपासून पहावें कारण त्या ठिकाणीं भाजल्याची खूण वगैरे असते. सुंभाचे मर्मस्थानीं टोंचून जर बाधिरपणा झाला असेल तर तोही दिसून येईल व त्या ठिकाणीं गाठ व सुजिरपणा असावा असें दिसून येईल.

पॅस्टर्न (मनगट) ह्या ठिकाणीं चक्रवाळ रोग होण्याची जागा आहे ह्मणून त्या ठिकाणीं सूज आहे किंवा हाडें तुटलीं आहेत हें पहावें. पायाचीं तनुमय हाडें आहेत तीं नळ्यांखालीं वाढतात. पाया संबंधी पहाणें फारच आहे, परंतु साधारण इतकें पहावें कीं, त्याचे पायात रोगानें किंवा उपजत बाधा वाईट नसावी. लहान खराचे घोंड कांहीं उपयोगी नाहींत, व तसेंच फार मोठे खराचे चांगले नाहींत. पायाचे खराची दिवाल वाटोळी, गुळगुळीत, सारखी व काळे रंगानीं चकचकीत अशी असावी. पुढील बाजू पूर्ण असावी व त्याचा तिरकसपणा सारखा असावा व पत्रगापासून मोकळी असावी आणि तिस स्पर्श केला असता ती गार लागावी त्याचा त्रिकोन नालापासून पंचाळीस डिग्री उंच असावा जर कमी असेल तर तो तळवा रुंद असतो किंवा अन्टाकृति असतो. जर जास्त असेल तर घोड्याचा खूर आकुंचित असतो

खराचे बाहेरील बाजू जर सारखी नीट नाहीं तर त्या खुरास (सेली) असें ह्मणतात. पण सेली खूर चांगला नाहीं. खुरास उंचपणा किंवा फुगिरपणा किंवा आंगठीसारख्या त्याच्या सभोंवती खुणा असतील तर त्या घोड्यास तापाचा असार झाला होता असें समजावें व त्याच्या शिरांमध्यें कांहीं इजा राहिली आहे असें समजावें, ह्मणजे बारिक मज्जा, तंतु व शिरा ह्यांचमध्यें पाणी साचतें व त्याचा संबंध पाय आणि खूर ह्याशीं लागून असतो सळगा किंवा पोकळी खुराचे

अवळ असेल तर तो पाय वेगळा होईल असें खास जाणावें, जरी चांगल्या आकाराचा खूर आहे तरी पातळ व अशक्त नसावा. पातळ असेल तर त्यास खुरासंबंधी कांहीं तरी रोग असतो.

चांगल्या घोड्याचे औलादीमध्य मस्तक हलकें, मान उंच, खांदा भुजाकडे उतरता, अशा प्रकारचा घोडा जमिनीवर पाऊल सारखें ठेवतो, आणि टांचेकडील बांक नीट राहतो. पुतळी कठीण व सुखी व आकर्षण झालेली, व लहान खूर आणि टांचा तरतरित असल्या ह्मणजे खेचराचे खुरांची व त्याची साम्यता दिसते. जेव्हां खूर आकर्षित असतात तेव्हां कांहीं तरी त्या खुरांत रोग आहे असें समजलेंच पाहिजे. खुराचे आंतील भाग नीट तपासला पाहिजे. कारण त्या ठिकाणीं सॅन्डक्रॅक ह्मणून रोग असतो. टांचेवर चिरा नसाव्या, गरम व मऊही नसाव्या. पुतळी नीट असावी व सशक्त असावी, व दुर्गंधीरहित असावी. तळवा उंच टांचेचा, अशक्त अथवा फार जाड नसावा.

स्टायफल ( मांडीचें हाड ) ह्यांत बहुतकरून कांहीं रोग नसतो, परंतु त्यावर ठिकम्टरची किंवा डागाची खूण नसावी, खूण असल्यास तेथील हाड पूर्वी दुखावलें होतें असें समजावें.

मागील पायाचा गुढघा तपासते वेळस घोड्याचे मागें उभे राहून तपासावें. दोन्ही गुढघे सारखे असावे कमजास्त नसावे, व तपासतांना हातास तेथें उष्णता किंवा मृदुपणा लागूं नये. जर घोड्याचे मागील गुढघा तरतरित, अरुंद व नीट आहे किंवा त्याचे बंधनाचीं नरम हाडें जाड आहेत तर त्या गुढघ्यांत दर्द आहे. घोड्याचे मागील गुढघ्याखालीं तीन चार इंचाचे अंतरावर सूज किंवा त्याची बाजू मोठी नसावी असल्यास घोड्यास लंगडण्यापैकीं कांहीं इजा आहे. त्याचप्रमाणें हॉकजाइन्ट ( मागील गुढघ्याचा सांधा ) ह्याच्यावर व ळेकझर) ह्याच्यामध्यें गुडघा आणि पाय पुढें वाढून आला

असल्यास त्या घोड्यापासून फार काम घेतलें असावें असें अनुमान होतें.

मागील खुरें एकमेकांकडे वळल्यासारखे दिसलीं तर पूर्वी गुडघ्यांस कांहीं इजा होती असें समजावें. तसेंच गुडघ्याचें हाड मागल्या अंगास फार वळलें असेल, तर सदरप्रमाणेंच समजावें.

मागील पायाचा गुडघा अगदीं अंतर्गत गांठ व अस्थि असल्यास मांडीचे व गुडघ्याचे सांध्यामध्यें इजा होती असें समजावें.

खडकाळ जमिनीवर निजल्यानें किंवा धक्का पोहोंचल्यानें अथवा दुसऱ्या घोड्याचे लाथेचा मार बसल्यानें मागील पायाच्या गुडघ्यास इजा होते.

पायांत कर्व असणें म्हणजे मागील पायाचे गुडघ्याखालीं पांच चार इंचांचे अंतरावर, तंगड्यावर सूज असणें म्हणजे त्यास कर्वीहाक असें म्हणतात, आणि त्यापासून लंगडण्याचा संभव असतो. परंतु सूज केव्हां केव्हां न दिसली तेव्हां घोडा लंगडत नाहीं. परंतु असेंच निरंतर राहील असें खात्रीनें सांगता येत नाहीं.

थारोफिन् म्हणजे गुडघ्याच्या सांध्याचे वर शीर मोठी झालेली असते. असें होणें विशेष घोड्यापासून काम घेतलें असावें असें वुइंड्गाल्स्प्रमाणें ही खोड दिसून येते.

बाग् अथवा ब्लड स्पाविन म्हणजे मागील पायाचे गुडघ्यातील पुढले भागांत म्हणजे आंतले बाजूनें शीर मोठी होऊन सूज असते.

घोड्याचे मागील पायाचे आंगठे नालाचे बाहेर पडून आले असतील तर लंगडण्याची कांहीं इजा असते असें समजावें.

---

# भाग दुसरा.

## घोडयांचे रोगाविषयीं चिकित्सा, निदान आणि औषधोपचार यांचें वर्णन.

प्रथमारंभीं वात, पित्त आणि कफ प्रकृति कशी जाणावी हें सांगून औषध देण्याचें प्रमाण, काढे, घृत व तैल करण्याचा प्रकार व स्नेह परीक्षा ह्मणजे आहरांत पिंड व तद्रुपी तैल देणें व पाजणें, घृत, दुग्ध व मद्य ह्यांचें पान देणें व त्याची क्रिया, नश्य (नाकांत औषध घालणें), अंगाचा घाम काढणें, अनुवामन ह्मणजे तुप, तैल इत्यादिकांची पिचकारी मारणें, रक्त काढणें, डाग देणें, धातु परीक्षा व कर्मेंद्रियें वगैरेचे ठिकाणीं होणारे रोगांची परीक्षा व सामान्य औषधें ह्यांचें वर्णन केलें आहे. ह्यापुढें विशेष रोग होण्याचीं कारणें व ते रोग कसे समजावे ह्यांचें संक्षिप्त वर्णन देऊन त्यावर अनेक प्रकारचीं औषधें देण्याचा विधी व ज्या ठिकाणीं रोग झाला असेल त्या ठिकाणचें शारिर ज्ञान होण्याकारितां त्याचे चित्रासहित वर्णन वगैरे प्रकार ह्या भागांत वर्णन केलेले आहेत.

---

## अथप्रकृतिपरीक्षा.

ज्याचा रंग धुरकट व जो शरीरानें कृश, रुक्ष, सरळ व वेगवान व उर्ध्व वायु व ज्याचे मुखांत दोन्ही जिव्हा तो अश्व वातप्रकृती होय.

ज्या घोड्याचे अंगाची त्वचा तीक्ष्ण, व जो शितल पदार्थास इच्छिणारा, फार खाणारा व पीतवर्ण तो अश्व पित्तप्रकृती होय.

जो श्वेत वर्ण, अंगानें दृढ,क्षुधा व तृषा सोसण्यास समर्थ तो कफप्रकृती जाणावा. ज्याच्या प्रकृतींत मिश्र लक्षणें असतात तो मिश्र प्रकृती जाणावा. याप्रमाणें प्रकृति पाहून वैद्यानें दोषांचें व प्रकृतीचें तारतम्य ज्ञान मनांत आणून शास्त्रांत सांगितलेली चिकित्सा करावी.

**पित्तप्रकृती अश्व**—आंगीं राग न धरी । दया, लक्षण, निद्रा शयनावांचून करी ॥ अखंड हिस्से व गर्जना करी । मदनालागीं बहुत रोष धरी ॥ वर बसलें असतां स्वार ह्मणे तसें काम करी, । ननावराचे अगर युद्धाचे गलबल्याची चांचणी समजे ॥ त्यास उष्णता मात्र न साहे ॥

**कफप्रकृती अश्व**—जो सर्व गात्रें मिळवून चाले, वेग फार असे, निद्रा आली तर करी, हा सात्विक गुण जाणावा. स्वारास आसनीं सुख होय व ज्याचें मन चांगलें आणि बोलाविलें असतां जवळ येतो, स्वार ह्मणे तसें करितो, ज्ञानवंत सर्व लक्षणी परिपूर्ण तो कफप्रकृती जाणावा.

**वात प्रकृती अश्व**—ज्याचे हात पाय कठीण, बहुत लहान, मन चंचळ तो तामसगुणी वातप्रकृती अश्व जाणावा.

## अथ वात प्रकरणं शालिहोत्रे.

वायु आदिकरून त्वचांचा प्रकोप पूर्वोक्त कारणावरून झाला असतां त्याच्या अंडाचे ठिकाणीं कंप होतो, त्याचें रूप, भेद व चिकित्सा संक्षेपानें सांगतों. ज्या घोड्याचा वायु कफयुक्त झाला आहे, त्याचे वृषण फुगतात,त्यास वातांड रोग ह्मणतात.त्या योगानें शरीर शुष्क होतें व अंडास वेदना होतात. तेव्हां त्या अश्वास अंडाचे ठिकाणीं टोचावें.

## यावर औषध.

मुष्काचे ( अंडाचे ) ठिकाणीं शून्यता, लाली किंवा काळेपणा हे

विकार पित्त दोषानें होतात व फुटकुळ्या येतात तेन्हां वातांडाप्रमाणें शिरावेध करावा.

अश्वाचें वृषण कठीण व रुक्ष होऊन त्याची वेदना कमी होते, मूत्र मोठ्या क्लेशानें होतो, त्या वेळेस कफ व वात यांची पीडा आहे असें जाणावें. त्यास शिरावेध करून निरूहबस्ति कडू तेलाचें करावी, घाम आणावा, कोष्ट, अतिवीष, लोध्र, वेखंड, ज्योपह व रेणू यांचा कल्क करून दारू व मध यांसहित अश्वास पाजावा.

---

# अथ पित्तादि रोगपरीक्षा.

जो घोडा खालीं तोंड करतो, डोळे झांकतो, नेत्रांतून पाणी गाळतो, किंवा ज्याचे डोळे कांचेप्रमाणें दिसतात व तांबडे, पिवळे, हिरवे आणि निळे होतात त्यास पित्त झालें असें समजावें.

## त्यावर औषध.

प्रपौंडरीक, मध, चंदन, लोध्र हे एकत्र करून पाण्यांत द्यावें. षष्टी मधुयुक्त व गोमयानें शिपडलेली, चंदन, वाळा, लोध व पीठ यांचें पान द्यावें आणि अश्रुपाताचे ठिकाणीं शीर टोंचावी. गैरिक, अभ्रक, शंख, लोध्र, निळें कमळ हे समभाग पदार्थ आवळीच्या रसांत मर्दन करावे आणि जंबु, कुंभमाल, आवळी व वड यांचीं फुलें व फळें अथवा यांपैकीं मिळतील तीं आणून त्यांत तीं द्यावीं. तूप व मध हे पदार्थ खाऊ घालावे. कडू व आंबट वर्ज्य होय. नुसत्या तुपानेंच परिहार होतो असें जयदत्तानें सांगितलें आहे. पडोळ, वासक, निंब, गडूची व कंटकारिका हीं १० दहा पळें घेऊन द्रोणभर पाण्यांत शिजवावीं. त्यांत ८ आठ पळें त्रिफळा घालून चतुर्थांश कषाय करावा. त्यांत शेरभर तूप व दोन पळें त्र्युषण मिसळून अश्वास द्यावें म्हणजे खोकला, श्वास, हिक्का व गळगंड इत्यादि वात, कफ व पित्त

यापासून होणारे सर्व रोगांवर प्रशस्त होय. हें पंचतिक्तात्मक घृत, द्वंद्व, संनिपात यांवरही लागू पडतें.

## अथ पित्तादि चिकित्सा जयदत्त कृते.

पित्त उत्पन्न करणारे पदार्थ सेवन केल्यापासून पित्तज्वर उत्पन्न होतो. पित्तज्वरानें अश्वाचे शरीरास घाम येतो, उष्मा होतो व डोळे लाल होतात. असें झाहल्यास बोरीच्या पानाचें लेपन त्यास करावें. ओल्या ताडाच्या पंख्यानीं वारा घालावा. शर्करा व सुरसा मिसळून दूध पाजावें.

शफा, दूर्वा, दर्भ, दुध व पांढरीं कमळें यांचा लेप या अश्वास प्रशस्त होय. दर्भ, काशा, ऊंस यांच्या मुळ्यांचा कल्क व लाख, मंजिष्टा, साखर या पदार्थांनीं त्यास क्षीरबस्ति करावा. खाण्यास तूप आणि यवान्न प्रशस्त होय. पाणी थंड द्यावें व हरळीचें गवत घालावें.

क्रोधानें, अतिश्रमानें, किंवा कडू, आंबट व खारट अशा खाण्यानें व ग्रीष्म ऋतूंत वायु सेवन केल्यानें पित्तज्वर उत्पन्न होतो.

घोड्यास वात, पित्त, व कफ झाल्यास पिंपळी व निर्गुडीचा पाला व त्यांत सैंधव, मारंगमूळ, यांचें चूर्ण ऊन पाण्यांत घालून नाकांत घालावें ह्मणजे कफ व पित्त नाहींसें होतें.

दुसरा उपाय—कोंवळा लिंब आणून त्याचे रसांत शंख उगाळून वसंतकाळीं नाकांत घालावें ह्मणजे पित्त शमन होतें. पांढरा उंबी चंदन पाण्यांत उगाळून नाकांत घालावा. द्राक्षांचा रस त्याचे अष्टमांश तवकीर मिळवून नाकांत घातला असतां पित्त नाहींसें होतें. मध, साखर व दूध समभाग घेऊन व पटोल चूर्ण त्यांत मिळवून शरद्काळीं नाकांत घालावें ह्मणजे पित्त दूर होतें. वेखंड, काळीं मिरें, कोष्ट, सुंठ, शृंगीबल, थंडपाण्यांत वाटून नाकांत घालावे. गुळवेल, धायटीचें

फूल व थोडी हरताळ थंडपाण्यांत घालून नाकांत घालावें. हें औषध शरिरास्तूंत द्यावें व शांत ठिकाणीं बांधावा ह्मणजे घोडा पुष्ट होईल. शिरसाचें तेल व गौमुत्र एकत्र कढवून नाकांत घालावें ह्मणजे घोडा निर्धातु असल्यास पुष्ट होतो.

तिसरा उपाय:—गौमूत्र व मीठ दिल्यास सर्व रोग जातात. मासाचें तेल व लसूण, पिंपळमूळ, ब्राह्मी, नाग केशर यांचें चूर्ण करून सकाळीं द्यावें ह्मणजे मुखरोग व नेत्ररोग जातात.

चौथा उपाय—वेखंड, सुंठ, पिंपळी, सैंधव व काळींमिरें पाण्यांत वाटून नाकांत घालावें ह्मणजे कफवात जातो. केशर, तूप, मध, माखर, नाबद पाण्यांत मिश्र करून नाकात घालावें ह्मणजे पित्त व सन्निपात जातो. कांच्य चूर्ण करून त्यांत हिरडा समभाग मिळवून थंडपाण्यांत घालून नाकांत घालावें ह्मणजे पादग्रंथी जातात.

# औषध देण्याचें प्रमाण.

## जय दत्तकृत शालीहोत्र.

श्रेष्ट, मध्यम व कनिष्ट अश्वास देश काल व शक्ति पाहून उपयोग करण्याकारितां द्रव्याचें परिमाण सांगतों:—

| | |
|---|---|
| गुंजा ८ = १ मासा. | ४ पलें = १ कुडव. |
| १६ मासे = १ कर्ष. | ४ कुडव = १ प्रस्थ = २ पौंड. |
| ४ कर्ष = १ पल. | ४ प्रस्थ = १ आढक. |

४ आढक = १ द्रोण.

शुष्क द्रव्याचें परिमाण आर्द्रद्रव्यापेक्षां द्विगुण समजावें. उत्तम अश्वास चार आढक यव पीठ न करितां तुष मात्र काढून एक दिवसांत द्यावें. मध्यम अश्वास चतुर्थांश कमी आणि कनिष्ट अश्वास त्यापेक्षां चतुर्थांश कमी द्यावें. पाद मात्र देणें झाल्यास १ आढक द्यावें.

चणे, उडीद व व्रीही ( साळी ) यवाचे निम्मे, देश पाहून द्यावे. मुग १प्रस्थ द्यावे. लवण (मीठ) १ कुडव द्यावें. मधु १कुडव द्यावें. परंतु तें तेलाशीं देणें झाल्यास तितकें देऊं नये. उडीद हे मुगा प्रमाणें द्यावे. पाना करतां तूप देणें झाल्यास १ प्रस्थ द्यावें. तेल अर्ध प्रस्थ द्यावें. गूळ ८ पळें द्यावा. प्रतिपानांत दारू १ प्रस्थ द्यावी. चूर्ण, लवण, पिंड व घृत ४ पळें द्यावें. निरूहबस्ती १० पळें कल्क घालावा. अश्वाचा दोष नाहींसा होई पर्यंत अभ्यंग करावा. कषायाचें प्रतिपान दोन प्रस्थ द्यावें. प्रतिपानापेक्षां मंड दुप्पट द्यावा. उसाचा रस अर्धा आढकभर द्यावा. तंदुळाचें पान १ प्रस्थ व यवागू ( पेज ) दुप्पट द्यावी. जेवण झाल्यावर अनुपानास १ प्रस्थ दारू द्यावी. तांदूळ देणें ते पेज व मंड यांच्या कल्काशीं द्यावेत. सक्तु १ प्रस्थ द्यावे. गूळ ८ पळें,पाणी १ आढक व गुळाचें पाणीं उसाच्या रसाचे प्रमाणानें द्यावें. प्रतिपानांत सांगितलेला पदार्थ दारूशीं एक पळ द्यावा. नस्यास जें तेल सांगितलें तें कुडव भर द्यावें. भेदनाविषयीं नस्य देणें झाल्यास तीक्ष्ण पदार्थ पाऊण कुडव द्यावा. कानांत घालणें झाल्यास प्रक्षेपाचे मानानें घालावें. लहान शिंगरास देणें असल्यास अर्ध कुडव द्यावें. औषधाचें पळ देणें असून त्यांत हिंग घालणें असल्यास एक माष प्रमाणानें घालावा. अश्वाला नस्य देणें असल्यास एक कर्ष, व धूप अथवा चूर्ण देणें असल्यास तीन कर्ष द्यावें. कषायाविषयीं विशेष निर्देश जेथें केला नाहीं तेथें एक चतुर्थांश शेष राखून द्यावयाचा असें जाणावें. जीं द्रव्यें अमुक रीतीनें घालावीं असें सांगितलें नाहीं तेथें पळभर घालावीं. जर त्याला रक्तपान देणें असेल तर आढक प्रमाणानें द्यावें.

साधारण उदकचारि प्राण्यांच्या मांसामध्यें गुण वीस आहेत. अनूप ( पाणथळ ) प्रदेशांतील प्राण्यांमध्यें ८०, व दाट झाडीच्या प्राण्यांत १०० गुण सांगितले आहेतः भोजनामध्यें वगैरे घोड्या.

मांस देणें असल्यास त्या त्या मानानें दिलें पाहिजे; त्यांत शिशुमा, रोद्र, कुंभीर, गोधा, सरुक, कर्कट ( हे सर्व जलजंतू आहेत ) त्याचप्रमाणें शंख, कच्छप इत्यादि अनूप देशस्थ राहणारे प्राणी होत.

गवय, गंडप, हस्ती, शूकर ( डुकर ), रेडा, सरूप इत्यादि जनावरांस अनूपवासी ह्मणतात. हरिण, छाग, सिंह, तरक्ष, सरेण, नीलांड, बैल, एडका वगैरे जांगल होत. यांत सत्या हा फार लहान धरिला असून अविका हें जनावर मोठें होय. जांबळी, वेत, ताड, केळ, वेळू, इत्यादिकांनीं युक्त असा खोल प्रदेश असल्यास त्याला अनूप असें ह्मणावें. कसेरुक, शशी, पीलु, करीर, खादीर, बकुल वगैरे वृक्षांनीं युक्त व ज्यामध्यें नद्या,सरोवेंर, डोह आहेत असा देश जांगल होय. उभय साधारण देशांतील पशु पक्ष्यांच्या मांसाचा प्रभाव मध्यम होय. जलजंतूचें मांस गुरू, स्निग्ध, वायूचा नाश व श्लेष्मा, शुक्र उत्पन्न करणारें आहे. अनूपांचें देखील वारिजांच्या मांसा प्रमाणेंच असून कांहीं लघु आहे. जांगल पशूच्या मांसाचे गुण असे आहेत कीं, ते त्रिदोष श्यामक असून जठराग्नीला मांद्य आणणारे आहेत. कल्कापेक्षां स्नेह चारपट, स्नेहा पेक्षां क्वाथ ( काढा ) चारपट असें प्रमाण आहे. स्नेह करण्याचें प्रमाण साधारण प्रसिद्धच आहे परंतु कल्क तयार जाहल्याची खूण इतकीच कीं, हातानें त्याची गोळी होऊं शकते व तो अग्नींत टाकला असतां शब्द होत नाहीं. व्रण, नस्य किंवा बस्ती यांचा प्रयोग कर्त्तव्य असतां यापेक्षां पाक थोडा मृदु करावा. औषध देणें तें मध्यमोत्तम हीन असा प्रकार पाहून द्यावें, व त्यांत वयाचेंही उणाधिक्य पहावें. वर्ष झालें असतां एक चतुर्थांश व दोन झालीं असतां दोन चतुर्थांश असें औषधाचें प्रमाण ठेवावें. गुण आल्यावर कमी कमी करीत जावें. शरीर स्थूल असल्यास मध्यम व उत्तम हे प्रकार न योजतां केवळ कनिष्ट प्रकारच योजावा. काढा, पान, अथवा लेप वगैरे देणें झाल्यास त्यांत पाणी

हें सर्व साधारण सांगितलें आहे व जेथें लवण येईल तेथें सैंधव असें जाणावें.

---

## अथ पिंडः

कुटकी, टाकळी, भ्रामरी, तुळसी, नागरमोथे, यांचा पिंड (लाडू) करून अश्वास दिला असतां अमृता प्रमाणें सुखप्रद होतो. विलायची, शतघ्नी, मुरुक (मोरवेल), कांग, शतावरी, मध, साखर, यांचा पिंड दिला असतां अश्वास पित्त शामक होय.

नागरमोथे, गडूची, सुरसा, विशाला (कडुवृंदावन), रिंगणी व तूप यांचा पिंड दिला असतां वायुनाशक होय.

माक्षीक, सैंधव, नागरमोथे, गोमूत्र, हिरडे हे समभाग करून यांचा पिंड दिला असतां अग्नि प्रदीपन कर्ता होय.

काकोली, केतकी, क्षुद्रा, ज्येष्टमध, व तूप यांचा पिंड दिला असतां अश्वास पुष्टता येते.

मांस, व उडीद, यांचा तूपासहित पिंड दिला असतां बलवृद्धि होते. घोडा वृद्ध व कृश असल्यास त्यास दहीं व मध खाऊं घालावें ह्मणजे तो सहा सात वर्षांचे अश्वाप्रमाणें सशक्त होतो.

मेथिका, धातकी (धावटी), काली, उपलसरी, बीजपूरक यांचा पिंड तेजाची वृद्धि करणारा होय. कुटकी, मद्य, धावटी व क्षौद्र (मध यांचा पिंड दिला असतां वीर्य वृद्धि होते. त्रिफला, कटुका, नागर मोथे, वावडिंग, निंब, चित्रक यांचा पिंड आळस, मेह व शूल यांचे नाशक होय. पिंपळी, पिंपळमूळ, कटुक, लवंगा व ताजी हरळी यांचा पिंड प्लीहाचा (पांथरीचा) नाश करतो.

नागचापा, श्रीफल, तालफल व माक्षीक व गोकर्णी यांचा पिंड दिला असतां अश्वास उत्तम गति प्राप्त होते.

घोडा कधीं कधीं अडखळतो, धांवतो व कांपतो त्यास औषध– हिरडा, गुळवेल, वेखंड, क्षौद्र, कापूर, गूळ व मद्य यांचा पिंड द्यावा ह्मणजे वरील दोष नाऊन त्यास वेग प्राप्त होतो.

दारू, मिरें, लसूण, नागकेशर व त्याचे दुप्पट मेंढ्याचें मांस यांचा पिंड दिल्यानें श्रम नाश होतो.

जंबीर (निंबू), कांगोणीचें पान किंवा साळ व त्यांतील रज यांचा पिंड दिला असतां रक्त नाशक होय.

तमाल, कमळ, क्षौद्र,अघाडा व टेंभुरणी यांचा पिंड दुधाशीं दिला असतां वायु नाशक होय.

आरनाळाचें चूर्ण व पथ्या नेपाळिकेचें फल यांचा पिंड करून त्यांत करंज, कापूर, वेखंड आणि सर्ज यांचें चूर्ण मिसळून दह्यांत द्यावें ह्मणजे व्रण व त्या पासून झालेले कृमि यांचा नाश होतो. सुधाकर, कापूर आणि कूपोदक यांचा पिंड उदरांतील कृमीचा नाश करतो. उन्हाळ्यांत दाहानें पीडित झालेल्या अश्वास आरनालयुक्त निंबे व मज्जामु यांचा पिंड दिला असतां सुखकारक होय.

वृष्टि व वायु यानीं पीडित झालेल्या अश्वास तेल, लसूण व मांस यांचा पिंड दिल्यास पुष्टता व सुख प्राप्त होतें.

ज्या अश्वाचें अंग कांपत असेल त्यास महाघृत, कापूर, साखर व दूध यांचा पिंड दिला असतां सुखावह होय.

धात्री, व बीजपूरक ( मातुलिंग ) यांचा पिंड हृदयांतील गुल्माचा नाश करतो. सहदेवी, वचा, कुष्ठ, वारुणी आणि कडू वृंदावन यांचा पिंड मधाशीं दिला असतां वात गुल्माचा नाश करतो.

उंबराचें फळ, मांस, कापूर व ह्मशीचे दुधाचें दहीं यांचा पिंड शैत्यानें पिडित अशा अश्वास सुखावह होय. ब्याहद्रा, वावाटी, सार्जिका

व मीठ यांचा पिंड कास (खोकला) हारक होय. ताक, कापूर, सैंधव आणि चिकणी यांचा पिंड अश्वास बस्तिरोध झाला असतां द्यावा. सौवर्चल, हळद, पिंपळी व वृंदावन यांचा पिंड मूत्र कृच्छ्रावर प्रशस्त होय.

जंबीर, हिंगूळ, क्षौद्र, स्रांत• व वाळा यांचा पिंड रक्त मूत्रावर प्रशस्त होय. हिरडे, ज्येष्टमध, श्यामा, देवदार व वाळुक यांचा पिंड रक्तातिसारावर प्रशस्त होय. पडवळ, धायटी, नागर मोथे, ज्येष्टमध व गिरिकर्णिका यांचा पिंड अश्वास रक्त अधिक झालें असतां द्यावा ह्मणजे रक्ताचें शोषण होतें. साधी व गाठी हळद, गंधक व मोहऱ्याचें तेल यांचा पिंड दिला असतां कंडू व कुष्ट यांचा नाश होतो. हा पिंड किंचित भाजून द्यावा. अतसीपत्र, निंबू आणि वडाच्या कळ्या यांचा पिंड अतिसारावर प्रशस्त होय. घोडा नेत्र रोगानें जेव्हां अत्यंत पीडित होतो तेव्हां त्यास ताक व एरंडाचीं पानें यांचा पिंड द्यावा पत्रक, सिंदुवार, चित्रमृग व धोतरा यांचा पिंड मधाशीं दिला असतां मांस वृद्धि करतो. सैंधव, चुल्लिकाक्षार, वावडिंगें व मध यांचा पिंड शस्त्रानें पीडित झालेल्या अश्वास प्रशस्त होय.

---

## काढ्या विषयीं.

घोड्यास काढा पाजला असतां रोग जाऊन तो सुखी होतो. याकरितां वनस्पतींचीं औषधें सांगतों. भृंगिराज, इंद्रायणी, पहाड, पुनर्नवा, बिल्व, पुष्करमुळ, लोध्र, सैंधव, व तगर हीं एक एक पल प्रमाणें घेऊन चौपट पाणी घालून त्यांचा काढा अष्टमांश उरवून घोड्यास द्यावा ह्मणजे अग्नि प्रदिप्त होतो व अरोग्य होऊन त्याची कांती चढते.

**वात रोगावर काढा**—नागरमोथा, मध, पत्रज, नागकेशर, सैंधव, एकेक पल प्रमाणें घेऊन अष्टमांश काढा करून द्यावा ह्मणजे वातरोग जाऊन अश्व अरोग्य होतो.

**पित्तरोगावर काढा**—जेष्टीमध, लोध्र, पांढरा शिरस, सावरी, वाळा, यांचा वरच्याप्रमाणेंच काढा करून तीन भाग उरवावा व त्यांत साखर घालून एकविस दिवस नेमानें द्यावा ह्मणजे वातपित्त नाहींसें होतें.

**सन्निपाताचें लक्षण व त्यावर उपाय**—घाम येणें, सर्व आंगास कंप सुटणें, जांभया येणें, जिभेस फोड येणें, क्षणोक्षणीं मस्तक झाडणें, नेत्र रक्तवर्ण होणें, व नाकांतून रक्त पाझरणें याप्रमाणें सन्निपाताचीं लक्षणें आहेत. त्यास उपाय-सुंठ, हिरडा, पहाड, शोपा, ब्राह्मी व मुस्ता हीं सर्व समसमान घेऊन अष्टमांश काढा करून एकवेळ सकाळीं सात दिवस द्यावा ह्मणजे सन्निपात दूर होतो.

**घोड्यास खोकला व श्वास होतो त्यास उपाय**—अश्वगंध, वाळा, ब्राह्मी, पुष्कर, भारंगी, रास्ना, देवदार, बेल, ओवा व दशमुळें यांचा काढा अष्टमांश करून द्यावा ह्मणजे कास, श्वास, ज्वर व वायू नाश पावतात.हा काढा दिल्यावर अश्वास सावलीचे ठिकाणीं बांधावें.

**घोड्यास ताप येतो त्याजवर औषध**—चंदन, निलोत्पल, पांढरा वाळा, रक्तचंदन व समभाग लिंबाची साल, धंग, डोरली, रिंगणी समसमान घेऊन चौपट पाणी घालून अष्टमांश उरल्यावर सकाळीं देत जावें ह्मणजे तेणेंकरून पित्त, ज्वर व श्वास हे नाश पावतात.

**कास,श्वास, हिका यांस उपाय**—जेष्टमध,भल्लातक, पक्का एक शेर बेहडा व त्रिफळा एक पल प्रमाणें घेऊन अष्टमांश काढा करून द्यावा ह्मणजे अग्नि प्रदिप्त होतो व त्यास अरोग्यता येते.

**मुत्ररोध होतो त्यास उपाय**—कुमारी, शाल्मली, पहाड, मंजिष्टा, इंद्रवारुणी व कावळी एकेक पल घेऊन चतुर्थांश काढा उरवून चौदा दिवस द्यावा. त्यापासून मुत्ररोग व अग्निमांद्य हे सर्व नाश पावतात.

**दुसरा उपाय**—ओंवा, जेष्टमध, आवळकठी व संचळ यांचें चूर्ण करून अष्टमांश काढा करून दिला असतां कोठा शुद्ध होऊन अश्व पुष्ट होतो.

**जहर वातास औषध**—हळदे, लिंबाचीं पानें, कडळमूळ, इंद्रावन, अश्वगंध, वेखंड व जिरे एकेक पल प्रमाणें घेऊन अष्टमांश काढा करून द्यावा ह्मणजे जहररोग जातो.

**घोड्यास अतिसार होतो त्यास उपाय**—धायटीपुष्प, धणे, जिरे, सुंठ, कुडा हीं सर्व तोळा तोळा घेऊन एकत्र चूर्ण करावें व अष्टमांश काढा करून द्यावा ह्मणजे अतिसार जातो.

**दुसरा उपाय**—धणे, बेल, धायटीपुष्प, सुंठ, वाळा व नागरमोथा यांचा अष्टमांश काढा करून द्यावा ह्मणने अतिसार जातो.

**कृमिरोगास उपाय**—शोषा, गुळवेल,तालीसपत्र, विडंग व निर्गुडी हीं एकत्र करून घोड्यास काढा करून द्यावा ह्मणजे कृमिरोग जातो.

**दुसरा उपाय**—वायवर्ण, जेष्टमध, कुटकी व महाळूंगबी यांचा अष्टमांश काढा करून द्यावा ह्मणजे त्यापासून कृमिरोग व अतिसार नाहींसे होतात.

**घोड्यास ताप येतो त्यास उपाय**—महाळुंगाचीबीं, पांढराचंदन, शिरस, उश्रपुष्प, करमूळ, ब्राह्मी, रिंगणी, पुनर्नवा व सुंठ हीं सर्व समसमान घेऊन अष्टमांश काढा करून द्यावा ह्मणजे ताप नाहींसा होतो.

---

## घृत करण्याचा प्रकार.

निंब, करंज, याची वसा, सत्पवर्ण व पटोल यांचा काढा किंवा कल्क करून त्यांत घृत मिसळावें ह्मणजे तें पंचतिक्त घृत होतें.

करंज, वाळा, मध, श्यामा, चंदन, कमळ, त्रायमाणा, कचोरा व

अश्वगंध यांचें चूर्ण करून तीन चार किंवा पांच अंश तुपांत मंदअग्नीवर त्रिफळा रसासहित शिजवून अश्वास द्यावें म्हणजे बळ व तेज यांची वृद्धि होते. याच प्रमाणें करंज तेलही अश्वाचे अनेक दोषहारक आहे.

घोड्यास तूप दिल्यानें बळ वाढतें, रोग जातात व कांती वर्ण होतो. शिलाजीत, इंद्रावण, कमळबिज, लाक्षा, नागकेशर, पुष्कर व लिंब हीं सर्व पावशेर प्रमाणें घेऊन त्यांत मध व तूप दोन शेर प्रमाणें घालून एकत्र करून लोखंडाच्या भांड्यांत मंदाग्नीवर कढवावें. तयार झाल्यावर चार तोळे प्रमाणानें द्यावें म्हणजे वात जातो. तेज, वृद्धी, क्षुधा, अग्निप्रदिप्तता, पुष्टता व बलत्व हे तूप पाजल्यानें प्राप्त होतात.

**दुसरा उपाय**—धायटी, नागकेशर, कोष्ट, कुसुंभयेळा, डाळींब, लोध्र, सैंधव, एकेक पळ (२तोळे)प्रमाणें सर्व घेऊन त्यांत दोन शेर तूप घालून कढवावें. सारखा रस आल्यावर घोड्यास द्यावा म्हणजे त्याचे सर्व रोग जाऊन त्यास तेज येतें व तो पुष्ट होतो.

**तिसरा उपाय**—आरनाल, वेखंड, कोष्ट, पिंगळा हीं समभाग घेऊन काढा करावा व त्यांत तितकेंच तूप मिळवून द्यावा म्हणजे पित्त नाश होतो.

**चौथा उपाय**—कोष्ट दोन पळें, व त्यांत शिरस पत्राचा रस एक प्रस्थ मिळवून तुपांत तयार करून द्यावें. कांजीक, वेखंड व कोष्ट समभाग दोनप्रस्थ तुपांत तयार करून सात दिवस अभ्यंग व पान करावें. सर्व पित्त नाश पावतें. हीं दोन्हीं तुपें उत्तम असून अश्वास अरोग्यकारक आहेत.

**कंडू आंगास झाला असतां त्यास उपाय**—आंबेहळद व साधी हळद आणि गंधक समसमान व थोडे मनशील घेऊन त्यांचें चूर्ण करून काढा करावा व त्यांत तूप ( त्रीगुण ) तिनभाग काढा

कढत असतांना मिळवावें, तयार झाल्यावर सकाळीं नाकांत घालावें, आणि अभ्यंग व पान सात दिवस करवावें ह्मणजे अश्वाची कांती दिव्य होते.

**दुसरा उपाय**—लिंबाचीं पानें, माक्षीक, नख, गुग्गुळ, बावची व मेण हे समसमान घेऊन त्यांत तूप व चौपट गोमूत्र घालून मंदाग्नीवर काढा करावा. त्याचें अभ्यंग व पान करवावें ह्मणजे कंडू जाऊन दिव्य कांती होते.

**तिसरा उपाय**—लाक्षारस चौपट व त्यांत तूप एक भाग घालून मंजीष्टा, तगर, जटामौशी, कोष्ट, चंदन, देवदार, कुटकी, शोपा व हळद सर्व एकेक पळ घेऊन त्यांत साखर आणि शिलारस घालून मंदाग्नीनें सिद्ध करावें. मग त्या तुपानें अभ्यंग व पान करावावें व नाकांतही घालावें ह्मणजे घोड्याचे आंगातला ज्वर, कफ, पित्त व रक्त दोष जातात.

**चौथा उपाय**—पटोळी, मुस्ता, रक्तचंदन, कर्दळीचा कांदा, माक्षीक, गुळवेल व कचोरा हीं सर्व समभाग व साखर आठपट आणि तूप चौपट घेऊन ते एकंदर मंदाग्नीवर सिद्ध करून दररोज घोड्यास द्यावें ह्मणजे दहा, ज्वर, क्षिणधातु वगैरे सर्व रोग बरे होतात.

**पांचवा उपाय**—मुस्ता, हळद, मंजिष्टा, तगर, कर्दळीचा कांदा, चंदन, देवदार, नागकेशर, बेल जटामौशी एकेक पळ घेऊन त्यांत तूप घालून त्यांचा काढा घोड्यास द्यावा. सर्व प्रकारचे ज्वर, रक्तपित्त व शरीर कटीभंग दूर होतात.

**सहावा उपाय**—बळ, अतिबळ, लाख, अश्वगंध, पिंपळी, पिंपळमूळ, चोख, वेखंड, हिरडा, गजपिंपळी, चवक, पुनर्नवा, हळद, जिरे, कोरांटीमूळ, एरंड, तगर, शतावरी, समभाग घेऊन निर्गुडी, करवीर, प्रसारणी, मदनचंदनाचा कांदा, पुत्रजी, शेवगा, ओंवा एकेक पळ

प्रमाणें चौपट पाणी व तितकेंच तूप त्यांत घालून सर्व मंदाग्नीनें कढवून शिजवावें. तयार झाल्यावर एक पल प्रमाणें द्यावें ह्मणजे वात व कंठी कफ हरतो; शिरग्रह, वक्षस्थळीं दुखावलेला स्कंद, आळस, जाड्यता, पायरोग यांवर ह्या तुपानें अभ्यंग व पान व नस्य केलें असतां सर्व रोग जातात.

**बोड्यास कफ होतो त्यास उपाय**–पिंपळी, वेखंड, कुष्ट, सैंधव, संचळ, डांगर हीं सर्व आडुळशाचे रसांत घालून सात दिवस द्यावीं ह्मणजे कफ जातो.

**कृमिरोग झाल्यास त्यास उपाय**–विडंग, त्रिफळा, त्रिकूट, ओंवा, वड, लिंबाची साल, अजमोदा व वेखंड कुटून बारिक चूर्ण करावें. त्यांचा काढा करून चौपट तूप घालून द्यावा ह्मणजे कृमिरोग जातात.

**मूढ वाताचें औषध**–रुईचा चीक आठ तोळे, निवडुंगाचा चीक बारा भाग (तोळे), हिरडा, कविठ आठ तोळे, गुळवेल समान यांचा कल्क करून तुपाचे मानानें मंदाग्नीवर एक प्रस्थ सिद्ध करून क्रमानें सात दिवस द्यावा ह्मणजे मूढवायु नाश पावतो.

**जिभेस व गळ्यास फोड येतात त्यावर उपाय**–मुळ्याचें बी, नेव शिरस, हळद, लिंब, जिरें, हिरडा, अतिविष, राई, तगर, मिरें, वेखंड, कुष्ट हीं सर्व समसमान घेऊन बारिक चूर्ण करावें आणि तें मधाबरोबर द्यावें ह्मणजे जिभेचे व गळ्याचे फोड जातात.

**सर्पाचे विषावर औषध**–पिंपळी, मिरें, सुंठ, चित्रक, गजपिंपळी, वेखंड, अतिविष हीं समसमान घेऊन बारिक चूर्ण करावें व दररोज पांच तोळे तुपाबरोबर द्यावें ह्मणजे विष दूर होतें.

**स्तंभवायुवर**–कोष्ट, हाळद, अतिविष, मिरी, वेखंड, समान एकत्र करून तुपाबरोबर रोज एक पल द्यावें ह्मणजे स्तंभवात जातो.

**दुसरें औषध**–कंकोळ, मिरी, नागकेशर हीं औषधें समसमान घेऊन भाजून तुपा बरोबर द्यावी ह्मणजे स्तंभवात जातो.

**आन्ड मोठें होतात त्यावर**–रास्ना, अतिविष, पिंपळी, पिंपळमुळ, अजमोदा, वावडींगे, इंद्रजव, पित्तपापडा, लसूण, शेवगामूळ, भलात, सुंठ व हिंग हीं समभाग कुटून वस्त्रगाळ चूर्ण करावें व तुपाबरोबर एकवेळ एक मंडळ द्यावें ह्मणजे आन्डवृद्धी दूर होते.

---

## तेल करण्याचा प्रकार.

मधु, उशीर (वाळा), षष्टीक, रक्तचंदन, कमळ, श्रीपुष्प, धायटी, लोध्र, मंजिष्टा आणि चंदन हे पदार्थ समभाग घेऊन त्यांचा कल्क करून त्यांत गाईचें दूध घालून शिजवावें. हें मधु पित्तरोगाचा नाश करणारें होय. हें मधु, तूप, तेल व वसा (मज्या) एकत्र करून दशमूलांच्या कषायांत अश्वास पाजावें.

तृवृताख्य पाण्यांत घालून मंद अग्नीवर तप्त करून अश्वास दिलें असतां वात हारक होय.

उपलसरी व अश्वगंधा १०० पलें व दशमूल १०० पलें एकत्र कढवून माषपर्णी ( मुमाकानी ) १ पल व मुद्गपर्णीचें दुध पल १ चा सैंधव दोन पलें, चित्रक, पिंपलीमूळ, प्रसारिणी, जवखार, दोन्हींगंध ( पांढरा व रक्तचंदन ) द्विजक, पलत आणि अष्टवर्ग हीं प्रत्येक दोन पलें आणून त्यांचा कल्क करावा. नंतर वर सांगितलेल्या कषांत दहीं, दुध, तूप व उदक यांसहित कढवावें ह्मणजे हें तेल अश्वाच्या सर्व वातरोगास उत्तम औषध होय.

दशमूलाचा कल्क वरचा कषाय, आम्लकांजी व लवण यांनीं मिश्रित असें तेल शिजवून अश्वास दिलें असतां प्रशस्त होय. तूप व तेल समभाग घेऊन त्यांत त्रिवृत पाणी करण्याचीं औषधें एकत्र

करून मेषाची मज्जा घालून तें तेल तयार करावें; मग तें फार पक्क न होऊं देतां उतरून अश्वास पाजावें व अभ्यंगाप्रमाणें बस्तीचे ठिकाणीं मर्दन करावें व सर्व अंगास लावावें ह्मणजे वातरोगावर प्रशस्त होय.

---

## वातहारक तेलें.

**नारायण तेल**—हें अश्वरक्षणास फार उपयोगी आहे. बिल्व, टाकळी, टेटू, रास्नामुळ, शतावरी, शेवगा, वेखंड, चांदवेली, कंकोळ, चंदन, जटामांसी, कांग, सुंठ, चित्रक, एरंड, निर्गुडी, राळ, व चवक, हीं समभाग घेऊन चूर्ण करावें. त्यांत चौपट पाणी घालावें व तिळाचें तेल तितकेंच आणि समान शतावरीचा रस, त्याजबरोबर दूध द्विगुण घालून मंदाग्नीवर पात्रांत तयार करून घोड्यास नस्य द्यावें व आंग मर्दन करावें. मलिनकोष्ठ, वातव्याधि, जडगति, कंठभ्रंश हे रोग नरतुरंग किंवा गज यांस झाले असल्यास बरे होतात.

**पोटीं खडा होतो त्यास तेल**—शेवग्याचे मूळावरची त्वचा, निर्गुडीचीं पानें, गाजर, ओंवा, पांढरें जिरे, वेखंड, सुंठ, पंचक्षार, वावडिंगें व पळसबीज हीं सर्व एकत्र समभाग करून ऊन पाण्यांत प्रातःकाळीं द्यावीं. पोटींचा खडा नाहींसा होऊन मळाचा झाडा होऊं लागतो.

**स्तंभवातास तेल**—शोपा, गेळें, कोष्ट, सैंधव, निंब. वाळा, मध, कुंभारू, देवदार, सुंठ, पुष्कर, चित्रक, कर्दळीचा कांदा, अतिविष, कचोरा, कंद, विडंग, भाळ, रेणुका, पिंपळी, दंती, रास्ना, आजमोदा, आणि बेलफळ हीं सर्व समान घेऊन त्या सर्वांचे चौपट पाणी व तेल घेऊन त्याचे चौपट दूध घालून मंदाग्नीवर तांब्याचे भांड्यांत एकत्र करून कढवावें. तयार झाल्यावर तें तेल घोड्याचे अंगास मर्दन करावें.

**अंगास फार कंड सुटते त्यास तेल**—शंखचूर्ण, शेंदूर, हरताळ, मनशीळ, हिराकस, जवखार, कोष्ट,व गंधक, हे सर्व शिरसाचे तेलांत खलून तीन दिवस लेप करावा ह्मणजे घोड्याची कंडू नाहींशी होते.

**विषगर्भ तेल**—धत्तूर, रुई, निवडुंग, रिठा, ऐरण, चित्रक, शोपा, निवळी, वेल, पाडळी, शतावरी,एरंड, शेवगामूळ.व ढाकळीबीज, हीं सर्व समान घेऊन कुटून काढा करून अथवा कल्कही घोड्यास द्यावा.

**जडत्वावर तेल**—देवदारु, कोष्ट, हळद, वेखंड, हिरडा, कुटकी, चाफा, तगर, चंदन, ओंवा मिरीं, कचोरा, अतिविष, मोथा, आणि पुष्करमूळ हीं, समान घेऊन बारीक चूर्ण करूनत्यांत तिळाचें तेल घालून कल्क करावा व तो मंद अग्नीवर सित्ध करून, घोड्यास नानारोग होतात त्यास मर्दन करावा; ह्मणजे जडत्व, भ्रंश, वगैरे सर्व रोगांचा नाश होतो.

**लाक्षादितेल**—रास्ना, एरंड, गोखरू, कुडा, रिंगणी, व चिकणा, हे सर्व एक पल प्रमाणें घेऊन आणि त्या समान तेल व दूध चौपट घेऊन शतावरीच्या रसांत मंदपणें कढवावें. हें तेल सर्व रोगांवर लावलें असतां घोडा निरोगी होऊन पुष्ट होतो.

**शतावरी तेल**—कोरांटीमूळ, गुळवेल, रक्तचंदन, वाळा, लिंब, रास्ना, रिंगणीमूळ, चिकण, धणे, मंजिष्ठ,कर्दळीचा कांदा, व पद्मकाष्ट हे समभाग घेऊन त्यांत चौपट पाणी घालून चतुर्थांश काढा उरवावा व त्यांत काढ्याइतकेंच लाक्षातेल घालून साखर वीस पलें घालावी व तें मंदाग्नीवर सिद्ध करून घोड्यास द्यावें. त्यायोगें संतापज्वर, कृमि, कोष्ठ, हृद्रोग, वात, पित्त, श्लेष्मा व सान्निपात हीं दूर होतात व तें नाकांत घातलें असतां वीर्यवृद्धि होते.

**अश्वगंध तेल**—अश्वगंध, काळा वाळा, तगर, मुस्ता, पांढरा वाळा, तमालपत्र, काळा कुडा,चंदन, पांढरा व रक्त पद्माक्ष, जेष्ठमध,

व पद्मकाष्ठ, यांचें समभाग चूर्ण करून त्याचा काढा करावा व त्यांत एक प्रस्थ तिळाचें तेल, व चौपट दूध व वीस पलें साखर घालून मंदाग्नीवर कढवून, मग तें तेल घोड्याचे अंगास मर्दन करावें. ह्मणजे ज्वर व कृमिरोग नाहींसे होतात.

**पत्रजादितेल**—तमालपत्र चार पलेंपर्यंत, तगर, कोष्ट, चित्रक, जायपत्री, लवंगा, वाळा व जायफळें हीं सर्व समभाग चूर्ण करून त्यांत एक प्रस्थ तेल, चौपट दूध व आठ पलें साखर घालून तें तांब्याचे भांड्यांत कढवावें व त्याचें मर्दन करावें ह्मणजे पित्त, कफ, व ज्वर नाहींसे होतात.

टीप—तेल व तूप किती द्यावें व किती घालावें हें ह्याच भागाचे ६ वे पानावर सांगितलें आहे तें पहावें.

मनुष्यरोगांवर अन्य वैद्यक ग्रंथीं सांगितलेलीं तेलें अश्वचिकित्सेवरही लागू पडतात.

---

## स्नेहपरीक्षा.

स्नेह (तैल) दोन प्रकारचें आहे. एक पिंड व दुसरें पिण्याचें. पिंडरूपी तैल हीं खाण्यांत द्यावीं व पेय तें पाजावें. शरदृतूंत तुपाचा प्रयोग मुख्य होय. हेमंत आणि शिशिर या ऋतूंत तेलाचा प्रयोग मुख्य होय. हीं तेलें पाच पलापासून दररोज क्रमानें तीन तीन पलेंप्रमाणें पूर्ण एक शेर होईपर्यंत वाढवावीं. अश्वाचें जें पान असेल त्याचे अर्ध तास प्रभातकालीं किंवा वायूचे वेळेस पाजल्यावर पिंड द्यावा. बाकीचें मग पाजावें.

एक वर्ष उमरीचे अश्वास एक शेरपर्यंत तूप द्यावें, पुढें अश्वाचे शक्तिमानाप्रमाणें ज्यास्त द्यावें. परंतु आढक (४ शेर) पर्यंतच अश्वास तूप चढविलें असतां प्रशस्त आहे, त्यापेक्षां अधिक प्रयोग करूं नये. अश्वास नेहमीं तूप ३, ५, ७, १०, किंवा १२ दिवस त्याच्य

शक्तीप्रमाणें द्यावें. तृण व हरळी हीं त्यास द्यावीं. पाणी गरम द्यावें.

या प्रयोगापासून सर्व शरीराचे ठायीं स्निग्धता व बळकटपणा प्राप्त होतो व त्यापासून उमेद वाढते. व्रण व पायांतील कंप नाहींसा होतो. फार वेळ पुरीपस्त्राव होत नाहीं. याकरितां जो घोडा तेजस्वी नसेल त्यास हें पान द्यावें, ह्मणजे त्याची रूक्षता जाऊन स्निग्धता येते. अति स्निग्ध असेल त्यास दिलें असतां पुष्टतादि अनेक गुण होतात. याप्रमाणें पूर्व दिवशीं पान देऊन दुसरे दिवशीं दारू व मीठ घालून पाहटेस द्यावें. खाण्यास पातळ (यवागू) पेज द्यावी. चंदीस आंबट ताकांत मर्दिलेले मूग द्यावे. अशा क्रमानें तीन किंवा पांच दिवस केलें असतां वाळलें गवत खाणारे रूक्ष अश्वास जठराग्नीचें दीपन होतें. पाणी मात्र थोडें पाजीत जावें.

वर्षाकाळीं दुधांत तेल पाजावें. शरदृतूंत व हेमंतांत दारूशीं, शिशिरऋतूंत मिठाशीं, वसंतांत त्रिफळेशीं व ग्रीष्मऋतूंत दुप्पट पाणी घालून पाजावें. पानांत अपक्व तैल देऊं नये. रोगाचे तारतम्यानें द्यावें. अश्वास कच्चें तेल दिलें असतां गुदद्वारांवाटे पाझरून येतें; यासाठीं अग्नीवर पाचित करून मग द्यावें.

ज्याचा कोठ्यांतील अग्नि मंद आहे व जो देहानें फार स्थूल आहे त्यास व फार कृश अशा अश्वास आणि ज्यास व्यायाम अतिशय आहे त्यास देऊं नये.

---

## नस्य देण्याचा प्रकार.

ज्या अश्वास मुखाच्या ऊर्ध्व भागीं किंवा अधोभागीं दोष झाला असेल त्यास नस्य देण्याचा प्रकार खालीं लिहिल्या प्रमाणें:—

डाव्या अंगस्थानें त्याची एक नाकपुडी दाबून दुसऱ्या नाकपुडींत बारीक नळीनें व मोठ्या जलदीनें नस्य घालावें; असें कीं, त्यापासून अश्वास भय वाटूं नये. नाहींपेक्षां त्याच्या नाडींत (शिरांत ) मोठी

दुखापत होते. तीक्ष्णनस्य जाणत्यानें विचारपूर्वक द्यावें. चंदन, वाळा, पाणी व शर्करा यांचें नस्य अश्वाच्या शिरांतील दोषांस नाहींसें करितें. नस्य दिल्यावर शरत्कालाप्रमाणें त्यास उपचार करावे. वातापासून दोष असल्यास स्निग्ध, व उष्ण नस्य द्यावें आणि पित्तदोषावर स्वादिष्ट व शीतळ असें नस्य द्यावें.

---

## अश्वास घाम काढण्याचा उपाय.

वमु, गोखरू, एरंड, धान्य व आम्ल हे पदार्थ कढवून घोड्यास लेपन केलें असतां सर्व वायुदोषहरण करणारा आंगचा घाम येतो. कांजीचें व धान्याचें पुट रूक्ष अश्वास द्यावें. वात व कफ यांपासून जो रूक्ष असेल त्यास तेलानें चोंपडून तुपानें लेपन करावें. जो वात व पित्त या दोषानें युक्त असेल त्यास घाम उत्पन्न करावा. ज्यास पित्त आहे व जो शांत, भुकेला किंवा तान्हेला अश्व आहे त्यास घाम काढू नये; त्याच प्रमाणें गर्भिणी घोडीस घाम काढूनये.

---

## अनुवासन.

अनुवासन ह्मणजे तूप, तेल इत्यादिक स्नेह पदार्थांची पिचकारी बस्तींत मारतात त्यास ह्मणतात.

अनुवासनाचा व स्थापनाचा प्रकारः—काष्ठ, पत्र, लोखंड, श्रृंग, वेळू किंवा देवनळ यांपैकीं कोणतीही युक्त १२ बोटें लांब व सहा ६ बोटें विशाल ( रुंद ) अशी नळी करावी. तिला बोराच्या आठुळीप्रमाणें एक छिद्र ठेवावें. मुळापासून शेवटापर्यंत ती नळी मृदु व स्निग्ध असावी. चार बोटें नळी सोडून पुटक बांधण्याकरितां दोन कळ्या कराव्या. त्या नळीनें वैद्यानें सर्व रोगाचे शांतीकरितां अश्वास यथायोग्य तीन, पांच किंवा सात दिवस अनुवासन करावें.

बस्तीचा प्रयोग करण्यापूर्वी घोड्यास स्निग्ध व रसयुक्त असें भोजन घालावें.

---

## निरूहबस्ती.

काढे, दूध, व तेल मिश्र करून ज्या पिचकाऱ्या मारतात त्याला हरूबस्ती ह्मणतात.

अश्वास आहार न देतां अपराण्हकाळीं त्रिवार निरूहबस्ती करावी. प्रथम पुट किंचित् तीक्ष्ण, दुसरें आणि तिसरें तीक्ष्ण याप्रमाणें ३ पुटें द्यावीं. मग अश्व कांहीं वेळ स्थिर करून तें निरूहण गेल्यावर त्यास दुधाचें पुट द्यावें. नंतर कांहीं अवकाशानें त्यास स्नाव करावा. इतकें झाल्यावर त्यास पायसाचें भोजन घालावें. व स्नेहानुवासन वेळ बदलून द्यावें. किंचित् हरळी द्यावी. अशा रीतीनें तीन दिवस अनुवासन केलें असतां सर्व रोग शांत होतात.

पाडळ, दंती, शतावरी, उपळसरी, त्रिघृता, श्यामा, बला, पुनर्नवा, गडूची, गोखरू, निंब, त्रिकटु, एरंड, अडुळसा, पेय, कुलित्थ, असगंध आणि शिंग्रुप हीं सर्व अथवा मिळतील तितकीं औषधें आणून त्यांचीं मूळें पाण्यांत घालून कढवावीं. तें पाणी वस्त्रानें गाळून निरूह बस्ती करावी. कषायरस, गोमूत्र व कांजी यांत त्रिफला, मध, रास्ना, मदन, पांढऱ्या मोहोऱ्या, विलायची, त्रिकटु, कुष्ट, शतपुष्पी, हरेणुक, साधी व गाठी हळद, मंजिष्ठा, व पंचक्षार हीं जीं मिळतील तीं औषधें घालून कल्कांत द्यावीं. हा निरूह कफ किंवा वात ज्यास्त झाल्यास द्यावा. कषायांतील कल्क नीट पाहून त्याचा निरूह करावा व तो फार कमी व दाट नसावा. तसेंच दूध किंवा ऊंसाचा रस यांत तूप व दारू मिसळून साखर व मध यांशीं द्यावा. घोड्याच्या गुदांत ती नळी चार वेळ घालावी. घोडा २ वर्षांचा असतां १ अंगुलें, तीन वर्षांचा असतां २ अंगुलें, ३ वर्षांहून अधिक असल्यास ४ अंगुलें

व १ वर्षांचे आंत असल्यास १ अंगुल नळी घालावी. त्यास तूपभात वगैरे खाऊं घालून उत्तरेस किंवा पूर्वेस उभा करून त्याचें पुरीष(मल) आकर्षण करावें. तें अनुवासन बस्ती आणि पुच्छ उजवेकडे करून, त्यास निरूहबस्तीही द्यावी.

दद्रु, शोफ, कफ, श्वास, संग्रहणी व कुष्ट इत्यादि रोगांवर आणि विषार्त, गर्भिणी, प्रवासी, अशा अश्वांसही बस्ती द्यावी.

क्षुधा, तृषा, श्रम यांनीं व्याकुल झालेल्या अश्वांस, व दारू पाजलेल्या आणि अति व्याधित व पीडित अश्वास ही बस्ती वर्ज्य होय.

---

## शीर टोंचून रक्त काढणें.

नकुलाचे शास्त्रांत अश्वांना एकंदर ७२००० हजार शिरा आहेत ह्मणून सांगितलें आहे. अश्वाच्या शिरा तोडणें झाल्यास शस्त्र अर्धे अंगुल रुंद व ६ अंगुलें लांब असून त्याचें अग्र माळीच्या टोंकाप्रमाणें किंवा कमलपुष्पाचे अग्रासारखें असावें. पक्क शोफ वगैरे झाल्यास वस्ताऱ्याप्रमाणें तें शस्त्र १ एक अंगुल मात्र असावें. शिर टोंचणें हें अश्वास मुख्य औषध आहे. रक्त हें देहाचें मूळ आहे. आणि त्यावरच जीवन आहे. परंतु कांहीं पदार्थांनीं तें रक्त दूषित होऊन अनेक रक्तरोग होतात. यासाठीं दुष्ट रक्त शिरा टोंचून वाहवावें. शरत्काल व उन्हाळा यांत शीर टोंचूं नये. झड लागली नसेल तेव्हां वर्षाऋतूंत अथवा थंडीचे दिवसांत मध्यान्ह काळीं शिरावेध करावा. शिशिर व वसंतऋतूंत स्वेद काढावा व शीत कालांत शिरावेध करावा. शब्द करणारे व फेंसकट जें रक्त असतें तें वातापासून झालेलें; काळें व निळें असें रक्त पित्तोत्पन्न होय; आणि दाटपांढरें व पिच्छिल रक्त कफापासून होतें. दोन प्रकारचें रक्त असल्यास द्वंद्वापासून आणि चित्ररंगी असल्यास संनिपातापासून दूषित झालें, असें जाणावें. शीर

टोंचल्यावर ससाचे रक्ताप्रमाणें किंवा सेंदरासारखें जें रक्त निघतें तें शुद्ध होय. शस्त्रवैद्यानें वेळणीसारखें भांडें तोंडीं धरून तें रक्त त्यांत धरावें. कापडानें अश्वाच्या अंगाचें रक्त निवारण करावें. जर रक्तस्राव राहत नाहीं तर जेथें शस्त्र टोंचलें असेल तेथें लोखंडाचा डाग द्यावा.

वामभागीं किंवा दक्षिणभागीं वसेच्या १ अंगुळ अंतरावर पुढें २ वळी सोडून टाळूची शीर टोंचावी. शंखावरची शिर अंगापासून दोन अंगुलांवर, अश्रुपाताचे ठिकाणची डोळ्याखालीं २ अंगुलांवर, प्रोथाची* नाकाचे खालीं दोन अंगुलांवर, बाहूवरची सांध्याच्या वर दोन अंगुलें, आणि उरावरची आवर्ताच्या खालीं ४ अंगुलांवर, किणावरची वर १ किंवा २ अंगुलांवर, कानावरची नेत्रकूटावर, स्तुवावरची स्नुवसंधि सोडून २ अंगुलांवर, कानावरची कर्णमूलापासून २ अंगुलांवर, मानेची व राकिकेची ही कूर्चाचे वर ४ अंगुलें सोडून, गुडघ्यावरची ६ अंगुलें गुडघा सोडून, कूर्चावरची खुराच्यावर ६ अंगुलें सोडून, रोमांच्या वरची खुरसंधीपासून दोन अंगुलांवर, तळावरची मंडूकाग्र सोडून, कक्षेंतली चार अंगुलांवर, नाभि व कोठा यांवरची डावेकडे व उजवेकडे ८ अंगुलें सोडून, पक्षाचे ठिकाणची पार्श्वभागीं आसनाजवळ दोन अंगुलांवर, ऊरुसंधींतली खालीं, ४ अंगुलांवर, पुच्छावरची पुच्छमूळापासून २ दोन अंगुलांवर आणि शरीराचा पृष्ठभाग ककुद व डोकें यांतली शीर गुढघ्यांचे खालीं, याप्रमाणें खालीं टोंचावी. जेथें शीर टोंचली तेथील रक्त दोषाचे तारतम्यानें वाहूं द्यावें. टोंचतानां डाव्या आंगठ्यानें शीर दाबून मग शस्त्रानें ताडन करावें. केशयुक्त प्रदेशावरची शीर टोंचण्यापूर्वीं तेथील केश छेदिले ( भादरिले ) पाहिजेत. टोंचल्यावर जें रक्त वाहील तें पात्रांत धरावें. ताल, शंख, हनवटी, प्रोथ, कपाळ, स्कंध आणि कान या ठिकाणच्या शिरा

---

* प्रोथ वगैरे जे शारीरिक शब्द आले आहेत त्यांचा खुलासा व कोश प्रथम भागांत दिला आहे, तो बघावा.

लोहमय सारख्या शस्त्रानें टोंचाव्या. मांड्या, पाय, कूर्च आणि कोष्ठ या ठिकाणची व तुळव्यावरची शीर अर्धांगुलपरिमाणाच्या शस्त्रानें छेदावी. तसेंच अंडावरची आणि कोष्ठावरची व पुच्छावरची शीर अर्धांगुल शस्त्रानें छेदावी. पृष्ठ, बाहू व जंघा यांवरची अंगुलमात्र शस्त्रानें छेदावी. शस्त्राचें मुख सुतानें वेष्टून वर सांगितल्याप्रमाणें शीर टोंचून रक्त वाहूं द्यावें. भलते ठिकाणीं ताडन केलेला, भ्यालेला व ज्याचें वीर्य क्षीण आहे त्या अश्वास शिशिरऋतूंत पाण्यांत शिरवून मग शिरावेध करावा ह्मणजे शिरा वाहत नाहींत.

अश्वास वमन किंवा रेच यांबद्दल रक्तस्राव करणें विहित होय. रक्ताचा भिन्न रंग दिसेपर्यंत स्राव करावा. पित्त झालें असल्यास पीतवर्ण, वायुदोष असल्यास काळें, आणि कफानें पांढरें व फेंसाळ असें रक्त होतें. कपोताचे रंगाप्रमाणें असल्यास पित्तजन्य जाणावें. आणि सन्निपाताचे रक्तांत सर्व दोष उत्पन्न होतात.

दुष्ट रक्त नाहींसें झालें ह्मणजे अश्वास स्वच्छ पुसून गोमूत्रांत तेल व हिरडे १ पलें घालून दररोज देत जावें. याप्रमाणें तीन सप्तकें द्यावें.

काल आणि अश्वाचें बळ पाहून शिरावेध करावा. त्यांतून दूषित रक्त वाहून गेलें असतां अश्वास परम सुख होतें, असें नकुलग्रंथांत सांगितलें आहे.

वोटे, गळा, मेंढ्र ( शिश्न ), कक्षांत, पुंड्रक, गुद, पुच्छ, बस्ति, जंघा, सर्वसंधी, जिव्हा, अधरोष्ठ, दाढा, शंख, कर्णमूल आणि मणिप्रांत या ठिकाणीं रक्तस्राव करावा.

घोडा पाणी प्यालेला, श्रमलेला, पीडित व ताडन केलेला असल्यास शीर टोंचूं नये. श्रमानें व भारानें अश्वाचें शरीर पीडित झाल्यास आणि रक्तमांस क्षीण झाल्यास शिरावेध करावा.

गळ्याजवळच्या शिरांचें पन्नास पळेंपर्यंत, तोंडाचें व गंडस्थळांचें व दोन्ही कुक्षींचें शंभर पळेंपर्यंत, ताळूजवळचें पन्नास पळेंपर्यंत, पुच्छ

व मेंढ़ ( शिश्न ) या ठिकाणचें पन्नास पळेंपर्यंत, अंडाचें पंचवीस पळें-पर्यंत,आणि गुदाचे ठिकाणीं बारा पळेंपर्यंत,याप्रमाणें रक्त काढावें.जरी हें प्रमाण सांगितलें तरी नासकें रक्त जाऊन शुद्ध रक्त दिसेपर्यंत काढावें.

दुसरें प्रमाण गळ्याचें, तोंडाचें व गंडस्थळाचें शंभर पळेंपर्यंत रक्त काढावें व इतर सर्व ठिकांणचें पांच पांच पळेंपर्यंत काढावें.

---

## डाग देण्याचा प्रकार.

अश्वास वायुप्रकोप झाला असतां सुज्ञ वैद्यानें यथाशास्त्र लोखं-डानें अग्निडाग द्यावा. लोखंडाच्या पातळ शलाकाकरून डाग द्यावा. आणि स्नेहानें डाग देणें असल्यास वातींनीं किंवा बिंदूंनीं डाग द्यावा. शलाकेनें रक्तापर्यंत व मांसलप्रदेशास फलकांनीं डाग द्यावा.

---

## धातुपरीक्षा.

आतां रोगांचा उद्भव समजण्याकरितां धातूचें लक्षण सांगतों. रक्त-दोषापासून घोड्यास महाभय प्राप्त होतें. यासाठीं विचक्षणांनीं आधीं त्याचें रक्त पाहावें. आषाढमासीं शीर तोडून रक्ताचें शोधन करावें. नंतर अश्वास पिंड (लाडू) वगैरे घालून श्रावणमासीं तूप पाजावें; ह्मणजे तो वज्राप्रमाणें बळकट होतो. ज्या अश्वास रक्त अधिक आहे तो जर शुष्क पदार्थ खाईल तर त्यास पित्ताधिक्य होऊन त्या योगानें तो नाश पावेल. रक्ताधिक अश्व स्निग्ध(तेलकट) गवत खाईल-तर कफाधिक्य होऊन नाश पावेल. आणि रक्तहीन घोडा रूक्ष गवत खात असल्यास वायुप्रकोप होऊन नाश पावेल.धातूचें लक्षणही रक्त-विकारावरून सुज्ञांनीं जाणावें.

ज्या वेळेस पित्तानें रक्तप्रकोप होतो त्या वेळेस घोड्यास कंडू उ-त्पन्न होऊन तो नेहमीं अंग घांसतो. तेव्हां त्यास उत्तम छाया व जलाश्रय असेल तेथें त्यास लागेल तितकें पाणी व उत्तम आहार द्यावा.

याप्रमाणें पित्तापासून झालेल्या रक्तावरून अश्वाची परीक्षा करून शिरामोक्ष करावा आणि त्यास कुटकी व गूळ द्यावा ह्मणजे तो शुद्ध व निरोगी असा होतो. घोड्याचें रक्त पित्तानें दूषित होऊन तो अश्रु गाळीत असेल व त्याचे नेत्रांचे टिकाणीं पांढरेपणा येईल तर तो अश्व थोडे काळांत मृत्यु पावतो. याकरितां प्रयत्नानें रक्तदोषनिवारण करावें. जो घोडा कफ व रक्त यांचा प्रकोप झाल्यामुळें खालीं तोंड करतो व वारंवार खोकतो, आहार घेत नाहीं, नाउमेद असतो, चाबुकानें मारलें असतां त्यास समजत नाहीं, गुद व पृष्ठ (पाठ) यांचें ज्ञान नसतें, नाकानें पाणी ओढतो, विस्तवानें शेकण्याची इच्छा करतो, अशा अश्वाचें रक्त शोधन करून त्यास तूप व गूळ द्यावा.

कफरक्तानें दूषित झालेल्या घोड्याचे नेत्राजवळ बिंदु उत्पन्न होऊन त्याचे पोटाशीं खाज उत्पन्न होते, तेव्हां तो सहा महिन्यांचे आंत मरतो. त्यास सुंठ, अमृता, गोखरू, नागरमोथे, श्यामा, वचा, हिंग व षष्ठी या पदार्थांचा पिंड (गोळा) करून देत जावा ह्मणजे त्यास सुखावह होतो. तो पिंड न खाईल तर त्यांत सैंधव द्यावें.

अश्वास वातरक्तप्रकोपानें पीडा झाल्यास तो अकालीं मैथुनाविषयीं सक्त होतो, कुशीस ताडन करतो, फार श्वास सोडतो, एके ठिकाणीं रमत नाहीं, अमर्याद हिंसतो, तेव्हां त्यास रक्तशोधन करून पुष्कळ तूप द्यावें ह्मणजे शुद्ध होऊन पुष्ट होतो. जेव्हां त्याच्या तोंडाजवळ तांबडा पट्टा, व मुखास खाज उत्पन्न होते तेव्हां तो अमृताशिवाय दुसऱ्या औषधानें जगणार नाहीं. त्यास ह्मशीचें दहीं व भात रात्रीं देत जावा.

घोड्याचें रक्त संनिपातानें जेव्हां दूषित होतें तेंव्हां तो कांपतो व फार खोकतो, त्यास निद्रा व आळस ज्यास्त होतात, अग्नि मंद होतो, तो बस्तीवर मान ठेवतो, कान पाडतो, व लाळ गाळतो, तेव्हां त्याचें रक्त शोधून लंघन करवावें. नंतर थोडें पाणी व आहार द्यावा.

कधीं उष्ण, कधीं शीतल व कधीं औषध या द्वारानें त्यास अन्नोदक द्यावें. पथ्या ( हिरडा ), अमृता ( गुळवेल), कुटकी, व वेखंड यांचा काढा किंवा चूर्ण करून त्यास द्यावें. शिरीष, श्रीफल आणि वेतस हे पदार्थ अश्वाच्या मंदाग्नित्वास व वायूस भस्म करितात. ज्येष्ठमध, मोहाचा कांदा, गुळवेल, चंदन, क्षौद्रक आणि लाख या पदार्थांचा तृतीयांश काढा करून सन्निपात झालेल्या अश्वास द्यावा ह्मणजे तो सन्निपात नाहींसा होतो. अश्व प्रकृतीनें स्वस्थ असूनही त्याचे नेत्रांचे जवळ पूर्वी सांगितलेलीं चिन्हें झाल्यास तो अश्व पुष्ट असला तरी तीन महिन्यांत नाश पावतो. ज्याच्या नेत्रांच्या आंत अनेक रंगांची रेषा उत्पन्न होते, व देहाचे ठिकाणीं जडपणा येतो, त्याचें आयुष्य पांच महिने राहिलें असें समजावें. ज्याचे जिभेवर एकाएकीं बिंदु उत्पन्न होतो, तो अश्व एक किंवा दोन महिन्यांत मरण पावतो. ज्या घोड्याचा रंग एकाएकीं पालटून निळा पडतो तो पांच महिन्यांनीं मरतो. ज्याची आकृति वज्रासारखी होते तो सहा महिन्यांनीं मरतो. ज्याची आकृति पांढरी होते तो सात महिन्यांनीं व ज्यास पंचका होते तो आठ महिन्यांनीं मरतो. हळदीसारखा ज्याचा रंग होतो तो अश्व नऊ महिन्यांनीं, लाखेप्रमाणें रंग झाल्यास दहा महिन्यांनीं, ज्याची कांति रूक्ष झाली असेल तो अकरा महिन्यांनीं, आणि जो बर्फाप्रमाणें थंड झाला असेल तो एक वर्षानें मरतो.

ज्या घोड्याचा श्वास उष्ण होतो, शरीर घामेजतें, व जीभ बर्फासारखी थंड होते, तो सहा महिने वांचतो. ज्याच्या मानेच्या समोर, पायाजवळ व उदराचे ठिकाणीं पट्टा उत्पन्न होतो, आणि लाल मूत्र होतें, तो सहा महिने वांचतो. ज्याच्या कानांत व नेत्रांत रक्त येतें तो वातपित्तानें पीडित झालेला अश्व दहा महिने जगतो. ज्या घोड्याची नेत्रकांति वातरक्तानें नाहींशी होते, तो, व ज्यास मूत्र-

कृच्छ्र होतें तो अश्व हे सात महिने जगतात. ज्याचे नेत्र वातरोगानें हळदीसारखे होतात त्याचें आयुष्य ७ महिने होय. ज्याचे नेत्र वातविकारानें अनेक रंगांचे होतात, तो सात दिवसांत मरतो. ज्याचा एक डोळा निळा व दुसरा लाल होतो तो पित्तरोगी घोडा महिनाभर जगतो. ज्याचें मुख पित्तानें प्रसन्न दिसतें व रक्तांत काळिमा असते तो १९ दिवस जगतो. याप्रमाणें चिन्हांवरून अश्वाचा रक्तविकार जाणून नंतर वर सांगितल्याप्रमाणें उपाय करावे. रोगी, फार ताडन केलेला, व शीर टोंचलेला, असा जो अश्व आहे त्यास पाणी पाजल्यावर थंड प्रदेशांत बांधावें.

---

## शिरोरोगपरीक्षा.

अश्वास श्वास, तहान, मर्मांचे ठिकाणीं शून्यत्व, अति उष्णता व जडपणा हीं चिन्हें होऊन तो अश्व खालीं तोंड करतो, आणि त्याला निद्रा व आळस फार येतात, तो पित्तोद्भव शिरोरोग समजावा. त्यास पूर्वीं सांगितल्याप्रमाणें शंखादिस्थानीं शिरावेध करावा. शंभर वेळ धुतलेल्या तुपानें मस्तकास अभ्यंग करावें. प्रपौंडरीक, मधुक, चंदन, वाळा व कमळ यांचा कल्क करून मस्तकावर लेपन करावें. दुधानें साधलेलें तूप, मध, वाळा व कमळ यांचा कल्क करून नासिकेंत सिंचन करावें. खाण्यास तांदूळ व मूग तूप घालून द्यावे. हरळी, अर्जुन वृक्षाचीं पानें, व शालपत्रें यांचा घांस द्यावा.

अश्वास मस्तकरोग हा वात, पित्त, कफ, संनिपात, रक्त आणि अभिघात (प्रहार) या कारणांपासून होतो. घोडा खालीं मान घालतो, दीन होतो, त्याचा आहार मंद होतो, नेहमीं शोथमान होतो, अंग रोमांचयुक्त होतें, व डोकें कांपूं लागतें तेव्हां तो रोग वातापासून आहे असें समजावें. यास शंख व तालु यांच्यांमधील शिरा टोंचून अंगास तेलानें सिंचन करावें.

अतिविष, पिंपळी, वचा, मीठ, व सुरसेचें पार्श्वपत्र यांसहित दारु हें प्रतिपादन द्यावें. भोजनांत रसयुक्त ओदन (भात) तिळाचें तेल व थोडी कुटकी घालून द्यावा.

---

## नेत्ररोगपरीक्षा.

घोड्याच्या नेत्रांवर मांस वाढल्यामुळें जेव्हां दृष्टि झांकली जाते तेव्हां कफात्मक प्रवारकाक्ष नांवाचा नेत्ररोग झाला आहे असें समजावें. या अश्वास जमिनीवर पाडून त्याचे नेत्र उघडून नंतर कुशल वैद्यानें लोहगळानें ब तीक्ष्ण शस्त्रानें प्रवारकाचा छेद करावा. परंतु डोळ्यांतील बाहुलीस अगदीं धक्का लागूं देऊं नये. नंतर त्या नेत्रांत मध व सैंधव भरावें. प्रवारकाचा नाश होण्याकरितां शंखावरची शीर तोडावी. कुष्ठ, वेखंड, त्रिकटु (सुंठ, मिरे, पिंपळी) व लवण हे पदार्थ दारूंत द्यावे. त्यास निवाऱ्यांत बांधावें. रसयुक्त हरळी खाऊं घालावी, परंतु तीक्ष्ण व मधुर पदार्थ देऊं नयेत.

रक्ताचा स्राव झाल्यानें समग्र किंवा अर्धे अथवा तृतीयांश अश्वाचे नेत्र लाल होतात तेव्हां त्यास स्राव नांवाचा नेत्ररोग झाला असें जाणावें.

अश्वाच्या शिराचे ठिकाणीं प्रहार केल्यानें नेत्रांतून रक्तस्राव होत असल्यास तो अभिघातोद्भव नेत्ररोग जाणावा.

वरील नेत्ररोगास चिकित्साः—इंद्रजव, तालपत्र, मंजिष्ठा, मध, हळद, शैलेयक आणि हरळी हे पदार्थ पाण्यानें धुऊन त्यांचें अंजन वर्तीनें (वातीनें) सुज्ञ वैद्याकडून नेत्रांत घालावें. मंजिष्ठा, हरिताळ, लोध्र, हवालक, हरेणुक, कुष्ठ, उशीर (वाळा) व मनशीळ हे पदार्थ पाण्यांत वाटून सांवलींत वाळवावे व त्यांचें अंजन घालावें. बीभित्सक, फल, लोध्र, कश्मरीचें फळ, मधुक, साखर, व रसांजन हे समभाग मधांत मिश्र करून त्यांचें अंजन नेत्रांत वर्तीनें घालावें, म्हणजे रक्ताभिस्यंद नांवाच्या नेत्ररोगाचा नाश होतो.

अश्वाचे नेत्रास खालीं किंवा वर पडळ येतें तें हिरवें किंवा निळें असल्यास पित्तापासून, तांबडें असल्यास वायूपासून, किंचित् पिंवळें जाड व पांढरें असल्यास कफापासून आणि मिश्र रंगाचें असल्यास संनिपातापासून आहे असें जाणावें. संनिपातजन्य पडळ तांबडें व काळें असें मिश्र वर्णाचें असल्यास असाध्य किंवा कष्ट-साध्य होय.

**पडळास उपाय**—सर्व पडळास शिशिर प्रशस्त होय. अश्रु-पात, प्रपाण, कपाळ व शंख या ठिकाणीं मध व सैंधव यांचें अंजन घालावें, आणि गोमूत्र व मध यांचें सेंचन करावें ह्मणजे कफजन्य पटलाचा नाश होतो. गोदंत, सैंधव, हरिताल, मनशीळ, आणि मिरे हे गोमूत्रांत खलून त्यांचें अंजन मधांत घालावें ह्मणजे कफोद्भव पटलाचा नाश होतो. वातजन्य पटल असल्यास वरीठ चूर्ण मांस व नागरमोथे घालून द्यावें. प्रपौंडरीक, ज्येष्ठमध, शंख, मोतीं, व प्रवाळ,हे समभाग करून पाण्यांत खलून एक दिवस उन्हांत वाळ-वून पुन्हा पाण्यांत खलून तें वातीनें लावावें. त्यावर त्रिफळा व तूप द्यावें. ह्मणजे रक्तपित्तापासून झालेलें पडळ नाश पावतें. पडळ झालें असतां घोड्यास नेहमींची वेळ सोडून पाणी पाजावें. वायू-पासून झालेलें मांस कीळशस्त्रानें फाडून त्यांत त्रिकटुचूर्ण व सैंधव हें घालावें.

---

## नेत्ररोगमुंजिका.

पडळाचे आंत किडा उत्पन्न होतो त्यास मुंजिका ह्मण-तात. व किडे पुष्कळ झाले ह्मणजे मुंजनाळ ह्मणतात. हा रोग झाला असतां अश्वाला भूमीवर पाडून बळकट बांधून मार्गांत ( डोळ्याच्या आंखांत ) सुईनें टोंचावें व बारीक कापडानें त्याचे अश्रु पुसावेत. त्या अश्वास खुपींत ठेवावें. शस्त्रास सूत गुंडाळून तें तिळायेवढें करावें

आणि त्यानें पांढरे व कृष्ण वर्ण झालेल्या नेत्रास टोंचावें. नंतर अंगठ्यानें नेत्र पिळून त्यांतील मुंजक ( कृमि ) ओढून बाहेर पाण्यांत टाकावें. मुंजक डोळ्यांतून निघाल्यावर गोमूत्रानें नेत्रशोधन करावें. मग मधानें डोळे भरून बारीक कापडानें वेष्टन करावें. बाहेरील बाजूस पंच वल्कलाच्या कल्कांत तूप घालून त्याचा लेप द्यावा. मुंजकास जो विधि सांगितला तोच मुंजनालावर व व्रणावरही प्रशस्त होय. प्रपौंडरीक, ज्येष्ठमध व रक्तचंदन यांचा कल्क त्रिफळा व पाणी यांसहीत तेल कढवून त्याचें नस्य द्यावें. हें नस्य व्रणासही प्रशस्त होय.

पिंपळी, सैंधव, सुंठ, गैरिक, अरुणावचा, गोदंत, उष्ट्रदंत, व अतिविष हे पदार्थ वस्त्रगाळ करून मधांत त्यांचें अंजन घोड्यास घालावें ह्मणजे मुंजकाचा नाश होतो.

ज्या अश्वाच्या नेत्रापासून पू पडत असेल किंवा ज्यास चर्मकोप झाला असेल त्यास कचाहड्याचें अंजन मधांत घालावें. शंख व अश्रुपात या ठिकाणीं कपाळावरली शीर टोंचावी. त्रिफळेच्या काढ्यांत लोध्र घालून त्यानें सिंचन करावें व पंच कल्काचें चूर्ण मधांत मिसळून त्याचा लेप द्यावा.

---

## श्लेष्मपरीक्षा.

जेव्हां अश्वाच्या नेत्रांतून नेहमीं श्लेष्मा (मळ) वाहतो, अश्रु वाहतात, काच उत्पन्न होते, व डोळ्यांस पांढरेपणा येतो, तेव्हां पिंपळी, लोध्र, कटुक, रोहिणी, त्रिफळा व पिचुमंद हे पदार्थ गोमूत्रांत भिजत घालून किंवा कढवून राहिलेल्या पाण्यांत मध घालून आणि सोसेल इतकें गरम करून अश्वाच्या नेत्रांस त्याची वाफ द्यावी व तें पाणी डोळ्यांतही घालावें. कटु तेल पाण्यांत कढवून वावडिंगाचा कल्क मिसळून, तें नस्य द्यावें. गैरिक,

आलें, काजळ, बृहतीफल, मिरीं, पिंपळी, वावडिंगें, व सैंधव हे पदार्थ समभाग करून ताम्रपात्रामध्यें गोमूत्रांत भिजत ठेवावे. ते पुष्कळ भिजल्यावर पुन्हां पीठ करावें. याप्रमाणें हें चूर्णांजन कफात्मक नेत्ररोगावर प्रशस्त होय.

जो घोडा मुखांतून व नाकांतून श्लेष्मा (कफ) गाळतो, अत्यंत दीन होतो, ज्याचें डोकें जड होतें, आहार मंद व टाळू शुष्क होते, त्यास कफोद्भवशिरोरोग झाला, असें जाणावें.

यास टाळूचे ठिकाणीं शिरावेध करावा. पौंडरिक, वावडिंगें, कुटकी, डोरलीं व मिरीं हे पदार्थ चूर्ण करून मेंढीचे दुधांत त्यांचें नस्य करावें. सुंठ, बडीशेप, तगर व हरेणुक यांचा गोमूत्रात कल्क करून तो तेलांत कढवावा आणि त्याचें नस्य द्यावें. तीळ व मूग हे खाण्यास द्यावे. त्रिकटु, कुटकी व मध देऊन त्यास साहेलसें उष्ण करावें.

## सिंहानक (शिंगाडा) रोगपरीक्षा.

सिंहानक (शिंगाडा) हा रोग वात, पित्त, कफ व सन्निपात यांपासून होतो. त्याचें लक्षणः—नाकांतून फेंसाचा स्राव होत असतां तो रोग वातापासून झाला आहे असें समजावें; तांबडा, पिवळा व काळा असा स्राव होत असल्यास पित्तजन्य रोग जाणावा, नष्ट व दह्यासारिखा स्राव असल्यास कफापासून रोग आहे असें जाणावें; आणि अनेक रंगांचा स्राव होत असल्यास सन्निपातजन्य अतएव असाध्य होय. वात व कफ यांपासून हा रोग झाला असतां मस्तकाचे ठिकाणी घाम उत्पन्न करावा; पित्तापासून असल्यास प्रियंगु, चंदन व वाळा यांनीं मस्तकास लेपन करावें. कोणतेही सिंहानकास शंख व टाळू या ठिकाणीं शीर टोंचावी. बृहती, पांढऱ्या मोहऱ्या, व डोरलीं हीं गोमूत्रांत चूर्ण करून व तेलांत आलोडन करून नस्य द्यावें. हरळी खाण्यास घालावी, पाणी थोडें द्यावें. नासिकेच्या अग्रभागीं व्योषचूर्ण देऊन आंत

नलिकाछिद्रानें औषध घालावें. याप्रकारानें कफाचें आकर्षण होतें. तर हा उपाय सिंहानकावर अवश्य करावा. शिरांचें रेचन करावें. अतिविषाचें चूर्ण व कूटचूर्ण श्लेष्म्याचा नाश होण्यासाठीं द्यावें. वसु, वावडिंग, राळ, देवदार, रजनी, वारीहींकंक, आणि वालमूळ हे समभाग घेऊन त्यांचा कल्क करून पंचमूळांच्या कषायांत तेल पक्व करून, त्यासह तें नस्य कटुचूर्णयुक्त द्यावें. ह्मणजे वात व कफ यांपासून झालेल्या सिंहानकाचा शम होतो. पित्तसिंहानकास मंजिष्ठा, ज्येष्ठमध, लोध्र, पिंपळी व रजनी (हळद) दोन प्रकारची (अंबहळद व गांवठी हाळद) यांचें नस्य दुधाशीं द्यावें. लोध्र, प्रपौंडरीक, ज्येष्ठमध, व निळें कमळ यांचा कल्क करून तो तेलपाणी व दूध यांत कढवावा, व तें नस्य द्यावें. ह्मणजे पित्तसिंहानकाचा नाश होतो. नस्य दिल्यावर घोड्याला कांहीं वेळ पुढच्या पायांस बांधून चालवावें, व पृष्ठभागीं ताडन करावें; ह्मणजे नाकांतून श्लेष्मा निघून जातो. असें दररोज प्रातःकाळीं करावें. सखल प्रदेशांत चालवावें. नासाछिद्रास गुडूची, त्रिफळा, निंब व अडुळसा यांचा कल्क करून सूक्ष्म कलमानें प्रोक्षण करावें. खाण्यास तिखट मूग तुपानें चोपडलेले असे द्यावे. पित्तसिंहानकावर तेल देऊं नये. वात व पित्त या द्वंद्वापासून हा रोग झाला असल्यास दोन्ही विधि करावे आणि सन्निपातापासून झाला असल्यास तिन्हीही उपचार करावे.

---

## संनिपातरोगपरीक्षा.

वर सांगितलेलीं तिन्हीं लक्षणें भासत असतां संनिपातरोग जाणावा. तो असाध्य अथवा कष्टसाध्य दोन्हीही आहे. त्यास पूर्वोक्त शेरावेध करावा. देवदारू, दोन्ही हळदी, पिंपळी, शृंगवेरक, प्रपौंडरीक, मधुक व सरसाचीं पानें यांचें दारूंत प्रतिपान द्यावें. श्रीवासक, सर्जरस, वेखंड, हरेणुक व नूप हे पदार्थ मिश्र करून त्यांची धुरी ना-

कांत द्यावी. आणि तीळ व मूग मध व तूप यांबरोबर खाण्यास द्यावे.

---

## रक्तादि शिरोरोग.

कडू क्षार व आम्ल हे रस अतिशय सेवन केल्यानें अश्वाचें रक्त कुपित होऊन शिरोरोग होतो. त्यापासून शून्यता, अक्षिकूट व नेत्रांचे ठिकाणीं लाली हीं उत्पन्न होतात. त्याच्या मनांत खिन्नता असते, व नेत्रांतून कधींकधीं रक्त गळतें. हा रोग अश्वाच्या डोक्यावर काठी किंवा धोंडा वगैरे मारला असतांही उत्पन्न होतो. या घोड्याचे कान ताठ, डोकें जड, व मन खिन्न असतें. पित्तजन्य शिरोरोगास जी क्रिया सांगितली, तीच यासही करावी. जो घोडा नेहमीं आकाशाकडे पाहतो, व ज्याच्या नाकांत किडे झालेले दिसतात, त्यास कृमिजन्य रोग आहे, असें समजावें. यास त्रिकटु, वावडिंग व डोरली हीं दारूसहित वाळवून त्यांचें नस्य द्यावें.वावडिंग, लसूण, लोध्र व बृहतीचीं फळें यांचा गोमूत्रांत कल्क करून, तेलांत पाचित करून, तें सोसेल असें उष्ण नस्य द्यावें आणि तीळ व मूग यांत वावडिंग व तूप घालून खाऊं घालावें.

## कर्णरोग.

दोषांनीं अथवा प्रहारांनीं रक्त दूषित झालें असतां सर्वांगाचे ठायीं वेदना होऊन अश्वास शोथ नांवाचा कर्णरोग होतो. कानांतून पू गळूं लागला ह्मणजे तो रोग कानांत झाला, असें समजावें.

वस्त्रानें शलाकेचें अग्र वेष्टन करून त्यानें आंतील पू काढावा.नंतर अश्वास पाडून बंधन करावें व त्याचे कानांत मध व तूप घालून कान भरावा. पिंपळी, लोध्र, ज्येष्ठमध, मधुक व चंदन यांनीं सिद्ध केलेलें घृत कानांत घालण्यास प्रशस्त होय.

कुड्याचें बीं पीठ करून त्यांत ज्येष्ठमध घालून घृतांत

आलोडन करावें. व किंचित् ऊन करून त्यांत वस्त्र भिजवून तें कानांत घालावें. कवठाचा रस, मध व तूप मंदोष्ण करून तें कानांत घालावें. क्षीरवृक्षाचें पान व साल, सापाची कांत, जटामांसी, गुग्गुळ, कुष्ठचूर्ण व मनशीळ हे पदार्थ तुपांत मर्दित करून त्यांचा धूर कानांस द्यावा. खावयाला पिंपळी व तिखट मूग हे मध मिश्र करून द्यावे.

कान सुजून वांकडे होतात, त्यास उपचारः—प्रथम कान शस्त्रानीं छेदून मग सैंधव, संचळ व गूळ हीं प्रत्येक एक एक टांक घेऊन वाटून त्यांचा कानावर लेप करावा, व तसाच दुसरे दिवशीं कान धुऊन पुन्हां लेप करावा; आणि सुंठ, सैंधव व लसूण हीं पावशेर प्रमाणें घेऊन कुटून तुपाबरोबर पोटांत द्यावीं. येणेंकरून तीन दिवसांत कानाचे सर्व रोग बरे होतील.

कर्णमूळः— कानाखालीं गांठी येतात, अथवा मानेस गांठी येतात तें. त्यास उपचार—लोखंड तापवून डाग द्यावा.

## घ्राणरोग—( नासारोग ).

ज्याच्या नाकांत पुटकुळ्या, व्रण किंवा सूज आली असेल त्यास घ्राणरोग झाला असें जाणावें. त्याचें दुष्ट रक्त आकर्षण करावें. नंतर त्यास जमिनीवर पाडून शस्त्रानें नासापुटास टोंचावें. पुढें त्यास घृताभ्यंग करावा. आणि मग पंचवल्कलाचे उदकानें तुपासह वरचेवर त्या घ्राणास सेचन करावें.

गुग्गुळाचा धूप जाळावा. त्रिफळेच्या काढ्याबरोबर हरळी खावयास द्यावी. सितळ नस्य द्यावें. बिंब ( तोंडलें ) याचीं पानें पाण्यांत शिजवून मध व तूप यांजबरोबर खावयाला द्यावीं. तिळाशीं व तिक्त (तिखट) मुगांशीं उत्तम रक्तचंदन, लोध्र, मध, हरताळ, कालेय, उपसरी व वालाक्ष हे पदार्थ शेळीच्या दुधांत मिळवून त्यांचा कल्क

व तिळाचें तेल हें अश्वास दिलें असतां मांसव्रणाचा नाश करतें.

## व्रणपरीक्षा.

व्रण सर्व रूपांनीं युक्त असतां ता संनिपातजन्य किंवा द्विरूप ह्मणजे द्वंद्वजन्य होय. दुष्ट व्रणास आधीं शुद्ध करावें आणि नंतर तो बुजविण्याचा उपाय करावा. जो व्रण प्रथम उत्पन्न होऊन मग त्यास दुर्गंध सुटतो, पुढें फुटतो आणि नंतर पीटिका (फोड) येतो, तो अशुद्ध होय. तो याप्रमाणें नसल्यास शुद्ध होय. दंतीमूल, दोन्हीं हळदी चित्रक व विश्वभेषज(सुंठ), किंवा रक्तजन्य असल्यास सैंधव, हे पदार्थ पेजेंत चूर्ण करून व्रणास लाविले असतां शोधन होतें. तीळ व मातूची पेंड हीं, किंवा दहीं, सैंधव, निंबाचीं पानें व तिळकल्क हीं मधाशीं द्यावीं; ह्मणजे व्रणाची शुद्धि होते.

व्रण शुद्ध झाल्यावर मध व सैंधव शिवाय करून वरील पिंड दिला असतां व्रण बुजतो. डाळिंब, आवळी, अगस्त्य व कंवठ यांच्या साळीचें चूर्ण हें शुद्ध व्रणास लाविलें असतां व्रण बुजतो. व्रण बुजल्यावर केश येण्याकरतां डुकराच्या अस्थि अथवा केश, दंत किंवा नख आणि वृषभादिकांचें गंडस्थळ किंवा कांस यांचें हाड किंवा प्राण्यांचे केश मिळेल तें एकत्र करून जाळावें, व ती राख तूप व तेल यांत लावावी, ह्मणजे केश उगवतात.

नाडीचे ठिकाणीं व्रण असल्यास, कण्हेर, दंती, अर्क (रुई), स्नेह, टक व चित्रक यांसह भल्लाक (बिबा) लावावा. घेरोसा गोमूत्रांत कालून त्या नाडीव्रणांत भरावा. रक्तापासून किंवा क्षतापासून व्रण असल्यास मूलकादिक व आम्ल पदार्थांनीं स्वेद (घाम) उत्पन्न करावा. ज्येष्ठमध व व्रतती यांचा कल्क तूप व मध यांसह वस्त्रानें व्रणास बांधावा. व तुपानें सेचन करावें. पंचवल्कलांच्या कल्कानें तुपांत लेप करावा. खाण्यास वाळलेलें गवंत द्यावें. पाणी थोडें पाजावें. पृष्ठ-

भागीं व्रण असल्यास वर सांगितलेला शोधनप्रकार करून सांगितले-ल्या सर्व क्रिया कराव्या. जो व्रण अति मोठा फार दिवसांचा किंवा मांस, मज्जा आणि अस्थि यां ठिकाणीं असेल तो असाध्य किंवा कष्ट-साध्य होय, असें जाणावें.

---

## पादरोग.

आतां पादरोगाचें लक्षण व चिकित्सा सांगतों. मंडूकता, पांसुखुर, पुनःखुर, चूर्णक, अध्यास्थि, दर्भक, चक्रवाकिक, उलूक, पादसंस्थान, पादविदालिका, आकर्दव्य, उपजंघा, गर्दभ, प्रपोटक, कदंबक, घृष्ट-तल व भिन्नखुर याप्रमाणें अश्वास पादरोग होतात. मंडूकता हा रोग मंडुकस्थानीं व्रण झाला असतां उत्पन्न होतो. पायावर प्रहार केला असतां व दुष्ट कर्दमांत चालविलें असतां पांसुखुर नांवाचा रोग होतो. सर्व पादरोगांस शिरावेध प्रशस्त होय ज्यास तळपांयाशीं हा रोग झाला आहे, त्याचें मंडुकशोधन करावें. अति तीक्ष्ण शस्त्रानें क्लिन्न (आर्द्र)मांस कापावें. व तळपायाची केशांतली शीर टोंचून दुष्ट रक्त का-ढावें. नंतर तें वाहवावें.अश्वास त्रिफळ्याच्या काढ्यांत गुग्गुळ पाजावा. या उपायांनीं रोगाचा शम न झाल्यास अग्नीचा डाग द्यावा. दूधभात आणि गुग्गुळ हें पान करवावें. असें सात, सोळा, किंवा बारा दिवस करावें. त्यास खाण्यास हरळी व पिण्यास उष्णोदक थंड करून द्यावें. हाच क्रम सर्व पादरोगांवर प्रशस्त होय. व्रण किंवा रोमसंबंधी ग्रंथी असेल ती छेदावी. मग रुई, कण्हेरी व चित्रक यांच्या मुळ्या गोमू-त्रांत वाटून त्यास लेप द्यावा. ह्मणजे तो व्रण वाळतो. नंतर दंती, न-रकी, भल्लातक (बिबा), असिका आणि शिते यांचा रुईच्या दुधांत लेप द्यावा. ह्मणजे त्या रोगाचा भेद होतो. इतक्यानेंही परिहार न झाल्यास पूर्वीप्रमाणें अग्निदाह (डाग) देऊन त्रिफळेच्या काढ्यांत गुग्गुळ पाजावा. दाह (डाग) हा सर्व पादरोगांस प्रशस्त होय. आ-

मर्दक नांवाचा रोग झाल्यास फाडून तत्क्षणीं दाह करून तो व्रण बुजेपर्यंत गुग्गुळ पाजावा. मुस्तकानी आणि यव हीं त्यास वर्षभर देऊं नयेत. प्रपोटक रोगास फाडणें शिवायकरून वरील सर्व विधि करावा. कदंबक रोग ह्मणजे शिळेप्रमाणें पायांस काठिण्य प्राप्त होतें. जंघांचे ठिकाणीं सूज येऊन ती मृदु असेल तर तो अध्यस्थि नामक रोग होय. त्यास अग्निदाह करून आमर्दकास सांगितलेली सर्व क्रिया करावी. उपजंघ नामक रोगास विशेषेंकरून शिरावेध योग्य होय. ज्या एका उपचारानें पादरोग कांहीं शांत होईल, तीच क्रिया वैद्यानें पुनःपुन्हा करावी.

---

## लंगितपरीक्षा.

लंगित ( लंगडणें ) हा रोग दोन प्रकारचा आहे. एक वातादि दोषांनीं उत्पन्न होतो, व दुसरा अभिघात ( प्रहार ) केल्यापासून होतो. त्यास उपायः—थोडा उरांत, बाहूंचे ठिकाणीं, जानु, जंघा, त्रिक, कूर्च, खूर अथवा मंडूक या ठिकाणीं प्रहारावांचून लंगडत असेल तर तो वातादि महादोषांनीं लंगडतो, असें जाणावें. त्यास उपवास घालून शुद्ध करावें; नंतर हळद, अतिविष, लोध्र, पिंपळी, बिलायची, सुंठ, तालिसपत्र, वेखंड, कुष्ठ, कुचला, कंकोळ व सैंधव या औषधांसह दारूंत प्रतिपान तीक्ष्ण व शीत यांचें समालोडन करून प्रतिदिवशीं द्यावें. असें तीन किंवा सात दिवस करावें. रक्त शुद्ध नसल्यास वैद्यानें उगांतली शीर शस्त्रानें टोंचावी. कारण, शिरांतून दुष्ट रक्तस्राव आला असतां, अश्वास सुख होतें. नंतर शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें दोन्ही पायांतील शिरावेध करावा. शिशपा व पाटलीमूल सालीसह पाण्यांत कढवून त्यांत तूप व तेल घालून त्यांतून गुग्गुळ द्यावा. हा लंगडण्यावर हितावह होय.

प्रहारापासून असल्यास तूप शंभर वेळ धुऊन त्याचे उरास अभ्यंग करावे. आणि पंचवल्कलांचे चूर्णाचा लेप वरचेवर करावा. असें सात सप्तकें ह्मणजे ४९ दिवस करावें. घोडा ठाण्यावर असतां वीस दिवस करावें. नंतर त्यास फिरवून निरूहबस्ती करावा. तिसरे सप्तकाचे शेवटीं घोड्याचें रक्त अशुद्ध असल्यास पुन्हां शीर टोंचावी; आणि अग्नीनें पोळवावें, ह्मणजे प्रहारजन्य लंगडणें नाहींसें होतें.

कपि, कच्छुक व वाह्याल यांचें मांस आणि निंब व सैंधव यांचा कषाय चतुर्थांश उरवून त्यांत आलें, सिंधु व हरिद्राचूर्ण हीं घालून तेल व त्र्योपचूर्ण यांसहित घोड्यास द्यावें. ते दिवशीं त्याला पाणी थोडें पाजावें. मागले भागास लंगडत असतां अनुवासन-बस्ति करावा. सर्व लंगडण्यांस शिरावेध प्रशस्त होय. उरांतील रोगानें लंगडत असतां जी क्रिया सांगितली ती सर्व लंगडण्यांस करावी. नेहमीं जो लंगडतो त्यास कंबरेंत धनुर्वात आहे, असें जाणावें. अंडाजवळ त्याची शीर टोंचून त्याला खाण्यास चांगलें द्यावें; व निरूह करावा. वातहारक तैलांनीं अभ्यंग करावें. जो घोडा तीन पायांवर उभा राहून ध्यान करतो, तो अश्व शुद्ध आहे असें समजावें. तसाच जो पुढचे भागावर चालतो, मागल्या भागा-पेक्षां पुढचे भागावर ज्याचें उत्थान असतें, तोही शुद्ध व दृढ होय. ओपेतल्या मारखा जो घोडा उरांत नेहमीं ९ किंवा तीन अंगुलें ही वाकलेला असतो, त्याची परीक्षा झाली पाहिजे. याहून जास्त वांकला असल्यास तो मोठा बलवान् असला तरी ग्राह्य नाहीं. जो दोन्ही किंवा एक खांदावर उचलून वेगानें गतीची तुलना ठेवितो, तो वातकटि जाणावा. जो वाळवंटांतून जात असतां कंबर उचलतो , जो मान आंखडून उराकडे पाहतो, ज्याचे कान अस्ता-व्यस्त होतात, जो चालतांना मागले खुरांच्या अग्रानें जमिनीस

टेंकतो, गुडघे आंखडतो, व पुढचे भागानें उठून कांहीं लोळून मग मागला भाग उचलतो, ते सर्व अश्व वातबद्ध व अश्वकर्मांत निरुपयोगी होत.

अश्वास निरूह करणें तो, त्यास आधीं फिरवून, स्नान घालून व पाणी पाजून, चारा घातल्यानंतर तो सुखानें एकाग्र बसला असेल तेव्हां करावा. लंगितास ( लंगडेपणास ) निरूह करावयाचा तो तीन, पांच किंवा सात दिवस करावा.

---

## कासरोग.

कास (खोकला) हा रोग तीन प्रकारचा आहे: जो खोकला श्वास व श्लेष्मा नसून रूक्ष असेल व शरीर कृश झालें असेल, तो कास वातजन्य होय; ज्यापासून अश्वास घाम येतो, खोकताना निळे व पिंवळे असे बेडके पडतात, तो पित्तजन्य; आणि जो अधिक असल्यानें अश्वाचे रोमही दूषित होतात, अश्वाचें शरीर व डोकें जड झालेलें, अग्नि मंद होतो, खिन्नता येते, दह्यासारखा पांढरा कफ पडतो, खावयास न दिलें ह्मणजे त्यास सुख होतें, असा जो कास तो कफोद्भव जाणावा. ह्या तिन्ही लक्षणानीं युक्त असतां सन्निपातिक समजावा. लाल कफ पडल्यास रक्तजन्य कास जाणावा. जो घोडा खोकतांना शरीर व मान पसरतो, अशक्त होतो, आणि पुवाप्रमाणें दुर्गंधयुक्त कफ पडतो, त्यास क्षतापासून कास आहे, असें समजावें.

वातकासास उपायः—पंचमूलांचे काढ्यांत मांसाचा रस करून तो तिळाचें तेल व मीठ यांसहित खाऊं घालावा. धमासा, रिंगणी, बृहती व कटुरोहिणी, यांचें चूर्ण करून वार्ताकपुष्प तेलांत साधून वंशलोचन व गोधूमचूर्ण हे सर्व दुधांत एकत्र करून वार्ताकी

फलाचे काढ्यांत सुंठ, मागधक व तिळांचें तेल यांसह पानक द्यावें. मूलकाचा रस व वार्ताक कढवून तेलमिश्रकाढा पाजावा.

कुलित्थ, दर्भमूल व मारलेला गोमेद यांचा धूर नासिकेंत द्यावा.

## पित्तकास.

गोमयाचा रस ब पिंपळीचें चूर्ण यांचा लेह मध व तुपांत द्यावा. यवचूर्ण, वंशलोचन, धात्री ब मागधिका, हे पदार्थ तूप, मध ब दूध यांसहित खाऊं घालावे. पिंपळी, मध, दूध, साकर आणि क्षौद्र हें पानक द्यावें. पंचतिक्तांचा कषाय दिला असतां मिश्रान्न खाऊं घालावें. मागधिकायुक्त मूग मध व तूप यांशीं द्यावे. चूर्ण, मांसलें-का, वंशलोचन, मध, पिंपळी, लोध्र, चंदन व कमळें हे पदार्थ तुपांत भिजवून त्यांचा धूर नाकांत द्यावा.

## श्लेष्मकास.

चित्रक, त्रिफलाचूर्ण, नागरमोथे ब त्रिकटु यांचा लेह द्यावा. तिक्तघृत व तिक्त मूग खाऊं घालावे. तिळांचें तेल, मध, त्रिकटु व गोमूत्र यानीं मर्दन केलेले व्योषचूर्णमिश्रित कुलित्थ हे भक्षणास योग्य होत. दंतिमूल, हरिद्रा, हिंग व बृहतीफळ यांची धुरी द्यावी, ह्मणजे कफकासाचा नाश होतो.

## ज्वर.

पित्तजनक पदार्थ सेवन केले असतां पित्तजन्यज्वररोग होतो. ज्वरानें अंगास उष्ण घाम येतो व अश्वाचे नेत्र लाल होतात. त्याचे शरीरास बोरीचे पानांचा फेंस लावावा. ताडाच्या ओल्या पंख्यांनीं वारा घालावा. साखर घालून दूध पिण्यास द्यावें. कफ व पित्त यांपासून ज्वर असल्यास दुधांत पांढरीं-कमळें मर्दन करून ब तूप घालून

त्यांचा लेप द्यावा. दर्भ, काश व इक्षुमूल यांच्या कल्कानें मंजिष्ठा व शर्करा घालून दुधाचा बस्ति करावा. तूप व यव खाण्यास द्यावे. पिण्यास थंड पाणी व खाण्यास हरळी हीं त्यांस देत जावीं. आणि पित्तज्वरास सांगितलेली सर्व क्रिया करावी. पित्तजन्य व कफपित्तजन्य या दोन्ही ज्वरांचा उद्भव क्रोध, अतिश्रम आणि कडू, आंबट व खारट पदार्थांचें फार सेवन यांपासून होतो.

---

## जीर्णज्वर.

अजीर्णाच्या योगानें घोड्याचा आहार मंद होतो, त्याचें मन खेदयुक्त असतें, जंघांनीं चाळतो, मूत्रपुरीष कष्टानें करतो, जंघा सुजतात आणि खूर व मुख या ठिकाणीं व्रण होतात; याप्रमाणें चिन्हें झालीं असतां जीर्णज्वर जाणावा. यास निदान तीन दिवस उपास घालून मग यथायोग्य प्रतिपानें दारूशीं द्यावीं. असें तीन किंवा पांच दिवस करून सप्तरात्रानंतर शिरावेध करावा. अश्व उरानें खाजत असल्यास उरावरची शीर टोंचावी, जंघावर लंगडत असतां जंघेवरची आणि कूर्चावर लंगडत असतां कूर्चावरची शीर टोंचावी. मग प्रतिदिवशीं वाढता पिंड देत जावा. कुटकी, पिंपळी, सुंठ, वेखंड, रामठ व सैंधव यांसहित पिंड द्यावा. अशुद्ध असल्यास पूर्वी सांगितल्याप्रमाणें गुग्गुळ द्यावा.

---

## श्लेष्मज्वर.

कफजनक पदार्थांच्या सेवनापासून कफज्वर होतो. या ज्वराचे योगानें अश्वाच्या नासिकांतून नेहमीं कफाचा स्राव होतो. यास पिंपळी, सुंठ, गुडूची, हळद, वेखंड, राळे, यव, नागरमोथे, व कंटकरोहिणी हे पदार्थ कढवून चतुर्थांश उरवावे व हा कषाय मधाशीं पाजावा. खाण्यास पंचतिक्तक, सित्धांन आणि मूग कटुकासह द्यावे. ते गरम असून त्यांत मध घातलेला असावा. वाळूच्या

पिंडांनीं मस्तक व शरीर यांचे ठायीं घाम काढावा. शंख व जत्रु यां ठिकाणची शीर टोंचावी. सन्निपातजन्य ज्वर असतां सर्व ज्वरांचीं चिन्हें त्यांत होतात. तो असाध्य होय. त्यास सर्व ज्वरासारखी क्रिया करावी.

---

## वातज्वर.

खोकला, ताठपणा, मूर्च्छा, व रक्तासहित कफ इत्यादि वातज्वराचीं लक्षणें होत. प्रहारापासून ज्वर असल्यास वरचेवर जांभया येतात. त्यास पंचवल्कलांच्या कल्कानें मधासहित अश्वाच्या सर्व शरीरास लेपन करावें. पित्तज्वराचीही क्रिया या ज्वरास करावी.

---

## अतिसार.

अश्वास अतिसार, वायु, पित्त, कफ व संनिपात होतो. श्वासाचे वेळीं घोडा संकोच करून अल्प किंवा बहुत शब्द सहित फेंसयुक्त मळाचा स्राव करीत असतां, तो अतिसार वातापासून झाला असें समजावें. अश्वास घाम व दाह होत असून निळा व तांबडा स्राव होत असतां, आणि अश्व मंद व अशक्त होऊन त्यास रोमांच येत असतां, कफजन्य अतिसार जाणावा. याशिवाय लक्षणें होत असतां पित्तजन्य अतिसार, आणि सर्व लक्षणें एकदम होत असल्यास संनिपातजन्य अतिसार, होय.

यावर चिकित्सा अग्निपुराणांत सांगितली आहे तीः—

नागरमोथे, अतिविष, विष्णुक्रांत व चिल्लमाळिका यांचा कषाय हा सर्व अतिसारांस नाशक होय.

बृहती, शालपर्णी, पिठवणी, रिंगणी, बेलफळ, सुंठ, कंवठ व पाढळ यांचा कषाय करावा. साळीचे तांदुळांची केलेली पेज, दहीं आ-

णि आम्लवेतस हीं त्यास खाण्यास देऊन नंतर वर सांगितलेला कषाय त्यास प्रतिपान द्यावें, ह्मणजे वातातिसाराचा नाश होतो.

जांभूळ, आंबा व डाळिंब यांचे माळींचा कषाय करून मधासहित प्रतिपान द्यावें. अथवा त्यांचें चूर्ण मधाशीं व तेलाशीं द्यावें. जांभूळ आदिकरून जे पदार्थ, त्यांच्या काढ्यांत कुटज व मध घालून तो द्यावा. तांबडे साळीच्या तांदुळांची पेज करून पाजावी. ह्मणजे पित्तातिसाराचा नाश होतो.

कुटज वृक्षाचें बीज, डाळिंब आणि आंबा या साळींचें चूर्ण, मातुळिंगाचा रस व सैंधव ह्यांचा लेह करून अश्वास चाटवावा. ह्मणजे कफातिसाराचा नाश होतो.

---

## कृमिकोष्ठपरीक्षा.

अश्व रोड झाला असून त्याचे विष्ठेंत कृमि वगैरे जंतु पडतील तर तो कृमिकोष्ठजन्य अतिसार समजावा. श्लेष्मयुक्त कोष्ठ ज्यास असेल तो घोडा मंदाहार, दुर्बळ, व ज्याचें अंग रोमांचानें फुगीर असा होतो; पुरीष हे श्लेष्मानें युक्त व पिच्छल असें होतें; आणि निद्रा व आळस हीं त्यास फार येतात. कृमिकोष्ठ झाल्यास महिनाभर बकऱ्याचें मांस दुधाशीं सिद्ध करून द्यावें. तीळ, दूध, गूळ व दहीं आणि भात एकत्र करून तें अन्न अश्वास द्यावें. वावडिंग, चित्रक, ओंवा, स्थलवेत, कपिला, वेखंड आणि रिष्ठ यांचा कषाय करावा. कपिल्लकाचा कल्क व हा कषाय यांनीं तूप साधून तें वावडिंगचूर्णासहित त्यास पाजावें.

वावडिंग, तूप, पंचक्षार, पडवळ, निंबपत्र, वेखंड, चित्रक, पिंपळी व आलें यांचें चूर्ण एकत्र करून दारूसहित हें पान द्यावें. या चूर्णपानापासून कृमींचा नाश होतो. हा प्रयोग कृमिकोष्ठावर व मंदाग्नीस दीपन करण्यास प्रशस्त होय.

घोडयाचा आहार मंद झाला आहे व कृमि वगैरे नाहींत तेव्हां तें श्लेष्मकोष्ठ जाणावें. त्यास कृमिकोष्ठाचीच क्रिया करावी.

कृमिरोगावर–(१) हिंगणाची साल पावशेर, पळसाचें बीं व चोखोवा ९ टांक, यांचें चूर्ण करून गुळांत कालवून देणें. (२) हिंग, पळसबीं आणि वावडिंगें हीं प्रत्येक ९ टांक प्रमाणें घेऊन चूर्ण करून तें सवदणीचे पाण्याशीं द्यावें.(३) हिरडे, बेहडे, मिरे आणि लसूण, हीं प्रत्येक ९ टांक आणि सुंठ, पिंपळी, सैंधव, वेखंड, वावडिंग, अजमोदा, चोखोवा, गांधीण, घोडेकातरा, शेवग्याची साल, कडसराचें बीं आणि हिंगणाची साल, हीं प्रत्येक ३ टांक घेऊन चूर्ण करून तें चूर्ण गुळाबरोबर कालवून सात दिवस द्यावें म्हणजे सर्व कृमिरोग जातील. हेंच औषध शूळादि सर्व वायूंवर फार गुणकारक आहे. घोड्याचे पोटांत कीड पडते त्यास उपायः–गूळ, हळद, भांग व मीठ हें प्रत्येक पावशेर घेऊन, कुटून, पाण्यांत कालवून व गोळा करून तो गोळा चारावा. आणि तिसरे प्रहरपर्यंत घोड्याला उन्हांत बांधावें. नंतर मोठ्या भांड्यांत पाणी घालून त्यापुढें ठेवावें व एकदम पिईल तितकें पिऊं द्यावें.

---

## मूत्रपरीक्षा.

अश्व आयासयुक्त होऊन थोडें थोडें व फेंसट असें मूत्र करीत असेल तर तो वातमूत्ररोग आहे, असें समजावें. वेदनांनीं पीडित होऊन तो थोडें मूत्र करितो व मुततांना त्याचे केंस कंपायमान होतात, त्यास सन्निपातजन्य मूत्ररोग आहे, असें जाणावें. त्यास शिश्नापासून पार्श्वभागीं बस्तीपर्यंत अभ्यंग करून हळूहळू मर्दन करावें. पाषाणभेद, सुंठ, गोखरू, दोन्हीबृहती, एरंडमूळ, सुविष्णुक्रांत, व शतावरी यांचा पाण्यांत कषाय करून द्यावा. खाण्यास

यवांची पेज करून पाजावी. नंतर वरील कषायाचें प्रतिपान द्यावें. म्हणजे वातमूत्राचा व दुसरे मूत्ररोगांचा नाश होतो.

---

## शोथ ( सूज ).

शोथ ( सूज ) उत्पन्न झाल्यापासून वेदना होऊन, अतिस्थूलता व मृदुता होत असल्यास तो शोथ वातजन्य होय; वेदना, उष्णता, अत्यंत उच्छूनता, काठिन्य व मोटेपणा असल्यास कफजन्य आहे; रक्तापासून शोथ असल्यास तो पित्तजन्य आहे असें समजावें; आणि हीं सर्व चिन्हें होत असल्यास संनिपातजन्य जाणावा. दोन चिन्हें होत असल्यास द्वंद्वजन्य शोथ समजावा. यास प्रथम जळवा लावून शीर टोंचावी. नंतर ही पुढील क्रिया करावीः शोथ वातोत्पन्न असल्यास तैलाभ्यंग करावें. शोपांचा लेप देऊन एरंडाचीं पानें बांधावीं. पिंपळी, सुंठ, वसु, देवदारु, रुई, आणि शिग्रू यांचा लेप द्यावा. लोध्र, एरंड, वायवर्णा व अंकोलक यांचीं मूळें पीठ करून गोमूत्रांत मर्दून त्याचा लेप द्यावा. पंचमूलांचा कषाय तिळाचे तेलाशीं प्रातःकाळीं पाजावा. भोजनांत रसयुक्त भात द्यावा. पित्तजन्य शोथास मंजिष्ठा, धायटी, लोध्र, उपलसरी व नवीन कमळें यांचा लेप द्यावा. व क्षीर ( दूध ) बस्ति करावा. पानास, दर्भ, काशा, देवनळ आणि ऊंस यांच्या मुळ्यांचा काढा शर्करा व मध यांसहित प्रशस्त होय. श्लेष्मशोथास पंचतिक्तकांत सिद्ध केलेलें इष्टक ( गोमय ) गाईचे तुपांत मिश्र करून त्याचा सिकतापुटांनीं रूक्ष लेप करावा. चवक, व्योष, वावडिंग, एला, कुष्ठ, जिरें आणि सैंधव हीं गोमूत्रांत खलून दारूसहित भोजनास प्रशस्त होत. सन्निपातजन्य शोथ असल्यास सर्व शोथांची क्रिया करावी. व द्वंद्वजन्य शोथ असल्यास रक्तमोक्ष करून दोहोंची क्रिया करावी; म्हणजे त्या उपायांनीं शोथाचा नाश होतो.

---

## मुष्कपरीक्षा.

ज्या अश्वांचे वृषण दिसण्यांत मृदु असून स्पर्शास कठिण व रूक्ष असे लागतात त्यांस रक्तांड असें ह्मणतात. व त्यास पित्तांडावर सांगितलेल्या सर्व क्रिया कराव्यां. ज्याचें अंड उच्च झालें असेल, त्यास मुष्कपर्यंत कीळन ( शेंकणें ) करावें. अशा अश्वास पुष्कळ भ्रमण करवूं नये. त्याचे शरीरास सतत अभ्यंग करावें. आणि त्रिफलेच्या काढ्यांत गुग्गुळ द्यावा. याप्रमाणें व्रण बुजेपर्यंत क्रिया करावी.

---

## अंत्ररोगपरीक्षा.

पुष्कळ भोजन व स्नान केल्यानंतर, पाठीवर बसून फिरवतांना जो घोडा बसण्याची इच्छा करतो, त्यास तसेंच फिरविलें असतां रक्तप्रकोप होऊन, त्याचें मेहन ( शिश्न ) शून्य व प्रक्लिन्न ( घामेजळेलें) होतें, त्यावर पुटकुळ्या येतात व त्या ठिकाणीं माशा बसतात, त्या घोड्यास औनीत नामाचा अजार झाला, असें समजावें. यास अंडासमीप कोष्ठशोषण करावें. मूत्रकोष्ठास तुपानें सेचन करावें. क्षार, तैल, जल व कोष्ठ हे पानास द्यावे. खैर व क्षीरवृक्ष यांचा सोसे असा गरम काढा करून त्यानें व्रण सेचन करावें. अति तीक्ष्ण पदार्थांचा तुपांत लेप द्यावा. मराली व सिलारस यांची धुरी द्यावी. सात्वण, सालफण, बाहवा, आणि कुटज यांचे सालींचें चूर्ण करून त्याचा लेप करावा. लवण, हाळद, रुई, मिरीं, बिबा, चित्रक आणि कुड्याचीं फळें यांचें तेल काढून तें गोमूत्राशीं लावावें; ह्मणजे व्रण बुजतो. खाण्यास तिक्तमूग, मध व तेल यांसहित द्यावे.

---

## उदरपरीक्षा.

उदर हें आठ प्रकारचें आहे; वातजन्य, पित्तजन्य, कफज, सं-

निपातन, प्लीहोदर, परिस्त्रावोदर, आणि आध्मानोदर. तेजास रूक्षता येते, वायु शब्दयुक्त सरतो, मलत्याग करतानां गुद निघतें, आणि आहार मंद होतो, हीं वातोदराचीं लक्षणें होत. पिवळी विष्ठा, पोट मोठें, घाम, उष्ण शब्द आणि उष्णश्वास हीं पित्तोदराचीं चिन्हें जाणावीं. उदरांत सूज येऊन तें वाढत जातें व शरीरांत आळस व कृशपणा फार येतो, तें कफोदर जाणावें. उदरास व्रण होऊन तें कठिण व मोठें होतें, आणि शरीरास रोडपणा येतो, तें प्लीहोदर जाणावें. अल्प मळ होतो, वायु सरतो व रक्त फेंसाळ होतें, तें आध्मानोदर होय. परिस्त्रावोदर झालें असतां, मूत्रांत दाह कधीं नसतो. अश्व रोड असून त्याचें पोट जलपूर्ण असल्यासारखें दिसतें त्यास उदकोदर आहे, असें समजावें. यास चिकित्सा: पंचमुळाचा कषाय करून त्यांत तेल घालून अश्वास पाजावें. नंतर यव खाऊं घालून तेलांनीं निरूह करावा. पिंपळी, सोंठ, क्षारपान, चित्रक व हिंग यांचा कल्क करून त्यांत तेल व महिषादिकांचें मूत्र घालून कढवावें, त्यांत कटुकचूर्ण, स्नुही (शेराचे) दुग्धांत मिळविलेलें घालावें आणि मग अश्वाची शक्ति पाहून त्यास तें तैलपान द्यावें. शक्तिबाहेर अतिपान दिल्यास घोडा मरतो. तैलपानानंतर मृदुग्रासांनीं त्यास भोजन घालावें. असें केल्यानें रोग नष्ट न आल्यास पुन्हा हीच क्रिया करावी. तुब्रंदनी व वेखंड यांचा कल्क करून त्याच्या कषायांत साधलेल्या तुपाचें पान वातोदरावर प्रशस्त होय. वातोदरास सांगितलेली क्रिया श्लेष्मोदरास करावी. संनिपातोदरास सर्वसाधारण क्रिया करावी. प्लीहोदरास त्रिकटुकाचा पिंड करून तो क्षार व सैंधव यांसह द्यावा. नंतर गाईचें अथवा म्हशीचें मूत्र पाजावें. याप्रमाणें अश्वाची शक्ति पाहून प्रतिदिवशीं करीत जावें, म्हणजे प्लीहोदराचा नाश होतो. जी क्रिया वातोदरास सांगितली तीच स्त्रावोदरास व पित्तोदरास करावी. उदकोदर झालें असतां अश्वास बांधून जमिनीवर पाडावें. आणि

हृदयाच्या खालीं व नाभीचे वर चार अंगुलें छेदन करावें. छेदण्यास शस्त्र एक अंगुल कमळाच्या पानासारखें असावें. तें पोटांत शिरवावें, छेदले ठिकाणीं व्रणावर वस्त्र वेष्टित नळी ठेवून कोष्ठांत हलकेपणा येईपर्यंत पाणी काढावें. तसें करून स्वच्छ पाणी येऊं लागलें ह्मणजे तो रोग साध्य असें समजावें. लाल पाणी किंवा रक्त येऊं लागलें असतां असाध्य होय. नंतर नळी काढून व्रणावर तुपांत भिजलेल्या कापडाची पट्टी बांधावी. क्षीरवृक्षाचे कषायांनीं अश्वास वेष्टन करावें आणि त्यास निर्वात प्रदेशीं बांधून तीन दिवस पाणी व अन्न देऊं नये. मग हरळी द्यावी. पाणी क्षीरवृक्षाच्या सालीसहित कढवून त्यांत मध घालून द्यावें. नंतर त्याचे व्रण बुजून कांहीं शक्ति आली ह्मणजे यवान्न शिजवून खाण्यास देत जावें.

घोड्याचें पोट दुखतें तेव्हां त्यास औषधः—केळीचा कांदा, केतकीचें धान ( दांडा ), आणि उंबराची साल, हीं समभाग घेऊन चूर्ण करावें. आणि पाणी घालून तो रस दोनशेर द्यावा. व गाईचें हिरवें दूध २ शेर एकत्र करून तीन दिवस द्यावें, ह्मणजे पोट दुखणें बरें होईल.

गांठाळी झालीं असतां पोट गडगडतें, हागतांना फार कुंथतो, श्वासोच्छ्वास करितो, कृश होतो व स्तब्ध राहतो, त्यास उपचारः—अंगास तेल व तूप चोळावें, उन्हांत बांधावें, आणि टाकळीचा रस १ शेर, तिळाचें तेल अर्धाशेर आणि हिंग ९ टांक अशीं एकत्र करून तें पोटांत द्यावें. असें तीन दिवस पर्यंत करावें.

पोटांत पाणी पितावेळीं जळू गेली तर घशांत असल्यास हातांनीं काढावी; पोटांत गेली असल्यास जैतूनचें तेल पाजावें.

---

## अर्श ( मूळव्याध ) परीक्षा.

गुदस्थानींचे अर्शरोगानें ( मूळव्याधीनें ) घोडा रोड, रूक्ष, मं-

दाहार, बलहीन व शिरायुक्त असा होतो. जांभळ, बोर किंवा खारीक या प्रमाणें गुदाचे आंत मांसाच्या गांठी एक, दोन किंवा पुष्कळ येतात; तो अर्श ( मूळव्याध ) रोग जाणावा. यास चिकित्साः सहा अंगुळें लांब व चार किंवा तीन अंगुळें रुंद यंत्र करून त्यांत पांच अंगुळें छिद्र ठेवावें. दोन बाजूंस दोन छिद्रें ठेवावीं. एकां छिद्रानें छेदादि कर्म करावें. नंतर छिद्रांतून अर्श अवलोकन करून यंत्राचें छिद्र ओढावें. मग लोहशलाकेनें तेथें दाह करावा; आणि जळले ठिकाणीं मध व तूप यांचा लेप करून यंत्र काढावें. मग अश्वास सोडून उठवून कांहीं चालवावें; आणि मस्तकावर व त्रिकावर अति गार पाणी घालावें. त्या रात्रीं घोड्यास घास देऊं नये. प्रातःकाळीं त्रिफलेच्या काढ्यांत गुग्गुळ द्यावा. पिण्यास कढवलेलें पाणी थंड करून द्यावें; व खाण्यास दूर्वा ( हरळी ) द्यावी. गुग्गुळ त्रिफलेच्या कषायांत सात दिवस देऊन त्यास शक्ति आली ह्मणजे यथेष्टाहार घालून पाहिजे तितकें क्रमानें फिरवावें. वातजन्य व कफजन्य अर्श असला तर अग्नीनें दाह करावा. आणि पित्तजन्य असल्यास दुधानें दाह करावा.

---

## उन्मादपरीक्षा.

अश्वास कफ व पित्त यांपासून जरी उन्माद झाला तरी वातावांचून तो होत नाहीं. वातप्रकोपाच्या कारणांनीं वायु कुपित झाला असतां उन्माद होतो. त्याचीं लक्षणेंः—जो पाणी तोंडीत पितो, दांतांनीं लगाम खातो, कधीं तृण आपण होऊन खातो व कधीं खात नाहीं, आणि एकादे वेळेस सावध असतो व कधीं बेसावध असतो; यावरून उन्माद जाणून चिकित्सा करावी. शीतजन्य रोगावर जीं अग्निदाह, भोजन, अभ्यंग व पान इत्यादि कर्मे सांगितलीं आहेत, तीं सर्व करावीं. उन्मादयुक्त अश्व, बांधून पाडिल्याशिवाय

त्यास कोणतीही क्रिया करूं नये. निंबपत्र, वेखंड, कुष्ट, लाक्षा, मीठ, हिंग, गोलोम-खुर-शृंग (गाईचे केश, खूर, शिंग) व सिद्धार्थ या पदार्थांचें चूर्ण करून गुल्मकाष्ठाच्या अग्नीवर तुपासह त्याचा धूर द्यावा. ह्मणजे उन्मादाची शांति होते.

---

## विषपरीक्षा.

स्थावर आणि जंगम असें दोन प्रकारचें विष असतें. त्यांत प्राण्यापासून उत्पन्न झालेलें विष तें जंगम, आणि मुळापासून झालेलें तें स्थावर होय. अंगास घाम येणें, रोमांच उभारणें, अरुचि, अवयवांत ताठपणा, निर्वाणमूलता, लाळ गळणें व बहुत अन्न खाणें हीं सर्पदंश झाल्याचीं चिन्हें जाणावीं. हींच स्थावर विषांचींही होत. जंगम विषापासून लाळ गळते व सूज उत्पन्न होते; व इतर सर्व दंशांचींही चिन्हें होतात. विषपरीक्षा करून अश्वास आधीं तूप पाजावें. नंतर उद्वर्तनादिक करावें. सर्पदंश झाल्यास तांदुळजाच्या व बिल्वाच्या आणि कवठाच्या मुळ्या गाईच्या तुपांत मर्दन करून पाजाव्या. शस्त्रानें स्कंधावरची शीर टोंचावी, आणि उद्वर्तन करावें.

---

## अपस्मारपरीक्षा.

घोडा बलवान् व स्वस्थ असून अकस्मात् जमिनीवर पडतो, तो अपस्मारी होय. यास उन्मादास सांगितलेली सर्व क्रिया करावी.

---

## षट्पदादिभक्षणपरीक्षा (पोटांत माशा वगैरे गेल्यास उपाय).

अश्वास पांढरेपणा, कपिलत्व आणि हिरवेपणा येऊन, शोष, मूर्च्छा, भ्रम आणि अधिक श्वास असे विकार झाले असतां, सर्पदंशाची क्रिया व औषधउपचार करावे.

## उत्कर्णपरीक्षा.

ज्याचें पुच्छ व कान ताठ, व शरीर शिथिल होतें, त्यास उत्कर्णरोग झाला असें जाणावें. त्यास वसाघृत आणि तेल यांनीं अभ्यंग करावें. प्रसारिणी आदिकरून तेलांनीं अनुवासन करावें. जवस, लवण, तीळ व यव यांचें कांजिक (पेज) त्यास प्रशस्त होय. जांगलिक रस हा पंचमूलांचा कषायं व तेल यांच्याबरोबर पिण्यास द्यावा. अथवा गूळ व तेल यांसह सुरा पिण्यास द्यावी. कुत्र्याच्या शेंपटाचें व डोक्याचें, व मेंढा, मांजर व बकरा यांचें ताजें रक्त पंचमूलांच्या काढ्यांत द्यावें. त्याच कषायांत मांसरस, तीळ व तांदूळ घालून त्यांची कणेर करून, ती तिळाचें तेल, तूप व वसा यांसहित भोजनास द्यावी. हरळीचा घांस व पिण्यास उष्णोदक द्यावें. त्रिवृत्तादिक तेलांनीं अश्वाचे कान भरावे. या क्रियेनें जर उत्कर्णरोग शांत झाला नाहीं तर उदर, कपाळ व कान यां ठिकाणीं चंडी द्यावी. ज्यास या रोगापासून ग्रासाचा द्वेष, नेहमीं अश्मान (दम), मूत्रविष्ठा करितांना क्लेश, लाळ, व्रण व श्वास होतात, तो अश्व जगत नाहीं. उत्कर्णरोगी अश्वास सफेत व स्निग्ध असें स्थान व प्रावरणें असावीं.

---

## वातोद्भवरोगपरीक्षा.

ज्या अश्वाची मान कधीं वांकते, वर होत नाहीं किंवा वर झाली असतां वांकत नाहीं, आणि कधीं अगदीं ताठ होते त्यास दारुण वातरोग झाला असें समजावें. ज्याची मान वर सांगितल्यांप्रमाणें असून तिच्यांत स्फुरण (कंप) असतें, आणि अश्वाचा आहार मंद होतो, तेव्हां त्या रोगास (मन्याचाली) ह्मणतात. घोडा निश्चल असून ज्याची हनुवटी चंचळ होते व लाळ फार गळते, त्या रोगास हनुग्रह असें ह्मणतात. घोड्याची पाठ ताठून उंच होते, तो पृष्ठ-

ग्रहरोग होय. ज्याचा एक कान लांब होतो व अर्धे शरीर वाळतें, त्यांस एकांग रोग जाणावा. जो अश्व पूर्वी संग्रामांत असून पुढें अगदीं फार दिवस स्वस्थ होता, त्यास मृगरोग होतो. त्या योगानें अश्वास अतिशय जांभया येतात. जो घोडा प्रथम पूर्व भागानें चालून नंतर मागला भाग उचलतो, ज्याचें अंग ताठतें व वेदना उत्पन्न होतात, त्यास आक्षेपकरोग जाणावा. जो अश्व मागल्या भागाचे ठिकाणीं वक्र होऊन मंडलाकृतीनें चालतो व मंदाहार होतो, त्यास भूमिक्षांतरोग ह्मणतात. अश्व पृष्ठभागानें चालून भूमिवर एकदम बसतो, त्यास कपोतकनिषादिरोग ह्मणतात; या रोगांतून घोडा वांचण्यास फार आयास होब. ज्याच्या हनुवटी विकार पावतात, व नाक भेद पावतें, त्यांस अर्दितरोगी ह्मणतात. हे सर्व वातोद्भव रोग जाणावे. या रोगास उत्कर्ण रोगाची चिकित्सा करावी. कपोतकनिषाद रोगास पान मात्र विशेष आहे. तें हें:—हिरडे, शुंठी, लंचुक व साहस हे पदार्थ चूर्ण करून,तें तिळाचे तेलांत मिश्र करून पाजावें.

---

## श्वासबलपरीक्षा.

कफ व वात यांपासून झालेली सिरागत सूज, तिच्या योगानें घोडा अति वेदनायुक्त होऊन खंजतो, व त्याचे सांधे ताठतात, त्यास वैद्यानें वसातेल व तूप हीं पांच क्षारांशीं मिश्र करून पाजावीं, व शोथास त्यांनीं मर्दन करावें. तग्वासक आणि करंज यांनीं शोधन करावें. पिण्यास तेलपाणी द्यावें व खाण्यास हरळी द्यावी. पंचमूळाचा कषाय करून त्यांत पिंपळीचा कल्क व दूध घालून त्यानें बस्ती करावा. त्रिवृततैलानें तैलानुवासन करावें. आणि मग अग्नीनें दाह करावा. ह्मणजे त्यास सुख होतें.

---

## हाडें मोडतात त्यांचें वर्णन.

ही इजा दोन प्रकारची आहे. एक साधी व दुसरी विशेष. ही इजा पडल्यानें किंवा लागल्यानें किंवा भरधांव धांवतांना किंवा खड्घांत पडल्यानें होते. परंतु जितकीं हाडें मांसांत आहेत त्याची माहिती होणें फार कठिण आहे.

ज्या हाडाजवळ मांस थोडें आहे, तीं हाडें लवकर समजतात. पायाचीं हाडें तुटलीं तर तीं चार तऱ्हेनें समजतात. पहिला प्रकार, पाय जमिनीवर टेंकीत नाहीं. दुसरा प्रकार, पाय हालवतो. तिसरा प्रकार, कान लावून ऐकलें तर तुटलेले हाडाचा आवाज, हाडावर हाड घांसतें त्यामुळें ऐकूं येतो. आणि चवथा प्रकार, तो पाय सुजलेला राहतो. कारण, त्याच्या वरचें मांस आंवळून जातें व त्यापासून त्यास फार इजा होते व त्या ठिकाणीं सूज येते. टिबिया ह्मणजे पाठीमागले पायाच्या मांडीचें हाड, ह्युमरस ह्मणजे पुढील पायाच्या मांडीचें हाड, आसिटेब्यूलम ह्मणजे फऱ्यावरचा सर, इलियमसॉफ्ट ह्मणजे गुदद्वाराच्या हाडाचें टोंक, आणि स्कचाप्यूला ह्मणजे खुब्याचें हाड, इतक्या ठिकाणचीं हाडें मोडलीं तर घोडा बरा होत नाहीं. अशा स्थितींत त्यास मारून टाकावें.

थोडे उमरीच्या वयांत घोडा असून जर त्याचें हाड तडकलें तर वळू घोडा करण्याकडे त्याचा उपयोग करावा.

उपाय—हाड जागचे जागेवर बसवावें आणि गव्हांची कणीक त्याजवर ठेवून पट्टी बांधावी. कपड्याची झोळी करून त्यांत दुखावलेला भाग ठेवावा. कारण, त्यास धक्का लागून तो भाग हालूंनये आळशीच्या तेलाचा जुलाब द्यावा. ताप येत असल्यास नायट्रिक इथर पाण्यांत द्यावें. आरटरी ह्मणजे चांगल्या रक्ताची शीर, व्हेन ह्मणजे काळ्या रक्ताची शीर, व नर्व्ह ह्मणजे ऐकूं येणारी शीर ह्यांच्या योगानें व फैबरन यांच्या योगानें मांस जमतें.

खालच्या जबड्याचें हाड मोडलें तर रबर ऊन पाण्यांत भिजवून त्या जागेवर ठेवावें, आणि त्याच्यावर गरम कपडा बांधावा. दोन दिवस घोड्यास खाण्यास घालूं नये व कदाचित् घालणें झाल्यास भुस्सा किंवा शिजवलेला दाणा खाण्यास द्यावा. व रेक्टस ह्मणजे गुदद्वार यांत पिचकारी मारावी. कमरेच्या हाडाच्या बाजूचें टोंक तुटलें तर बरें होतें; पण मणका तुटला तर बरा होत नाहीं. घोडा मरून जातो.

---

## सामान्य परीक्षा.

वातादि दोषांचीं सामान्य लक्षणें व चिकित्सा आतां सांगतों. ज्या कुशींत अध्मान, क्षुद्रकास, कृशत्व, पुष्कळ व फेंसाळ मूत्र, आहार मंद आणि शरीरावर दीप्ति हीं लक्षणें असतील, त्यास वातरोगापासून शोष झाला आहे असें समजावें. श्वासाचे ठिकाणीं दुर्बळत्व, तृषादाह आणि रोमांचे ठिकाणीं संकीर्णता (मिश्रण) हीं पित्तशोषांचीं लक्षणें होत. वेगवेगळे व लांब केश, मंद आहार, क्षीणता, अतिइच्छा, शीतल शरीर, जास्त आळस, आणि जिव्हेंत भेद हीं चिन्हें कफशोषाचीं होत. हीं सर्व चिन्हें होत असल्यास संनिपातशोष होय. तो शोष असाध्य अथवा कष्टसाध्य जाणावा.

वरील वातादि शोषांपासून अश्वाचें शरीर दुर्गंधयुक्त होतें व दिवसेंदिवस क्षीण होतें. यास चिकित्साः—

पंचमूलांच्या कषायांत मांसाचा रस करून, त्याच्याशीं तेल, मीठ घालून, शाल्यान्न(भात)युक्तीनें खाऊं घालावा. ह्मणजे त्याचे अग्नींत बळ उत्पन्न होतें. मग प्रसारिणी आदीकरून तेलांनीं त्यास स्थिर करावें. या उपायानें वातशोषार्त अश्व जर बरा न होईल तर त्यास दूर्वा, साळीचा भात आणि देवनळाचीं व काशाचीं मुळें हीं एकत्र मंदअग्नीनें कढवून त्यांत मांस घालून तें द्यावें. यवान्न घृतासहित खाऊं

घालावें. पित्तशोष असतां वसा व निंब यांचा कषाय करून त्यांत मेंढ्याचें, हरणाचें अथवा पक्ष्याचें मांस कुलित्थासहित शिजवून त्या रसाशीं मध व कटुक घातलेले तीळ खाऊं घालावे. कफशोषार्त अश्वास अग्नीचें दीपन केल्यावर हा उपाय करावा. संनिपातोद्भव शोष असल्यास तिन्ही उपाय करावे. सर्व प्रकारचे शोषांस चितेचा धूर द्यावा आणि जळचरांचे रक्तांत पिंपळीचें चूर्ण समभागानें घालून त्याचें अंजन डोळ्यांत घालावें.

---

## साध्यासाध्य परीक्षा.

ज्याचा एक व्याधि शांत होतो तोंच दुसरा उत्पन्न होतो, तो दूर होतो इतक्यांत तिसरा उद्भवतो, ज्या अश्वाची पूर्वप्रकृति विपरीत होते, देह पुष्ट होतो, परंतु गंधाचें ज्ञान ज्यास नाहींसें होतें, ज्याला सात दिवस औषध दिलें असून कांहीं विशेष होत नाहीं, जो अग्निदीप्त असून क्षुब्ध होत नाहीं, ताडण, दाह व काकादि दंश हे जो चुकवीत नाहीं, हनुवटी व जीभ अति ताठ किंवा अति सैल होते, निराहार असून पुष्ट असतो, आहारापासून ज्याची तृप्ति होत नाहीं, ज्याचें पूर्वांग दाहयुक्त आणि मागलें शरीर शीतल असतें, नाभी, ऊर व गुद या ठिकाणीं शैत्य असून जो शीतोष्ण सहन करतो, ज्यास शूलाध्मान आहे, पापणी लवत नाहीं, चालतांना क्लेश होतात, फार कांपतो, श्वास फार सोडतो, ज्याचें शिश्न शून्य होतें, ज्याची विष्टा कफयुक्त, फेसाळ व पांढरी होते, मलावरोध होतो, सूज कठिण असते, अतिसारानें क्षीण झाला असतां अंगास सूज येते, पश्चात् मूत्ररोग होतो, शिश्न झांकत नाहीं, डोळे निस्तेज होतात, सर्व अंगापेक्षां द्रोणी विस्तीर्ण होते, आणि ज्यास श्वास, घाम व मूत्र फार होतात, हे सर्व अश्व औषधादिकांनीं असाध्य होत. आतां साध्य अश्वः—जो पुष्कळ पान करतो, शरीर झाडतो, पुच्छ फार हालवतो आणि घोडीशीं रम-

माण होतो तो साध्य होय. ज्याचें नेत्रेंद्रिय तेजस्वी आहे, ज्याचे बाहूंस घाम येतो आणि शिंक व मूर्छा येतांना ज्याच्या शिरा प्रफुल्लित होतात, तो साध्य होय. परंतु साध्य अश्वाची उपचाराविषयीं कांहीं काळ हयगय केली असतां तेच असाध्य होतात.

---

## आयुष्यपरीक्षा.

शालिहोत्रादि मुनींनीं सांगितल्याप्रमाणें अश्वाचें अरिष्टलक्षण असें आहे: जो घोडा खिन्न, दीन व निस्तेज असतो, व दिलेलें खात नाहीं आणि रोग नसतां अशी स्थिति ज्याची असते, तो अश्व आयुष्यहीन होय. ज्याच्या कपाळावर व पुच्छाचे ठिकाणीं कंप उत्पन्न होतो, ज्याचे पुच्छाचे केश गळतात आणि ज्यास दमा असतो तो अश्व ७ दिवस जगतो. जो आपलें शिश्न बाहेर करून वाघाप्रमाणें बसतो, ज्याचे दांत एकाएकीं गळून पडतात, तालु आणि जीभ काळी होत ते अश्व गतायुषी जाणावे. ज्यास स्नान घातलें असतां प्रथम पोट वाळतें, त्याचें मरण १ महिन्यानें होतें. नाक, शिश्न, डोळे, व गुद या ठिकाणीं काळें रक्त होतें; व ज्याचे स्तन, उदर, नेत्र व गुद हे मूत्राप्रमाणें पीतवर्ण होतात, तो अश्व गतायुषी होय. ज्याच्या विष्ठामूत्रास दुर्गंध येतो, ज्यास हर्ष झाला असतां कांपतो, तोंडांतून घांस गाळतो, ज्यावर माशा बसतात, डोळ्यांस निमेष होतो, शीर टोंचली असतां पांढरें रक्त निघतें, मस्तक, टाळू, कंठ व हृदय हीं शुष्क होतात, कानांनीं ऐकूं येत नाहीं, डोळ्यांनीं दिसत नाहींसें होतें, स्पर्शज्ञान नष्ट होतें, शेंपूट हालवीत नाहीं, कान ताठ करतो, रक्तनाश होतो, मुखानें लाळ गाळतो, दाट घाम येतो, टाळूस फोड येतात, नेत्र निस्तेज असतात, खाण्या पिण्याचा ज्यास कंटाळा येतो आणि झोंपेवांचून झुलतो, या चिन्हांपैकीं एकही चिन्ह ज्यास आलें असेल तो अश्व एक महिन्यापर्यंत जगतो. पूर्वीं रोगी असून घोड्या-

स कांहीं उपचार न होतां वरील चिन्ह झालें तर तो पांच दिवसांतच मरतो. ज्याचे मानेवर गोळा व खालचे ओंठावर पांढरेपणा येतो, व मूत्रांत रक्त पडतें, तो सात दिवसही जगत नाहीं. ज्याचा श्वास उष्ण होतो, शरीर घामेजतें आणि जीभ बर्फासारखी होते, तो अश्व अल्पायुषी जाणावा. ज्याचे अश्रु लाल व नेत्रप्रांत पांढरे होतात, ते अश्व अल्पायुषी होत. ज्याचे नेत्र घामेजल्या मांसाप्रमाणें किंवा रक्तवर्ण व निळे असून त्यांत काळे पिवळे बिंदु उत्पन्न झाले असतील तो अश्व अल्पायुषी होय. ज्याचे नेत्रांत अनेक रंग होतात तो अश्व सात दिवसही वांचत नाहीं. एक डोळा तांबडा असून दुसरा निळा असेल व नेत्रप्रांत निळे व पिंवळे असतील तर त्या अश्वास तीन महिने आयुष्य जाणावें. ज्याच्या नेत्राजवळ अनेक रंगाच्या रेषा आहेत व नेत्र फुटीर आहेत, तो महिनाभर जगतो.

नेत्रांत पांढरेपणा व नेत्रप्रांतांत रेषा दिसत असल्यास दोन महिने जगतो. सहा महिन्यांनीं मरणाऱ्या घोड्याचे नेत्रांत अनेक बिंदु उत्पन्न होतात. ज्याचे नेत्र नील होतात तो अश्व ७ महिने, ज्याच्या नेत्ररंगांत व्यत्यय येतो, नेत्रप्रांत व नासिका येथील रंग बदलतो, तो दहा महिने जगतो. त्यांची दृष्टि रूक्ष होते आणि वातानें पांढरी, पित्तानें पिवळी किंवा तांबडी, कफानें पांढरी व पाण्याच्या योगानें कृष्णवर्ण याप्रमाणें दृष्टींत विकार होतात.

---

## घोड्यांस उलट्या होतात सांजवर इलाज.

घोड्यांचे बेंबीजवळ डाग द्यावा. डाग देण्याची कृति प्रस्तुत भागांतील पृष्ठ २६ याजवर लिहिली आहे, ती पहावी. फारच उलट्या होतील तर तंगाखालीं रक्त काढावें. रक्त काढण्याचे प्रकार पृष्ठ २३ याजवर लिहिलेले पाहावे.

२. दुसरा उपचार—काथ एक पैसाभार, लवंग जंगली ६ सहा

मासे, स्पंज १॥ दीड पैसाभार, फटकी १॥ दीड पैसाभार, शंखजिरें २ दोन पैसेभार, संगपलिता २ दोन पैसेभार, आणि कापूर ६ सहा मासे, हे सर्व जिन्नस पाण्यांत घालून त्यांचा काढा घोड्यांस पाजावा, तो काढा शेरभर पाण्यांत कढवून पाऊणशेर उरला ह्मणजे, थंड झाल्यावर पाजावा.

---

## जुलाब होण्याविषयीं उपाय.

१. बामझाडाचीं पानें एक शेरभर आणि शिककई अतपाव. बामझाडाचीं पानें बारीक करून रस काढावा. त्यांत शिककई बारीक करून एकत्र करावी. आणि तो रस नळानें घोड्यास पाजावा. हें औषध अनुभविक आहे.

२. गव्हाचें पीठ पावशेर व कोपलशेर. कोपलशेराचे रसांत पीठ मिळवावें. मग हरभऱ्या एवढ्या गोळ्या कराव्या. एक किंवा दोन गोळ्या सकाळीं द्याव्या. जुलाब झाल्यावर ते बंद होण्यास उतार अर्धाशेर दह्यांत शिजलेले तांदूळ घालून खाण्यास द्यावे.

३. सोनामुखी अतपाव, खडीसाखर पावशेर, मध उत्तम पावशेर, आणि बाळहिर्डे एक पैसाभार, यांच्या मधांत आठ गोळ्या कराव्या. दरदिवशीं एक गोळी द्यावी. हें औषधही अनुभविक आहे.

---

## मोठे घोड्यास जुलाब होण्यास उपाय.

१. जेपाळाचे बियांचा मगज. लहान घोड्यास चतुर्थांश व मोठ्या घोड्यांस अर्ध्या बीचा मगज पुरे होतो. त्यांत दोन तोळे पांढरें जिरें मिळवून गुळांत द्यावें. त्यावर गरम पाणी पिण्यास द्यावें. तें नळींत घालून पाजावें. लहान घोड्यास एक तोळा पांढरें जिरें द्यावें ह्मणजे जुलाब होतील.

---

## घोडा कशाही प्रकारचा अजारी झाला तर खालीं लिहिलेला जुलाब त्यास द्यावा:—

१. हिर्डे, बाळहिर्डे, अमला, सोरे, ( हिंदी ), सदखू झाडाची साल, चित्रकाची साल, सुंठ, गेरू, पित्तपापडा, रिंगणी, निंबझाडाची साल व मुळी, किरमणीओंवा, आणि धावडी हे सर्व जिन्नस बारीक करावे. त्यांपैकीं दोन पैसेभार घेऊन आंठशेर पाण्यांत कढावावे. त्यांतील एकशेर पाणी राहिल्यावर थंड करून घोड्यास पाजावें. असें दोन आटवडे करावें, सर्व रोग बरे होतील.

---

## धोट्यानें औषध पाजण्याची रीति.

*औषधाचा गोळा देण्यापेक्षां धोट्यानें औषध देणें हें मोठें मेहनतीचें काम आहे;* आणि शिवाय तें औषध देतांना वांया फार जातें. जेव्हां औषध घोड्यास लौकर लागू झालें पाहिजे अशी भावना दिसते, तेव्हां गोळीच्या रूपानें जर औषध दिलें तर तें लौकर लागूं पडणार नाहीं; सबब पातळ औषध धोट्यानेंच दिलें पाहिजे. धोटा बैलाचे शिंगाचाच करावा. त्या शिंगाचें टोंक तिरकस कांपावें. तें असें कीं, त्याच्या बाटें चिरकंडी जाईल. अथवा तोटी सारखें तोंड केलें तरी चालेल. ह्मणजे मराभर पोटांत औषध जाईल. केव्हां केव्हां धोट्याचे ऐवजीं बाटलीनें जरूरीचे वेळेस औषध पाजितात. परंतु कांचेचें भांडें भंगशिर आहे, आणि त्यापासून कांहीं भयंकर होतें; सबब बैलाचे शिंगाचाच धोटा असावा. धोटा देते समयीं जशी गोळी देतांना घोड्याची जीभ धरितात, तशी धरावी. नंतर घोड्याचें तोंड वर पुष्कळ उंच धरावें. आणि हळूंहळूं औषध त्या धोट्यानें त्याचे गळ्यांत सोडावें. सगळें औषध गिळून जाई तोंपर्यंत घोड्याचें तोंड वरतीं धरलें पाहिजे, सोडूं नये; जर औषध देतांना त्यांतील कांहीं सांडलें तर त्या ऐवजीं दुसऱ्यानें तचें औषध तितकेंच घेऊन

पाजावें. घोडा जर ढांसेल किंवा ढांसण्याचा यत्न करील तर डोकें खालीं करून मोकळेपणानें ढांसतां येण्यासाठीं आणि ढांसतांना तें औषध त्याचे श्वासनळींत जाऊं नये, यासाठीं घोड्याचें डोकें लागलें-च सोडावें. घोडा आतां ढिसेल असें चिन्ह दिसतांच जर लागलेंच डोकें सोडून दिलें तर कांहीं औषध श्वासनळींत जाईल, आणि घो-डा मरेल; ह्मणून त्याविषयीं खबरदारी ठेवावी.

---

## ढाळक देण्याची रीति.

जेव्हां ढाळक द्यावयाचें असेल तेव्हां धान्याचा भुसा किंवा कोंडा दोन किंवा तीन रात्रींपर्यंत द्यावा, दाणा देऊं नये. ह्मणजे त्याचा कोठा मोकळा राहील, बद्धकुष्ठ राहणार नाहीं. कोठा नरम करून ढाळकाचें औषध दिलें असतां लौकर लागूं होतें. व मळ निघून येतो. जर याप्रमाणें न केलें तर पक्काशयांत जो अन्नाचा कठिण मळ झा-लेला असतो, तो गुदद्वारावाटे लवकर बाहेर येत नाहीं. आणि गुद-द्वारावर दाब पडून गुदद्वार सुजेल. ढाळक देणें तें दिवसाचे मध्यवे-ळीं द्यावें. नंतर घोडा तबेल्यांतून बाहेर काढूं देऊं नये. आणि भुश्या-बरोबर त्याला पाणी पाजावें. तो जितकें थंड पाणी पिईल तितकें भुश्याबरोबर द्यावें. दुसरे दिवशीं सकाळीं एक तासपर्यंत घोडा थोडा बाहेर फिरवावा. ह्मणजे जर त्याला पोटांत औषध लागूं झालें नसेल तर लागूं होईल. घोड्याचें शेंपूट दोरीनें बांधून ठेविलें पाहिजे ह्मणजे शेपटीषी मळानें घाण होणार नाहीं. घोडा एक तास फिरविल्यावर जर जुलाब लागूं न होईल तर त्याजवर बसून थोडा दुडकी चालीवर फिरवून आणावा, इतकेंही करून जर जुलाब लागूं न होईल तर पु-नः आणखी बारा वाजतां त्यास फिरावयास न्यावें. घोड्याला जसा जुलाब लागूं व्हावा तसा लागूं झाला ह्मणजे त्याला घरीं आणून तबेल्यांत बांधावें. मग कोणतेही कारणानें त्याला बाहेर काढूं नये.

४८ तास ह्मणजे दोन दिवस पर्यंत, साधारण ह्मणजे ढाळ बंद होईप-र्यंत फिरण्यास काढूंनये. ढाळ बंद झाल्यावर मग त्याला थोडें गवत आणि भुइयांत थोडा दाणा मिळवून २४ तास पर्यंत देणें सुरू ठेवावें. पाणी थोडें द्यावें. तें थंड असावें. त्याचे अंगावर कपडे नित्यापेक्षां जास्ती गरम ठेवावे. थंड हवा त्याला न लागण्याचा बंदोबस्त ठेवावा. जुबाल दिल्यापासून कमींतकमी ३ दिवस त्याला विसावा पाहिजे.

---

## औषधाचीं वजनें व मापें.

या भागांत घोड्यास इंग्रजी औषधें देण्याचा प्रकार सांगितला आहे. सबब खालीं लिहिलेले कोष्टकांत हिंदुस्थानांतील व इंग्लंड देशांतील वजनांचा व मापांचा होईल तितका मेळ घातला आहे.

### वजनें.

१ स्क्रुपल ह्मणजे ९ वाल = १ चवलीभार.
१ ड्राम = १९ वाल = ३ चवल्याभार.
$1\frac{1}{2}$ ड्राम = ॥ तोळा = ॥ रुपयाभार.
२ ड्राम = १० ग्रेन. ।।। तोळा = बारा आणे भार.
३ ड्राम = १ तोळा = १ रुपयाभार.
४ ड्राम = ॥ औंस = १। तोळा = १। रुपयाभार.
८ ड्राम = १ औंस = २॥ तोळे = २॥ रुपयेभार.
२ औंस = ५ तोळे = १ छटाक.
१ पौंड = ६ छटाक = ३० तोळे.

---

### मापें.

॥ औंस = । छटाक.
१ औंस = ॥ छटाक.
२ औंस = १ छटाक.

१ पौंड = ६ छटाक.
१ कार्ट = ॥ शेर.
२ कार्ट = १ शेर.
१ पैंट = ३ पाव किंवा पाऊणशेर.

---

# औषधिक्रिया.

## मोरचुताचें पाणी.

मोरचुताची पूड = १ ड्राम = ३ चवल्याभार.
ऊनपाणी = १ पैंट = ३ पाव किंवा पाऊणशेर.

याप्रमाणें पाण्यांत मोरचूत वितळवावें. आणि थंड झाल्यावर तें पाणी लावावें. हें पाणी खांडकें माठण्याचें (भरून येण्यावर प्रशस्त) आहे.

---

## मोरचुताचें मलम.

मोरचुताची पूड = १ ड्राम = ३ चवल्याभार.
टर्पिनटैन = १ ड्राम = ३ चवल्याभार.
लिनासिड (अळशीचें) तेल ४ औंस = २ छटाक.
मेण = ४ औंस = २ छटाक.

आळशीचें तेल व मेण हें एकवट वितळवावें; आणि मग त्यांत टर्पिनटैन व मोरचुत घालावें. व तें गार होई तोंपर्यंत ढवळीत असावें.

खांडकें पडलीं असतील त्यावर हें चांगलें मलम आहे.

---

### फटकीचें पाणी, नंबर १.

तुर्टी (फटकी)—४ ड्राम—१$\frac{1}{4}$ तोळा.
पाणी —१ क्वार्ट— $\frac{1}{2}$ शेर.

तुर्टी पाण्यांत वितळवावी. हेंही खांडकें माठविण्याचें पाणी आहे.

---

### तुर्टीचें पाणी, नंबर २.

तुर्टी (फटकी)—२ ड्राम—१ चवल्याभार.
गूळ —४ औंस—२ छटाक.
पाणी —१ क्वार्ट—॥ शेर.

हीं सर्व एके ठिकाणीं वितळवावीं. याचा उपयोग वरच्याप्रमाणें.

---

### तुर्टीचें ( फटकीचें ) मलम.

तुर्टी ( फटकी ) —१ औंस २$\frac{1}{2}$ तोळे.
लिन्‌सिड(आळशीचें)तेल—३ औंस १$\frac{1}{2}$ छटाक.
मेण —३ औंस १$\frac{1}{2}$ छटाक.
टर्पिनटैन —$\frac{1}{2}$ औंस १$\frac{1}{4}$ तोळा.

विस्तवावर आळशीचें तेल व मेण एकवट वितळवावें. आणि मग त्यांत टर्पिनटैन व तुर्टी घालावी. तें थंड होईतोंपर्यंत ढवळीत असावें, ह्मणजे चांगलें मेळावें. याचाही उपयोग वरच्याप्रमाणेंच आहे.

---

### कापराचें तेल.

कापूर —१ भाग.
टर्पिनटैन—$\frac{1}{2}$ भाग.
गोडेंतेल—४ भाग.

हे पदार्थ चांगले भेळून खांडकास लावावे. त्यांतही मांस फार वाढेल तर त्यावर मोरचुताची पूड लावावी.

## शेकण्याचीं औषधें.

फ्लानेलचें किंवा कांबळीचें कापड फार ऊन पाण्यांत बुडवून तें पावतास अगर अर्धातास सुजेवर अगर दर्द शेकावयाचें असेल त्यावर लावावें. शेकलेले भागास वारा लागूं देऊं नये. मग शेकलेला भाग सुके वस्त्रानें अगदीं साफ पुसावा. नंतर खालीं लिहिलेलें औषध त्यावर चोळावें:—

मोहऱ्यांचें तेल—४ भाग.
टर्पिनटैन —२ भाग.

हीं औषधें चांगलीं मेळावीं.

बाहेरचे सुजेवर ऊन पाण्याचा शेक देणें हें फार चांगलें आहे. किंवा स्पंजानें शेक द्यावा. अथवा लवचिक नळी ज्याला इल्यास्टिक किंवा रबराची नळी ह्मणतात, तिणें अथवा स्टापकास्क यानें शेकावें. किंवा मोठी जखम झाली असेल आणि त्यामुळें सूज असेल तर त्या सुजेवर ऊन पाण्याची संततधार धरून शेकावें, अथवा ऊन पाण्याचें भांडें घोड्याचे पाठीवर साफ ठेवावें. वांकडेंतिकडें ठेवूं नये. ह्मणजे त्यांतील पाणी वांकडेंतिकडें होणार नाहीं. त्या भांड्याला इंडिया रबरची नळी लावून त्या नळीवाटे पाणी जेथें सूज असून स्पंज बसविला असेल त्या ठिकाणीं वाहूं द्यावें. ह्मणजे जें पाणी अधिक होईल तें स्पंजावरून खालीं जमिनीवर पडेल; आणि स्पंजाच्या द्वारानें त्या सुजेला जितका शेक लागावयाचा तितका लागेल. ही युक्ति कोणीही साधारण बुद्धीचा कलक मनुष्य सहज करूं शकेल.

---

### ब्लिस्टर (फोड येण्याचें औषध).

ब्लिस्टराच्या माशा —१ भाग.
लिन्सिडचें (आळशीचें) तेल—६ भाग.
मेण —६ भाग.

मेण पातळ करून त्यांत आळशीचें तेल मेळावें, आणि मग त्यांत माशा घालाव्या.

जपाळाचें तेल—$\frac{1}{4}$ औंस—$\frac{1}{8}$ छटाक.

गोडें तेल —४ औंस—१ छटाक.

हीं तेलें चांगलीं मेळून लावावीं.

मोहऱ्यांची पूड—२$\frac{1}{2}$ औंस—१$\frac{1}{4}$ छटाक.

टर्पिनटैन — $\frac{1}{2}$ औंस— $\frac{1}{4}$ छटाक.

ऊन गोडें तेल — $\frac{1}{2}$ शेर.

हीं एकत्र चांगलीं मेळून लावावीं.

---

## उवांचें व गोचड्यांचें औषध.

गोडें तेल —१ शेर.

गंधकाची पूड—३ औंस—१$\frac{1}{2}$ छटाक.

तार (डांबर)—१ औंस— $\frac{1}{2}$ छटाक.

टर्पिनटैन —$\frac{1}{2}$ औंस— $\frac{1}{4}$ छटाक.

हीं एकत्र मेळावीं, व तें औषध कातड्याचे ज्या भागावर उवा व गोचड्या असतील त्या भागावर लावावें.

---

## पोटीस.

कोंडा ऊन पाण्यांत मेळून मऊ लोंधा करावा, आणि तो कापडावर पसरावा आणि त्याचेवर थोडकें गोडें तेल ओतून तें पोटीस लावावें.

जखम घाणेरडी असेल तर जखमेवर पोटीस लावण्यापूर्वी तिच्यावर कोळशाची पूड छाटावी, आणि तें पोटीस व तो कोळसा वारंवार बदलावा.

## पिचकारी.

### पिचकारी कशी करावी व मारावी ह्याविषयीं.

एक फूट लांब व अर्धा इंच जाड बांबूची नळी घेऊन तिचीं दोन्ही शेवटें ह्मणजे त्याचे कांठाचीं धार गोल करावी. मग दीडफूट लांब व चार पांच इंच रुंद अशी सुमारें दीडशेर पाणी राहील इतकी मोठी कातड्याची लांब पिशवी करावी. तिचे खालचे बाजूस बांबूचें शेवट शिरे इतकें मोठें भोंक पाडावें. ती पिशवी बांबूचे नळीचे एका शेवटास मजबूत बांधावी. ह्मणजे पिशवींतील पाणी नळींतूनच बाहेर येईल. मात्र बांधलेले ठिकाणांतून बाहेर न येईल अशी मजबूत बांधावी. पिचकारी मारतेवेळीं नळीस तेल लावावें. आणि ती मळद्वारांत आठपासून नऊ इंचपर्यंत घालून एका हातानें तेथें धरून ठेवावी व दुसरे हातानें पिशवीचें खुलें तोंड असेल तें जनावराचे पाठीबरोबर उंच होईइतकें उचलून धरावें. ज्या औषधाची पिचकारी मारावयाची तें १ ग्यालन किंवा ६ क्वार्टर पिशवीचे उघडे तोंडांत गड्यास ओतण्यास सांगावें. असें केलें ह्मणजे तें हळूहळू आंतड्यांत जातें.

---

### बधुकपिचकारी.

तांदुळाची जाड कण्हेरी—२ क्वार्टर—१ शेर.

अफू —२ ड्राम —$\frac{3}{4}$ तोळा.

हीं चांगलीं भेळून त्याची मळद्वारानें पिचकारी मारावी.

### क्रिमी झाले असतां ते मारण्याची पिचकारी.

गोडें तेल—१ क्वार्टर—.॥. शेर.

टर्पिनटैन—१ औंस —$\frac{1}{2}$ छटाक.

हीं ऊन करूनचांगलीं भेळावींवत्याची मळद्वारानें पिचकारी मारावी.

**पिचकारी मारण्याची दुसरी रीति**–दवाखान्यांत पिचकारी मारण्याच्या नळ्या दाबासहित ऐत्या तयार केलेल्या मिळतात. त्यां-

पैकीं एक पिचकारी घेऊन घोड्याचे गुदद्वारांत त्या नळीचें टोंक ८ आठ किंवा ९ नऊ इंच घालावें, मग नळींत असलेला औषधी पातळ पदार्थ जो शरीरांत घालावयाचा आहे तो पंपानें शरीरांत जितका घालविला पाहिजे तितका घालवावा. तो १ ग्यालन किंवा ६ कार्टर घालवावा असा अजमास आहे.

**लोसन**—औषधी पाण्यानें जो शरीराचा भाग धुतात त्याला लोसन असें ह्मणतात. तें लोसन (औषधी पाण्यानें घोड्याचा पाय धुणें) कापसाचे वस्त्राची पट्टी लावून करावें. अथवा दुसरा कोणता भाग धुणें असेल तर कापसाचें वस्त्र त्या भागावर बांधून नंतर तो औषधी पाण्यानें धुवावा.

## तांदळाची कण्हेरी.

तांदूळ— २ पौंड—१ शेर.

पाणी —१० कार्टर—५ शेर.

ही कण्हेरी दीड तासपर्यंत उकळवून कपड्यानें गाळावी; आणि थंड झाल्यावर थोडकें मीठ घालून घोड्यास द्यावी.

जेपाळाचे बियांची पूड—१ स्क्रूपल—१ चवलीभार.

मीठ किंवा एप्समसॉल्ट—$\frac{1}{2}$ पौंड —४ छटाक.

हा हलका जुलाब आहे. हीं औषधें एकत्र मेळावीं.

बद्धकोष्ठ झालें असेल तर वरील औषध एक कार्ट ($\frac{1}{2}$ शेर) ऊन तांदळाचे कण्हेरींत द्यावें.

| | |
|---|---|
| गंधकाची पूड. | –२ औंस–१ छटाक. |
| आळशीचें तेल (लिन्सिड ऑईल) | –४ औंस–२ छटाक. |
| ऊन तांदळांची पेज | –१ कार्ट–.॥. शेर. |

हें सारक औषध आहे. रेचक देऊन जुलाब होण्याचें बंद झाल्यावर बद्धकोष्ठ न होऊं देण्यासाठीं हें उपयोगी आहे.

आळशीचें तेल (लिनसिडऑईल)–१ पैंट – ३ पावशेर.
गंधकाची पूड –४ औंस – २ छटाक.
सुंठीची पूड –½ औंस –१¼ तोळा.

हें रेचक औषध आहे. तें तांदळाची कण्हेरी एक कार्ट (॥) शेर घेऊन तींत द्यावें.

मीठ —१ पौंड— ८ छटाक.
एळ्या (काळाबोळ)—४ ड्राम—१¾ तोळा.
गंधकाची पूड —२ औंस— ५ तोळे.
सुंठीची पूड —१ औंस—२½ तोळे.
गूळ —४ औंस— २ छटाक.
ऊन पाणी —२ कार्ट— १ शेर.

हेंही रेचक औषध आहे.

एप्समसाल्ट किंवा मीठ—४ औंस— २ छटाक.
गंधकाची पूड —३ औंस—१½ छटाक.
सुंठीची पूड —½ औंस—१¼ तोळा.
गूळ —३ औंस—१½ छटाक.

हेंही सारक औषधच आहे. हीं सर्व औषधें ४ कार्ट (२ शेर) ऊन पाण्यांत भेळून थंड झाल्यावर द्यावीं.

एप्समसाल्ट किंवा मीठ—१ पौंड—८ छटाक.
एळ्या ( काळाबोळ )—½ औंस—¼ छटाक.
आळशीचें तेल —४ औंस—२ छटाक.
सुंठीची पूड —½ औंस—¼ छटाक.
अर्क दारू —२ औंस—१ छटाक.

हें एक भारी रेचक आहे. हीं औषधें ४ कार्ट ( २ शेर ) ऊन पाण्याशीं चांगलीं भेळून ऊन असतांच द्यावीं.

## नस्य देण्याचा प्रकार.

घोड्यास वात, पित्त व कफ झाला असतां नस्य द्यावें.

१ पिंपळी, निंब, निर्गुडी व सैंधव हीं समभाग घेऊन त्याचें चूर्ण करून ऊन पाण्यांत घोड्यास नस्य करावें. याचे योगानें कफ नाश पावतो.

२ निंबाचीं कोंवळीं पानें त्यांचा रस काढून त्यांत शंख उगाळून वसंतकाळांत घोड्यास नस्य करावें. ह्मणजे पित्ताचा नाश होतो.

३ उंची चंदन उगाळून त्याचें नस्य द्यावें. सर्व प्रकारचे कफ नाश पावतील.

४ द्राक्षांचा रस व अष्टमांश तवकीर एके ठिकाणीं करून नस्य द्यावें. पित्तनाश होतो.

५ साखर व मध हीं समभाग, दूध समभाग आणि पडवळीचें चूर्ण या सर्वांचें नस्य शरत्काळीं घोड्यास द्यावें. पित्तनाश होईल.

६ वेखंड, काळीं मिरीं, कोष्ठ, सुंठ व शृंगीबल हीं थंड पाण्यांत वाटून त्यांचें नस्य घोड्यास द्यावें.

७ गुळवेल, धायटीफूल व थोडी हरताळ यांचें थंड पाण्यांत नस्य करून शिशिरऋतूंत घोड्यास द्यावें. व त्यास शीतळ जागेंत बांधावें.

८ शिरसतेल व गोमूत्र हीं एकत्र करून घोड्यास नस्य निघात झाल्यास करावें, ह्मणजे पुष्टता येईल.

९ गोमूत्र व मीठ, यांचें नस्य घोड्यास कंठरोग झाला असतां करावें.

१० मच्छाचें तेल, लसूण, पिंपळमूळ, ब्राह्मी व नागकेशर ह्या सर्वांच्या चूर्णाचें नस्य प्रातःकाळीं घोड्यास केल्यास नेत्ररोग जातो.

नेत्ररोग असणारे मनुष्यानेंही हें औषध घेतलें असतां त्याचा नेत्ररोग जाईल.

११ पिंपळी व मीठ हीं दोन्हीं ऊन पाण्यांत मिश्र करून नंतर

थंड करून घोड्यास नस्य करावें. स्निग्ध, रूक्ष, तीक्ष्ण व मध्यम, हे रोगाचे चार प्रकार पाहून नस्य द्यावें.

१२ मार्गशीर्ष, माघ, आषाढ, श्रावण, व भाद्रपद ह्या दिवसांत वाताचा जोर फार असतो; ह्मणून वायु असल्यास, स्निग्ध नस्य द्यावें; कफास रूक्ष व तीक्ष्ण योजावें, आणि पित्त असल्यास मधुर योजावें.

फाल्गुन व चैत्र, ह्या दिवसांत जंतांची पीडा होते. व हिरवा घास खाल्ल्यानें घोड्यास कफ होतो, अशा वेळीं घोड्यास नस्य देण्याचें प्रमाणः—

उत्तम शंभर बिंदु, मध्यम पन्नास व कनिष्ठ वीस. याप्रमाणें नस्य द्यावें.

घोड्याचे अंगीं रक्तदोष असल्यास नस्याचा नाश होतो, सबब जलद उपाय करावे तेः—

१ डाळिंब, पुष्करमूळ व श्वेतदूर्वा, यांचा रस काढून नस्य करावें ह्मणजे रक्तविकार जाईल.

२ धायटी, पुष्करमूळ, कुसुंबा, लोध्र व निर्गुंडी यांचें थंड पाण्यांत नस्य द्यावें. तेणें करून रक्तदोष जातो.

३ धायटी, ब्राह्मी, गोमूत्र व मीठ यांचें थंड पाण्यांत नस्य करून द्यावें. कफविकार नाश होतो.

४ सुंठ, डिकेमाली व राजवृक्षाची अंतरसाल, तुपांत वाटून त्यांचें नस्य करावें; ह्मणजे वातरोग जाईल.

५ माक्षिक, नाबद, साखर, नागकेशर व चंदन यांचें थंड पाण्यांत नस्य करून द्यावें. पित्तनाश होतो.

६ सुंठ, पिंपळी, वेखंड, हिंग, सैंधव व काळीमिरें यांचें ऊन पाण्यांत तयार करून नस्य द्यावें ह्मणजे वात व श्लेष्म नाश पावतात.

७ गुळवेल, सुंठ, मुस्ता, तगर व श्वेतशिरस यांचें उष्ण उदकांत नस्य तयार करून द्यावें. सन्निपात जातो.

८ हिरडा, शंखावळी, शंख, शतावरी, आवळी व एलची या सर्वांचें थंड पाण्यांत नस्य करून द्यावें. वात व कफ नाश होतो.

९ वेखंड, सुंठ, पिंपळी, सैंधव व काळींमिरें यांचें पाण्यांत नस्य करून द्यावें. कफवात नाश होतो.

१० तुपांत केशर, मध, साखर व नाबद हीं सर्व घालून घोड्यास नस्य करावें. पित्त व सन्निपात नाश पावतात.

११ काथचूर्ण व त्यांत तितकाच हिरडा मिळवून थंडपाण्यांत तयार करून नस्य द्यावें. पादग्रजा रोग नाश पावतो.

---

# क्षुद्ररोगप्रकार.

## ग्रंथिदोष.

१ सर्जखार व तितकाच गूळ एकत्र करून एकवीस दिवस नेमानें दिलें असतां ग्रंथिदोष जातात.

२ अर्कमूळ व टांकळीमूळ, निवडुंगाचे चिकांत वाटून एकवेळ लेप करावा. त्यांत चित्रकही थोडा टाकावा. हें औषधही वरील रोगावरच आहे.

३ धत्तूर, मंजिका, हळद, निंबाचीं पानें, दंती, कण्हेर व माका हे समभाग एकत्र करून गोमूत्रांत घालून त्यांची गोळी करावी; तीन दिवस सकाळीं ग्रंथीवर बांधावी, आणि नंतर सोडून पहावें. रोग नष्ट झालेला दिसेल!

---

## वरील रोगांवर पोटांत देण्याचीं औषधें.

१ आंवा व मूग दोन्ही एकत्र करून द्यावें. म्हणजे ग्रंथिदोष जातात.

२ साजिखार व समभाग गूळ हीं एकत्र करून चौदा दिवस रोज एकवेळ एक पलप्रमाणानें घोड्यास द्यावें. तेणेंकरून सर्व ग्रंथिरोग जातात.

---

## मसाला देण्याचा प्रकार.

घोड्यास मसाला देणें तो अनुक्रमें एक मंडळ ( ७ दिवस ) द्यावा. मसाल्याच्या योगानें घोडा शक्तिवान् व रोगरहित होतो.

१. कुटकी, तुळस, भांग, टाकळी व मुस्ता या सर्वांचें चूर्ण करून एक कर्षप्रमाण द्यावें.

२. वेळा, शोपा, चंदन, कावळी, माक्षिक, व शतावरीचूर्ण हें साखर घालून रोज द्यावें. हें पित्तनाशक आहे.

३. मुस्ता, गुळवेल, तुळशीचें चूर्ण, वृंदावनी व रिंगणी या सर्वांचें चूर्ण करून तुपांत मिश्रण करून पलप्रमाण एक वेळ द्यावें. वातरोग नाश पावतो.

४. सुंठ, गुळवेल, गोंखरू, नागरमोथे व वेखंड हीं चूर्ण करून पीठ व गूळ यांचे मिश्रणांत एक पलप्रमाणानें द्यावें. सर्वरोग जातात.

५. ज्येष्ठमध, सैंधव, मुस्ता व हरीतकी हीं समभाग चूर्ण करून तें चूर्ण गोमूत्रांत द्यावें. अग्नि प्रदीप्त होतो व घोडा पुष्ट होतो.

६. कांगोणी, केतकी, द्राक्ष व साखर हीं मिश्रण करून तें मिश्रण द्यावें. किंवा ज्येष्ठमध आणि वरील समानचूर्ण घेऊन तें तुपांत द्यावें. रक्तिवर्धक आहे.

७. मत्स्य, मांस व स्वच्छ उडदांचें पीठ समभाग घेऊन तुपांत मिश्रण करून द्यावें. बळ व पुष्टता येते.

८. दहीं, मध व बकऱ्याचें मांस हीं एकत्र करून घोड्यास चारावें. बळ व पुष्टता येते.

९.त्रिफळा, कुटकी, मुस्ता, चित्रक आणि वावाडिंग, एककर्ष-प्रमाण सर्व घेऊन गूळ मिश्रण करून पीठ घालून द्यावें. आळस व सर्व प्रकारचे शूळ नाश पावतात.

१०. पिंपळी, पिंपळमूळ व कुटकी हीं दूर्वांच्या रसांत गोळा करून द्यावीं. दाह नाश पावतो.

११. नागकेशर, बिल्वफळें सागरगोटे व माक्षिक हीं मिळवून चारावें. शूळरोग जातात.

१२. सुंठ, हिरडा, व गूळ, समभाग सकाळीं द्यावें. हें औषध घोड्याची धातु पडते त्याजवर वस्ताद आहे.

१३. वेखंड, लोध्र, कचोरा, अतिविष, पिंपळी, गूळ व मध या सर्वांचें मिश्रण करून एक वेळ द्यावें. त्याचे योगानें वीरश्री व बळ उत्पन्न करतें.

१४. मत्स्यतेल, बकऱ्याचें मांस ( दुप्पट ), लसूण व नागकेशर या सर्वांचा पिठांत गोळा करून रोज एक वेळ चारावा. हा शक्तिवर्धक आहे.

१५. जंबीरपत्रें, कमलदळें व वेखंड आणि तितकाच गूळ, एकवेळ चारीत जावे. रक्तदोष जातात.

१६.कोलिस्ता, शेवगामूळ, पिंपळी, विडंग, ( वावाडिंग ) हळद व गूळ हीं मिश्रण करून तें औषध द्यावें, रक्तदोष जातात.

१७. वातबद्ध घोडा झाल्यास मंद चालतो. त्यास मसाला:-पिंपळी, पिंपळमूळ, चव, चित्रक, सुंठ, अतिविष, ओंवा, सैंधव, वेखंड, हरीतकी, अजमोदा, शिग्रमूळ. वावडिंग व बोरी हीं सर्व समभाग घेऊन चूर्ण करून त्यांत चौपट गूळ घालून समान गोळ्या कराव्या. वातभग्न, रक्तदोष व कासश्वास, वगैरे नाश पावतात.

१८. पिंपळी पिंपळमूळ, बोरी, लसूण, अजमोदा,वावाडिंग, संचळ, सैंधव, श्वेतजिरे, ओंवा आणि वर्धरा; या सर्वांचें चूर्ण करून चौपट

गूळ घालून सातपलें एक वेळ द्यावें. गात्रभंग, रक्तदोष, अजीर्ण व विषूचिक हे सर्व रोग जातात.

१९. तमालपत्र पुष्करमूळ, लोध्र, अघाडा व टेंभुरणीफळ या सर्वांचें चूर्ण एक वेळ द्यावें. सात दिवस दिल्यानें वायु व शीतपित्त नाश पावतात.

२०. अतिविष, हरीतकी व किंचित् हरताळ हीं मिळून ते मिश्रण तांदुळाचे धुवणांत द्यावें. जृंभवात नाश पावतो.

२१. मूग भाजून त्याचें पीठ, वेखंड आणि राळ हीं तूप व गूळ यांत द्यावीं.

२२. वावडिंग, कापूर, मोथा व गुळवेल, पाण्यांत मिश्रण करून द्यावें. वलितरोग नाश पावतो-

२३. साखर, दूध, कापूर, एलची, व तमालपत्र, मिश्रण करून द्यावें. अग्निदग्धाच्या लहरा नाश पावतात.

२४. गीष्मकाळीं दाहा होत असल्यास घोड्यास कांजीचा लेप करावा व सातूचें पीठ खाण्यास द्यावें, दाहा शांत होतो.

२५. तेल व लसूण एकत्र करून चारल्यास वातशीत रोग जातो. हें औषध शीतकाळांत द्यावें.

२६. साखर, तूप, दूध, व दास हीं मिश्रण करून दिल्यास कफाचा नाश होतो. किंवा त्याजमध्यें पीठ मिश्रण करून द्यावें.

२७. रोचन, बर्बरी, आवळी व पक्क महाळुंग यांचें मिश्रण करून दिल्यास कफाचा नाश होतो.

२८. सहदेवी, वेखंड, वृंदावनी, व कोष्ठ, यांचें चूर्ण मधांत मिश्रण करून द्यावें, श्वासरोग जातो.

२९. उंबराचीं पिकलेलीं फळें, हशीचे दह्यांत कल्क करून द्यावीं. दाह शांत होतो.

३०. बिब्याच्या फळांची त्वचा, कांगोणी व मीठ या सर्वांचा कल्क करून द्यावा.

३१. कचोराचूर्ण याजमध्यें सैंधव व संचळ मिळवून नाकांत वाटून द्यावें. येणेंकरून घोडा मूत्र करीत नसल्यास करूं लागतो.

३२. संचळ, हळद, पिंपळी व वृंदावनी हीं मिश्रण करून दिल्यास मूत्रकृच्छरोग नाश होतो.

३३. जंबीरफळें ( जांभूळ ), सातू, मध, बित्रवा व पांढरा भोपळा यांची निंबरसांत गोळी करून द्यावी. घोडा रक्तमूत्र करीत असल्यास बंद होतें.

३४. हिरडा, ज्येष्ठमध, अतिविष, देवदारू व पुष्करचूर्ण हें मिश्रण करून द्यावें. रक्तमूत्ररोग नाश पावतो.

३५. पटोळ, धायटी, मध, यष्टिका, मोथा व गिरिकार्णिका यांचें मिश्रण करून द्यावें. रक्तविकार दूर होतो.

३६. घोड्याचें अंग तप्त होतें, श्वास करतो, तोंडांतून रक्तस्राव होतो, व तसाच नाकांतूनही रक्तस्रास होतो त्यास ममाला:-

खजूर, कोहळा व कांकडी यांचा साखर घालून रस काढावा. तो घोड्यास वरचेवर दिल्यास रक्तपित्तदोष नाश पावतात.

३७. औदुंबराच्या मूळाजवळचें पाणी, मध व साखर हें मिश्रण करून द्यावें; रक्तपित्त नाश पावून बळ येतें.

३८. दोन्ही हळदी, गंधक, विडंग (वावडिंग) व शिरसाचें तेल मिश्रण करून दिल्यानें कंडूकुष्ट नाश पावतें.

३९. आळशी, तमालपत्र, निंबाचीं पानें व वडाचे कोंब पाण्यांत वाटून द्यावें. अतिसार नाश पावतो.

४०. गुंजा व एरंडाचें बीं, वाटून त्याचा लेप अंगावर व्रण पडल्यास त्याजवर करावा. व्रणरोग जातो.

४१. तमालपत्रें निर्गुंडीपत्रें व मिरे, एकत्र करून, ज्येष्ठमध समान घालून द्यावें.

४२. जखमी घोडा झाल्यास:—

सैंधव, जवखार, विडंग व मध मिश्रण करून द्यावें; जखम, शस्त्रपीडा नाश पावते.

४३. वेखंड, टांकणखार, तीळ, सज्जीखार व जवखार यांत समभाग गूळ घालून, घोड्यास एक वेळ उक्त प्रमाणानें चौदा दिवस दिल्यानें सर्व रोग नाश पावतात.

४४. सुंठ, मिरे, पिंपळी, सैंधव, वज्रखार, हिंग, संचळ, हरीतकी, कुटकी, अजमोदा, ओंवा, जव, चित्रकमूळ व वावडिंग यांचें चूर्ण करून एरंडेलांत द्यावें; शूळरोग जातात.

४५. मदनफळ, पिंपळी, सुंठ, काळी हरितकी, ओंवा, अजमोदा व शेवग्याची मुळी गूळ घालून ती गोळी द्यावी. शूळरोग जातो.

४६. हिंग, सुंठ, पिंपळी, मिरे, हर्तकी, ओंवा, यवक्षार, कचोरा, सैंधव व गुंजासार, समभाग करून चूर्ण करून ताकांत मिश्रण करून पांच पलप्रमाण द्यावें. गुल्मोदर व शूळ, हे रोग जातात.

४७. रिठा, कचोरा व सैंधव, ऊनताकांत वाटून द्यावें; ह्मणजे घोड्यास मळ बद्ध झाल्यास ढाळ होतात.

४८. अतिविष, सुंठ, सैंधव, गुळवेल, शिरस व पांढरा आम्लवेत या सर्वांचें चूर्ण पिठाबरोबर द्यावें. सर्व शूळ नाश पावतात, व त्यांतच किंचित् गूळ घातला ह्मणजे पित्तवाताचा नाश होऊन बळ येतें.

४९. वाळा, धायटी, लोध्र, धने व जिरे या सर्वांचें चूर्ण ताकांत द्यावें. अतिसार नाश पावतो.

५०. राई, हळद व जिरे, यांचें चूर्ण ताकांत द्यावें. अतिसार नाश पावतो,

५१. संचळ, कवठ, वाळा, श्वेतजिरे, बिल्व, धायटीचीं फुलें, लोध्र व मोचरस, समभाग सर्वांचें चूर्ण करून ताकांत मर्दन करून द्यावें. सर्वप्रकारचे अतिसार नाश होतात.

५२. धायटी, अघाडा, जंबू, कांचनार व तेज, समभाग चूर्ण

करून दहीं व ताक यांचे मिश्रणांत द्यावें. रक्तातिसार तत्काळ नाश पावतो.

९३. बिल्व, धायटी, मंजिष्ठ, लोध्र व धने या सर्वांचें मिश्रण करून तें दारूंत द्यावें. सर्व अतिसारं नाश होतात.

---

## रोगाचीं कारणें.

रोग सहा प्रकारानें होतातः—

१. त्वचेसंबंधी.—स्पर्शापासून किंवा स्पर्शरहित कारणांनीं.

२. शरीरेंद्रियांचे व्यापारांत कमजास्त झाल्यानें.

३. सुजेपासून.

४. अजीर्णापासून.

५. विशेष प्रकारानें.

६. अपघातापासून.

१. स्पर्शजन्य—ह्मणजे, खरूज, देवी वगैरे; हे रोग स्पर्शापासून होतात.

२. भूक तहान न लागणें किंवा दोन्ही जास्त होणें, ह्मणजे, इंद्रियांचे व्यापारांत कमजास्त झाल्यानें.

३. रक्त एके ठिकाणीं जमल्यानें किंवा शरीरेंद्रियांचे भाग ठेंचल्यानें.

४. अधिक खाल्ल्यानें वांती व ज्वर वगैरे उत्पन्न होतात.

५. संधिवात, गंडमाळा, इत्यादि विशेष प्रकारचे रोग आहेत.

६. पडल्यापासून हातपाय दुखणें किंवा हाडें मोडणें.

---

## विशेष उपचारांची माहिती.

उपचार दोनप्रकारचे आहेतः एक पोटांत देणें, आणि दुसरें बाहेर औषधें लावणें.

औषधें देण्याच्या चार तऱ्हा आहेतः एक, गोळीकरून देणें;

दुसरी, पातळ पदार्थ करून देणें; तिसरी, चूर्ण देणें; आणि चवथी, चाटण देणें.

गोळी देणें ती नरम करून हातानें घोड्याचे ताडांत घालावी; पातळ औषध देणें तें दाण्यांत किंवा दुसऱ्या पाजण्याच्या तऱ्हेनें द्यावें; चूर्णें, दाण्यांत किंवा पिठांत द्यावीं; आणि चाटण हातानें द्यावें.

घोड्याची साधारण प्रकृति बिघडली तर खालील औषध द्यावें:—

स्टिंकिंग हेलीबोर ( काळीकुटकी ) पांच पासून आठ ग्रेन आणि ऱ्हुबर्ब पौडर ( रेवाचिनी ) दोन पासून चार ग्रेन पर्यंत, यांची एकत्र गोळी करून रात्रीं दररोज द्यावी.

## त्वचेचे रोगांवर उपचार.

एमेटिक टारटर पांच औंस, पौडर जिंजिर ( सुंठीची पूड ) तीन औंस व ओपियम ( अफू ) एक औंस. साखरेच्या पाकांत या सर्वांचें मिश्रण करून सोळा गोळ्या कराव्या. रात्रीं रोज देणें.

घोड्यास उष्ण झालें असेल तर शीत करण्यास उपायः—

बार्बेडोस अलोस एक औंस, क्यास्टाईल सोप दीड औंस व जिंजिर ( आलें ) अर्धा औंस, या सर्वांचें साखरेच्या पाकांत मिश्रण करून त्याच्या सहा गोळ्या कराव्या; प्रत्येक सकाळीं एक गोळी देत जावी.

घोड्यास हुळक व रिंगाडा, झाल्यास त्यावर उपायः—

बारबेडोस अलोज एक औंस, एमेटिक टारटर दोन ड्राम व क्यास्टाईल सोप एक ड्राम, यांचें मिश्रण करून गोळी देत जावी.

---

## साधारण सर्व रोगांवर उपाय.

ब्ल्याक सल्फ्यूरेट ऑफ अँटिमनि ( सुरमा ) दोनपासून चार ड्राम, सल्फर ( गंधक ) दोन ड्राम, नायटर दोन ड्राम आणि लिन्सिड-

सिडमीळ ( जवसाचा मगज ) यांत पाणी गोळा होण्यापुरतें घालावें. आणि त्याची एक गोळी करून द्यावी.

---

## हरएक रोग शुद्ध किंवा निर्दोष करण्यावर औषध.

फ्लावर्स ऑफ सल्फर ( गंधकाचें फूल ) सहा औंस, एमेटिक टार्टर पांचपासून आंठ ड्रामपर्यंत, क्यारोसिव्ह सब्लिमेट १० दहा ग्रेन आणि लिनसिडमीळ ( जवसाचा मगज ) यांच्या ऊन पाण्यांत सहा गोळ्या कराव्या. आठवड्यांतून दोनदां किंवा तीनदां एक एक गोळी द्यावी.

---

## अग्निमांद्यावर उपाय.

क्यालोमेल ( पारदभस्म ) एक स्क्रूपल, आलोज एक ड्राम, कार्स क्यारिला, जंटेन (काडेचिराईत) व जिंजिर (आलें) ह्या तिहींची पूड प्रत्येकी एक ड्राम, आणि क्यास्टाइल सोप तीन ड्राम याची सायरप (साखरेचा पाक) मध्यें एक गोळी करून आठवड्यांतून दोनदां द्यावी किंवा प्रत्येक दुसरे दिवशीं रात्रीं देत जावी.

---

## अनोडाइन ह्मणजे दर्द कमी करणारी दवा.

मज्जातंतु, हगवण, पोटदुखी किंवा तिडिक व चांदणी यांजवर देण्याची पोटदुखीवर—पावडर ओपियम ( अफूची बुकणी ) अर्ध ड्राम पासून दोन ड्रामपर्यंत, क्यास्टिल सोप व क्याफर (कापूर) प्रत्येक दोन ड्राम, आणि जिंजर ( आलें ) दीड ड्राम यांचा लिकरिस पावडर आणि ट्रिकल ( काकवी ) ह्या दोहींत गोळा तयार करून बरणींत ठेवावा आणि जोंपर्यंत पोट दुखत आहे तोंपर्यंत प्रत्येक तासाला थोडथोडा देत जावा.

---

## साधारण दर्द दूर करणारा दवा.

१. ओपियम ( अफू ) अर्धड्रामपासून एक ड्रामपर्यंत, क्यास्टिल्ल सोप दोनपासून चार ड्रामपर्यंत, जिंजिर ( आलें ) एकपासून दोन ड्राम, पावडर ॲनिसीड अर्धाऔंसपासून एकऔंस आणि क्यारावेसीड ( ओंव्याचें ) तेल अर्धा ड्राम यांजमध्यें सर्वांचा गोळा होण्यापुरता साखरेचा पाक घालून गोळा करावा. नंतर तो गोळा अर्धी बांटली एल् नांवाचे दारूंत मिळवून तें मिश्रण धोत्यानें पाजावें.

---

## वरचेवर लीद होत असल्यास ( ऑर्डिनरी डायरिया ) त्यावर उपाय.

१. अरेबिक् गम ( अरबीगोंद ) दोन औंस व बॉयलिंग वाटर ( कढतपाणी ) पाऊणशेर यांचें मिश्रण करून नंतर त्यांत पेपरमिंटाचें तेल २५पंचवीस थेंब व टिंचर ऑफ ओपियम ( अफूचा अर्क ) अर्ध औंस यांचें मिश्रण करून, जरूर असेल त्याप्रमाणें सकाळीं व संध्याकाळीं थोडें थोडें द्यावें.

---

## साधारण जुलाबावर दुसरा उपाय.

२. पावडर च्याक ( खडूची बुकणी ) एक औंस आणि अरेबिकगम ( अरबीगोंद ) प्रत्येक एकेक औंस हीं टिंचर ऑफ ओपियम ( अफूचा अर्क ) अर्धा औंस आणि पेपरमिंटाचें पाणी दहा औंस यांजमध्यें मिश्रण करून तें मिश्रण सकाळीं व संध्याकाळीं थोडें थोडें द्यावें.

---

## सर्दी दूरकरणारी दवा.

शरीरांत तिडका, वेग, पेटके येणें किंवा कंप होत असेल त्याजवर.

१.पोटदुखीवर.—स्पिरिट ऑफ़ टरपेनटाइन ( टरपेनटाइन तेल)

३ तीन औंस आणि टिंचर ऑफ ओपियम ( अफूचा अर्क) १ औंस, हीं सर्व बाटलीभर एलु नांवाच्या दारूंत घालून तें पेय धोत्यानें पाजावें.

२. स्पिरिट ऑफ टरपेनटाइन ( टरपेनटेल ) साडेतीन औंस, टिंचर ऑफ ओपियम ( अफूचा अर्क ) दीड औंस, आणि बारबाडोज अलोज एक औंस. अलोजची बुकणी करून ऊन पाण्यांत टाकावी. नंतर वरील जिन्नस घालून तें औषध धोत्यानें पाजावें.

---

## पोटदुखीवर पिचकारी मारण्यास औषध.

स्पिरिट ऑफ टरपेनटाइन सहा औंस व अलोज दोन ड्राम हीं दीड शेर ( तीन क्वार्ट) ऊन पाण्यांत मिसळून नंतर टरपेनटाइन त्यांत चांगलें मिसळून द्यावें.

४. जिंजिर ( आलें ) चारपासून सहा औंस, टिंचर ऑफ क्यॉपसिक्रम् दोन ड्राम, टिंचर ऑफ ओपियम ( अफूचा अर्क ) ३ तीन ड्राम व दीड शेर ऊन पाणी हीं सर्व एकत्र मिसळून तें पेय धोत्यानें पाजावें. परंतु हें औषध शरीरावर सूज असेल तर देऊं नये.

---

## ढाळकाविषयीं.

१. **साधारण जुलाब**—बारबेडोज अलोज तीनपासून आठ ड्रामपर्यंत, हार्डसोप चार ड्राम व जिंजर एक ड्राम हीं थोडी मिश्रणापुर्ती ऊन पाण्यांत मिश्रण करून तापवून तें मिश्रण पिण्यास द्यावें. पोटांत मुरडणार नाहीं.

२. **उष्ण जुलाबाचा गोळा**—बारबेडोज आलोज तीनपासून आठ ड्रामपर्यंत, क्यारबोनेट ऑफ सोडा अर्धा ड्राम, आरोम्याटिक पौडर एक ड्राम, आणि आईल ऑफ कॅरावे ( ओंव्याचें तेल) बारा थेंब. वरच्याप्रमाणें सर्वांचें मिश्रण करून नंतर तें तेल घालून द्यावें.

३. **सौम्य जुलाब**.—बारबेडोस अलोज तीनपासून पांचड्रामपर्यंत,

ऱ्हुबर्ब पौंडर एकपासून दोनड्रामपर्यंत, जिंजर दोन ड्राम आणि ऑईल ऑफ क्यारावे, पंधरा थेंब, या सर्वांचें मिश्रण ऊन पाण्यांत करून पहिल्याप्रमाणें गोळा करून द्यावें.

४. **कोठा साफ होण्यास 'वासी' जातीच्या घोड्याकरितां.**—बारबेडोस अलोज तीन ड्राम, ऱ्हुबर्ब दोन ड्राम, जिंजर आणि क्यासक्यारिला पौंडर प्रत्येक एक ड्राम, ऑईल आफ क्याराबे पंधरा थेंब आणि क्यारबोनेट ऑफ सोडा दीड ड्राम, हीं ऊन पाण्यांत प्रथम अलोज मिश्रण करून नंतर सर्व औषधें पहिल्याप्रमाणें मिळवून तें पेय द्यावें.

५. **क्यालोमेलच्या जुलाबाचा गोळा.**—बारबेडोज अलोज तीनपासून सहा ड्रामपर्यंत, क्यालोमेल अर्धा ड्रामपासून एक ड्रामपर्यंत ऱ्हुबर्ब एकपासून दोन ड्रामपर्यंत, जिंजर अर्धा ड्राम पासून एक ड्रामपर्यंत आणि क्यास्टिल सोप दोन ड्राम. वरच्या प्रमाणें मिश्रण करून गोळा द्यावा.

६. **साधारण पातळ मिश्रण.**—बारबेडोस अलोज तीनपासून चार ड्रामपर्यंत, क्यानेला अलबा एकपासून दोन ड्राम, साल्ट आफ टार्टर एकड्राम आणि मिन्ट वाटर आठ औंस, हीं मिश्रण करून तें द्यावें.

७. **दुसरा प्रकार.**—क्यास्टर आइल (एरंडीचें तेल) तीनपासून सहा औंस, बारबेडोज अलोज तीनपासून पांचड्राम, क्यारबोनेट ऑफ सोडा दोनड्राम, आणि मिंटवाटर आठ औंस. प्रथम मिंटवाटर ऊन करून त्यांत अलोज मिसळून नंतर सर्व औषधें मिळवून द्यावें.

८. **सौम्यजुलाबाचें पातळ औषध.**—क्यास्टर आइल चार औंस, इप्सम साल्ट तीनपासून पांच औंस आणि ग्रुएल (भाताची पेज) दोन बाटल्या, हीं सर्व औषधें एकत्र करून द्यावीं.

९. **फारच सौम्य असे जुलाब.**—क्यास्टर ऑईल व लिनसिड ऑईल प्रत्येक चार औंस आणि ऊन पाणी किंवा भाताची पेज एक बाटली. हें औषध वरच्याप्रमाणें मिश्र करून द्यावें.

**१०. उन्मादरोगावर जुलाब.**—बारबेडोस अलोज, सहा ड्राम, कामन साल्ट (मीठ) सहा औंस, फ्लोअर ऑफ मस्टर्ड ( राईची बुकणी ) एक औंस आणि पाणी दोन शेर मिळवून द्यावें.

**११. थोडी थंडी झाली असतां सौम्य व पातळ जुलाब.**—इप्सम साल्ट सहापासून आठ औंस. व व्हे ( ताक ) दोनबाटल्या हें मिश्रण करून धोंस्यानें पाजावें.

१२. जुलाबाकरितां पिचकारी देणें तीः—

कामनसाल्ट (मीठ) चार पासून आठ औंस व ऊनपाणी चारपासून आठ शेर मिश्रण करून पिचकारी मारावी.

---

## कषायान्वित औषधें.

काढा करून तोंडानें पाजण्याची आणि वरती जखमेचे तोंडावर व चट्ट्यांवर बाहेरून लावावयाचीं कषायान्वित औषधें. घोड्याचे शरीरांत किंवा वरचे भागावर हाडें जमण्यास किंवा दुखवलेला वरचाभाग मिळून येण्यास या औषधांचा उपयोग करावा.

१. घोड्याचे डोळ्यांस आजार झाला असतां डोळे धुण्यास औषध.

सल्फेट ऑफ झिंक पांच पासून आठ ग्रेन आणि पाणी दोन औंस. यांचें मिश्रण करून त्याणें डोळे धुवावे.

२. गोलार्ड एक्स्ट्राक्ट ( गोलार्डचा अर्क ) एक ड्राम व पाणी एक औंस, यांचें मिश्रण करून त्याणें डोळे धुवावे.

३. घोड्यास रक्ताची लघवी होतअसल्यास त्यावरः पावडर्ड क्याटेच्यू ( काथाची बुकणी ) अर्धा औंस, अलम अर्धा. औंस, क्यॉस क्यारेला बार्क पावडर एक पासून दोन ड्रामपर्यंत व लिक्वारिस पावडर आणि ट्रीकल ह्या दोन्ही औषधी सर्व औषधांचा गोळा होण्यापुरत्या घालून तें औषध दिवसांतून दोनदां द्यावें.

४. फार मूत्रमेह होत असल्यासः—ओपियम ( अफू ) अर्धा-

ड्राम, जिंजर पावडर ( सुंठीची पूड ) दोनड्राम, ओकबार्क पावडर (ओकसालीचें चूर्ण)एक औंस, आणि क्यामो माइल् चहा एक बाटलीभर तयार करून, त्यांत वितळेल इतकी अलम (तुर्टी) मिळवावी व त्या सर्वांचे मिश्रण करून, तें घोड्यानें पाजावें.

५. घोड्यास व्रण झाला असतां त्याचे भोंवतालीं लावण्याचें औषधः—पावडर अलम (तुर्टीची पूड) चार औंस व आर्मिनीयन बोळ एक औंस.

६. व्हाइट व्हिट्रियल चार औंस व आक्सिड ऑफ झिंक एक औंस यांचे मिश्रण करून लावावें.

७. घुण्याचीं औषधेंः—गोलार्ड एक्स्ट्राक्ट दोनपासून तीन ड्राम-पर्यंत व अर्धी बाटली पाणी.

८. सल्फेट ऑफ् कॉपर एकपासून दोनड्राम व अर्धी बाटली पाणी यांचे मिश्रण करून धुवावें.

९. टांचा सुजल्या असल्यास त्याजवर तेल लावण्याचा उपायः—सुपर असिटेट ऑफ लीड एकड्राम व लार्ड (चर्बी)एक औंस यांचें मिश्रण करून लावावें.

१०. दुसरा उपाय—नाइट्रेट आफ सिल्व्हर पावडर अर्धाड्राम, गोलर्ड एक्स्ट्र्याक्ट एकड्राम व लार्ड एक औंस यांचें मिश्रण करून लावावें.

---

## तेलें व लिबस्टरें.

१. साधारण सूज आली असल्यास तेल लावावें तेंः—हॉगज् लार्ड ( डुकराची चर्बी ) चार औंस, व्हेनिस टरपेनटाइन एक औंस व पावडर्ड क्यांथेरिड सहा ड्राम हीं मिश्रण करून तें तेल लावावें.

२. फार सूज आली असल्यास त्याजवर तेलः—स्पिरिट ऑफ टरपेनटाइन एक औंस व सल्फ्यूरिक आसिड मोजूनच दोन ड्राम—फार काळजीनें, उघड्या हवेमध्यें, त्या आसिडाचें मिश्रण करून, नंतर

डुकराची चर्बी मिळवावी. ती चर्बी चार औंस पाहिजे. त्यांत पावडर्ड कॅंथाराइड्स् एक औंस मिश्रण करून लावावें.

३. सूज आली असल्यास त्याजवर फोड आणण्याचें कडक औषध :–स्ट्रांग मर्क्यूरिअल ऑइन्टमेन्ट चार औंस, ऑइल ऑफ आर्ग्यानम् अर्धा औंस, फाइनली पावडर्ड यूफराबियम तीन ड्राम व पावडर्ड कॅन्थारिड अर्धा औंस यांचें मिश्रण करून लावावें.

४. जलद उपाय करणारें ब्लिस्टरः–राईची चांगली पूड आठ औंस पाण्यांत घालून त्याची खळ करावी. नंतर त्यांत स्पिरिट ऑफ टरपेन्टाइन् दोन औंस मिळवावें व स्ट्रॉग लिकर ऑफ आमोनिया एक औंस हीं सर्व तयार करून कुशी, पोट व पाठ ह्या ठिकाणीं चांगलें सपाटून चोळावें.

५. साधारण ब्लिस्टरः—स्ट्रॉग मर्क्यूरियल ऑइन्टमेन्ट दोन औंस, ऑइल ऑफ अर्ग्यानम् दोनड्राम, कारोसिव्ह सब्लिमेट दोन-ड्राम व कॅन्थारिड्स् पावडर तीनड्राम यांचें मिश्रण करूनहातांनीं खूप चोळावें.

६. कडक साधारण ब्लिस्टर, ( चपरहड्डी, चक्रावळ, बेरहड्डी ) वगैरेंवरः—

रेड आयोडाइड ऑफ मर्क्यूरी एकपासून दीडड्रामपर्यंत, आणि लार्ड (चरबी) एक औंस, हें, पायांवरचे किंचित् केस काढून तेथें चांगलें चोळावें व अर्निका हें रोजचेरोज ब्रशानें धुतल्यासारखें लावावें. टिंचर ऑफ अर्निका एक औंस आणि पाणी बारा किंवा चौदा औंस यांचें मिश्रण करून त्याणें धुवावें.

७. टिंचर ऑफ आयोडाइन हें ब्रशानें रोज त्याजवर लावावें. तें हाडावर कातडें येईपर्यंत लावावें. नंतर कांहीं दिवस बंद ठेवून फिरून लावीत जावें.

---

## घोड्यांस औषधाचे योगानें भाजणें.

क्यास्टिक ह्मणजे औषधाचे योगानें घोड्याचे शरीरास डाग देणें, यांत दोन भेद आहेतः एक लोखंड अग्नींत तापवून भाजणें; व दुसरें पोट्याश, लूनार क्यास्टिकै वगैरेंनीं भाजणें. ह्यांपैकीं पहिल्या प्रकारचें भाजणें ह्मणजे जेथें फार मोटी सूज आली असेल तेथेंच त्याचा उपयोग करतात. हा भाजण्याचा प्रयोग जो रोग ह्मणजे सूज-किंवा हाडांतील दर्द त्याजवर ब्लिस्टर लावून, उपयोगांत आणिला असतां सूज कमी होते. हा प्रयोग करून तीन महिने गुजरल्याबां-सून अग्निदाह करूं नये.

---

## तीव्र आणि घट्ट क्यास्टिक औषध.

१. फ्यूज्ड पोटॅश ह्याचा उपयोग करणें कठिण आहे, कारण तो सर्व जागेला पसरतो. सबब घोड्याचे दर्दावरचे औषधांत त्याचा उपयोग थोडा करितात.

२. लूनार क्यास्टिक अथवा नाइट्रेट ऑफ सिल्व्हर हें फार करून घोड्याचे रोग जाणणारे लोक उपयोगांत आणितात.

३. सल्फेट् ऑफ् कॉपर याचाही उपयोग सदरीं लिहिल्या-प्रमाणेंच आहे. परंतु लूनार क्यास्टिक प्रमाणें हें तीव्र नाहीं. हें औ-षध दर्द माटून येईपर्यंत पुष्कळ चोळलें पाहिजे. घोड्याचा गुडघा मोडतो अगर त्या सारखें दुसरें दर्द होतें त्या वेळेस चोळावें.

४. कारोसिव्ह सब्लीमेट पावडर ही चामखीळ वगैरेंवर ला-विली असतां जलद नाश करिते. हें औषध फारच युक्तीनें तेव-ढ्याच जागेवर लावावें, आणि थोडे मिनिटांनीं लागलेंच धुऊन टाकावें. परंतु हें लावण्यास दर्द जाणणाराचा हात चांगलाच बसला पाहिजे.

५. यलो आर्पिमेन्ट याचाही उपयोग सदरीलप्रमाणेंच आहे. हें औषध वरीलप्रमाणें तीव्र नाहीं. सबब निर्भयपणानें लावावें. चामखीळ किंवा मस ह्यांचे वर हें चोळलें असतां तीं जातात.

६. स्ट्रॉंग लिक्विड क्यास्टिक, ह्मणजे पातळ पदार्थाचा तीव्र दाहः—

सलफ्यूरिक आसिड अथवा नाइट्रिक आसिड ह्यांचा उपयोग, तितक्याच प्रमाणाचें पाणी घालून किंवा पाण्यावांचून तें चोळून, करावा. परंतु तें कातड्याला ( त्वचेला ) लवकर जाळतें; सबब जपून उपयोग करावा.

७. घोड्याचे पायाच्या तळव्यावर व पुतळीवर मुरदाड मांस वाढतें, त्याजवरः—क्विक् सिल्व्हर एक औंस, व नाइट्रिक आसिड दोन औंस. मातीचे परळांत मिश्रण करून थंड झाल्यावर रुंद कांचेच्या शिश्यांत ठेवावें व बूच मारावा. व त्यांत एकपासून तीन औंसपर्यंत पाहिजे असल्यास चरबी घालावी.

८. याचप्रकारचें दुसरें औषध अदलून बदलून लावण्याचें तें:- कॉपर फिलिंग्ज अर्धा औंस व नाइट्रिक आसिड एक औंस या दोहींचें मिश्रण करून वर लिहिल्याप्रमाणें उपयोग करावा.

९. म्यूरिएट ऑफ अन्टिमोनी यास बटर ऑफ अन्टिमोनी ह्मणतात. हें फार तीव्र असून नेहमीं वापरण्यासवरण्यासारखें नाहीं. याचा उपयोग नुस्ता करावा किंवा थोडें किंवा फार पाणी मिळवून करावा.

१०. माइल्ड सालिड क्यास्टिक ह्मणजे सौम्य घट्ट क्यास्टिक.— व्हर्डिग्रीस याची बुकणी किंवा चरबी बरोबर मळम करून एक पासून तीन औंस सारखें घेऊन, चोळावें.

११ रेड प्रेसिपिटेट याचा वरच्या प्रमाणेंच उपयोग करावा.

१२. बर्न्ट आलम् ( भाजलेली फटकी ) कोरडीच उपयोगांत आणावी.

१३. पौडर्ड व्हाइट शुगर ( पांढऱ्या साखरेची बुकणी ) हिचा उपयोग करावा.

१४. माइल्ड लिक्विड क्यास्टिक ह्मणजे सौम्य पातळ क्यास्टिक: सोल्यूशन ऑफ नाइट्रेट ऑफ सिल्व्हर ( पांच पासून पंधरा ग्रेन ) व एक औंस शुद्ध पाणी, मिश्रण करून लावावें.

१५. सोल्यूशन ब्ल्यूव्हीट्रियल ( मोर्चूत ) वरच्या पेक्षां दुप्पट मानानें घेऊन मिश्रण करून लावावें.

१६. क्लोराइड ऑफ झिंक, तीन ग्रेन व एक औंस पाणी, मिश्रण करून लावावें.

---

## चार्जे ( मलमपट्टी ).

ही दवा प्ल्यास्टर प्रमाणें आहे. ही घोड्याचे पायावर ऊन असतांनांच बांधावी. आणि लोकर तागाचे कापडानें पाय आच्छादावा. व तो चरूं लागला किंवा हिंडूं लागल्यास सुटूं नये.

नेहमींच्या साध्या पट्या.—बरगंडी पिच चार औंस, बारबेडोज टार चार औंस, बीव्याक्स ( मेण ) दोन औंस व रेडलेड (तांबडें शिसें) चार औंस; पैकीं पहिलीं तीन एकत्र मिश्रण करून वितळवावीं आणि नंतर शिसें घालून तें मिश्रण लावण्याजोगें थंड होईपर्यंत ढवळीत जावें. कदाचित् हवेनें घट्ट झाल्यास चरबी किंवा तेल घालून नरम करून लावावें.

**आर्निका मलम.**—कानडा ब्यालसम दोन औंस व पावडर आर्निका लीव्हज् अर्धा औंस. ब्यालसम हें वितळवून पानासहित लाविल्यास स्पिरिट्स टरपेन्टाइन् घालावें. त्यांचें जेव्हां चांगलें मिश्रण होईल तेव्हां पातळ थर पायावर चोळावा. वर सांगितल्याप्रमाणें पायावर तागाचें कापड आच्छादावें. ह्मणजे तें वेष्टण ब्यान्डेज प्रमाणें उपयोगी पडतें. व आर्निका हें घोड्याच्या शिरांस मजबुती आणितें. हा चांगला उपाय आहे.

---

## उष्णता आणणारीं औषधें.

कार्डियल्स ( उष्णता आणणारें ). हें औषध तूर्तातूर्त अंगांत उष्णता आणणारें आहे. अजारीपणांत शक्ति व उत्साह कमी असल्यामुळें किंवा फार काम केल्यानें अंगांत शक्ति व उत्साह कमी होतो, तेव्हां याचा उपयोग केला असतां फायदा होतो. हें औषध गरमी आणणारें असून घोड्यास व कुत्र्यास उपयोगीं पडतें. परंतु ह्याचा डोस घोड्याच्या व कुत्र्याच्या शक्तीप्रमाणें द्यावा.

१. कार्डीयल बाल्स.–पावडर्ड क्यारावे सीडस् सहा ड्राम, जिंजर दोन ड्राम, आइल आफ क्लव्ह्ज ( लवंगांचें तेल ) वीस थेंब, आणि सर्वांचा गोळा होण्यापुर्ती काकवी ध्यावी.

२. पावडर्ड अनिसीड (बडिशेपेची पूड) सहा ड्राम, क्यार्डामोम (एलची) दोन ड्राम, पावडर्ड क्याशिया ( बहावा ) एक ड्राम आणि आइल आफ क्यारावे वीस थेंब. यांत गोळा होण्यापुर्ती काकवी घालून गोळा करावा.

३. कार्डियलड्रेंच.—एक शेर एल नांवाची उष्ण दारू व त्या मानानें आलें घालून धोंड्यानें पाजावें.

४. **कार्डीयल अन्ड एक्सपेक्टोरन्टः**—पावडर्ड अनिसीड अर्धा औंस, पावडर्ड स्क्विल एकड्राम, पावडर्ड मिन्ह दीड ड्राम, आणि ब्यालसम आफ पेरू गोळा होण्यापुर्ते घालून गोळा करावा.

५. लिक्करिस पावडर अर्धा औंस, गम अमोनिआकम् तीन ड्राम. बालसम ऑफ टोलु दीड ड्राम आणि पावडर्ड स्क्विल एक ड्राम. लिन्सीड मील, व बायलिंगवाटर (ऊनपाणी) गोळा करण्यापुर्ते घालून गोळा करावा.

---

## डेम्यूलसेन्टस् ( नरमाई आणणारी दवा ).

डेम्यूलसेन्ट हें औषध पोटांतील रोग, मूत्राशयरोग, आणि म-

लाशय रोग ह्या ठिकाणीं नरमाई आणण्याचे उपयोगी आहे.

१. डेम्यूलसेन्ट ड्रेंच:—अरेबिक गम अर्धा औंस व पाणी एक शेर, हें सर्व मिळवून द्यावें.

२. लिनसिड चार औंस व पाणी एक शेर, घट्ट होईपर्यंत साखरेचा पाक घालून वरच्या प्रमाणें द्यावें.

३. मार्शमालो ड्रेंच.—मार्शमालो दोन मुठी व पाणी एक शेर; वरच्या प्रमाणें साखरेचा पाक घट्ट होईपर्यंत घालून द्यावें.

---

## डायफोरेटिक (घाम आणणारें).

हें घाम आणणारें औषध होय.

१. त्वचेला घाम आणण्याकरितां—इमेटिक टारटर दीड ड्राम, क्यांफर अर्धा ड्राम, जिंजर दोन ड्राम, ओपियम अर्धा ड्राम, आणि आइल ऑफ क्यारावे (ओंव्याचा अर्क) पंधरा थेंब. लिनसिडमील आणि ऊनपाणी, हें गोळा होण्या पुर्ते घालावें; हा आठ दिवसांत दोन वेळ किंवा तीन वेळ द्यावा.

२. घाम आणणारें परंतु साधारण.—अन्टीनियल पावडर (सुरमा) दोन ड्राम, जिंजर एक ड्राम, पावडर क्यारावे सहा ड्राम व आइळ आफ अनसिड (शोपाचें तेल) वीस थेंब वरच्याप्रमाणें मिश्रण करून द्यावें.

ह्या औषधाचा गुण आणण्याकरितां घोड्यावर झूल घालून फिरवावा ह्मणजे घाम येईल. नंतर तो घाम पुसून काढावा.

---

## डायजेस्टिव्ह (पिकवण्याचें औषध).

जखमेंतीळ व चट्टे पडले असतील तर त्यांतील पूं काढण्याचें औषध.

पूं काढणारें मलम: रेड प्रेसिपिटेट दोन औंस, व्हेनिस टरपेन्टाइन, तीन औंस, बीज़्व्याक्स (मेण) एक औंस व हाग्स लार्ड (डुकराची चर्बी)

चार औंस. पैकीं शेवटलीं तीन औषधें मंदाग्नीवर कढवून थंड झाल्या-वर त्यांत वरील पावडर ( पूड ) मिळवावी.

---

## ड्यूरेटिक ( मूत्रव्याधीवर )

ड्यूरेटिक ह्मणजे, पृथःकरणें, व शुद्धीकरण होऊन लघवी साफ होण्याचें औषध.

१. घोड्याचे अंगीं उष्णता ठेवून मूत्र साफ होण्यास उपायः पावडर रेसिन, साल प्रूनेल व क्यास्टिक सोप, प्रत्येक तीनड्राम, आणि आइल आफ ज्यूनिपर एक ड्राम मिश्रण करावें.

२. सौम्य मूत्ररेचक औषधः—पावर्ड नाइटर अर्धा औंसपासून एक औंसपर्यंत, क्यांफर आणि आइल ऑफ ज्यूनिपर प्रत्येक एक ड्राम व सोप तीन ड्राम; लिनसिड मिल मिश्रणापुरतें घालून गोळा करावा.

३. नायटर आणि रोसीन हीं प्रत्येक अर्धाऔंसपासून पाऊण औंसपर्यंत घेऊन मिश्रण करून द्यावें.

४. दुसऱ्या प्रकारापेक्षां कांहीं तीक्ष्ण.—नायटर आणि क्यांफर, पैकीं नायटर सहा ड्राम व क्यांफर दीड ड्राम मिश्रण करून द्यावें.

---

## इंब्रोकेशन ( तेलानें मर्दन करणें व धुणें).

हें औषध दर्दाचे आंत उष्णता ठेवतें. बाहेरून हातानें चोळलें असतां दर्दाची सूज व त्याच्या वेदना होत असल्यास अभ्यंतरीं गर्मी राहून वेदना कमी होतात.

१. मोहरीनें मर्दन करण्याचा प्रकार.—बेस्ट फ्लोअर ऑफ मस्टर्ड ( उत्तम मोहरीचें पिठ ) सहा औंस, लिकर आफ अमोनिया दीड औंस व आईल ऑफ टरपेन्टाइन (टरपेन तेल ) दीड औंस या सर्वांचें घट्ट मिश्रण होण्यापुरतें पाणी घालून खळीसारखें झाल्यावर चिकटवावें.

२. चेतनावर्धक.—क्यांफर अर्धा औंस, आईल ऑफ टरपेन्टाइन आणि द्राक्षाची दारू प्रत्येक एकेक औंस मिश्रण करावें.

३. मागील पायाचे दर्दावर मध्यम मर्दन.—स्ट्रांगमरक्यूरिअल आईन्टमेंन्ट दोन औंस, क्यांफर अर्धा औंस, आइल ऑफ रोजमरि दोन ड्राम आणि आईल ऑफ टरपेनटाइन एक औंस मिश्रणकरून लावावें.

४. दुसरा प्रकार वरच्यापेक्षां उत्तमः स्ट्रांग मरक्यूरियल आईन्टमेन्ट दोन औंस, आईल ऑफ बे एक औंस, आइल ऑफ आर्ग्यानम् अर्धा औंस,व पावडर क्यांथारिडस् अर्धा औंस,मिश्रण करून लावावें.

५. सौम्य परंतु तलख मर्दन.—रेड आयोडाइड ऑफ मर्क्यूर अर्धा औंसपासून एक औंसपर्यंत, पावडर्ड अर्निका लिव्हज एक ड्राम. सोप लिनिमेन्ट दोन औंस, मिश्रणकरून लावावें.

---

## इम्यूलशन ( नरमाईस औषध. )

फार दिवसांचे खोकल्यास हें औषध फार उपयोगी आहे.

१ साधी नरमाई.—लिनसिड आइल दोन औंस, हनी ( मध ) तीन औंस, स्वच्छ पाणी अच्छेर आणि सबक्यारबोनेट आफ पोट्याश एक ड्राम. मध व पोट्यास पाण्यांत एकत्र करून नंतर लिनसिड तेल थोडें थोडें घालीत जाऊन खलबत्त्यांत खलीत जावें. फेंस येईपर्यंत तयार करून सकाळीं व संध्याकाळीं द्यावें.

२ दुसरा साधा परंतु तीव्र उपाय.–सिंपल इम्यूलशन एक पासून आठ औंस, क्यांफर एक ड्राम, ओपियम पावडर अर्धा ड्राम व आइल आफ अनसिडचे तीस थेंब. परंतु शेवटचीं तीन औषधें एकत्र करून खलबत्यांत घालून घोटावीं. घोटतानां त्यांत थोडी पांढरी साखर घालावी. नंतर इम्यूलशन (नरमाईचा पदार्थ) थोडें थोडें घालीत जावें.

---

## एक्सपेक्टरन्टस् (कफ पडण्यास).

फुफ्फुसांत अभ्यंतरीं जी सूज असते त्यापासून कफ निर्माण झाला असतो, तो बाहेर पाडून सूज उतरण्यास उपायः—

१ सूज नसतांना साधारण खोकला आहे तर.—गम अमोनिया-कम अर्ध औंस, पावडर्ड स्किल एक ड्राम, क्यास्टिल सोप दोन ड्राम व मध सर्व औषधांचा गोळा होण्यापुरता घालावा.

२ फार दिवसांचा जुना खोकला.—असाफोटिडा (हिंग) तीन ड्राम, गलबानम एक ड्राम, क्यारबोनेट आफ अमोनिया अर्ध ड्राम व जिंजर दीड ड्राम. आणि या सर्वांचें मिश्रण होण्यापुरता मध घालावा.

३ कफ पडण्यास उत्तम औषध.—इमेटिक टारटर अर्ध ड्राम, क्यालोमेल पंधरा ग्रेन, डिजिटालिस (रानहरभरा) अर्धा ड्राम, पावडर स्किल अर्ध ड्राम आणि लिनसिड व पाणी सर्व औषधांचा गोळा होण्यापुर्ते घालून गोळ्या कराव्या.

---

## फिबरीफ्यूग्ज (ज्वरनाशक.)

हीं औषधें ताप निवण्यास, लघवी साफ होण्यास आणि खर न पडण्यास उपयोगी आहेत.

१ तापावर.—नाइटर चार ड्राम. क्यांफर एक ड्राम, क्यालोमेल आणि ओपियम प्रत्येक एकेक स्क्रूपल; लिनसिडमीळ आणि पाणी सर्व औषधांचा गोळा होण्यापुरतें घालावें.

२ दुसरा प्रकार.—इमेटिक टारटर दीड पासून दोन ड्राम, कंपाउन्ड पावडर आफ ट्रॅग्याकॅन्थ दोन ड्राम. लिनसिड मीळ वरच्या प्रमाणें घालून गोळा करावा.

३ तिसरा प्रकार.—नाइटर एक औंस कोंडा किंवा भुस्सा ह्यांत द्यावें.

४ धोस्यानें पाजण्याचा प्रकार.—नायटर एक औंस, स्वीट स्पिरिट्स

ऑफ नायटर दोन औंस, टिंचर ऑफ डिजिटेलीस दोन ड्राम. आणि दह्याची निवळ (व्ही–ताक) अर्धे शेर एकत्र करून धोत्यानें पाजावें.

---

## क्लिस्टर ( पिचकारी ).

पिचकारी मारण्याचें कारण इतकेंच कीं, पोटांत तिडीक येणें किंवा त्या संबंधीं आंतड्यांत हरकत आली असल्यास ती दूर होण्याकरितां पिचकारी ऊन पाण्यानें किंवा औषधी काढ्यानें मारावी. पोटदुखीचा वगैरे अजार असल्यास त्यावर ही प्रशस्त आहे.

१. हगवणीवर पिचकारी.—धुण्याकारितां केलेली पेज किंवा कल्क एक शेर, व पावडर ओपियम दोन ड्रामः पैकीं ओपियम पाण्यांत शिजवून नंतर पेज किंवा कल्क त्यांत मिश्रण करावा.

---

## लोशन ( भाजणें ).

लोशन करण्याचा जो पदार्थ तो पातळ असून त्याचा उपयोग बाहेरच्या भुजेवर कारितात. ह्याचा उपयोग केल्यानें उष्णता कमी होते व शिरा बंदावर राहतात.

१. ब्रशनें लावण्याचें सौम्य औषध.–टिंचर ऑफ अर्निका एक ड्राम, व स्पिरिट ऑफ वाइन सात ड्राम या सर्वांचें मिश्रण करून ती जागा हातानें चोळून नंतर तें औषध लावावें.

२. दर्दाचे आंतील किडविर.—नायट्रेट ऑफ सिल्व्हर १० ग्रेन व शुद्ध पाणी (डिस्टिल्डवाटर) एक औंस, मिश्रण करून रोज रात्रीं त्याचा टिपका त्याच जागेवर द्यावा.

३. बाहेरच्या बाजूस सौम्य औषध.—गोलार्ड एक्स्ट्र्याक्ट एक औंस, व्हेनिगर दोन औंस, स्पिरिट ऑफ वाइन किंवा जिंजर तीन औंस व पाणी दीडशेर मिश्रण करून क्यालिकोब्यान्डेज बरोबर त्या ठिकाणीं लावावें.

४. पाय, किंवा वांसटलेला खांदा किंवा पाठ, यांवर.—साल आमोनिआक एक औंस, व्हिनिगार चार औंस, स्पिरिट ऑफ वाईन दोन औंस, टिंक्चर ऑफ अर्निका दोन ड्राम व पाणी अर्धशेर मिश्रण करून लावावें.

९. व्रण किंवा भगेंद्र.—सल्फेट ऑफ कापर एक औंस, नायट्रिक आसिड अर्धा औंस व पाणी आठपासून बारा औंसपर्यंत मिश्रण करून त्याचें लेपन करावें.

हें तेलकट औषध आहे. यांत तेजस्वी औषध असून चर्बीचें मिश्रण आहे. ज्या ठिकाणीं क्षत वगैरे असेल त्याठिकाणीं किंवा ज्या ज्या दर्दावर जें जें मलम चालतें त्या त्या ठिकाणीं त्याचें वर्णन केलें आहे त्याप्रमाणें लावावें.

## सिम्यूलेन्ट ( गर्मी आणणारें ).

हें औषध शिरांची व धमनीची क्रिया चालू करतें. व मस्तकांतील मेंदु आणि काळीज यांचीही क्रिया या औषधापासून चालू होते.

१. ओल्ड एल ( जुनी एल नांवाची दारू ) एक शेर, क्यारबोनेट ऑफ अमोनिया अर्धाड्रामपासून दोनड्राम पर्यंत व टिंक्चर ऑफ जिंजर चार ड्राम मिश्रण करून घोटचानें पाजावें.

मलम किंवा लेपन यावरचीं आणिक औषधें 'कार्डियल' (गरमी आणणारीं औषधें ) या सदरांत सांगितलीं आहेत.

---

## स्टमक ( क्षुद्बोधक ).

अपथ्यानें किंवा आजारीपणानें पोटांत मंदाग्नि होतो तो चेतवण्यास हें औषध आहे.

पोटांत देण्याचे गोळे.—पावडर जन्टेनाटियन अर्धा औंस, पावडर जिंजर दीड ड्राम, क्यारबोनेट ऑफ सोडा एक ड्राम आणि ट्रिकल

( काकवी ) या सर्व पदार्थांचा गोळा होईपर्यंत घालून गोळा करावा.

२. दुसरा प्रकार.—क्यासक्यारिला पावडर एक औंस, मिऱ्ह दीड ड्राम, क्यास्टिलसोप एक ड्राम आणि गोळा होण्यापुर्ता साखरेचा पाक किंवा काकवी घालून गोळा करावा.

३. पावडर कोलोंबो अर्धापासून एक ड्रामपर्यंत, पावडर क्यासिया एक ड्राम आणि पावडर ऱ्हुबार्ब दोन ड्राम यांचें दुसऱ्या नंबरांत सांगितल्याप्रमाणें मिश्रण करावें.

---

## स्टायपिक्स ( रक्त बंद करणें ).

हा उपाय शरीराचे बाहेरून किंवा आंतून रक्त वाहूं लागलें असतां तें बंद करण्याचा आहे. पोटांत औषधें घेऊन किंवा बाहेर डाग देऊन रक्त बंद करावें. कषायांचे सदरांत औषधांचा प्रकार लिहिला आहे तो पान ८९ यावर पहा.

## वर्म मेडिसन ( क्रिमींवर औषध ).

क्रिमी घालविणारे औषधाचे योगानें, क्रिमी मळद्वारावाटे बाहेर पडतात किंवा पोटांतच नाहींसे होतात.

१. क्यालोमेल एक ड्रामपासून दोन ड्राम, बारबेडोज अलोज तीन पासून सहा ड्राम, जिंजर एक ड्राम, व सोप तीन ड्राम मिश्रण करून द्यावें. दुसरें औषध, एक पिंट जवसाचें तेल क्रिमी दूर होईपर्यंत दररोज द्यावें.

---

## टॉनिक ( पाचक व पौष्टिक ).

हें औषध दिल्यानें कांहीं दिवस शरीरांत गर्मी राहते. थोडा ताप कमी झाला ह्मणजे या औषधाचा उपयोग करावा. हें औषध शक्तिवर्धक आहे.

**टानिकबाल.**—पावडर यलो बार्क एक औंस, जिंजर दोन ड्राम, क्यारबोनेट ऑफ सोडा अर्धा ड्राम व गोळा होण्या पुरतें लिनसिडमील आणि पाणी घालून गोळा करावा.

२. सल्फेट ऑफ आयर्न अर्धा औंस आणि एक्स्ट्राक्ट ऑफ क्यामोमाइल एक औंस हीं मिश्रण करून गोळा करावा.

३. अन्यासिनीक दहा ग्रेन, जिंजर एक ड्राम, पावडर अनसिड एक औंस, कंपाउन्ड पावडर ऑफ ट्रगाकॅन्थ दोन ड्राम आणि सायरप (साखरेचा पाक) गोळा होण्यापुरता घालून त्या सर्वांचें मिश्रण करून गोळा करावा. हें औषध फार शक्तिवर्धक आहे.

## मेंदूसंबंधी रोग.

**फ्रिनिटीस,**( मेंदूस सूज येते ती )—इंग्रजींत याला बरींच नांवें आहेत: **स्ट्यागर्स, आपोप्लेक्सी, म्याड** व **स्लीपी** वगैरे. हा रोग होण्याचें कारण वाईट धान्य व वाईट गवत खाण्यापासून अजीर्ण होतें आणि तेणें करून मेंदूस सूज येते.

**लक्षण**—प्रथम सुस्ती येते, डोळे सुजून पाणी निघतें, नाडीचे ठोके जलद चालतात, पोटांत अवरोध होतो, लघवी कमी होते, व पुढें बेशुद्ध व वेड्यासारखा होतो; असें झालें ह्मणजे मेंदूची दशा आली असें समजावें.

पक्काशयांत आलेले विकृतीमुळें डोळे व तोंड पिवळें होतें; छातीच्या शिरा टणक होतात; घोडा फार अशक्त होतो; पुढील पाय कांपतात, ते इतके कीं, उभें राहण्यासही त्याला ताकद नसते; आणि बेशुद्ध होऊन तो पुढें वांचत नाहीं, त्याबद्दल निरनिराळे उपाय आहेत.

**इलाज**—मेंदु सुजला असतां रक्त फार काढलें पाहिजे, जुलाब दिला पाहिजे व टरपेनटाईनची पिचकारी द्यावी. त्यापासून गुण येतो, डोक्यावर ब्लिस्टर मारावें, पोटांत एक औंस नाईटराचा डोस

द्यावा, व टार्टर इमिटिक, डिटेलीस प्रत्येक ड्राम याचा डोस द्यावा, पक्काशयांत झालेले विकृतीस लौकर उपाय झाला तर घोडा बरा होईल. पोट फुगत असेंल तर रक्त काढण्यापेक्षां पोटांत औषध द्यावें हें चांगलें; कारण दोन्हींचे भेद कळत नाहींत. टिंकचर आफ जिंजर कान्पौंड स्पिरिट आफ अमोनिया, टिंकचर आफ लॅवेंडर व सल्फर हे प्रत्येक एक द्राम आणि क्यांफर मिक्स्चर व येलदारू चारचार औंस मिळवून घोड्यास द्यावें.

**दुसरा इलाज**—बारबेडोज एलोज तीन ड्राम, टिंकचर आफ क्याप्सिकम दोन ड्राम, जिंजर चार औंस आणि पाणी चार औंस मिळवून डोस द्यावा व स्टिम्युलेटिंग पिचकारी मारावी. पिचकारी मारण्याची कृति पूर्वींच सांगितली आहे त्याप्रमाणें मारावी, ह्मणजे पोटांतील विकृति दूर होईल. नंतर जुलाब द्यावा आणि खाणें कमी करावें. सदरीं लिहिलेले उपचार एकदम करूं नयेत:—एक दवा दिल्यावर चारसहा तासांत फरक न दिसेल तर दुसरा उपाय करावा.

---

## अक्सिस ऑफ थि ब्रेन.

हा रोग डोक्यावर कांहीं दुखापत झाल्यानें होतो. त्या योगानें आंतील मेंदूस क्षत पडतें.

**लक्षण.**—सुस्तता येते, दाणा वैरण खात नाहीं व डोक्यावरील बाहेरच्या दुखापतीचा स्राव होतो तेणेंकरून तो मरेपर्यंत आपलें डोकें जमिनीवर आपटतो.

**इलाज.**—या रोगावर इलाज चालत नाहीं असा हा एक असाध्य रोग आहे !

---

## स्लीपी.

हा रोग मस्तकांत मेंदूंतील रक्त फार मंद वहात असल्यानें

होतो,' किंवा रक्त न्मसल्यानें होतो. यास कंजंक्शन आफ् ब्रेन ह्मणतात.

**लक्षण.**—झोंप आल्यासारखें करतो, कान व शेंपूट ताठतें, डोकें टांगल्याप्रमाणें होतें, डोळे मिटतो, श्वास कष्टानें टाकतो, नाडी मंद वाहते, त्वचा गार होते, नाकपुड्यांचे पडदे फिकट होतात व तोंडास चिकटा असतो.

**इलाज.**—कोणतेही तेलाचा साधारण एक डोस द्यावा, ह्मणजे एक पिंट (आच्छेर) तेल पाजावें. आळेज तेल देण्यास सर्वांत उत्तम आहे. सहा तासांत कांहीं फरक न वाटल्यास दुसरा डोस त्या तेलाचा करून क्रोटन तेलाचे वीस थेंब घालून द्यावें. ह्यापासून फरक नाहीं झाला तर सहा तासांनीं क्रोटनचे तीस थेंब घालून द्यावें. या रोगापासून म्याडस्ट्यागर रोग होतो आणि त्या रोगाप्रमाणें त्याचीं चिन्हें होतात तेव्हां म्याडस्ट्यागर याजवर सांगितलेलें औषध द्यावें.

## म्याडस्ट्यागर (ह्मणजे उन्माद).

हा रोग मेंदूस सूज आल्यानें होतो.

**लक्षण**—घोडा भानरहित असतो, भित्रपणा राहत नाहीं, कितीही प्राणांतिक अवस्था आली तरी सोसतो, बेशुद्ध (बेफाम) होतो—ज्युगलव्हेन ( मानेच्या शिरा ) ताठतात आणि लीद, व लघवी थोडी होते.

**इलाज**—मानेच्या शिरांचें रक्त तो अगदीं मलूल होईपर्यंत काढावें. नंतर ती जखम तत्काळ शिवून टाकावी. प्रमाणापेक्षां दुपटीच्या मानानें जुलाब द्यावा. तीन तासांत जुलाब न आल्यास पुन्हां जुलाब द्यावा, किंवा फिरून रक्त काढावेसें वाटल्यास काढावें. तंबाखू एक स्क्रूपल, अर्ध ड्राम अकोनाइडच्या मुळ्याचा रस किंवा डिगीटॅलिस एक ड्राम, इतक्यांचा काढा करून निवळून गाळून

त्याचा डोस द्यावा. यांपैकीं जें औषध लौकर होईल तें द्यावें. कांहींच न मिळाल्यास फार कढत पाणी एक बाटलीभर द्यावें, आणि ह्यापासून जर तो शांतसा वाटेल तर चांगला शांत होईपर्यंत प्रत्येक अर्ध तासानें फार कढत पाणी सदहूप्रमाणें द्यावें. जुलाब न होईल तर जुलाबाचे औषधाची पिचकारी मारावी व मस्तकावर प्ल्यास्तर मारावें.

फ्रिनिटिस याजवर ( मेंदूस सूज येऊन जो रोग होतो त्यावर) जो उपाय सांगितला आहे तो यावरही लागू आहे.

---

## मिग्रिम (मिर्गी.)

हा रोग मेंदु थोडा गोंठला ह्मणजे अति उष्णतेपासून उन्हाळ्यांत होतो अथवा मानेच्या शिरांस गळेबंदाचा दाब लागून अथवा लगाम फार तंग धरल्यानें एकाएकीं घोडा थांमजतो आणि डोकें हालवितो; त्यावेळेस लगामास त्रास देतो असें वाटतें. इतक्यांत घोडा फिरतो किंवा पडतो, पांच मिनिटांनीं पुन्हां उठतो आणि चालू लागला तर घाम येतो. या रोगानें घोडा क्वचित् मरतो. विकृति होतांच लागलेंच रक्त काढलें पाहिजे, जुलाब देऊन कांहीं दिवस विश्रांति द्यावी आणि त्याजकडून मेहनत फार घेऊं नये.

---

## हैड्रोफोबिया (जलद्वेषरोग).

पिसाळलेलीं कुत्रीं, कोल्हीं, किंवा मांजरें घोड्यास चावलीं असतां मस्तकांतील मेंदूस विकार होतो आणि मग घोडीं वेडीं होतात. त्यांच्या क्षुधेंत फरक पडतो, त्यांस तहान फार लागते, जवळ कोणी आल्यास चावण्यास धावतात आणि कोणी त्यांच्या आटोक्यांत आला ह्मणजे त्याचे तुकडे तुकडे करितात. तींच कुत्रीं, मांजरें, किंवा

कोल्हीं, हीं पुष्कळांना चावून जर घोड्यांस चावलीं असतील तर त्यांचें विष कमी चढतें, व ज्या ठिकाणीं चावतें त्या ठिकाणीं नेहमीं स्राव होत असतो.

**इलाज**—यावर कांहीं उपचार चालत नाहीं. घोडा कोंडून ठेवावा. त्याजवळ कोणी जाऊं नये. अशा वेळीं घोड्यास गोळी घालून मारून टाकावें हें चांगलें. पिसाळलेलीं कुत्रीं चावल्यापासून लवकर ह्मणजे निदान पंधरा दिवसांनीं विषाचा अम्मल चढतो.

केव्हां केव्हां तर सहा महिने किंवा बारा महिनेपर्यंत केव्हां अम्मल चढेल याचा नेम नसतो!

---

## पिसाळलेलीं कुत्रीं चावलीं तर त्यावर उपाय.

कारळें, कडू वृंदावन, गजनाकोई, कुटकी, पाषाणभेद, नागशेराचा गोंद, कांदा व मिरची हीं एक सारखीं बरोबर घेऊन त्यांमध्यें गुलाबपाणी ४ चार टांक घालून तें घोड्यास पाजावें.

**दुसरें**—बोळ, गोंदबारखी, गोंदतरसीत, तून व डाळिंबाचीं मुळें हीं सर्व कुटून तें मिश्रण शिरक्यांत पाजावें, व चावलेल्या ठिकाणीं लावावें.

पिसाळलेलीं कुत्रीं किंवा मांजरें चावलीं तर सदरप्रमाणें भावना होते.

## चांदणी.

**लक्षण.**—चांदणी आली ह्मणजे घोड्याची मान आंखडते, मान वर करीत नाहीं, डोळे फिरवतो, वरच पहातो आणि दाणा खात नाहीं. पाटीवर जखम होऊन किंवा अंगाची कातडी निघून अगर हवेनें चांदणी होते. त्याचप्रमाणें मानेवर फोड आल्यानेही हा रोग होतो या चांदणीच्या संबंधानें मुखावरही फोड होतात. शिवाय ना-

लबंदी नीट झाली नाहीं तर हे चांदणीचे फोड येतात व तेणेंकरून घोडा दुबळा होऊन त्यास ताप येतो.

**उपचार.**—ताप आल्यावर अगोदर अंगावर कांबळी घालावी. खाण्यास गवत द्यावें. हबूल बकर (तान्ह्या वासराचें शेण) व हळद तीन दिवस द्यावी. तेणेंकरून मानेचा ताठा जाईल. तिळाचें तेल, एरंडाचीं पानें व गाईचें शेण गरम करून, गेरू, सुंठ, हळद, अंबर, आंबेहळद, पिंपळी आणि तीळ तीन टांक घेऊन बारिक करून, गोड दारूंत मिळवून तें मिश्रण पाजावें. दारू न मिळेल तर तें मिश्रण एकशेर साखरेंत द्यावें.

चांदणीचे चार प्रकार आहेत:—पहिला प्रकार **कैसर चांदणी**, दुसरा प्रकार **धनुर्वायु**, तिसरा प्रकार **गत** आणि चौथा प्रकार **हिरण्वायु**.

हा रोग घोड्याचे पुढील अंगानें व मागील अंगानें होतो आणि कित्येक घोड्यांस शेपटी जवळ होतो.

**चांदणीचीं आणखी लक्षणें.**—दोन कान उभे राहतात, लगाम दिल्यावर पाय आंखडून घेतो, दम टाकतो, दाढा बंद होतात आणि दांतखिळी बसते.

**दुसऱ्या प्रकारचीं लक्षणें.**—जमिनीवर पडतो. दाणा खात नाहीं. अशा लक्षणांवर जो दवा द्यावयाचा तो साखरेंत दिल्यानें अवगुण होईल. यास्तव तिळाचे तेलांत व पाण्यांत दवा द्यावा. थंडकाळांत साखरेंत द्यावा. व पावसाळ्यांत पाण्यांत द्यावा.

**दवा.**—काळे दाणे, कलोंजी, संभाळूचीं (निरगुडीचीं पानें, बोळ, पिंपळमूळ, कोहळा, पिंपळी व केळीं, हीं एरंडाचे तेलांत द्यावीं. समुद्रफळ बारिक करून घोड्याचे डोळ्यांत घालावें ह्मणजे अंजन करावें. डुकराचें रक्त पिंपळीं बरोबर द्यावें आणि दिवसांनंतर रक्त काढावें. ह्मणजे शिरा नरम होतील. वीस रोज झाल्यावर छातीचें रक्त काढावें.

पांढरे जिरे, धने, गुळवेल, काळाबोळ. अवळकंटी, जायपत्री, ज्येष्ठमध,

आणि पळसाचें फूल हीं बारिक करून द्यावीं. हीं सर्व औषधें जर न मिळतील तर अवळकंठी, बोरीच्या बियांचा मगज आणि जायपत्री द्यावी. याशिवाय आणखी उपाय आहेत ते:—

१. चांदणी होईल तेव्हां बकरी कापून तिचें रक्त कच्चें सात शेर द्यावें.

१. घोड्यास जमीनीवर पाडावें, पुढील पायांचे सुंभे छेदाव व त्यांतून ह्मणजे सुंभांच्या शिरांतून रक्त काढावें. रक्त काढल्यावर त्या सुंभांचे शिरांच्या रगावर डाग द्यावा आणि त्याजवर औषध लावावें.

**दवा.**—हरताळ तीन टांक, निलातोता (जंगला) तीन टांक, गाळ तीन टांक व मनशीळ तीन टांक हीं सर्व एकत्र करून बारीक करावीं आणि ती पूड सुंभावर चोळून कपड्यानें सुंभ बांधावें. याप्रमाणें सात दिवस करावें.

१. घोडा चांदणी झाल्यावर शेंपूट फार हाल्वीत असतो. सर्व शरीर आंखडतें. असें हवेचे योगानें होतें. पहिल्यानें पुढील भाग व मागाहून मागील भाग आंखडतो.

**उपचार.**—औरतेचे (बायकांचे) विटाळाचा कपडा घेऊन तो जाळावा व एक बिरघुटी, व एक काळा दाणा (कलोंज), मिरे, व थोडें अलें हीं सर्व लिंबाचे रसांत खलावीं व त्यांचे अंजन घोड्याचे डोळ्यात तीन वेळ घालावें.

१. चांदणी झाल्यावर चांगला निर्मळ मद्य एक पैसाभार ऊन करावा व शेपटीसुद्धां पाल घेऊन मारून त्या मद्यांत मिळवून घोड्यास चारावी. तीन दिवसपर्यंत रोज एक याप्रमाणें पाल खाऊं घालावी. पालीची नखें मात्र काढून नंतर पाल चारावी.

२. चांदणी झाल्यावर चोपड करावें तें:—तांब्याचे परातींत मीठ बारीक करावें व तें मीठ बकरीचे रक्तांत मिळवावें. आणि तें गरम करून सर्व अंगास चोपडावें. तें इतकें चोळावें कीं, एक कम-

मुद्धां चोपडल्याशिवाय राहूं देऊं नये. याशिवाय घोड्याला मसाला द्यावा तोः—लवंग अर्धा तोळा, बिरघुटी चार पांच दाणे, कायफळ एक तोळा, पिंपळी एक तोळा, पिंपळमूळ एक तोळा, कुटकी एक तोळा, काळीं मिरें एक तोळा, सुंठ एक तोळा आणि भाजलेली सोहागी सहा मासे हीं सर्व बारीक करून तें मिश्रण अदपाव मधांत मिळवून एकदमच द्यावें. त्याचप्रमाणें एक वेळ घोड्याचे कानांत एक तोळा पारा घालावा. त्यावर कापूस लावावा. एक कावळा मारून त्याचे दोन तुकडे करावे, आणि घोड्याचे दोन्ही डोळ्यांवर तीन दिवस बांधून ठेवावे. कावळा न मिळेल तर काळी कोंबडी कांपून डोळ्यांवर बांधावी, व घोड्यास अंधारांत बांधावें. सदर्हू गोष्टीनें बरें न झालें तर बत्तिसा डाग द्यावा. याशिवाय त्याचे डोळ्यांत घालण्याकरितां अंजन करावें तेंः—काळीं मिरें एक व लवंग एक कावळ्याचे किंवा कोंबडीचे रक्तांत घांसून अंजन करावें.

दुसरें अंजन—मोटा जंगली सरडा घेऊन त्याचा गळा कांपून रक्त काढावें व त्यांत काळीं मिरें उगाळून अंजन करावें. याप्रमाणें तीन दिवस करावें. बाकी राहिलेला सरडा बारीक करून तो त्या घोड्याला तीन दिवसपर्यंत खाण्यास द्यावा.

१. चांदणी झाली असतां सर्व शरीर आंखडतें, शरीर गार पडतें, खाण्याची इच्छा नसतें, मूत्र बंद होतें, आणि घोडा वाळत जातो. अशा लक्षणांवर उपायः—

उपाय—तेल लावून मालिस करावें. गरम पाणी घेऊन तें थंड करावें. त्या पाण्यांत एक शेर तिळाचें तेल व चार शेर जवखार घालून तें पाणी घोड्याचे अंगास चोळावें. नंतर खावयास देण्याचे जिन्नस तेः—हिंग, जवखार, पिंपळीं व सुंठ हीं दरएक चारचार टांक घेऊन बारीक वस्त्रगाळ करावीं. आणि ती पूड एक शेर गोड दारूंत घालून सकाळीं घोड्यास पाजावी.

दुसरा प्रकारः— तिळाचें तेल चार शेर, गाईचें तूप नऊ टांक व बकऱ्याची चरबी चार शेर, हें सर्व कढवून घोड्याचे नाकांत दररोज चार शेर घालावें, आणि एक शेर चरबी घोड्याचे अंगास चोळावी. हुकना ह्मणजे, बारिक कांठी घेऊन त्यास चिंध्या लपेटून सदरचे द्रव्यांत ती भिजवून घोड्याचे गुदद्वारांत घालून काढावी.

खाण्यास देण्याचे जिन्नसः—दगडी मीठ सहा टांक, नऊ टांक मिरच्या, चार शेर तेल व एक शेर बकरीचें रक्त हीं मिळवून घोड्यास चारावीं. शिरावर किंवा डोळ्यावर किंवा छातीवर अथवा दोन्ही पायांवर फोड आले तर ते फोड चिरावे, आणि बरे न होतील तर डाग द्यावे.

खाण्यास देणें तें:—राई चार तोळे, गुग्गूळ चार तोळे, व लसूण चार तोळे, हीं सर्व बारिक करून दारूंत बायकांचे विटाळाची फडकीं धुऊन तें सकाळ संध्याकाळ याप्रमाणें सात दिवसपर्यंत घोड्यास खावयास द्यावें.

संख्या सोमल एक तोळा व शिंगरूफ एक तोळा हे दोन जिनस अल्याचे दोन शेर रसांत मिळवून पांच रोजपर्यंत हालवीत जावे. नंतर त्यांच्या हरभऱ्यायेवढ्या गोळ्या कराव्या. एक गोळी पावशेर दारूंत द्यावी. हें अनुभवशीर आहे.

---

## अर्धांगवायु.

१. मान वांकडी होते त्यास लखवा किंवा अर्धांगवायु ह्मणतात; त्यावर इलाजः—लहान शेवरीचें बीं बारिक करून त्याचा रस घोड्याचे नाकांत घालावा.

उपायः—पांढरे मोहरीचें तेल, लसूण तेल, जुने तेल, मीठ, जिरे, साखर व दैलम हीं एकत्र करून जखमेवर लावून ती जखम बकरीच्या कातड्यानें बांधून टाकावी.

२ रा. नाकांत गुलाबाचें व शेवतीचें तेल एकत्र करून घालावें. हीं तेलें न मिळतील तर मुरेबुखें दारूंत मिळवून तें नाकांत फुंकावें.

३ रा. गाईची चर्बी सर्वांगास लावावी. बतम तेल ( बुंदांचें तेल) यास इंग्रजींत काफी ह्मणतात, हें दारूंत गरम करून सर्व अंगास मर्दावें.

४ था. बतम तेल दोन्ही नाकांत फुंकावें. अखम सुकली नाहीं तर दोन्ही कानांचे मागें डाग द्यावे. गरम वस्तु खाण्यास द्याव्या.

५ वा. घोड्यास शेणांत ( शेणखळींत ) नाक, तोंड, अयाळ, शेंपूट, हें अवयव खेरीजकरून सर्व गाडावा आणि याप्रमाणें सात दिवस ठेवावें.

६. डुकराची चर्बी, मुरूचे झाडाचा गोंद, बतम झाडाचा गोंद, लसूण व मीठ हे सर्व पदार्थ बरोबर घेऊन बारीक करून तेलांत मिळवून सर्व अंगास मर्दावे.

७. मिरच्या, बुरेसमा व हिंग हे बरोबर घेऊन बारिक करून दारूंत मिळवून नाकांत घालावे.

८. मेथी व कलोंजी नऊ टांक बारीक कुटून तिळाचे पावशेर तेलांत मिळवून रात्रीं खाण्यास द्यावें. मानेच्या शिरांचे रक्त काढावें. बरें न झाल्यास बत्तिसा डाग द्यावा.

९. भारंगी, इंद्रजव, कोहळा, असकंद, नागोरिअजवान, वावडिंग, बच ( वेखंड ), पिंपळमूळ, पिंपळी, सुंठ, चित्रक, दारू, हळद, देवदार, चोपडा, रसशेंदूर, आवळा, सारगंधक, सोनामुखी, काळाबोळ, अजमोदा, कलोंजी ( काळे दाणे ), काचकुइरी, काकडशिंगी, शेवग्याची साल, निरगुडीचें बीं, ओंवा, काळे जिरे, रूमीमस्तकी, आहळीव, कबाबचिनी व भिलावे हीं सर्व बारिक करून तें चूर्ण समभाग घ्यावें व एरंडीचे तेलांत घालून तीन किंवा सात दिवसपर्यंत रोज पावशेर प्रमाणें द्यावें. दाणा उकडून द्यावा.

१७. हिर्डा, बेहडा, अवळकंठी, चुवानिकचरी, मिरे, पिंपळी, हिंग, कडूवृंदावन, वेखंड, पाषाणभेद, सोरमीठ, पिंपळमूळ, कोरफड, मुसःबारबोळ, हळद, अलें, लसूण, लिंबें व मोहऱ्या. हे सर्व जिन्नस एकत्र करून कांडावे व दह्यांत कालवावे. परंतु त्यांत मीठ, लिंबें व अलें हे जिन्नस फार घालावे. हें औषध फार उपयोगी पडेल.

**अर्धांगवायु**—यास इंग्रजींत 'प्यारालिसिस' असें ह्मणतात. हा रोग, फार आयासयुक्त काम करण्यापासून किंवा मेंदूवर भार पडल्यापासून पाठीचे कण्यास दुखापत होऊन अथवा विशेष सर्द हवेपासून होत असतो.

**लक्षणें**—पाय कांपतात व जमिनीवर पडूं पाहतो; उभा राहूं शकत नाहीं; आणि कमरेंत व पायांत जीव नसतो.

**उपचार**—अर्धाग्रेन ट्रिक्निया, ऐवोडाईड ऐरन एक ग्रेन, क्कासापौडर व काकवी गोळी होण्यापुरती, हीं मिश्र करून त्याच्या गोळ्या कराव्या. आणि सकाळीं एक व संध्याकाळीं एक याप्रमाणें गोळी द्यावी. उष्ण कपडे अंगावर घालावे, व घोड्याची चाकरी त्याचे अंगांत गरमी येईपर्यंत करावी.

---

## झुला होतो त्यास उपाय.

घोडा वरून पडला किंवा पाय सरळा किंवा हवेच्या योगानें, या तिन्ही कारणांमुळें अशा घोड्याची कंबर तुटते ह्मणजे लब खाते व मानेच्या शिरा तुटतात, व जमिनीवरून उठतां येत नाहीं. यास हिंदवींत 'कमरी' ह्मणतात. या रोगापासून घोडा फारकरून मरतो.

यावर उपाय—लांकडांनीं कमर व मान बांधावी. आणि त्या ठिकाणीं गाईचे तुपांत गुग्गुळ मिळवून अंगास चोळावा.

दुसरा उपाय—सोनिबहुळ सुकवून बारिक करावी. बेलाचे झाडाची साल एक पावशेर साखरेंत द्यावी. घोड्याची कंबर बरी हो-

ईल. कोल्हा कांपून त्याचें कातडें काढावें. नंतर त्याचें मांस व हाडें हीं ठेवून वाळवावीं. नंतर कुटून त्याचे सात भाग करून साखरेंत सात दिवस द्यावे. डुकराची चर्बी घेऊन ऊन करून थंड करावी व एक तास प्रमाणें दर्दावर दहा पंधरा दिवस चोळावी. परंतु लांकडांनीं बांधलेलें कायम ठेवावें. व रोज कोंबडीच्या वीस अंड्यांतील पिंवळा मगज व हालूंज यांचें बीज कुटून पिठासारखें करून पांवशेर प्रमाणें त्यांत घालून चाळीस दिवस द्यावें. याचा अनुभव आहे.

भिलावे पावशेर, तेलीया सुवागी आतपाव, साबण पावशेर, सज्जीखार आतपाव, अंबेहळद पावशेर, गेरू अर्धापाव, काळ्या मिरच्या आतपाव, हालूंज अतपाव, गुग्गूळ अतपाव, लवंग एक तोळा, अफू एक तोळा, सज्जीखार एक तोळा, फटकी आतपाव, रूईचे झाडाचीं पानें पिकलेलीं व किड्यानें न खाल्लेलीं एक तोळा घेऊन तीं सर्व कुटून तीन गोळे करावे. सकाळीं व संध्याकाळीं दाण्याचे पूर्वी एक गोळी द्यावी. अनुभवशीर आहे.

अंबेहळद एक पैसाभार, मैदालकडी एक पैसाभार, कायफळ एक पैसाभार, तिळाचें तेल कढविलेलें चार पैसेभार व त्याचप्रमाणें एरंडीचें तेल व तूप चार पैसेभार हीं सर्व बारीक करून तुपांत तेल मिळवावें व तें कमरेवर चोपडीत जावें.

**शूलाविषयीं २ रा प्रकार.**—जंगली कबूतर आणून कांपावें. त्याचे पंख उपटून शिजवावें. तें इतकें कीं, मांस व हडूक निराळें होईल. त्यांत तूप अतपाव घालावें व गरम मसाला घालून शिजवावें. नंतर त्याचा अर्क नळीनें घोड्यास पाजावा. ह्याप्रमाणें तीन चार रोज किंवा एक आठवड्यापर्यंत दररोज एक कबूतर द्यावें.

१. हवेपासून शूल होतो त्यास इलाजः—राळ तोळे २, गुग्गूळ तोळे २, पारा तोळा एक, आणि मध तोळा १. राळ बारीक करून नंतर गुग्गूळ घेऊन तो बारीक करावा; त्यानंतर पारा घालावा. पुढें मध

थोडा थोडा टाकावा, आणि सर्वांचा खल दोन घटकांपर्यंत करावा. हरभऱ्याएवढ्या सात गोळ्या कराव्या. बाजरीचे पिठांत रात्रीस दररोज एक गोळीप्रमाणें सात रोज द्याव्या.

मनुष्यास झुला किंवा बायकोची गैरमी लागते, त्याजवर ह्याच औषधाची मुगाइतकी गोळी करून लोणी किंवा तुपांत द्यावी.

कोल्ह्याचें कातडें काढून त्याचे पोटांतील मैला काढून टाकून मांस मात्र घ्यावें. उडीद एक शेर, आंबेहळद पावशेर व तूप एक शेर हीं तिन्हीं मांसांत घालून शिजवावें; नंतर हाडें काढून टाकावीं, व तें घोड्यास दररोज अर्धशेरप्रमाणें सात किंवा आठ दिवसपर्यंत देत जावें.

२. अस्कंद व नागोरी दोन दोन शेर, साखर दोन शेर, तूप अर्ध शेर, व गव्हांचा मैदा दोन शेर, हीं सर्व एके ठिकाणीं करून शिजवावीं. हें मिश्रण दररोज घोड्यास सकाळीं व संध्याकाळीं एक शेरप्रमाणें सहा दिवस द्यावें. व तें अर्धा शेर मधांत मिळवून द्यावें. अर्धा शेर मधांत वीस शेर पाणी एकत्र करून घोड्यास पिण्यास द्यावें. सहा दिवसपर्यंत देणें; परंतु ती मुदतपर्यंत दुसरें पाणी पिण्यास देऊं नये.

३. सज्जीखार दररोज तीन तोळे बारीक करून गाईचे तुपांत गोळी होईपर्यंत तूप घालून सात दिवस द्यावा. घोड्याचे कमरेवर सकाळीं ऊन पाणी घालावें. गरमीचे दिवस असल्यास एक वेळ घालावें व सर्दीचे दिवसांत दोन वेळ घालीत जावें.

---

## झणक वायु.

**स्ट्रिंग हाल्ट**—हा रोग बहुतकरून एकाच पायास होतो व एखादेवेळेस दोन्हीं पायास होतो. हा रोग वाढत जातो, व चालू लागल्यावर पायांत झणक किंवा शिणिक मारते.

---

## शिरोरोग.

. हा रोग झाला असतां मस्तक सुजतें, व घोडा मान खालीं घालतो, त्यास उपाय—बोराची साल, पळसाची साल, आंकोल्याची साल, व येरंडमूळ हीं सर्व पाण्यांत वाटून त्यांचा कल्क करावा. अगोदर घोड्याचें मस्तक तेलतुपानें मर्दावें. नंतर तो कल्क घेऊन त्याचा मस्तकावर लेप करावा, व विटेनें शेकावें. मग गूळ नऊ टांक, टांकळी ९ टांक, आणि वांवडिंग ९ टांक, हीं समभाग ४ दिवस देणें ह्मणजे बरें होईल.

**शिरःशोष**—टाळू शोषतें, ओंठ शोषतात, ह्मणे वाळतात आणि उकलतात. त्यास उपचार—सुंठ, जिरे, मिरे पिंपळी, कोथिंबीर, हिरडा, बेहडा व आवळकठी, हीं प्रत्येकीं तीन टांक घेऊन त्याचें चूर्ण करून हें चूर्ण मधांत कालवून सात दिवस द्यावें. आणि दररोज अश्वगंध, वावडिंग, ओंवा व जिरे हीं प्रत्येक पांच टांक घेऊन पाण्यांत वाटून त्याचा लेप डोक्यावर करावा. असें एक सप्तक करावें.

---

## नेत्ररोग.

**सिंपल अप्थाल्मिया**—हा रोग घोड्याच्या डोकीवर मारल्यानें किंवा केरकचरा वगैरे बारीक पदार्थ डोळ्यांत गेल्यानें किंवा घोड्याघोड्यांनीं मस्ती करून लाथा मारल्यापासून किंवा चावल्यापासून क्षत पडून होतो.

**लक्षणें**—हा रोग झाला असतां डोळ्यांतून नेहमीं पाणी गळतें. पापण्या मिटतात व बुबुळावर पांडुरकी येते.

**इलाज**—डोळ्यांत कांहीं गेलें असल्यास तें काढण्याचा इलाज करावा व डोळ्यावर वस्त्र बांधावें. पण तें वस्त्र अफूच्या बोंडाचा काढा करून त्यांत टिंक्चर ऑफ आरनिका थोडीशी मिळवून डोळ्याच्या जागे पुरतें भिजवावें. जर डोळ्यावर थोडी सूज जास्त अ-

सेल तर डोळे उघडून क्लोराईड आफ् झिंक याणें डोळे धुवावे; सूज जास्त होत असल्यास डोळ्याचें रक्त काढण्याच्या शस्त्रानें डोळ्याच्या शिरांचें रक्त काढावें व तें रक्त गळूं लागलें असतां जमिनीवर घोड्यास आवडता दाणा खावयास ठेवावा. ह्मणजे रक्त डोळ्यांत न जातां खालीं पडेल. याप्रमाणें डोळे बरे होई तोंपर्यंत करावें. परंतु रक्त मात्र एकदांच काढावें.

---

**स्पेसिफिक आफ् तालमा.** (वायूपासून डोळ्यास विकार होतो तो).

हा डोळ्याचा रोग, तबेल्यांत घाणेरडा पदार्थ सांचला असून त्याची वाफ निघून हवेनें जर डोळ्यांत गेली तर त्यापासून होतो.

**लक्षणें.**—डोळ्याच्या पापण्या सुजतात व डोळ्यांतून पाणी गळतें, नाडी कठीण चालते, श्वासोछ्वास जलद चालतो, तोंडास चिकटाई येते, नाकाचे पडदे सुजतात, किंवा फिकट रंगाचे होतात, डोळ्याची पापणी सावलींत मात्र उघडते, आणि डोळ्याच्या बुबुळाजवळील भाग लाल होतो. ऐरिश (बुबुळाच्या आंतील भाग) नेहमीं पेक्षां हलका होतो. हा रोग एका डोळ्यास आला ह्मणजे दुसऱ्यासही होण्यास अवधि नसतो. एक वेळ हा रोग झाला ह्मणजे पुन्हां होत नाहीं असें नाहीं. तरहा पुन. पुनः होतो. याचा अखेरीस परिणाम डोळा जातो. कधीं कधीं दोन्हीही जातात किंवा एक बरा होऊन एक जातो.

**उपाय.**—वाईट तबेल्यांतून घोड्यास काढावा, सावलींत बांधावा, डोळ्याच्या शिरांचें रक्त काढावें, व त्याच शस्त्रांनीं पापण्यांचेंही रक्त काढावें. रक्त काढण्याची जरूर नसेल तर काढूं नये.. दोन्ही डोळ्यांवर थंड पाण्याची घडी घालावी. जर घोडा अशक्त असेल तर त्यास खाण्यास पुष्कळ घालावें, आणि घोडा तयार असेल तर कोंडा-चें खाणें खाऊं घालावें; जास्त घालूं नये व ज्या खाण्यास फार चर्वण लागणार नाहीं असें घालावें.

**दुसरा उपाय**—दररोज सकाळ संध्याकाळीं औषध द्यावयाचें तें पाउडर्ड कोलचिकम दोन ड्राम, आयो डाईड ऑफ ऐरन एक ड्राम, क्यालोमेल एक स्क्रूपल आणि एक्स्ट्रयाक्ट ऑफ जंटीयन, हीं एकत्र करून लवकर त्यांचा गोळा करावा. आणि तो वर लिहिल्याप्रमाणें दिवसांतून दोन वेळ द्यावा. ह्या गोळ्यांनीं जर कांहीं गुण न येईल तर बदल करावा. किंबा अवगुण होईल तर बदल करावा, आणि त्याच्या ऐवजीं लिकर आरसीनेकीलीज तीन औंस, म्यूरीइटेट आणि टिंक्चर आफ् ऐरन पांच औंस, हें औषध द्यावें. तें अर्ध्या औंस पाण्यांत मिश्रण करून दोन वेळ द्यावें. व घोडा तबेल्यांत येण्यापूर्वी तबेला स्वच्छ ठेवावा.

---

## क्याटेऱ्याक्ट. (डोळ्यांतील फूल किंवा मोतीबिंदु).

पांढऱ्या भिंतीकडे नेहमीं पाहण्यानें किंवा डोळ्याच्या आंत इजा झाल्यानें किंवा स्पेशिफिक ऑफ तालमा यापासूनही डोळ्यांत फूल पडतें.

**लक्षणें**.—हें फूल केव्हां केव्हां कमी असतें किंवा उगीच त्याची झळक असते. जर अगदींच पूर्ण फूल पडलें तर बुबुळ पांढरें राहून डोळे आंधळे होतात.

**इलाज**.—तबेल्याच्या भिंती हिरव्या रंगांनीं सारवाव्या, कारनीयावर जर थोडकें फूल पडलें आहे तर आपोआप जाईल, नाहीं तर त्यास दुसरा इलाज चालत नाहीं.

---

## फंगॉइड.

हा रोग कशापासून होतो याचें कारण समजत नाहीं.

**लक्षणें**—डोळे आंधळे होतात, व कांहीं पिवळा पदार्थ डोळ्यांत आहे असें दिसतें, आणि डोळ्यांतून रक्त किंवा वाईट पदार्थ पडत असतो. हा असाध्य रोग आहे.

## अमरोशिस (मोतीबिंदु).

हा होण्याचें कारण, अर्धांगवायु झाल्यानें किंवा खच्चीकेल्यानें डोळे आंधळे होतात.

**लक्षणें.**—हा रोग झाला ह्मणजे घोडा साफ न चालतां फार जपून चालतो व चमकतो; डोळे अगदींच आंधळे होताव असें नाहीं व यामुळें चांचपटल्यासारखा चालतो.

याजवरहीं कांहीं उपाय चालत नाहीं.

---

## इंपिडिमेंट (डोळ्यांतील पाणी नाकांतून येण्याचा रस्ता बंद होतो तो रोग).

**लक्षण.**—नाकांतून पाणी येण्याचें तें डोळ्यांतून येऊं लागतें. व पापण्यांचे पडदे सुजतात.

**इलाज.**—नाकाच्या नळीपर्यंत पाण्याचा प्रवाह जोरानें करावा, ह्मणजे डोळ्याचे कण्यापाशीं नाकांत पाणी जाण्याचा जो रस्ता आहे तो खुला करावा आणि त्यांतून मेण लावलेली दोरी घालून नाकाच्या नळींतून आरपार काढावी. आणि मग पाणी ओतावें. ह्मणजे नाकाच्या नळीचा रस्ता कांहीं गेल्यानें बंद झाला असल्यास खुला होतो, आणि मग डोळे बरे होतात.

---

## डोळ्यांतील दर्द.

डोळ्यांतून पिंवळें पाणी निघतें त्याजवर उपचारः—

१. सोन्याचा व रुप्याचा गू, इंद्रनीळ, पांढऱ्यामिरच्या, माणिक, इंद्रायणी मीठ आणि गारेचा दगड हीं बारीक करून त्याचें अंजन करून लावावें.

२. पिंवळें निळें पाणी डोळ्यांतून जाऊन कमी दिसतें. याजवर उपचार.—काळाबोळ नऊ मासे, येलवा, केशर नऊ मासे, कोरफड,

कापूर आणि जवाचे दाणे एक टांक, हे सर्व पदार्थ बारिक करून अंजन करावें. व तें मधांत कालवून डोळ्यास लावावें. डोळ्याजवळचें रक्त काढलें तर चांगलें आहे. टाळूवर थंड पदार्थ बांधावा.

३. सर्दी किंवा गर्मी आली तर डोळ्यांनीं दिसत नाहीं याजवर– डोळ्याच्या शिरा नाकाखालीं येतात, त्यांचें रक्त काढावें. कोंबडीचे अंड्यांतील पांढरें बलक घ्यावें, सुगंधिक फुलाचें तेल व जवसाचें पीठ सारखें घेऊन, डोळ्यांत घालावें.

४. डोळ्यातून निळें पाणी जातें त्याजवर–कोंबडीचें अंड्यांतलि पांढरें बलक केशर व बत्तासे हे प्रत्येक बरोबर घेऊन अंजन करावें, व कोंबडीचे पिसानें लावावें.

५. डोळ्यांतून पांढरें पाणी निघतें त्यास मोतियाबिंदु ह्मणतात. ह्मणजे डोळ्यांतली बाहुली काळी पांढरी होते. अशा वेळीं त्यावर उपचारः शस्त्रांनीं डोळ्याचा पडदा काढावा, आणि नीळकांत कोंबडीच्या अंड्यांतलि पांढऱ्या बलकांत घोंटून डोळ्यांत घालावा.

६. काचबिंदु याजवर उपचार.—डोळ्यांतील बाहुली निळी होते. त्यांतून काळे पाणी जातें. डोळे लाल होतात. अशा स्थितींत वेताचीं पानें घेऊन सावलींत सुकवून बारिक करावीं. व साबणानें धुऊन पुन्हां सुकवावीं आणि नंतर डोळ्याचे आंखांत घालावीं.

७. कोंबडीचे अंड्यांतील पिंवळा बील, जिरे, व फुलाचें तेल यांचें अंजन करून डोळ्यांत घालावें.

८. डोळे काळे होतील, त्यांतून पाणी येईल, व लाल दिसतील, तेव्हां त्यास मुंज्या ह्मणतात. त्याजवर उपचार—बाभळींचा गोंद, केशर, हिंगुळ व फटकी वस्त्रगाळ करून; दररोज चार जवा येवढें हें औषध डोळ्यांत घालावें.

९. डोळ्यांतील बाहुलीचा रंग निळा होतो, नंतर डोळे लाल होतात, डोळ्यांतून कांहीं वेळ पिंवळें पाणी निघतें, कहीं वेळ निळें

पाणी निघतें व डोळे हागतात. त्याजवर उपचारः—तांदूळ शिजवून त्यांत कच्ची फटकी मिळवून घोड्याचे डोळ्यावर कांहीं वेळ ठेवून लेप करावा. नंतर त्यावर साखर लावावी, व घोड्याजवळ मनुष्य बसवावा. घोड्यास हालूं देऊं नये, व तीन दिवसपर्यंत घोड्याचे कानावर पट्टी तशीच ठेवून नंतर काढावी.

१०. सिरसाचे झाडाच्या चार बिया, गुंजा पांढऱ्या ४, हत्तीची नखी, लवंगा ४, हे सर्व पदार्थ लिंबाचे रसांत उगाळून, कुंकूं ४ मासे व फटकी भाजलेली १ मासा घेऊन त्यांत मिश्रण करून लेप घालावा, व एक दिवस तो लेप तसाच ठेवावा. नंतर कोंबडीचे परानें डोळ्यांत घालावा. दिवसांतून तीन वेळ हें औषध द्यावें व दररोज नवें औषध करीत जावें. पांच दिवस असें करावें.

११. हिंगणाची मुळी तीन तोळे, धमासा तीन तोळे व जंगला भाजलेला एक रती, हें सर्व दाळिंबाचे रसांत भिजवून कोंबडीचे पिसानें लावावें.

१२. डोळे लाल होतात किंवा मैले दिसतात, किंवा पाणी वाहतें व भुंवया चढल्या असतात, त्यावर उपचार.—शहादाणे, पांढऱ्या मिरच्या, काळ्या मिरच्या, मुरदाडसिंग व केशर, हे सर्व पदार्थ सारखे घेऊन बारीक वस्त्रगाळ करावे. मग शिजवावे आणि अंजन करून तें डोळ्यास लावावें.

१३. तांबडी साखर घेऊन ती दाळिंबाचे रसांत भिजवावी आणि तें अंजन डोळ्यास लावावें.

१४. गव्हांची कणीक व मनुष्याचे केंसांची राख एकत्र शिजवून नंतर त्यांत दगडी मीठ, संगमरवरी दगड, समुद्राचा फेंस व कोरफडीचा मगज हें सर्व बारीक करून डोळ्यास लावावें.

१५. भाजीचे मुळे बारीक करून त्यांचा रस मधांत मिश्रण करावा आणि पिसानें डोळ्यांत घालावा.

१६. डोळ्यांत कंडू होतो त्यावर उपचार.—जंगला, बाभळीचा व तुताचा गोंद, इंद्रायणी मीठ आणि नवसागर हे सर्व बारीक करून, गाईचे तुपांत घालावे. व तें मिश्रण एक टांकाचा चौथा हिस्सा इतकें डोळ्यांत घालावें.

१७. पडबल ह्मणजे डोळे हागतात त्यावर इलाज.—डोळ्यांचे टोंकांस ह्मणजे नाकाकडे रक्त काढावें. नंतर मेंदीचा रस काढून डोळ्यांत घालावा.

१८. कोंबडीचे अंड्यांतील सफेत बील, व फुलाचें तेल डोळ्यांत घालावें, किंवा गाढवीचें दूध चार पांच दिवस डोळ्यांत घालावें.

१९. डोळ्यांचे केस बुबुळावर येतात त्यावर उपचार—भाजलेली हळद व हरताळ वस्त्रगाळ करावी. आणि लिंबाचे रसांत अंजन करून डोळ्यांत घालावें.

२०. खुपरी होते त्याजवर उपचार—रक्त निघतें त्यावर डाग द्यावा आणि त्यावर तीन दिवस साखर टाकावी. नंतर डाग दिलेली कातडी काढावी, त्यावर दवा—डाळिंबाचें फूल आणि फटकी बारीक करून त्याजवर लावावी.

२१. डोळ्यांतून पाणी वाहतें, डोळ्याची पुटें सुजतात आणि डोळे लाल किंवा निळे होतात. त्याजवर उपचार—रक्त काढावें आणि त्यावर पुढें लिहिलेला दवा लावावा. कोंबडीचे अंड्यांतील पांढरें बलक, बुरा अदमणी आणि मीठ, यांचें मिश्रण करून डोळ्यांत घालावें.

२२. तांबडी साकर, कापूर व लांबट मिरच्या हीं सर्व एकत्र करून तें मिश्रण डोळ्यांत घालावें.

२३. गोंद गाढवीचे दुधांत मिश्रण करून डोळ्यांत घालावा.

२४. चिमणीसारखे डोळे होतात त्याजवर उपचार—शस्त्रांनीं टोंचून, मिठाचें पाणी डोळ्यांत घालावें व रक्त बंद करावें. नंतर साधें मीठ, पिंवळें मीठ, इंद्रायणी मीठ, नवसागर आणि मिरच्या

हीं सारखीं घेऊन बारीक करावीं व त्यांत सर्व औषधांचे अर्धी साखर घालून अंजन करावें व डोळ्यांत घालावें.

२५. सैंधव व खाण्याचें मीठ, हें नरमूत्रांत मिळवून अंजन करावें, व दिवसांतून चारपांच वेळ डोळ्यांत घालावें.

२६. सिरसाचे झाडाचें बीं, लिंबाचे रसांत उगाळून त्यांत फटकी, लवंग व चंदन मिळवून पिसानें डोळ्यांत घालावें.

२७. जंगला भाजलेला अर्धा पैसाभार, सिरसाची अंतरसाल भाजलेली अर्ध पैसाभार आणि फटकडी अर्ध पैसाभार; लिंबाचे रसांत सर्व औषध भिजवावें. नंतर तें तुपांत तळावें. व बाटलींत घालून ठेवावें, आणि दिवसांतून चार वेळ डोळ्यांत घालावें.

२८. पांढरे डोळे झाले असतील तर त्यावर उपचार—हळद मीठ यांची पट्टी डोळ्यावर बांधावी, आणि मीठ व हळद यांचें पाणी सोडावें. चवथे दिवशीं पट्टी काढावी. जर कांहीं पांढरेपणा असेल तर पिवळी कवडी जाळावी व त्याचें भस्म वस्त्रगाळ करून, गाईचे लोण्यांत अंजन करावें व डोळ्यांत घालावें. परंतु पाणी फार जात असेल तर नुस्तें भस्मच डोळ्यांत टाकावें.

२९. जंगला निळा अर्धा मासा, फटकी एक मासा, लवंग पांच मासे, गूळ खापरी सहा मासे व हत्तीचें नख एक मासा, हे सर्वत्र वस्त्रगाळ करून त्यांचें गाईचे लोण्यांत अंजन करावें व दिवसांतून दोन तीन वेळ डोळ्यास लावावें.

३०. इंद्रायणी मीठ, ( बुरा अरमणी मीठ ) मोतीं चिनखेद, खडी साखर, गारेचा दगड, पांढऱ्या मिरच्या आणि मिरे हें सर्व बारीक करून दिवसांतून चार वेळ डोळ्यांत घालावें.

३१. शरीराचें मास वाढतें त्याजवर—फुलेल तेल व मेण हें ऊन करून डोळ्यास लावावें. नंतर माशीचें डोकें कापून बाकी भाग घोड्याचे डोळ्यावर लावावा.

३२. डोळ्याच्या कोणांत मासाचा तुकडा होतो, व त्यापासून पिंवळें पाणी वगैरे निघतें. त्यावर उपचारःशस्त्रांनीं कांपावें ह्मणजे रक्त व पू निघून जाईल; नंतर पांढरे जिरे बारीक करून त्यांत भरावे, आणि कोंबडीचें आंडें पक्कें झालेलें, गरमदूध, पांढरे जिरे व फुलेल तेल हीं एकत्र करून जखमेवर लावावीं. आणि तीन दिवसपर्यंत जखम बांधून टाकावी. नंतर सोन्याचा गू, जंगला, नवसागर व गारेचा दगड हीं सर्व बारीक करून अंजन करावें.

३३. रातांधळ्यावर उपचार—बकरीच्या कर्डाचें काळीज घेऊन विस्तवावर ठेवावें, आणि ऊत आल्यावर मेंदीचा रस त्यांत पिळावा. आणि तो फेंस घेऊन तें अंजन डोळ्यांत घालावें.

३४.काळे मिरे बारीक करून हातांत ठेवावे.उंटाचें दूध, व गाढवाचें रक्त, एकंदर करून पिसानें लावावें; असें २०दिवस पर्यंत करावें.

३५. घोड्याचे डोळ्यांत लाल ठिपका होतो त्यापासून ऊन पाणी निघतें, त्यावर उपचार—जंगली खबूतराचा बच्चा आणावा, त्याचीं पिसें काढून टाकावीं, आणि त्याचें रक्त निघेल तें डोळ्यांत घालावें. मध व उंसांचा रस मिळवून डोळ्यांत घालावा.दुसरे दिवशीं गाईचें तूप, शेंदूर, अळें, शिंगरूप, केशर, फुलाचें तेल आणि कोंबडीचे अंड्यांतील पिवळें बलक हीं एकंदर करून अंजन करावें व तें डोळ्यांत घालावें.

३६. डोळ्यांत उन्हांनीं लाल ठिपका होतो, त्यावर उपचार—गाढवीचें दूध डोळ्यांत घालावें.

३७. फूल पडतें त्याजवर उपचार—कांब्या सेंदूर तीन मासे, लवंग तीन मासे, शिरसाचे झाडाचें बीं तीन मासे, हे सर्व गाईच्या दुधांत खलून गोळ्या करून लिंबाचे रसांत उगाळून लावावें.

३८. सफेत गूळ दोन तोळे, हत्तीची नखी दोन तोळे, पिंपळपान दोन तोळे, पिंपळमूळ १ तोळा, शिरसाचें बीं एक तोळा, व सा-

बू १ तोळा, बारीक करून वस्त्रगाळ करावें. आणि गोळी करून लिंबाचे रसांत लावावी.

३९. काळा भंगडा याचें बीं, मधांत मिळवून अंजन करावें, व त्यांत पिण्याची दारू मिळवून लावावी, आणि अफू, लवंग, हळद, हे पदार्थ लिंबाचें रसांत लावावें.

४०. गुगुपंजर लिंबाचे रसांत घांसून लावावें.

४१. बांगड्या निळ्या बारीक कुटून १ एक तोळा, व केश २ तोळे, तिळांत कुटून त्यांत लिंबाचा रस घालून खळबत्यांत घोंटावें. या प्रमाणें खल करावा, नंतर गोळी करून लिंबाचे रसांत उगाळून दिवसांतून तीन वेळ डोळ्यांत घालावी.

४२. काळे किंवा पांढरे जिरे दहा मासे, हळद नऊ मासे, खडीसाखर सात मासे, व जंगला (निळा) चार मासे, हीं सर्व बारीक करून वस्त्रगाळ करावीं, नंतर तरवटाचे झाडावरच्या किड्याचा रस काढून त्यांत मोरचूत घालावा आणि वस्त्रगाळ करून सर्व मिळून त्यांचें अंजन करावें.

४३. निळा (जंगला) ६ मासे, व मनुष्याचें नख एक तोळा, हीं बारीक करून शिजवून लोणी घालून अंजन करावें, आणि तें दिवसांतून दोन वेळां लावावें.

४४. डोळ्यास गरमी होते, लाल होतात, त्यास संकला ह्मणतात. त्याजवर उपचार—रक्त काढावें. गाईचे तुपांत जवसाचें पीठ शिजवावें व त्याचें अंजन करावें.

४५. डोळे पाण्यानें धुवावे, लोणी, तांबडी साखर व कंचनाल याचीं पानें सारखीं घेऊन बारीक करून सुरमा करावा आणि पिसानें लावावा.

४६. सफेती किंवा जाळें डोळ्यावर येतें, त्याजवर उपचार—सफेत गुंज, हत्तीचें नख, तरवटाचे झाडाचा किडा, विसमुलसरी, फटकी, रिठ्याचे बीचा फेंस, त्यांत निळा (जंगला) भाजलेला, मनुष्याचें नख १ एक तोळा, आंबेहळद एक तोळा, लवंग तीन मासे व काळे-

मिरे मुमारें ४ हीं सर्व लिंबाचेरसांत मिळवून तें मिश्रणपेनानें लावावें. एक महिन्यापर्यंत असें करावें.

४७. सोरा, शिककई, हिंगणाचा मगज, व सिंदीचेझाडाचीसाल, हें सर्व बारीककरून लिंबाचे रसांत खल करावा आणि ती गोळी घांसून दिवसांतून तीन वेळ लावावी.

४८. माशाचें पित्त, मेणांत दिवसांतून चार वेंळ लावावें.

४९. हिंगणाची सालतीन मासे, व जंगला(निळा) भाजून त्यांचें लिंबाचे रसांत अंजन करावें. व तें पिसानें दिवसांतून तीन वेळ लावावें.

५०. गाईचें तूप, फूलतेल, अंड्याचा पिवळा बलक, व केशर हीं एकत्र करून तें मिश्रण पिसानें लावावें.

५१. सिरसाचे झाडाचें बीं, लवंग, काळींमिरें, हत्तीचें नख, व हिंगणबेटाची बी, हीं सर्व एकत्र करून, सिंदीचा रस घालून दिवसांतून तीन वेळ लावावें.

५२. शिंदीचा रस व कांहीं मीठ घालून लावावें. सात दिवस दररोज सकाळीं लावीत जावें.

५३. पांढरे मिरे, लालमिरच्या, जवसागर, चांदीचा गू, मरजान दगड, व बिन छेदलेलें मोतीं बारीक करून चार पैसेभार डोळ्यांत घालावें.

५४. सफेद गुंज, खडीसाकर, व जैतूनाचें बीं, हीं सर्व बारीक करून वस्त्रगाळ करावें. आणि बिजखोबऱ्याचा रस त्यांत मिळवावा आणि तें अंजन सकाळीं संध्याकाळीं डोळ्यांत घालावें.

५५. कुंकू चार मासे, तरवटाचे झाडावरचा किडा, व मिरें ५० लिंबाचे रसांत खलावें. आणि गाईचें लोण्यांत लावावें.

५६. विलायती एरंडाचा चीक, त्यांत लवंग चवथा हिस्सा, व सिरसाचें बीं चवथा हिस्सा, दिवसांतून दोनवेळ लावावें. चाळीस दिवस असें करावें. ह्मणजे रात्रीचें दिसत नाहीं तेंही बरें होईल.

५७. डोळ्यावर छडी मारल्यापासून वगैरे डोळयावर सफेती येते, त्यास प्रथम शेकावें, नंतर आंबेहाळद, रक्तबोळ, फटकी, लिंबाचींपानें; पिठाचे झाडाचा मगज, व कोरफड हीं बारीक करून पोटली करावी, आणि गरम करून शेकावें.

५८. सर्दी किंवा गर्मी झाली तर दृष्टीस विकार होतो, दिसत नाहीं, त्याजवर उपचार—नाकाकडच्या शिरांचें रक्त काढावें, कोंबडीचे अंड्यांतील पांढराबल्क, फुलाचें तेल, व जवसाचे पीठ, सारखें घेऊन, लिंबाचे रसांत अंजन करावें.

५९. कापूर, अंड्यांतील पांढरे बल्क, केशर, व बत्तासे, यांचें अंजन करावें, व पिसानें लावावें.

६०. घोड्याचे डोळे गुंजावर्ण अथवा नीलवर्ण होतात, त्यास औषधः—तालांजन, नीलांजन (निंबीचे मुळीची साल), रातांजन (रक्तचंदन) व कोरांजन (टारडमुळीची साल) हे सर्व जिन्नस मधांत उगाळून, घोड्याचे डोळ्यांत घालावे. चार दिवसांत घोडा बरा होईल.

६१. डोळे धूम्रवर्ण होतात, हा पित्ताचा गुण होय, त्याजवर उपचार—पिंपळी, सुंठ, व रसांजन हे सर्व जिन्नस मधांत उगाळून डोळ्यांत घालावें.

६२. वडसांस औषध—सैंधव, व डांगरमीठ, हीं समभाग घेऊन गोमूत्रांत कालवून, सात दिवस डोळ्यांत घालावें, ह्मणजे बरे होतील.

६३. घोड्याचे डोळ्यांत निळे, पिवळे व मुतासारखे किडे पडतात. त्यास उपाय—नीळांजन, रसांजन, व रातांजन, हीं जाळून त्यांची राख मधांत कालवून डोळ्यास लावावी. असें तीन दिवस करावें व डोळे ऊन पाण्यानें धुवावे.

६४. घोड्याच्या डोळ्यास मुंजा होतो त्यास औषध—हिराहिंग ३ तीन टाक पोटांत तीन दिवस पर्यंत द्यावा. व डोळ्यावरचे सर्व केंस काढून त्यावर हिंगाची पुडी घालून, वरनीं कापडानें बांधावें

म्हणजे आंतील किडा जाईल. नंतर तिधारी निवडुंगाच्या दुधाचें अंजन लावावें. त्यावर आंबेहाळद अच्छेर बारीक वस्त्रगाळ करून त्याची टिकी करून, पांढरे कण्हेरीचीं फुलें अच्छेर घेऊन मोठ्या मडक्यांत पाणी घालून चिरगुटानें तोंड बांधावें. नंतर चिरगुटावर फुलें घालून, त्या फुलावर झांकण ठेवावें व नंतर फुलें उकडल्यावर त्या फुलांची व हळदीच्या पुडीची डोळ्यावर पट्टी बांधावी. सात दिवस झाल्यावर डोळ्यावरची पट्टी काढावी, ह्मणजे डोळा बरा होईल.

६५. मुंज्यास औषध—वडाचे पारंबीचा चीक, अरुणोदयीं एक टांकप्रमाणें डोळ्यांत घालावा. सात दिवसांत बरें होईल.

६६. घोड्याचे डोळे मुजतात, रक्तवर्ण होतात, वारंवार पाणी जातें. त्यास उपचार—संचळ, सैंधव, मध, व कांच हे सर्व कांजीबरोबर वाटून त्याचा डोळ्यावर लेप करावा. मग निर्गुडीचा पाला, ऊन करून डोळ्यास शेक द्यावा. घटकाभर चिरगुट वर बांधावें. असा क्रम तीन दिवस करावा.

६७. डोळा पांढरा पडला असल्यास त्यास उपाय—पिंपळी, सुंठ व रसांजन, हे सर्व जिन्नस बरोबर घेऊन मधामध्यें उगाळून डोळ्यांत घालावे.

६८. डोळे अगदीं रात आंधळे होतील, त्यास औषध—मासळीचें अथवा साळूचें पित्त मधांत मिसळून डोळ्यांत चार दिवस घालावें.

६९. डोळ्यांत फूल पडलें असेल तर त्यास औषध—मासळीचें पित्त मधांत मिसळून, डोळ्यांत घालावें.

७०. गुंजा मनुष्याचे मूत्रांत उगाळून डोळ्यांत घातल्या असतां फूल झडेल.

७१. मुंज्यास औषध—गोंद लिंबाचे रसांत खलून डोळ्यांत घालावा. मुंजा तत्क्षणीं निघेल.

७२. घोड्याचे डोळ्यांत रस उतरतो त्यास उपचार—सैंधेलोण,

व डांगरमीठ, हे दोन्हीं बरोबर घेऊन, गोमूत्रांत खलून तीन दिवसपर्यंत डोळ्यांत घालावें. डोळे बरे होतील.

७३. घोड्याचे डोळ्यांतून पाणी गळतें. त्यास उपाय-तांबडे कण्हेरीचें फूल, गहूं, कोष्ठ, तूप, व मध हे सर्व जिन्नस बरोबर घेऊन तांब्याचे परातींत घालून तांब्याचे भांड्यानें घोंटावें. एक एक थेंब घोड्याचे डोळ्यांत घालावा. सात दिवसांत डोळे बरे होतील.

७४. शेंदेलोण, काळेंमीठ, सोरमीठ, व गोमूत्र हे सर्व सारखेएक ठिकाणीं करून सारवावें. व हें औषध चिरगुटांत घालून त्याची पोचंडी बांधून ऊन करून दोन्ही डोळे शेकावे. ४ च्यार दिवसांत डोळे बरे होतील.

## डोळे आणि तोंड सुजतें त्यावर उपचार.

१. हा रोग एकाएकीं होतो, त्या वेळेस साधारण ताप थोडा येतो. घोडेवाल्यांस हा रोग माहित नसला तर ते त्यास उष्ण झालें आहे असें समजतात आणि त्याकडे फारसें लक्ष्य लावीत नाहींत. तेव्हां घोड्याच्या डोळ्याची पापणी सुजते. व डोळ्यांतील पांढरा भाग तांबूस होतो आणि बाहुली मंद दिसते. डोळ्यावर सारा येतो, डोळ्यास कांहीं लागलें किंवा डोळ्यांत कांहीं गेलें तर डोळ्यावर सूज वगैरे येते. तेव्हां डोळ्यांत कांहीं गेलें असेल तें काढलें असतां बरें होईल. जुलाब दिला तर बरें होईल. भुस्यांत नैटर एक औंस घालून खाण्यास द्यावें. याप्रमाणें दोन किंवा तीन दिवस केलें असतां बरें होईल. थंड पाण्यानें त्याचे डोळे धुवावे. धुण्याची कृति पूर्वीं लिहिल्याप्रमाणें करावी.

२. डोळे आले असल्यास वर लिहिल्याप्रमाणें चिन्हें होतात. डोळे आले तर उजेडाकडे पाहवत नाहीं, डोळे अगदीं मंद होतात, पांढरेपणा येतो, रक्त किंवा पुवानें डोळे भरतात, कांहीं दिवस विकृति

कमी असते, परंतु अखेरीस डोळे जातात, ह्मणजे फुटतात. हा रोग-दुसऱ्या घोड्यास स्पर्शानें लागतो, किंवा थंड ठिकाणचे तबेल्यांतून उष्ण ठिकाणचे तबेल्यांत नेला असतां किंवा जास्ती खावयास घातल्यानें किंवा अधिक काम घेतल्यानें हा रोग होतो. यावर उपचारः रक्त काढावें किंवा थंड पदार्थानें डोळे धुवावे. रक्त काढणें तें डोळ्याचे आंतील शिरांचें• ह्मणजे कानाच्या बाजूकडील रक्त काढलें असतां बरें होईल.

३. डोळ्यांतील बाहुलींत फूल पडतें तो रोग डोळे सुजल्यावांचूनही होतो. पहिल्यानें डोळ्यांतून थोडा पूं वाहतो आणि नंतर जास्ती वाहत जातो. अखेरीस सर्व डोळा पांढरा होतो. हा रोग आईबापाला असला तर त्याचे संततीला होतो. आणि तो त्याचे ह्मातारपणीं होतो. हा रोग बरा होत नाहीं. शेवटीं घोडा अंधळा होतो.

४. दुसरी एक डोळ्याची विकृति अशी आहे कीं, डोळे दिसण्यांत सुरेख दिसतात. परंतु घोड्याला त्या डोळ्यानें मुळींच दिसत नाहीं. यावर कांहीं औषध नाहीं.

५. घोड्याचे तोंडांतील आंतील हिरड्या सुजतात; त्यावर उपचार—दोन जुलाब द्यावे. व रात्रीस भूस नेंटर १ औंस घालून द्यावें. दाणा देऊं नये. हिरड्या इतक्या सुजतात कीं, त्या दांतांबराबर मिळून जातात.

६. कमजास्ती तोंड उघडत नाहीं यावर उपचार—एका कारणानें हा रोग होतो तो असा—छातीवर धुरीचें लांकूड लागलें, किंवा शिरा ताठतात त्यामुळें असें होतें. त्यावर औषध लागूं होत नाहीं. अफू, क्लोरोफार्म, गांज्या, वावडिंग, रक्त काढणें किंवा चादर भिजवून आंगावर लावणें. या उपायांनीं घोडा वांचेल तर वांचेल, नाहीं तर वांचणार नाहीं. ज्योसतिद—डोळ्यांतून पाणी वाहूं लागतें व तोंडांतून लाळ गळते. यास उपाय—हिरडा, बेहडा, आवळकठी, मोहऱ्या, व हळद हे सर्व जिनस बराबर घेऊन गोमूत्रांत चारावे. व

या औषधांचा लेपही करावा. परंतु हा लेप करण्याचे अगोदर कांजीनें तोंड चांगलें धुवावें.

---

## मुखरोग.

हा रोग घोड्याच्या तोंडास (कल्लुचांस) लगाम लागून त्याचे योगानें क्षतें पडतात; यांचें कारण, लगाम फार ओढल्यापासून असें होतें.

**इलाज**—खालीं लिहिलेले औषधानें चट्टे पडलेले धुवावेत. तें औषध—क्लोराईड आफ झिंक दोन स्क्रुपल, इसेन्स् आफ आनीसीड दोन ड्राम, व पाणी एक शेर, हें सर्व मिश्रित करून पडलेले चट्टे धूत जावे.

---

## खालचे जबड्याची इजा.

हा रोग, साधा लगाम ओढल्यानें किंवा घोड्यास दाबांत ठेवण्याकरितां दाबाची सांखळी बळकट आंवळल्यापासून होतो.

**लक्षण**—मुळे दांतांच्या पुढें किंवा मागें क्षत पडतें, आणि जिभेच्या खालीं खोक होते, किंवा टाळ्यास दुखापत होती, अथवा जबड्याच्या बाजूवर गांठ येते, किंवा हाड वाढतें.

**इलाज**—जेथें क्षत पडलें असेल तेथें हाडापर्यंत चाकूनें कांपावें, जर दुर्गंधि येत असेल तर क्लोराइड आफ् झिंक यांणीं धुवावें आणि जखम उघडी ठेवावी ह्मणजे बरें होईल.

---

## घोड्याचें तोंड येतें त्याजवर उपचार.

हा रोग उष्णतेपासून होतो किंवा अन्न न पचन झाल्यामुळें होतो.

**लक्षण**—ओंठ सुजतात, जिभेस सूज येते आणि दोन्हीही ठिकाणीं चट्टे पडतात, आणि गुदद्वारांत फोड येऊन येऊन खवले पडून

बरे होतात किंवा जास्ती झाले ह्मणजे त्यांतून नासका पदार्थ पडूं लागतो.

**इलाज**—नरम दाणा खाण्यास देऊन खालीं लिहिलेले औषधानें तोंड धुवावें. तें औषध–बोराक्स पांच औंस, मध किंवा काकवी दोन पिंट, व पाणी एक ग्यालन, हें मिश्रण करून तोंड धुवावें. याप्रमाणें दिवसांतून दोन वेळ धुवावें ह्मणजे बरें होईल.

---

**जिव्हारोग** ( जिभेवर चिरा पडतात, किंवा जीभ उफळते ).

हा रोग जुलाबाचें औषध देतेवेळीं चिकटा राहिल्यानें किंवा चऱ्हाटें चघळण्यापासून होतो.

**लक्षण**—घोडा जीभ बाहेर काढितो, आणि जिभेचें चळण वळण कमी असतें.

**इलाज**—शस्त्रांनीं जीभ कांपावी आणि रक्त जाऊं द्यावें; व दाण्याऐवजीं पातळ व नरम पदार्थ खाण्यास द्यावा, आणि चंदी दिल्यावर कांहीं वेळांनीं, क्लोराईड आफ् झिंक यांणीं किंवा बोराक्स पांच औंस, मध दोन पिंट व पाणी एक ग्यालन हें एकत्र करून तोंड धुवावें ह्मणजे बरें होईल.

---

**तोंड येतें व आंत चट्टे पडतात.**

हा रोग फार कडक औषध दिल्यानें होतो ( तोंड उफळतें ).

**लक्षण**—घोडा वारंवार थुंका गाळतो व ओंठानें मिटक्या मारितो.

**इलाज**—पातळ व नरम पदार्थ खाण्यास द्यावा, आणि क्लोराईड आफ झिंक, किंवा बोराक्स पांच औंस, मध दोन पिंट, व पाणी एक ग्यालन हें एकत्र मिश्रण करून घोड्याचें तोंड धुवावें, बरें होईल.

---

**घोड्याच्या तोंडाचे रोग.**

१. तोंडास घाण येते, व फेंस येतो.

२. तोंडांत फोड येतात व पिंवळें पाणी निघतें. ह्याप्रमाणें गाईचे व ह्मशीचे तोंडास फोड होतात,त्यास कुकडा ह्मणतात. त्यावर उपचारः—जिभेचें रक्त काढावें, जव, मीठ, व दाळिंबाचें फूल, सारखें घेऊन बारीक करून, अंगुराचे शिरक्यांत चोळावें.

३. कोंबडीचे अंड्यांतील पांढरें बील, अंबेहळद, खाण्याचें मीठ व धमासा हें सर्व बारीक करून मिश्र करावें. आणि रक्त निघेपर्यंत जिभेस चोळावें.

४. अंजिराचे झाडाचीं पानें व त्याचीच साल बारीक करून जिभेस चोळावी.

५. तोंड सुजतें त्यास औषध—जवखार, रायी, शिरस, हाळद व सैंधव हें सर्व सारखें घेऊन, चूर्ण करावें. व चिंचेच्या बरबटांत कालवून त्याचा लेप तोंडावर व बाहेर करावा. तीन दिवसांत सर्व सूज जाईल.

६. काळेमिरे दोनचार दाणे घेऊन पूड करावी. लसणाच्या पाकळ्यांचा रस काढून, त्यांत ती पूड भिजवावी. आणि कापसाचे बोळ्यानें जिभेस चोळावी.

७. मुंगा (ओंठाचे आंतल्या आंगास फोड येतात) व कांटे येतात. हा रोग झाला असतां घोड्याच्यानें दाणा वैरण खाववत नाहीं. हा रोग घोड्यास वेळच्यावेळीं पाणी न पाजल्यामुळें होतो. यास औषधः— धमासा,हळद, व मीठ, हें सारखें करून रक्त निघेपर्यंत ओंठांवर चोळावें.

८. विड्याचीं चार पानें व कळीचा चुना हीं एकत्र करून तें औषध ओंठास चोळावें.

९. मीठ व हळद बारीक करून ओंठावर चोळावें आणि वाळलेले हरभरे खाण्यास द्यावे.

१०. कव (टाळ्यास मास येतें तें) त्यावर औषधःगव्हांचा भुस्सा व कणीक खाण्यास द्यावी आणि रक्त काढावें.

११. दांतांवर मास जमतें त्यावर लोखंड तापवून डाग द्यावा, नंतर उंटाचे दांत व मायफळ समभाग घेऊन, बारीक करून द्राक्षाच्या शिरक्यांत लावावें.

१२. मटर (मोठे वाटाणे) व माजूम हे समभाग घेऊन, शिरक्यांत घालून दांतास चोळावें.

१३. बेडूक शिज [illegible] त्याचा अर्क काढावा. व तो भाकरीचा मगज व जैतूनचें तेल यांमध्यें कालवून खाण्यास द्यावा.

१४. कित्येक घोड्यांस चोर दांत एक असतो, तेणेंकरून घोड्यास दाणा वैरण खावबत नाहीं. यास्तव जो घोडा दाणा वैरण खात नसेल, त्याचे दांत पाहावे, आणि चोर दांत असल्यास काढून टाकावा.

१५. दांतांच्या हिरड्या सुजून रक्त निघतें त्यावरः विंचू जाळून त्याची राख चोळावी, तशींच करडूड यांचीं पानें घेऊन शिरक्यांत बारीक करून चोळावीं.

१६. मटर (मोठे वाटाणे) व माजूम हीं सारखीं वजनानें घेऊन शिरक्यांत चोळावीं.

---

## दंतरोग.

हा रोग होण्याचें कारण कमजास्ती दांत होऊन हिरड्या घांसतात व दांतांवर मास येतें.

**लक्षण**—घोडा डोकें एकीकडे करितो, थुंका गाळितो, व दाणा खाते वेळीं, थुंक्यानीं खराब होतो.

**इलाज**—पुढें आलेला दांत असेल तो शस्त्रांनीं कांपावा किंवा मासास लागत असेल तर तेवढा भाग कांपून काढावा.

---

## उशीतरोगाचें लक्षण.

दाणा खातां अथवा दूध पितां त्यांणीं अनमूट लागली असतां त्या-

ज्वर उपचार—पद्मकाष्ठ, भारंगी, वेखंड व सुंठ, हीं औषधें समभाग, प्रत्येकीं २ टांक घेऊन पाण्यांत वाटून खूप बारीक करून खलून नस्य द्यावें. तीन दिवसांत बरें होईल.

दुसरें औषध—शेरणी, एरंड, कडुंदोडकी, रुई, कारलें, चित्रक, आस्कंद, बेल, चित्रकमूळ, तेरणी, डोरली, राई, उताटे, इंद्रावणी, अडोळसा, व पांगारा, ह्या सर्वांचीं मूळें माका; घोडकातरा, निंबारा, वायवर्णा, भुईनिंब, वाघाटी, व कांदे यांचा पाला आणि मिरे, लसूण, वेखंड, ओंवा, पिंपळमूळ, शेपा, आजमोदा, चोखोवा, गेळ, निवडुंगाचा चीक, भारंगी, दोन्ही हाळदी, कोरांजन, हिरडे, हिंग, पिंपळसाल, व हादगा हीं औषधें समभाग आणि वर सांगितलेल्पा मुळ्या व पाला मिळून गोमूत्र, ताक व नरमूत्र यांत कालवून मडक्यांत भरावें. त्यांत मीठ बरेंच घालावें आणि तें घोड्यांस द्यावें.

---

## घोड्याला फांसणी ( फासी ) होते त्यास उपचार.

सुंठ, मिरे, पिंपळी, हिरडा, अवळकठी, वेखंड, वावडिंग, लसूण ओंवा, किराईत, गोष्टकोळिंजन, भारंगीचीं व डोरलीचीं मुळें, केवडयाचे झाडाची साल, निर्गुडी, टाकळी, इंद्रावणीचें मूळ, रिंगणीचें मूळ, पांढरे जिरे, शहाजिरे, आजमोदा, डाळिंबाचा पाला, पत्री, मोठीं भोकरें, रुईचें लांकूड, लिंबू, गाजर, वांगी, व अश्वगंध, हे सर्व जिन्नस बरोबर घेऊन कुटून दह्यामध्यें कालवून तीन दिवस मडक्यांत घालून ठेवावे. तीन दिवसानंतर मीठ घालावें. व हें दररोज घोड्याला चाटवीत जावें. ह्मणजे घोड्याला क्षुधा चांगली लागेल. कांहीं रोग होणार नाहीं. मोठ्या पाहाटेस औषध चारलें पाहिजे. व हिरडा, अजमोदा, ओंवा, लसूण, वेखंड वावडिंग व हिंग हे सर्व जिन्नस तुपामध्यें कालवून दुपारीं द्यावे. ह्मणजे सर्व रोग दूर होतील

पाणी पिते वेळीं पोटांत जळू गेली असल्यास घशांत हात घालून

काढावी व पोटांत गेली तर जैतुनाचें तेल पाजावें. दांतीखळीं बसली तर बचनाग, तेलीयानाग, मिरानाग, आणि सुंठ, मिरच्या, पिंपळपान, पिंपळमूळ, दगडी मीठ, लसूण, अजवान, व गुंजाचें बीं, हीं अनुक्रमें दोन दोन टांक घेऊन अर्धे भाजून एकशेर गूळ घालून वीस दिवस खाण्यास द्यावें.

२. बचनाग, क्लेटकोळंजन, सुंठ, बचनागतेलिया, कचोरा, काळाबोळ, गजगांठीची बी, आंबेहाळद, अजवान, टांकणखार, हिंग, व पिंपळाची साल, हीं बारीक करून पाण्यांत उकडून तोंडावर लेप द्यावा.

---

## जिव्हारोग.

जिव्हेखालीं रोग होतो, तेणेंकरून पिंवळें किंवा लाल किंवा पांढरें पाणी निघतें त्याजवर औषधः—

पिण्याचे दारूंत पाणी मिश्र करून त्या पाण्यानें तें दर्द एकवीस वेळ धुवावें; नंतर कोंकणी मीठ एक पैसाभार, कापूर व फटकी तोळा तोळा, आणि ( निळा ) जंगला तीन मासे, हे जिन्नस बारीक करून तुपांत मिश्र करावे. त्यांत आंबेहळद एक तोळा मिळवावी आणि तें औषध दिवसांतून दोन वेळ दर्दावर चोळावें.

काळीं मिरीं दोन चार दाणे, व लसणाच्या पाकळ्या दोन हीं एक ठिकाणीं वाटून त्यांत कापूस भिजवून जिभेस चोळावा. जिव्हा-शोष ह्मणजे जीभ वाळते आणि लांकडासारखी होते, त्यामुळें त्यास चरतां येत नाहीं. त्यास उपचारः—उंबराची साल, मध, व जिरे प्रत्येक सहा टांक घेऊन मधांत कालवून त्याचा लेप जिभेवर करावा. चार दिवसांत सर्व बरें होईल.

तितिडी (चिंच) ३ टांक, उंबराची साल ६ टांक, व त्रिरेग ६ टांक यांचें चूर्ण मधांत सात दिवस द्यावें. व हें पाण्यांत वाटून जिभेस लेप करावा.

जिव्हा रोग ह्मणजे दाढांच्या सांधीस फोड येतात, लाळ वाहते, व श्वासोछ्वास करितो त्याजवर उपचार—सुंठ, मिरे, पिंपळी, राळ, व जिरे हीं प्रत्येक ९ टांक घेऊन त्यांचे चूर्ण करून तुपांत कालवून त्याचा तोंडावर आणि आंत लेप करावा.

जिभेखालीं रोग होतो, तेणेंकरून पिंवळें किंवा लाल किंवा पांढरें पाणी त्या ठिंकाणांतून गळतें. त्याजवर उपचार—कोंकणी मिठ एक पैसाभार, कापूर १ तोळा, फटकडी १ तोळा, निळा (जंगला) तीन मासे, व आंबेहळद १ तोळा, इतके जिनस बारीक करून वस्त्रगाळ करावे. हें सर्व तुपांत कालवून जिभेखालीं जेथें पाणी निघतें तेथें लावावें.

---

## दाढबंदरस.

घोडयाचे तोंडांत दोन्हीकडून मोठाला एकेक फोड होतो. त्या योगानें घोडा खात नाहीं. त्यास उपचार—मोठी कांठी घेऊन तिला, मध्यें बोट जाईसें भोंक पाडावें. ती कांठी घोड्याचे तोडांत घालून त्या भोंकांतून त्याचे तोंडांत बोट घालावें,आणि बोटानें फोड फोडावा. नंतर लसूण, सुंठ, पिंपळमूळ व हळद हे सर्व जिन्नस बरोबर घेऊन गाईचे दुधांत एकत्र करून फोडास लेप करावा. व एक मोठें लांकूड घोड्याचे तोंडांत घालून नंतर दाढ बांधावी. ह्मणजे तोंड मिटणार नाहीं. ह्याप्रमाणें दोन तासपर्यंत तसेंच घोड्यास राहूं द्यावें. नंतर लांकूड काढावें; असें चार दिवस करावें.

---

## दाढारोग.

दाढांच्या सांधींस फोड येतात. त्यामुळें त्यास चरतां येत नाहीं. तोंडावाटे लाळ पडते. त्यास उपचार—प्रथम शस्त्रानें फोड फोडावे.

मग लसूण, वाया (सुंठ), पिंपळमूळ व हाळद, हीं प्रत्येक चार टांक प्रमाणें घेऊन कुटून गुळांत कालवून त्यांचा दाढांस लेप करावा. आणि घटकाभर तोंड उघडें ठेवावें. असा क्रम तीन दिवस करावा. नंतर टाकळीचा पाला ४ टांक, लसूण ४ टांक व सुंठ ४ टांक ह्याप्रमाणें घेऊन कुटून तुपांत कालवून ती गोळी पोटांत द्यावी.

दाढसाकळ रोग असा होतो कीं, घोड्याचें थोबांड सुजतें. त्यास उपचार–सज्जीखार, जवखार, व लोणाखार हे समभाग घेऊन मधांत कालवून लेप करावा. हींच औषधें गुळांत कालवून चार दिवस चाटण द्यावें.

गालफुगी—गळा व गाल सुजतो. त्यावर औषध—शंखजिरे, सज्जीखार, जवखार, व लोणखार हे प्रत्येक एक एक टांक ह्याप्रमाणें घेऊन चूर्ण करून मधांत कालवून गालास आंतून बाहेरून लेप करावा. आणि हेंच औषध पोटांत द्यावें. गाल बरे होतील.

---

## घोडा कानानें बहिरा होतो त्यावर उपचार.

१. काळा आणि पांढरा अबलक या घोड्यास हा अजार होतो, तो कानांत मळ आला ह्मणजे होतो. त्याची खूण नालबंदीचे वेळेस पुकारा करितो. त्यास—जव शेरभर व पारा शेराचा चौथा हिस्सा घेऊन कढवून, नंतर त्यांत कढविलेलें दूध घालावें. ५ थेंब थेंब प्रमाणें कानांत घालावें.

२. मध ऊन करावा, व नफाशाचें तेल घेऊन, त्यांत गरम दूध घालून कानांत घालावें.

३. तूप, व बदामाचें तेल, सारखें घेऊन त्यांत दूध घालून कानांत थेंब थेंब प्रमाणें घालावें.

४. गोडें तेल, व केशर तेलाचा आठवा हिसा घेऊन मिळवून गरम करून थेंब थेंब प्रमाणें कानांत घालावें.

५. अल्याचा अर्क घ्यावा, त्यांत गरम दूध घालावें आणि थेंब थेंब प्रमाणें कानांत घालावें.

६. कानांत पडदा हीतो,पिंवळें पाणी जातें त्यावर उपाय. सुगंध तेल कानांत घालावें,ऊद कानांत घालावा व जवाचें पीठ सिरक्यांत शिजवून कानांत घालावें. ह्मणजे कानांतील मळ निघेळ, नंतर देवदाराचा गोंद, व खजूर एकत्र करून सिजवावे. त्यांत तेल घालून कानावर लावावें.

७. कवडी जाळून तिची भुकटी कानांत घालून त्यावर लिंबाचा रस दिवसांतून दोन तीन वेळ टाकावा.

८. कानांत जखम होते त्यावरः—तेल गोडें व तेलाचे आठवे हिशाबरोबर केशर घेऊन कानांतील जखमेवर लावावें.

९. कर्णमूळ होतें त्यावर—जुनें तेळ कानांत घालावें व उंटाची चर्बी आणि बदकाची चर्बी कानांत चोळावी. देवदाराचा गोंद, पांढरें मेण सारखें घेऊन शिजवून जैतूनचें तेल मिळवून कानांत घालावें. व मीठ बारीक करून किंवा पिण्याची दारू कानांत टाकावी.

१०. कानांत खुजळी होते त्यावर—कायफळ, सिरका, व मध हें सर्व एकत्र करून लावावें.

११. गुग्गुळ, राई, व मीठ, सारखें घेऊन जैतूनचे तेलांत कढवावें आणि कानास लावावें.

१२. कानांत कांहीं खडा वगैरे जाऊन दर्द झालें तर—घोडा कान जमिनीकडे करितो ह्मणजे कान ताठ उभे रहात नाहींत त्यास—कापसाची वात घेऊन ती मनुष्याचे लाळींत भिजवून कानांत घालावी. नंतर जैतूनचें तेल घालावें.

१३. कानांत मांस वाढतें, आणि छेद बंद होतात, पिंवळें पाणी निघतें, त्यास पैन किंवा शिंगाडा ह्मणतात. कानांत मांस वाढतें तें कांपून काढावें. नंतर नवसागर जैतूनचे तेलांत उगाळून लावावा. व उंटाचे दांत शिरक्यांत उगाळून लावावे.

## घोड्याच्या नाकांतील रोगांविषयीं.

१. पहिला प्रकार, नाकांतून रक्त जाणेंबद्दल—रक्त जास्त झालें किंवा मार फार बसला तर नाकांतून रक्त जातें. त्यावर उपायः— जायफळ, मायफळ, फटकी, व दाळिंबाचें फूल एकत्र करून नाकांत घालावें. फार रक्त झालें तर कागद जाळून राख करावी, व काळे मिरे, मुरदाडशिंग, फटकी, अफू, कापूर, दाळिंबाचें फूल, आणि माजूम, हें सर्व सारखें घेऊन शिरक्यांत घालून नाकांत घालावें. कानांतून व तोंडांतून रक्त गेलें तर पित्त झालें असें समजावें. किंवा, गरमीमुळें त्याचें शरीर तप्त होतें व दाणा वगैरे खात नाहीं; लघ्वीवाटे रक्त गेलें तर घोडा थंड पाण्यानें धुवावा. पापडखार व लाल मिरच्या सहा टांक प्रमाणें घेऊन, बारीक करून मधांत मिळवून, तें औषध कांहीं दिवस खाण्यास द्यावें. नाकांतून व लघ्वीवाटे रक्त जाईल तर—मेंदीची पानें, बाभळीचा डिंक, कितराचा डीक, पांढरे जिरे दोन टांक, व काथ पांढरा, हीं सर्व बारीक करूत त्यांत पाणी घालून रात्रभर ठेवावीं ते मिश्रण पाण्यासुद्धां दिवसांतून तीन वेळ पाजावें.

२. नाकांत मास वाढतें व घाण येते. तेणेंकरून घोडा दुबळा होतो, व तोंड उघडतो. त्यावर उपचार—मास कांपून टाकावें. त्यावर शिरका टाकावा, व जंगला भाजून बरोबर घेऊन बारीक करावा, व शिरक्यांत मिळवून त्यावर लावावा. मटर (वाटाणे), माजूम, व उडीद, बरोबर घेऊन दारूचे शिरक्यांत भिजवून त्यावर लावावे.

३. गांडवळ सावलींत सुकवावे. नंतर बारीक करून नाकांत टाकावे; जखम बरी होई पर्यंत दोन तीन दिवस असें करावें व नाकावर डाग द्यावा.

४. नाकांत मांस वाढतें, आणि छेद बंद होतात, पिवळें पाणी निघतें, त्यास पैन किंवा शिंगाडा ह्मणतात. नाकांत मांस वाढतें. तें कापून टाकावें. नंतर नवसागर, जैतूनचे तेलांत उगाळून, लावावें,

व उंटाचे दांत शिरक्यांत उगाळून लावावे. **कास** (खोकला) व **अर्धशिशी** झाली ह्मणजे नाकांतून पाणी येतें, त्याला घाण असते. घोड्यास ढास येते, ती सर्दीमुळें येते, डोळ्यांतून गू जातो. चौकचीं पानें व नवसागर, हळद, केशर बरोबर घेऊन बारीक करावें, व फुलांचे तेलांत नाकांत घालावें. कानाजवळचें व डोळ्याजवळचें रक्त काढावें. नंतर कानांत जैतूनचें तेल टाकावें.

६. प्रत्येक दिवशीं बाजरीचे पिठांत लहान घोड्यास २ बिबवे व मोठ्यास ४ बिबवे खाण्यास द्यावे.

७. अलें दोन पैसेभार, मध तोळाभर, लवंग एक तोळा, मिरे काळी एक तोळा, पिंपळपान एक तोळा, व आंबेहाळद छटाक हीं, एकत्र करून तीन गोळ्या कराव्या. एक सकाळीं, एक तिसरे प्रहरीं, व एक सध्याकाळीं अशा दिवसांतून तीन गोळ्या द्याव्या

८. मध एक पैसाभार, छटाक अलें, मिरेकाळे, व लवंग, हें एकत्र करून चार पैसेभार खाण्यास द्यावें.

९. कायफळ एक तोळा, आंबेहाळद दोन तोळे, सुंठ दोन तोळे सैंधव एक तोळा, व अंजिराच्या मुळाचें तेल अतपाव हें सर्व बारीक करून डोक्यावर लेप करावा. कपाळ विस्तवानें शेकावें.

१०. पाणी पितांना नाकांत जळू गेली तर नाकांतून पाणी व रक्त जातें. तेव्हां नाकांत जैतूनचें तेल व तिळाचे तेलांत डिकेमाली मिश्र करून घालावी.

११. गेरू, व मुलतानी माती हीं दोन्ही बारीक करून, येरंडाच्या पानांत घालून, ती विस्तवाच्या उबाऱ्यांत भाजून त्यानें कपाळ व नाक शेकावें.

१२. घ्रीणानुरोध ( खरणीरोग ) दोन्ही नाकपुड्यांतून वाफा निघतात, दुर्गंधी सुटते, नाकपुड्या ताणतो, पाणी पीत नाहीं, अगदीं कृश होतो, त्यास उपचार—सुंठ, मिरे, पिंपळी, हिरडे, आवळ-

कठी, हाळद, मुस्ता, शिग्म, अतिविष, देवदार, व पद्मकोष्ठ, हीं प्रत्येक दोन टांकप्रमाणें घेऊन चूर्ण करून गाईचे अच्छेर तुपांत ७ दिवस द्यावें. नंतर मध आणि गाईचें दूध एकत्र करून तीन दिवस नाकांत घालावें.

## श्लेष्मा (पडसें).

घोड्याचें नाक व तोंड यांतून पाणी जातें, ताळू जळते, चारा खात नाहीं, अंगास घाम येतो, व डोळ्यांतून पाणी जातें त्यास उपचार-दालचिनी, देवदार, ओवा, व वावडिंग, हीं ४ टांक प्रमाणें घेऊन एकत्र पूड करावी. व गाईचें दूध ४ टांक घेऊन त्यांत ही पूड घालून पोटांत द्यावें.

२. सुंठ, मिरें, पिंपळी व शहाजिरें हे सर्व जिन्नस समभाग घेऊन गाईचे दुधांत वाटून शेरभर पाण्यांत कालवून घोड्यास चाटण द्यावें. व हें औषध घोड्याच्या नाकांत थोडेसें घालावें.

३. दालचिनी, देवदार, पद्मकोष्ठ, उंबराचें बीं, चंदन, भद्रमोथा, व वावडिग हें सर्व समभाग घेऊन, गाईचें दूध तापवून त्यांत कालवून घोड्यास चाटण्यास द्यावें.

---

## हलका खोकला.

खोकला फार दिवस सरदीपासून होतो, पौष्टिक फार खाण्यास द्यावें. पोटांत विकृति झाली तर जंत होतात, त्यावर जंताचें औषध द्यावें. · रोअरिंग (घश्यांतून नाद निघतो,) श्वास लवकर सोडतो, घोरण्याचा आवाज शंभर कदमावर किंवा जवळ ऐकूं येतो, श्वास फार निघत नाहीं, परीक्षा केली तर दिसत नाहीं, आंतील बाजू सुजलेली असावी. गळ्यास दोऱ्यानी बांधून ठेविल्यापासून खोकल्याचा विकार होतो.

## नाकांत फोड येतात.

हा रोग सर्दीपासून होतो.

**लक्षण**—नाकपुड्या मोठ्या होतात; नाकांतून पाणी वाहतें; गुदमरल्यासारखें होतें; नाकपुड्या फार बंद झाल्या तर घोड्यास ढास लागून खोकला येतो.

**इलाज**—नाकांत जे गोळे असतील ते शस्त्रांनीं कापून काढावेत.

## दुसरा प्रकार.

कपाळावर दुसरे घोड्याची लाथ लागल्यामुळें कपाळाचे हाडाला इजा होती; किंवा दाढांला कीड लागल्यानें चेहऱ्याचीं हाडें नरम लागतात. आणि एका नागपुडींतून चिकट पदार्थ गळूं लागतो.

**इलाज**—ज्या ठिकाणीं इजा आहे त्याचा शस्त्रवैद्याकडून फाड करावा, आणि क्लोराईड आफ् झिंक याचा ताव द्यावा.

बालसम आफ् कोपायबा अर्धा औंस, पोटॅस्क्यायराईड चार ग्रेन आणि कबाबचिनी घालून गोळा करावा आणि दररोज द्यावा. यापासून लघवीला जर कांहीं इजा होईल तर तें बदल करून त्याबद्दल बेलाडोनाचा अर्क अर्धा औंस याचा टाम अर्धा ड्राम घेऊन वाइन गलासभर पाण्यात मिसळून चारचार दिवसांनीं एकदां द्यावा.

---

## सोअर थ्रोट ( गळा सुजतो )

लहान शिंगराला हा आजार बहुतकरून होतो. हा रोग त्याजपासून अनियमित काम घेण्यापासून होतो. किंवा लहान शिंगरास स्वइच्छेप्रमाणें काम नियमितपेक्षां जास्त घेण्यानें अगर कांहीं दिवस तबेल्यांत बंद ठेविल्यानें अगर रानांत स्वतंत्र फिरल्यामुळें होतो.

**लक्षण**—गळ्यांत चिकटा अगर थुंका जमतो. पातळ पदार्थ

गिळत नाहीं; भूक लागत नाहीं; आणि पातळ पदार्थ कांहीं गिळतो व कांहीं नाकावाटे पडतो.

**इलाज**—गरम कपडे घालावेत. आणि त्याच्या तबेल्यांत त्यास न बांधितां मोकळें सोडावें. खाण्यास हिरवें गवत द्यावें व पातळ पदार्थ करून द्यावा, व गवताचा बिछाना असावा. जर घोड्यास लीद चांगली न होतां अवष्टंभ होईल तर सोल्युशन आफ् आलोज औंस ४ एसेन्स आफ् अनिशीड औंस अर्धा, व आच्छेर पाणी हें मिश्रण करून द्यावें. हें वशांतून न जाईल तर अर्धा औंस एक्सट्र्याक्ट आफ् बेलाडोना एक ग्यालन पाण्यामध्यें मिसळून पाजावा. हें पाजणें तें असें कीं, घोड्याचें डोकें वर करून अर्धी बाटली त्याच्या तोंडांत ओतावी आणि अर्धे मिनीटपर्यंत त्याचें डोकें तसेंच वर राहूं द्यावें नंतर खालीं करावें, याप्रमाणें सहा किंवा आठवेळ औषध दिवसांतून पाजावें. यानें कांहीं गुण नाहीं आला तर परमगनेट अॅपोटाज अर्धा पिंट आणि पाणी एक ग्यालन मिसळून वर लिहिल्याप्रमाणें पाजावें. इतकें होऊन जर नीट न होईल तर क्लोराईड आफ् झिंक तीन ड्राम; एक्सट्र्याक्ट आफ् बेलाडोना अर्धा औंस, टिंचर आफ् क्याप्सीक दोन ड्राम; व एक ग्यालन पाणीं मिश्रण करून पाजावें; या सर्वांचा जर निरुपयोग होईल तर त्याच्या गळ्यावर ब्लिस्टर मारावें.

---

## खोकला.

खोकला हा रोग होण्याचें कारण, तबेल्यांत फार उष्ण असल्यानें किंवा तबेल्यांत कुजके दाणे ठेविल्यानें किंवा गवत ठेविल्यानें किंवा कुजका बिछाना घातल्यानें, किंवा अनियमित त्याजपासून काम घेतल्यानें होतो.

**इलाज**—दाणा भरडून द्यावा. गवत ओलसर ( हिरवें ) द्यावें;

जवसाचा चहा किंवा कण्हेरी पिण्यास द्यावी, अंगावर उष्ण कपडे ठेवावेत; एक्सट्र्याक्ट आफ् बेलाडोना एक ड्राम अच्छेर पाण्यामध्यें मिसळावा; टिन्चर आफ् क्लोरस दहा औंस; व टिंनचर आफ् इपिका क्यूना आठ औंस, हें एकत्र करून पाण्याचें एक टंबेरलभर, याप्रमाणें दिवसांतून तीनवेळ दररोज द्यावें. यांत गुण नाहीं आला तर बार्बेडोज अर्धा औंस, किंवा अर्धा औंस डामर, क्यालोमल पांच ग्रेन आणि जवस गोळा होण्यापुरतें घालून गोळा करावा आणि तो गोळा सकाळीं एक व संध्याकाळीं एक देत जावा, यापासूनही गुण नाहीं आला तर पावडरी येलोज एक ड्राम, बालसम आफ् कोपेबा तीन ड्राम, क्याथराईड तीन ग्रेन, हे जिन्नस भुसामध्यें कालवून सकाळीं खाण्यास द्यावें. हंगामीं कापलेलें गवत घोड्यास खावयास देणें.

---

## शिंगरास ( ढास ).

१–शिंगरास कोरडी ढास लागते यामुळें शिंगरूं कृश होतें त्यास उपाय—आडुळसा, व भारंगीच्या पाल्याचारस पाणी घालून काढावा. आणि शिंगरानें नाकांत नस्य घालावें. याप्रमाणें एक सप्तकपर्यंत करावें. अथवा पावशेरप्रमाणें सात दिवस खाण्यास द्यावें.

२–घोडा चारा खातो परंतु खातानां घश्यांत आडकतो. यामुळें त्यास खोकला येऊन ढास लागते, त्यास उपाय–आल्याचा रस, गाईचें दूध तापवून थंड झालेलें व सुंठ समभाग घेऊन वस्त्रगाळ करावी. ही पूड रस व दूध यांत कालवून नाकांत नस्य घालावें. नस्याच्या योगानें गळा मोकळा होऊन चारा चांगला गिळला जाईल. तीन दिवस करावें.

३–ढासीस दुसरें औषध—सापाची कात २ तोळे गाईचे लोण्यांत कालवून तीन दिवस पोटांत द्यावी.

**लॅरिंग झायटीज (श्वासोच्छ्वासाच्या नळीस सूज येते).**

ह्या रोग तबेला घाणेरा ठेवल्यापासून किंवा सर्दीपासून होतो.

**लक्षणें**—सुम्ती येते, हवेची नळी मोठी होते, मान ताठते, श्वासोच्छ्वास फार घाईनें टाकतो, नाडी थोडी जलद चालते, नाकाचे पडदे लाल होतात.

**इलाज**—टिंनचर आफ् आकोनाईट एक ड्राम, वाईन गलासभर पाणी यांत मिसळून प्रत्येक अर्ध्या आवरानें डोस द्यावा, ह्मणजे नाडी बेतावर येईल. एक तऱ्हेची पिशवी आहे ती नाकाला घालावी, त्यापासून नाकाच्या श्वासोच्छ्वासांत सुधारणा होईल. मानेला ब्यांडेज करावा ( गरम कपडा बांधावा ) व पुढें लिहिलेलें औषध दिवसांतून तीन वेळ द्यावें: इन्फ्युशन आफ् क्लि, दोन औंस; इन्फ्युशन आफ् इपिकाक्युना दोन औंस; इन्फ्युशन आफ् आकोनाईट अर्धा औंस; एक्सट्र्याक्ट आफ् बेलाडोना एक ड्राम; हे सर्व पदार्थ एक पिंटभर ऊन पाण्यांत चांगले मिश्रण करून वर लिहिल्याप्रमाणें तीन वेळ द्यावें. घोड्याचा बिछाना गवताचा जाड ( भरपूर ) करावा, घोड्यास चांगले हवेंत ठेवावें. गरम कपडे घालावेत, पायाला ब्यांडेज ( गरम पट्टा ) बांधावा. खाणें पातळ कण्हेरीसारखें करून द्यावें, चांगलें खाऊं लागला ह्मणजे दाणा नरम करून द्यावा; सुधारणा चांगली झाली ह्मणजे वशाला पोत द्यावें आणि ब्लिस्टर मारावें.

**रोअरिंग, व्हीझिंग, ग्रंटिंग, आणि ब्रोकन वुईन्ड.**

हे रोग होण्याचें कारण जेव्हां घोडा चांगल्या स्थितींत नसतो ( दुबळा असतो ) तेव्हां पुष्कळ काम घेतल्यानें, अथवा नेहमीं लगाम ठासून धरल्यानें, किंवा खाणें घालून लगेच काम घेतल्यानें उत्पन्न होतो.

**लक्षण**—ह्या रोगाचीं लक्षणें बहुतकरून मनुष्याच्या दमाच्या

रोगाच्या भावनेप्रमाणें होतात; गळा वाजतो; श्वासोश्वास जलद चालतात. अशीं या रोगाचीं लक्षणें होतात.

**इलाज**—पौडर नायटर एक औंस, क्यांफर दोन ड्राम, टार्टराईज्ड अंटिमनी दोन ड्राम, किंवा पौडर अनिसीडम्, आणि क्यारेसीडम् प्रत्येक एक औंस, डोअर्स पौडर दोन् ड्राम, बाल्सम ऑफ् सल्फर दोन औंस; येणेंप्रमाणें औषधांपैकीं बाल्सम ऑफ् सल्फर बारीक करून कोंबडीच्या अंड्यांतील बलकांत घोटावा. नंतर त्यांत वर लिहिलेलीं औषधें मिळवावींत. हें औषध ऊन कण्हेरी करून त्यांत द्यावें, व त्यांत थोडी काकवी दोन चमचे मिळवावी. रोज किंवा एक दिवसा आड रात्रीस तीन वेळ द्यावें. औषध दिल्यावर घोड्यास उष्ण भुसा द्यावा.

---

## चोकिंग.

हा रोग गळ्यांत एखादी वस्तु हवेच्या नळींत किंवा खाण्याचे नळींत आडकून उत्पन्न होतो.

**लक्षण**—हवेच्या नळींत कांहीं आडकलें असेल तर डोकें वर करितो, नाकांतून चिकट पाणी पडतें, डोळे मुजतात, चेहरा बदलतो, श्वासोश्वासांत आवाज होतो, मानेचे स्नायु आंखडतात, पुढचे पायांनीं लाथा मारितो, मागचे पाय झाडितो, खाण्याचे नळींत कांहीं आडकलें असेल तर घशाखालीं कांहीं उतरत नाहीं, नाकावाटे पाणी जातें; व नाकांतून चिकट पदार्थ निघतो, क्वचित् वेळीं श्वासांत आवाज होतो.

**इलाज**—जर प्यारिंगजेम ह्मणजे हवेच्या नळींत कांहीं गेलें असेल तर हात घालून काढून टाकावें, किंवा तेल अतपाव दरएक तासानीं पिण्यास द्यावें, जर गुलेट ह्मणजे खाण्याच्या नळींत गेलें असेल तर तेल पिण्यास देऊन हात फिरवावा, जर तेल उतरलें नाही तर प्रोब्र-

न नांवाचें हत्यार घालावें, जर हत्यार घालून तेल उतरलें नाहीं तर क्लोरोफार्म पिण्यास द्यावें, यानेंही न उतरेल तर मोठी एखादी वस्तु आडकली आहे असें समजून चिरून वस्तु काढावी. जर छातींत असेल तर तेल पिण्यास द्यावें किंवा प्रोब्रेन हत्यार घालावें, वस्तु खालीं गेली तर बरें, नाहींतर घोडा मरतो.

इलाज दुसरा—सल्फरीक आसीड दोन औंस, लाडनोम् दोन औंस व पाणी अर्धा पिंट हें एकत्र करून तेल पाजल्यानंतर अर्धे तासानीं द्यावें. या रोगास इंग्रजींत चोकिंग ह्मणतात. हा रोग गळ्यावर दाब बसल्यापासूनही होतो.

---

## शेंबा म्हणजे पडसें, वळगम आणि कफ यांवर उपचार.

१–सुंठ शेरभर, तूप चार शेर आणि चार शेर बकरीचें दूध हें एके ठिकाणीं करून विस्तवावर कढवावें. निमें राहिलें ह्मणजे, उतरून निवाल्यावर अर्धा शेरप्रमाणें दर रोज सकाळीं द्यावें.

२–अच्छेर आलें, विड्यांचीं पानें २०० दोनशें, पिंपळमूळ व पिंपळपान प्रत्येक आतपावप्रमाणें व बचनाग छटाक, गुगुळ छटाक, व पावशेर मध घेऊन त्यांत वर लिहिलेले जिन्नस बारीक करून घालावे. आणि त्यांत हरभऱ्याचें भाजलेलें पीठ घालून त्याच्या १४ चौदा गोळ्या कराव्या. आणि दररोज एक एक गोळी सकाळीं, व संध्याकाळीं द्यावी.

३–रूईचें फूल, आजवान पावशेर, पीठ पावशेर, गुगुळ अतपाव, लसूण पावशेर, गुळ पावशेर जुना, काळेमिरें पावशेर, हिंग४चार तोळे, राई पावशेर, वेळूचें फूल पावशेर,हें बारीक करूनएकत्र करावें.पिण्याचे दारूंत किंवा शिरक्यांत कढवून सकाळीं एक गोळा लिंबायेवढा बाजरीचे पिठांत घोड्यास चारावा. ७ सात दिवस पर्यंत.

---

४. पिंपळी अच्छेर व मिरे पावशेर, ह्या दोन जिनसा एकंदर कुटून पूड करून गुळांत घालून गोळ्या अजमासें लहान लिंबासारख्या कराव्या व दररोज एकप्रमाणें द्यावी.

५. हरभरे दोन टांक, छटाक हळद, व मेथ्या अतपाव, येणेंप्रमाणें जिनसा रात्रौ मनुष्याचे लघवींत भिजत घालून लागलीच दुसरे दिवशीं सकाळीं वाटून गोळे करून दररोज तितके सर्व चारावे, असें एकसारखें १४ चौदा दिवसपर्यंत चालवावें, ह्मणजे घोडी बरी होईल. लघवी खेरीज दुसऱ्यांत वाटूंनये.

६. रिंगणी बोंडें आणून भाजावीं, थोडीसी वाटून बारीक पूड करावी. व शेळीचें दूध छटाक—दुधांत पूड मिळवून घोड्याचे नाकांत दोन्ही नाकपुड्यांत ओतावी. परंतु हें औषध घोड्यास फारच सरदी असेल तर करावें.

७. सेंबा अथवा पडसें ( जुकाम ) हें झालें असतां घोड्याचे नाकांतून पाणी गळूं लागतें. त्यास उपचार—पिकलेलें डोरलें आणून त्याचा रस काढावा. हा रस व तिळाचें तेल एकत्र करून नाकांत घालावें. व सुंठ गूळ एकत्र करून पोटांत द्यावें.

८. गूळ, ओवा, वेखंड, सुंठ, व हळद, हीं प्रत्येक अर्धशेर आणि मिरे व गूळ पावशेर घेऊन निरनिराळीं कुटून एकत्र गुळांत करून १४ गोळे करावे. दररोज एक गोळा द्यावा.

९. अजमोदा छटाक, गूळ पावशेर, मटकीचें पीठ दोन पैसेभार, व भांग दोन तोळे, हीं सर्व एकत्र करून तिळाचे तेलांत मिळवून ती गोळी दोनपैसेभार प्रतिदिवशीं सकाळीं एक व संध्याकाळीं एक याप्रमाणें तीन दिवसपर्यंत द्यावी.

१०. कायफळ, लवंगा, नकसीमणीचीं पानें, रिंगणीचीं बोंडें ४ व तंबाखू हीं बारीक करून नाकांत घालावें.

११. गुग्गुळ सहापैसेभार, वांगें १ कोरून त्यांत घालावा, आणि

त्यास कणकेचा लेप करून, नंतर भाजावें. भाजल्यावर पिटांत चारावें. याप्रमाणें करून चार दिवस एक तास मालीस करावें.

१२. अजवान पावशेर, साबूण पावशेर, सज्जीखार पावशेर, काळे बिबवे पावशेर, खजूर पावशेर, गूळ पावशेर, सुंठ पावशेर, लसूण पावशेर, व गुग्गुळ पावशेर, हे एकत्र करून पिण्याचे दारूंत मिळवून गोळे करून संध्याकाळीं एक गोळा पावशेर वजनाचा देत जावा. सात दिवसपर्यंत करावें.

१३. म्हशीचें शेण तिच्याच मुतांत कालवून, खापरांत ऊनकरून ऊनऊन असतां मस्तक व तोंड शेकावें.

१४. गळ्यास किंवा गळ्याखालीं गांठी आल्यास त्यास सेंबा ह्मणतात. शस्त्रांनीं गांठी कापाव्या, किंवा गांठीस डाग द्यावा. राई पावशेर, हरभऱ्याचें पीठ भाजलेलें अतपाव, बचनाग पावशेर, व लसूण छटाक, हें सर्व बारीक करून बकरीचे दुधांत भाकर करावी. ती भाकर एक अंगानें भाजावी, दुसरे अंगानें भाजूंनये. सदर्हूप्रमाणें भाकर करून तीच तीन दिवस द्यावी.

१५. सिंगाडा—नाका तोंडांतून पिवळें पाणी पडतें, पाण्याचा फार सोस पडतो, गळा घरघर वाजतो, गळ्याखालीं गांठी येतात, गळा बंद होतो, आणि घांस खातांखातां तोंडांतून टाकतो, अशीं लक्षणें होतात. त्यास उपाय—शेराच्या किंवा चौधारी निवडुंगाच्या कांड्या (देंठ) आणून त्या तापवून त्यांणीं गळा शेकावा. आणि त्याचे रसाचा गळ्यास लेप करावा. अगर सरसून ( राई ) ०००९, हळद ०००९, लसूण०००९, शेवग्याचे मुळीची साल००॥, व सेंधेलोण०००९ हे सर्व समभाग घेऊन निर्गुंडीचे रसांत वाटून खापरांत घालून ऊन करावें. व ह्याचा लेप घोड्याचे गळ्यास करावा. दुसरे दिवशीं धुऊन टाकावें. वर पुन्हा लेप करावा. असें चार दिवस करावें. व टाकळीचा पाला ००॥, लसूण ००॥, ओंवा ००॥, सुंठ ००॥, पिंपळमूळ

अगर पिंपळी ८८८९, व वेखंड ८८८९ हे सर्व समभाग घेऊन पूड करून तुपांत कालवून घोड्याला चारावे. सतकपर्यंत द्यावें. जर गळ्यांतील गांठी आंतून फुटतील तर साध्य व बाहेरून फुटतील तर असाध्य लक्षण समजावें.

१६. पिण्याची दारू १ शेर व बाजरीचें पीठ १ शेर हें एकत्र करूने त्याच्या १४ गोळ्या कराव्या. आणि सकाळीं १ व संध्याकाळीं एक याप्रमाणें दररोज द्यावी.

१७. ब्राम–पाण्यांत असते; तिचीं पानें नरमूत्रांत भिजवून गरम करून शेकावें. आणि थंड झाल्यावर तेथें बांधावें.

---

## सेंब्याविषयीं.

गेरू अदपाव, लसूण अदपाव, लालमिरची अदपाव, भिलावे छटाक, अंबेहळद अदपाव, गूळ सात वर्षांचा जुना अदपाव, अक्कलकारा छटाक, सुंठ अदपाव हें सर्व बारीक करून पिण्याचे दारूंत कालवून छटाकाचा एकेक गोळा करून तो सायंकाळीं एक गोळा द्यावा.

शेंदे मीठ दोन तोळे, व हरभऱ्याचें पीठ पावशेर एकत्र करून पाण्यांत भाकर करण्यासारखें कालवून तव्यावर त्याची भाकर भाजावी. याप्रमाणें दररोज एक भाकर चार दिवसपर्यंत देत जावी. दररोज पाणी पाजण्याचें त एकवेळ पाण्यांत ओंवा टाकून तापवून पाजीत जावें.

---

## हुब्बक.

हुब्बक ह्मणजे हनवटीखालीं किंवा गळ्याखालीं गांठी होतात त्याजवर—गाईचें शेण त्यांत मीठ व सफेत जिरें घालून तें शेण तव्यावर किंवा खापरांत ऊन करून गांठीवर बांधावें आणि गांठी पि-

कल्यावर शस्त्रानें फोडून त्यांतील पू निचरूं द्यावा. नंतर औषध द्यावयाचें तें: सफेत जिरें, तांबड्या मिरच्या, बचनाग व गंधांची पानें हे सर्व जिन्नस सारखे वजनानें घेऊन शिरक्यामध्यें गोळी करून द्यावे.

खेचराची लीद गरम करून गांठीवर बांधावी..

बकरीचें दूध पावशेर त्यांत रिंगणीचीं दोन फळें बारीक करून त्याची भुकटी दुधांत घालावी. आणि तें दूध घोड्याचे नाकांत घालावें व त्या घोड्यावर बसून लागलेच पुष्कळ फिरवावें ह्मणजे नाकांतून सर्दी निघून जाईल. हें औषध हुब्बक व शेंबा याजवर आहे.

सुंठ वस्त्रगाळ, कित्रा गोंद म्हणजे डिंक, काडेचिराईत, इन्द्रावणीचें बीं, रिंगणीचीं पानें, व लसूण, यांपैकीं लसूण अच्छेर घेऊन बाकीचे जिन्नस प्रत्येक सम ( सारखे ) वजन घेऊन शिरका घालून मडक्यांत हे सर्व जिन्नस शिजवावे. थंड झाल्यावर घोडयास चारावे. त्याचें प्रमाण मोठे घोडयास पावशेर, व लहान घोडयास अदपाव याप्रमाणें सात दिवस द्यावें.

इंद्रजव, वावाडिंग, बच, रुईचीं पानें, बेलाची साल, कबुतराची विष्ठा वाळलेली, नऊटांक नरमूत्रांत घालून कढवावें. घोडयास मालीस करून हुब्बक झाला असेल त्या ठिकाणीं बांधावें. हें चार दिवसपर्यंत करावें.

निळे रंगाचा कपडा घेऊन त्याचा कांकडा करून जाळावा व त्याचा धूर नाकांत द्यावा.

फटकी तोळे दोन, सुहागी तोळे दोन, काळीं मिरीं तोळे दोन, व मांस तोळे दोन बारीक करून त्याची गोळी करावी व ती प्रत्येक गोळी पांच तोळे वजनाची करावी. आणि सकाळीं एक गोळी देत जावी म्हणजे तीन चार दिवसांत रोग दूर होईल.

जैतूनचें झाड आहे त्याचें फळ, गुग्गुळ, व म्हशीचें शेण

एकत्र करून गरम करून शिजवणें; तें तव्यावर किंवा खापराबर शिजवावें आणि हुब्बक झाला असेल त्या ठिकाणावर तीन दिवसपर्यंत बांधावें.

कस्तुरी मासे दोन, कायफळ मासे दोन, व तमाखू मासे तीन हें एकत्र करून बारीक करावें आणि ती पूड घोडयाचे नाकांत तपकिरी सारखी घालावी.

---

## शिंगाडा.

शिंगाडा, शेंबा, व हुब्बक, हे तिन्ही रोग सर्दीपासून आहेत. आणि हे एकसारखेच आहेत प्रथम शेंबा होतो तो बरा न झाला तों हुब्बक होतो व तिसऱ्यानें शिंगाडा होतो. त्यावर औषधः—

शेरभर दारू पिण्याची, पीठ हरभऱ्याचें दोन शेर त्यांत घालून चवदा गोळे बांधावे. संध्याकाळीं एक गोळी द्यावी ह्मणजे शिंगाडा जाईल. हें औषध चौदा दिवसपर्यंत द्यावें.

भिलाव्याचे तेलांत काळे हरभरे भाजून दोन तोळेप्रमाणें दररोज दाण्यांत देत जावे.

बकरीचें किंवा ह्मशीचें दूध दोन पैसेभार तापवून त्यांत रिंगणीचीं चार फळें बारीक कुटून त्या दुधांत मिळवून घोड्याचे नाकांत घालावें.

गाईचें दूध पावशेर, व मेण पावशेर गरम करून एकत्र मिळवून घोड्यास पाजावें. सदहू औषध याप्रमाणें सात दिवस द्यावें. हें औषध शिंगाड्यावर आहे.

रिंगणीचें झाड पान फळ फुल मूळमुद्दां बारीक करून सुकवावें. खाण्याचें मीठ पैसाभार, हिंग तोळा एक, अजवान अदपाव, लसूण अदपाव, व काळीं मिरें अदपाव हीं सर्व बारीक करून बाजरीचे पिठांत घोड्यास तीन दिवस द्यावें.

भिलावे दोन तीन घेऊन बारीक तुकडे करावे आणि बाजरीचे

पिठांत सात दिवस द्यावें: हें औषध दाणा रोजचा असेल तो दिल्या-नंतर द्यावें.

सागमाठ पाण्यांत गरम करून शिंगाड्यावर बांधावा.

शेवग्याचीं पानें तुपांत ऊन करून शिंगाड्यावर बांधावीं.

कुचला अदपाव व चिकणमाती नरमूत्रांत गरम करून शिंगाड्या-वर लेप करावा.

बकरीचें दूध नऊ टांक व लवंगा चार बारीक करून दुधांत मिळवून घोड्याचे नाकांत घालावें.

राई छटाक, लसूण कांदा एक, अजवान अर्धा पैसाभार, व कोंकणी मीठ अर्धा पैसाभार, हें बाजरीचे पिठांत घोड्यास खाण्यास द्यावें.

शिंगाड्याच्या गांठी शस्त्रानें कांपून त्यांत वावडिंग व स्पंज जाळून त्याची राख जखमेंत भरावी.

---

## मानेवर दर्द होतें, मान ताठते व फोड येतात त्याजवर उपचार.

१.—बेटकुळी घेऊन दर्दावर बांधावी, असें पांच ५ दिवस करावें. आणि डिकेमाली ८८८५ पांच टांक व रानांतील सरडा हे तेलांत घालून तें तेल कढवावें आणि त्याचा लेप दर्दावर करावा.

---

## गंडमाला (कलिकस).

घोड्याच्या गळ्याखालीं कानामागें दोन्हीकडे सूज येते व गांठी येतात आणि फुटतात. व त्यांतून लस वाहूं लागते. त्यास उपचार—सोनपडवळीचें मूळ, व कडू रानदोडकीचीं मुळें, हीं समभाग घेऊन चूर्ण करून तिळाचे तेलांत भिजवून पाताल यंत्रांत घालून त्याचें तेल काढावें. हें तेल गंडमालेस लावावें.

जवखार, सज्जीखार, लोणाखार, नवसागर, व सोरमीठ, हे जिन्नस आणावे. प्रथम त्या गाठींवरचे केंस काढून त्यावर कळीच्या चुन्याचा

लेप करावा चोळून आणि दुसरे दिवशीं चोळून गांठ मऊ करावी. त्यावर वर सांगितलेलें औषध वाटून लिंबाचे रसांत कालवून गांठीवर लावावें. तीन दिवसांत गांठ बरी होईल.

फटकी दोन पैसेभार भाजलेली, अदपाव मीठ, गूळ जुना अदपाव, व कांद्याचा रस अदपाव हें सर्व एके ठिकाणीं करून, गंडमालेवर लेप करावा. आणि थोडें ठोकावें. याप्रमाणें तीन दिवस लेप करावा. चौथे दिवशीं लेप धुऊन टाकावा.

घोडा दुबळा होऊन हनवटीखालीं किंवा गळ्याखालीं गांठी होतात. त्याला गुतुद म्हणतात. त्याजवर औषधें—गांठी शस्त्रानें चिराव्या. त्यांतून कांहीं रक्त जाऊं द्यावें. नंतर माजू व डाळिंबाचे फळाची साल बारीक करून जखमेंत भरावी म्हणजे रक्त बंद होईल. नंतर मेण व जंगला सारखे वजन करून घ्यावे. आणि शिजवून जैतुनचे तेलांत जखमेस लावावें.

माहाडूक झाडाचीं पानें व मीठ एक ठिकाणीं बारीक वाटून दरदावर बांधावें. तें दोनतीन दिवसपर्यंत सोडूं नये. तितक्यांत बरें न झाल्यास पुन्हा एकवेळ तसेंच करावें.

## ब्रॉंकाइटिज.

हा रोग नळींत इनफ्लमेशन म्हणजे गरम सूज आल्यानें किंवा इपिझोटिक किंवा इनफ्लुंझा म्हणजे एकास रोग झाला असतां त्यापासून दुसऱ्यास होतो. ही दर्द फार वाईट आहे. ह्या अजाराचा तीन दिवस फार जोर असतो. सात दिवसांत बरा होईल. बरा न झाल्यास घोडा मरून जाईल. व बारा दिवसपर्यंत तसाच अजारी राहिल्यास चांगला निरोगी होईल.

कारण. एकापासून दुसऱ्यास होतो व दुसरा आजार झाला असल्यास त्यापासून, अशा ह्या दोन कारणांनीं हा रोग उत्पन्न होतो.

लक्षणें:—ताप येतो. पल्स ह्मणजे नाडी कडक लहान किंवा तारे सारखी होते. दम फार मुषकिलीनें घेतो. श्वास पाहिला असतां गार हवेसारखा येईल. तोंड व नाक ह्यांचे पडदे लाल होतात. पूं वाहील. दाणा व चारा खात नाहीं. त्रास फार होईल. डोकें खालीं ठेवीत जाईल. जुलाब झाला तर म्युकस मेमरन हा पडदा बंद होतो.

इलाजः—चांगले हवाशीर तबेल्यांत आजार सुरू असतां ठेवावा. प्लस्टर मारावें. फोमेन्टेशन ह्मणजे गरम पाण्यानें शेकावें. ऊबदार झूल घालावी. गरम ब्यांडेज बांधावें. जुलाब जर होत नसेल तर नायट्रिक ईथर दोन औंस व दोन द्राम अर्ग्रोज मिळवून पाण्यांत द्यावें. जुलाब झाल्यास टिंकचर ओपियम एक औंस व नायट्रिक इथर दीड औंस पाणीं घालून द्यावें किंवा सेडेटिव्ह म्हणजे रक्त स्थिर वाहणारी आणि डायोरेटिक ह्मणजे मूत होणारी दवा द्यावी. नाहीं तर क्यालोमेल एक स्क्रुपल द्यावें. किंवा टिंकचर अकोनाइड द्यावें.

अखेर इलाज.—चांगला होईल किंवा मरून जाईल किंवा थिक् उइन्ड ह्मणजे म्यूकसमेमरन ह्मणजे पातळ पडदा करणारा जो पडदा तो मोठा होऊन हमेषा हरकत होईल.

अंजिराचें बीं, बकरीचें मूत, भिलावे, फटकी (तुरटी) काळा-खजूर, किंवा शिरका, ह्यांची गोळी करून द्यावी, किंवा, बेलफळाचा मगज व दहीं ह्या दोन्ही जिनसा मिळवून सकाळीं व संध्याकाळीं द्यावें.

---

## खांद्यावर गंडमाळा होतात त्यास उपाय.

गंडमाळा नारिंगाएवढ्या होतात त्या कापून त्याजवर औषध

लावणें ·तें कडू वृंदावन, मरू (कोरफड), व अंजीर हीं तिन्ही खलब-
त्त्यांत खलून मलमासारखें झाल्यावर त्यावर लावावें.

हा रोग खेंचरास फार होतो. त्याचे तंग आवळतात व खांदे तुटतात
ह्मणून गैरउपयोगी होतो व त्यावर ओझेंही फार लादतात. जखम
झालेल्या ठिकाणचें पाणी काढावें; नंतर मलम लावावें तें.—

१ डुकराची चर्बी साफ करून त्यांत जैतुनाचें तीन चार वर्षांचें
जुनें तेल मिळवावें; मग मुरदाडशिंग, व फटकी, सारखी घेऊन वस्त्रगा-
ळ करून त्यांत मिळवावी व चुलीवर ठेवून खजुरीचे झाडाची हिर-
वी डहाळी घेऊन तिनें हालवावें. डाहळी सुकल्यास नवी डाहळी
घ्यावी. औषध जमेपर्यंत हालवीत जावें. जमल्यावर जखमेवर चोळावें.

२ मेण, मुरदाडशिंग, गोंद सनावर (सुरू)झाडाचा, दूध सात तोळे,
व जंगला सर्व औषधांचा चवथा हिस्सा घेऊन वस्त्रगाळ करून
जैतुनाचे तेलांत कालवून चोळावें.

३ आळशी (जव), व मुरदाडशिंग हीं कुटून बारिक करावीं; दोहीं-
स शिजवावें व शिजतांना हलवीत जावें. मलमासारखें झाल्यावर
दर्दावर लावावें.

---

## खांद्याचें हाड मागें पुढें होतें त्यास उपाय.

१ शेलगमचें तेल व आळशीचें तेल दोन्ही एकत्र करून जखमे-
वर सात दिवस लावावें नंतर जैतूनचें तेल चवदा दिवस लावावें.
त्यानें बरें न झाल्यास चार गोल डाग द्यावे ते येणें प्रमाणें.

---

## लजला ह्मणजे छातींतील व खांद्यावरील जखम त्यांजवर उपचार.

१ लजला खांद्यावर मारल्यानें किंवा दगड मारल्यानें अगर त्या-
जवर कांहीं वजन पडून जखम होते व लंगडतो व तेणें करून घोडा
त्या जखमेवरचें कानडें मुकतें व चालवत नाहीं.

**उपचार.**—सलगमचें तेल आळशी किंवा गाईचें तूप जखमेवर चोळावें. कातडें सुकलें असल्यास तें चिरून मलई लावावी किंवा तेथील रक्त काढावें व त्याजवर तीन दिवस लावावें. तिळांचें तेल व शेंदूर किंवा शिरका केस येईपर्यंत लावावा.॰

खांद्याचें मांस कापलें किंवा नाळ पडली तर किंवा फार मार लागल्यानें किंवा ओझें फार घातलें तर, किंवा सक्त स्वारीपासून प्रथम कांहीं वेळानीं गंडमाळेसारखे फोड येतात. कडू इंद्रावण, व कोरफड दोन्हीं बरावर घेऊन शिरक्यांत घालावीं. वतें माजूम अदमासानें घालून लावावें.

१ गुडघी होते ती मागील पायांत दर्द होतें. गुडघ्यावर दर्द न होतां तेथील मांस नरम होतें. त्यावर फोड येतात त्यावर उपचार-गुग्गूळ तोळा एक, हिंग तोळा एक, सोमल एक तोळा, कुचला अर्धा तोळा, बोळ(यलव) किंवा कोरफड एक तोळा, व सोहागी एक तोळा हीं सर्व बारीक करून लिंबाचे रसांत कालवावीं. जेथें दर्द असेल तेथील केंस काढवून त्यावर लेप द्यावे, नंतर चार पदरी कपड्यावरून शेकावें, बरें होईल. ही दवा बरबला आजारावरही लावावी व शेकावें.

चिंचेच्या रसांत गुग्गूळ घालावा, नंतर मीठ टाकावें. कढवावें व दर्द असेल तेथें पांच रोज लेप करावा.

२ कोंबडीचे अंड्यांतील सफेद बलक व कळीचा चुना त्यांत पाणी नसावें, एरंड्याचें बी साल काढून पांढरे गोळे करावे. मध व शेंदूर हें सर्व चोळावें. त्याचा लेप घोड्यास करावा. थोडें थोडें शेकावें. याप्रमाणें तीन रोज करावें, बरें होईल.

३ मैदालकडी चार मासे, सोहागी चार मासे, लसूण अर्धा पैसा भार, गेरू तीन मासे, लिंबें २०, सर्व जिनसा लिंबाचे रसांत घालून खलाव्या, त्याचा लेप दर्दावर घालावा, थोडें थोडें शेकावें अनुभवीक आहे.

४ शेराच्या चिकाच्या डाहाळ्या मूठभर पिकल्या आणाव्या, त्यांत कांहीं मीठ घालावें. कपडबंद करून शिजवावें. मग मध्यम गरम

करून घोड्याचे गुढघ्यावर बांधावें. याप्रमाणें चार दिवस करावें. अनुभव आहे. गुढघ्यास पन्नास जळवा दोन रोज लावाव्या.

## छातीचा दोन प्रकारचा दर्द.

१ खुलल व २ सरेसिना.

१ खुलल.—घोडा आंखडतो, छाती वर करीत नाहीं,छातींत दब खातो, छातींतून पिंवळें पाणी निघतें, मानेच्या शिरा आखडतात.

ईलाज.—त्याला कापून कातडें काढावें. परंतु काळजा जवळचे शिरेस फार जपावें नाहीं तर घोडा मरेल. मग जखमेवर डाग द्यावा. डाग दिल्यावर तीन रोज औषध करवूं नये. नंतर सुरूच्या झाडाच्या चिकाचें तेल काढून व राळ दोन्ही मिळवून दर्दावर लेप करावा. डाग खालीं लिहिल्याप्रमाणें द्यावे.

## शिनाबंद खांद्यावर होतो त्रास.

मेंडफळ दाणे १४ चौदा बारीक कुटून नरमूत्रांत भिजवून दंवांत रात्रभर ठेवावे. सकाळीं उडदाचें पीठ, व चण्याचें पीठ, सुमारानें घेऊन त्यांत घोड्यास खाण्यास तीन दिवस द्यावे. बरें होईल. वर लेप करावा. तेणेंकरून पाय लंगडणें व छातीचें दर्द दूर होईल.

उपचार—कोरफड, गेरू, व एरंडीचें तेल एकेजागीं करावें. छातीवर किंवा सांध्यावर चोळावें. लेप करावा. त्याची चाकरी पुष्कळ करावी. शेकावें. लेप सुकेपर्यंत तीन रोजपर्यंत करीत जावें. नंतर फोड होतात ते नरम होतील. अर्धे शेर किंवा पावशेर एरंड्यांचें बीं शिजवून तें लोण्याप्रमाणें वाटावें मग चवथा हिस्सा दहीं कपड्यांत घालून पाणी काढावें. दोन्ही एकत्र करून दर्दाचे ठिकाणीं लेप करावा. थोडें थोडें शेकावें, उन्हांत बांधावें, फोड कापावे, दुसरे तिसरे दिवसपर्यंत तसा क्रम ठेवावा. दहा दिवसांत ववड्या-

वर केश येतील. १ मीठ खाण्याचें, बारीक करून अंजनासारखें करावें. व त्यांत लोणी टाकून दर्दावर चोळावें. चमडा ( कातडें ) निघाल्यास करावें. अनुभव आहे.

१ घोडा लंगडतो, छातींत दर्द होतें, त्यांस खालीं लिहिलेला मसाला खाण्यास द्यावा.

अंबेहळद, गुग्गूळ, साबूण, गेरू, हलवन, भाजलेली फटकी; गूळ तीन वर्षांचा जुना एक शेर, भिळावें पावशेर, भाजल्या सुहागीचें तेल चार तोळे, जंगळा भाजून त्याची राख चार मासे, हें सर्व बारीक करून घोड्यास अगोदर पाणी पाजून नंतर ह्या औषधांचा पावशेराचा एकेक गोळा करून सकाळीं एक व संध्याकाळीं दाणा खाल्यावर एक याप्रमाणें तीन दिवस द्यावा व लेप करावा तो याप्रमाणें:— कोंबडीचीं अंडीं पंचवीस, लिंबें पंचवीस, कोरफड तोळे २ दोन, उडदाचा आटा ( सहा बिलुनी ) कुळथी तितकीच, एरंड्याचें तेल सहा ( बिलुनी ) गाईचें तूप सहा ( बिलुनी ) तिळाचें तेल सहा ( बिलुनी ) हळद सहा ( बिलोनी ) वाघाटी झाडाच्या पानांचा रस सहा ( बिलुनी ) व नरमूत्र दोन शेर कढवून सर्व जिनसा बारीक करून त्यांत मिळवाव्या. तीन चार मनुष्यांकडून घोड्यास मालीस करावें.

---

## घोडा लंगडतो व छातींत दर्द होतें त्यावर उपाय.

काळ्या मिरच्या तोळे एकवीस २१, गुग्गूळ तोळे एकवीस २१ अंबेहळद एकवीस तोळे २१, व गूळ ३ वर्षांचा जुना, हीं सर्व बारीक करून गुळांत एकेक तोळ्याची गोळी करून सकाळीं दाण्याचे अगोदर एक गोळी द्यावी. अनुभव आहे.

१ एरंड्याचें तेल, कायफळ तोळे ४, गेरू तोळे ४, अफू तोळा १, वेखंड एक तोळा १, लसूण तोळे दोन. अळित्याची पोथी १

हीं सर्व एरंड्याचे तेलांत मिळवून बाटलींत भरून ठेवावें. त्यापैकीं दोन पैसेभार घेऊन घोड्याचे छातीवर मालीस करून पट्टी लावावी. नऊ दिवस किंवा तीन दिवस लेप करावा. अनुभव आहे. १ वाघोटीचीं पानें आणून एक शेरभर रस काढावा. तूप छटाक, तिळाचें तेल छटाक,एरंडीचें तेल आतपाव.दहीं चक्का एक शेर,गेरू पावशेर, हळवनी छटाक, कोंबडीचीं अंडीं सात. अंबेहळद छटाक, मैदा लकडी छटाक, जपाळाच्या बिया ३ तीन, हीं सर्व बारिक करून वाघोटीचे रसांत दहीं व तूप मिळवून गंधाप्रमाणें करून छातीवर लेप करावा परंतु त्यांपैकीं कांहींचें शेष घेऊन छातीवर दोन तासपर्यंत चोळावें. नंतर लेप करावा. तो तीन दिवसपर्यंत रोज शेकीत जावें. तीन दिवस झाल्यावर नीळ बारीक करून छातीवर चोळावी. नंतर ऊन पाण्यानें घोडा धुवावा. नंतर मसाला खाण्यास द्यावा. मसाला अगोदर करून ठेवावा.

अंबेहळद, साबूण, गुग्गूळ, बिबवे फटकी भाजलेली, गेरू, सवागी, गूळ तीन वर्षांचा जुना. सर्व बारीक करून गूळ मिळवून आतपाव सकाळीं पाणी पाजण्यापूर्वीं दोन रोज द्यावें किंवा सात रोज द्यावें. अनुभव आहे.

बुराणोदीन सवदागर यांणीं औषध केलें असे.

१ दररोज फटकी छटाक, बदाम पांच बारीक करून घोड्यास देणें. घोड्यास तूप पूर्वींच चारावें. नंतर फटकी व बदाम पांच दिवस द्यावें. लेप करावा तो खालीं दिल्याप्रमाणें. अनुभविक आहे.

१ राई पावशेर बिलाव छटाक, साबण पावशेर, रक्तबोळ तोळे २ दोन, लसूण चार पैसेभार, वाघाटीचा रस व अंतरवेलाचा रस छटाक,पांढरी साखर अर्धशेर,व एरंडीचें वीं तिळाचे तेलांत टाकून बारीक करावें.नंतर छातीवर मालीस करावें.नंतर लेप करावा. शेक करावा.तो लेप सुका होईपर्यंत तीन दिवस करावा.अनुभव आहे.

१ हाळद अर्धशेर, हलवन पावशेर, साबूण पावशेर, हळद व हळवन बारीक करून साबूण सुरीनें कापून एकत्रकरून त्यापैकीं चार पैसेभार घेऊन तो गुळा बरोबर द्यावा. गूळ अर्धाशेर, हें औषध दाणा-देण्याचे अगोदर द्यावें. लेप करावा तो, गुळी, संभाळूचीं पानें, रुईचीं पानें, तरवडाची पानें, उडदाचें पीठ पावशेर, एलवा छटाक, मीठ पावशेर व सेंदेमीठ पावशेर यांना ऊन करून लेप करावा. अनुभविक आहे.

१ साबूण पावशेर, फटकी पावशेर, एकशे एकवीस पानें विड्यांची, अफू एक तोळा, गूळ तीनवर्षांचा पावशेर, सर्व बारीक करून तीन गोळ्या कराव्या. सकाळीं एकेक गोळी द्यावी. तीन दिवस ऊन पाण्यांत धुवावें. कपडा ठेवून ऊन पाण्यानें शेकावें. छातीवर तिळाचें तेल व गेरू याचें मालीस करावें नंतर खाण्यास द्यावें अनुभविक आहे.

---

## घोडा थकला व छातींत दर्द झाल्यास.

१ निळा तोता (जंगला) २ तोळे, कोरफड अर्धशेर, गाईचें तूप पावशेर, व निळाथुरी हे बारीक करून कोरफडीचे रसांत एकत्र करावें. व लेप करावा तो.

गव्हांचा आटा दोन शेर, व गूळ तीन वर्षांचा, हे सर्व निरनिराळे पाण्यांत कालवून शिरा करावा. नंतर तिन्हीं एकत्र करावीं. आणि त्यांनीं छातीवर मालीस करून लेप करावा. तीन दिवसपर्यंत लेप करावा नंतर ऊन पाण्यानीं धुवावें पाणी ऊन करते वेळीं त्यांत आल झाडाचें लांकूड टाकावें व गरम पाणी करून त्यानें धुवावे. अनुभव आहे.

१ तिळाचें तेल, व तूप, एरंडीचें तेल. प्रत्येक सहा पैसेभार घेऊन मालीस करावें. दुसरे दिवशीं गूळ दोन पैसेभार. जेपाळ ५ पांचबिया तेलांत गंधासारखें छातीवर व खांद्यावर चोळावें. तिसरे दिवशीं गरम पाण्यानें धुवावें. नंतर हळद व तूप एकत्रकरून खांद्यावर व

छातीवर चोळावी नंतर थंड पाण्यानें तीन वेळ त्याच जागेस धुवावें. अनुभव आहे.

---

## घोडा लंगडतो व छातींत दर्द होतें त्यावर उपचार.

१ राई पावशेर, पांढरी साखर पावशेर, एरंडीच्या बीचा मगज आतपाव, हें सर्व बारीक करून ( उखळांत कुटून ) साखर व राई एकत्र करून पाणी घालावें. तें दोन घटका मालीस करावें. नंतर एरंडीचा बारीक मगज त्यांत टाकून एक घटका मालीस करावें. ज्या पायांनीं घोडा लंगडतो त्या पायांसही मालीस करावें. मालीस करतांना औषधाचे दोन हिस्से करावे. एक हिस्सा लेप करावा. व विस्तवानें दोन घटका शेकावें. तीन दिवसपर्यंत करीत जावें व दुसरा हिस्सा मालीस करावा.

१ साबण आतपाव, भिलाव्याचें तेल दोन तोळे, दोन्ही एकत्र करून मालीस करावें. व त्याचाच लेप करावा. व विस्तवानें शेकावें दोन चार रोज असें करावें. अनुभव आहे. तीन रोज झाल्यावर मग घोड्यास धुवावें व खालीं लिहिलेला मसाला खाण्यास द्यावा.

१ हिंग एक तोळा, गुग्गूळ एक तोळा, लसूण छटाक, काळीमिरें अर्धा तोळा, हळद आतपाव, गूळ पावशेर, हें सर्व बारीक करून गुळांत मिळवून चार गोळ्या कराव्या. त्यापैकीं एक गोळी धुतल्यावर द्यावी. दुसरी रात्रीस, तिसरी सकाळीं दाण्याचें पूर्वीं, चवथी पुन्हा रात्रीं. घोड्यास धुतल्यावर गरम जागीं बांधावें व त्यावर झूल घालावी. अनुभव आहे.

१ अजवन पावशेर, सुंठ पावशेर, काळीमिरें पावशेर, साबण पावशेर, मायफळाची साल कच्ची पावशेर, गूळ पावशेर तीन वर्षांचा, साहागीचें बीं पावशेर, हीं सर्व बारीक करून गोळी आतपावाची करावी. सकाळीं आतपाव व रात्रीं ( संध्याकाळीं ) आतपाव.

याप्रमाणें सात दिवस पावशेर घोड्यास द्यावें. गोपाळदास मुंबईकर यांणीं अनुभव घेतला आहे.

---

## छातीवर फोड होतात त्यावर किंवा कोणत्याही जागीं फोड झाल्यास उपाय.

वेखंड अतपाव, एलव छटाक, हिंग दोन तोळे, गुग्गूळ छटाक, कोळिंजन छटाक, पिंपळमूळ छटाक, चिराईत छटाक, वावाडिंगें छटाक, पळसपापडा छटाक, अजवान खुरासनी छटाक, सुंठ छटाक, कुटकी छटाक, काळींमिरें छटाक, मालकांगोणी छटाक, इंद्रजव छटाक, लवंग दोन तोळे, अकलकारा छटाक, असगंध छटाक, राई छटाक, मुरूडफळ छटाक, खाण्याचा अजवन छटाक, कुचला वीस, तेलिया सोहागी भाजलेली दोन तोळे, भिळावे वीस, जंगला भाजलेला तीन मासे, आल्याचे रसांत मिळवावें व निला तोता एकत्र करून ठेवावें. किरमाणी ओवा छटाक, काळींजिरें, छटाक अंबेहळद छटाक, जायफळ चार तोळे, समुद्रफेन छटाक, सज्जीखार छटाक, भाजलेला बदाम छटाक, ऊद तोळे चार, अजमोदा छटाक, बाळहिरडे दळ मोनामुखी मिळून अतपाव. बाहव्याची शेंग ( अमलतासाची साल ) तोळे चार, गेरू छटाक, नरकचूर छटाक, चोख तोळा एक, बांगडखार चार तोळे, जवखार चार तोळे, हिरडा बेहडादळ अतपाव, रिंगणी छटाक हे सर्व जिन्नस बारीक करून कच्चा पावशेर ह्मणजे सत्तावीस तोळे घेऊन दारूंत किंवा द्राक्षाचे शिरक्यांत गोळी बांधून घोड्यास सकाळीं एक द्यावी व संध्याकाळीं एक द्यावी. प्रत्येक गोळी पावशेर ह्मणजे सत्तावीस भार करावी. दाणा घोड्यास देवूं नये. एक कोन्यांत गरम जागेंत बांधावें. अंगावर झूल घालावी. सर्व रोग जातील. अनुभव आहे.

कुटकी सात तोळे, पिंपळमूळ सात तोळे, एक तोळा हिंग, बारीक करून

दारू पावशेर मिळवून घोड्यास द्यावी. तीन दिवस दोन वेळां द्यावी. अजमोदा बाजरीचे पिठांत घोड्यास द्यावा. प्रथम सकाळीं एक अजमूद व संध्याकाळीं एक अजमूद याप्रमाणें द्यावी. अगोदर फोड कापून रक्त काढून टाकल्यानंतर सदर्हू औषध द्यावें.

१ हिंग तोळा एक, सोहागी भाजली तोळा एक, अफू तीन मासे सर्व एक ठिकाणीं करून चार गोळ्या कराव्या. एक सकाळीं व दुसरी संध्याकाळीं दोन दिवस द्यावीं.

१ हळद शेर १ एक, साबूण शेर १ एक, गुग्गुळ शेर १ एक, लसूण शेर एक, काळजिरे १ शेर एक, गुळ शेर १ एक, रुईचे झाडाचीं पानें पन्नास पिकलेलीं हीं सर्व बारीक करून गुळामध्यें ३ गोळ्या कराव्या व खाण्यास द्याव्या. अनुभव आहे.

२ साबूण अतपाव, गूळ जुना अतपाव, गुगूळ अतपाव, गुग्ळी अतपाव, फटकी भाजली अतपाव, अफू तोळे दोन, व सज्जीखार काळा छटाक भाजला, हीं सर्व बारीक करून सावलींत सुकवावीं. पाण्यांत साबूण वगैरे मिळवून रुईचीं शंभर पानें तयार ठेवून लिंबाएवढी गोळी करावी. सकाळीं व संध्याकाळीं एक एक गोळी द्यावी. गरम पाणी पिण्यास एक वेळ द्यावें. अनुभव आहे.

३ अफू एक तोळा, हिंग दोन तोळे, सोहागी दोन तोळे, काळीं-मिरें एक शेर, पिंपळमूळ अतपाव, व गूळ जुना हीं सर्व बारीक करून गुळांत गोळ्या कराव्या. सकाळीं व संध्याकाळीं एकेक द्यावी. ऊन पाणी एक वेळ द्यावें. अनुभव आहे.

४ सज्जीखार अर्धाशेर, हळद अर्धाशेर, गेरू पावशेर, हीं सर्व बारीक करून सात गोळ्या, एक दिवशीं एक गोळी द्यावी. अनुभव आहे.

५ धत्तूर पिवळा झाडा सुद्धां घ्यावा. बांगडखार एक तोळा बारीक करून धोतऱ्याचे पावशेर रसांत मिळवून घोड्यास पाजावा. अनुभव फार आहे.

६ सुंठ पावशेर, काळीमिरें पावशेर, पिंपळी व पिंपळमूळ पावशेर, माळकांगोणी छटाक, अक्कलकारा छटाक, नागोरी इसगंध,छटाक, लवंग छटाक, जेष्ठमध तीन तोळे, कायफळ छटाक,मध चांगली अर्धशेर, व विड्याचीं पानें एकशेंवीस हें सर्व बारीक एकत्र करावें.अतपाव दर वेळेस सकाळीं व संध्याकाळी खाण्यास देणें.

७ मीठ खाण्याचें पावशेर, हळद पावशेर, व गुग्गुळ पावशेर हीं तिन्हीं बारीक करून एक गोळी करावी. आणि घोड्यास एकवेळ द्यावी. याप्रमाणें तीन दिवस करावें. अनुभव आहे.

८ जंगल्या एक तोळा, बारीक करून गव्हांच्या दोन भाकरींत शिजवून ह्मणजे भाजून घोड्यास खाण्यास द्यावा. एक दिवसपर्यंत.

९ बेखंद एक तोळा, हिंग एक तोळा, गुग्गुळ एक तोळा, आणि कानेफळ एक तोळा,शुवर (शेराच्या डिगऱ्या)एक तोळा,खोबरें तोळा एक. सर्व बारीक करून जंगलीबोरा एवढ्या गोळ्या कराव्या. एक गोळी कांद्यात ठेवून तो कांदा वर गव्हांचा आटा(पीठ) लावून विस्तवामध्यें भाजावा. आणि तो ऊन दुधांत घोड्यास सकाळीं चारावा.

घोड्यास गरमी झाली तर कापूर तोळे २, सोरा एक मासा,व सुंठ अतपाव हें बारीक करून पावशेर दह्यामध्यें मिळवून घोड्यास देणें.

## छातीवर किंवा सर्व शरीरावर फोड येतात.

शरीर आंखडतें, दाणा घास खाववत नाहीं, वायूनें बिमार होतो, त्यास उपाय—सुंठ पावशेर, तांबड्या मिरच्या पावशेर, काळीं मिरें पावशेर, कुटकी पावशेर,सोहागीखडीया अतपाव,फटकी अतपाव भाजलेली, जायफळ अतपाव, लवंगा अतपाव, सज्जिखार अतपाव, आंबेहळद अतपाव, नरकचूरा अतपाव, मालकांगोणी अतपाव, लसूण एकशेर, गूळ जुना अर्धशेर, व विड्याचीं पिकलीं पानें एकशें पंचवीस. हीं सर्व बारीक करून दारूंत मिळवून मग विड्याचीं

पानें मिळवावीं. सकाळी पावशेर व संध्याकाळीं छटाक गोळा द्यावा. एकवेळ गरमपाणी द्यावें. परंतु कमी द्यावें. पाणी न दिलें तर फारच उत्तम आहे.

१ ऊद उत्तम एक तोळा, बारिक करून दारूंत किंवा शिरक्यांत गोळ्या होण्यापुरता टाकावा. नंतर घोड्याच्या मांड्या चोळाव्या व त्यावर डागही द्यावे. ते डाग दोन किंवा चार द्यावे.

## शूळाविषयीं.

शूळ २९ प्रकारचे आहेत. त्यांचीं नांवें व त्यांजवर उपचार खालीं लिहिल्याप्रमाणें.

### पारकिडाशूळ.

हा शूळ असा समजावा की, पंधरा दिवस किंवा एक महिना पोटांत किडा होतो. त्यास उपाय—खमखमीचीं बोंडें, पळसाचें बीं, बाळओंवा, हें प्रत्येक ९ टांक घेऊन गुळांत कालवून ३ दिवस चारावें.

२–पळसबीज ००० ९ व चोखावा ०००९ हीं दोन्हीं औषधें एकत्र करून चूर्ण करावें आणि गुळांत द्यावें.

३–हिंग ०००९, पळसबीज ०००९, वावडिंग ०००९, हीं औषधें एकत्र करून सौंदनीचे पाण्यांत द्यावीं.

### कोलंज.

१ आतड्यांत वायू बंद होतो. त्यामुळें पोटांत मुरडनें, लीद व मूत्र बंद होतें. त्यावर इलाज.

हिंगाची पूड करून पाणी घालून कढवावी. थोडी दारू टाकावी. व साबूण व खारीक घालावी. घोड्यास पाजावें.

दुसरा प्रकार.—घोड्याचें पोट फुगतें व गुडगुड होतें. हातपाय सुकतात. जमिनीवर पडल्यावर उठूं शकत नाहीं. सर्व शरीर कांपतें. त्यावर.-सुंठ बारीक करून डोळ्यांत घाळावी. आणि सुंठ, पिंपळी, गेरू, अजवान, व चित्रकसाल प्रत्येक तीन टांक द्यावें. कण्हेर झाडाचीं पानें सहापैसे भार, दगडी मीठ, सालन मीठ, काळें मीठ, काखांचे मीठ, व खाण्याचें मीठ दोनदोन पैसेभार बारीक करूंन वस्त्रगाळ करावें. मग गुळाचे दारूंत एकत्र करावें. आणि घोड्यास द्यावें. किती द्यावें हें लिहिलें नाहीं. दारू एक शेर नंतर पाजावी. दारू न मिळाली तर दोन शेर शिरका द्यावा. अनुभव आहे.

तिसरा प्रकार.—मूत व लीद लवकर होत नाहीं, बहुतकरून बंद होतें, पोटांत आवाज होतो, घोडा बेहोष होतो व दुबळा होतो. बेंबीवर व पोटाखालीं डाग द्यावे. डागानें हुशार न झाल्यास मरेल.

उपचार.-नागरमोथ्याचीं मुळें,वावडिंग,गेरू,हिंग,सुंठ, पिंपळपानें, व पिंपळी,प्रत्येक चार पैसेभार घेऊन बारीक वस्त्रगाळ करून गुळाची दारू १ शेर घेऊन द्यावें. कांहीं दिवसांनीं बरें होईल. अनुभव आहे.

दुसरा उपचार.—मेथी पावशेर, कुटकी अतपाव, खारीक अतपाव बियांसुद्धां, मध पावशेर, कोष्टकोळिंजन दोन तोळे, इसबंद नागोरी एक तोळा, हिराहिंग एक तोळा, गुग्गुळ एक तोळा, हालवान एक तोळा, राई एक तोळा, सुंठ एक तोळा, मिरें काळीं एक तोळा, अजवान खुरासणी अतपाव, खाण्याचें अजवान अतपाव, प्रत्येक निराळें बारीक करून मध मिळवून चवदा गोळ्या कराव्या. दरदिवशीं दाणा दिल्यावर एक गोळी द्यावी. अनुभव आहे.

अतिसार—ह्मणजे घोड्याचें पोट नेहमीं मऊ असतें. त्यास उपाय—पांढरा वाळा, बेलजी हरभऱ्याची डाळ, धणे हें सर्व बरोबर घेऊन एकत्र करून मडक्यांत पाणी घालून शिजवावें. आणि दह्यामध्यें सात दिवस चारावें. उपशमन होईल.

२ हिरडे, जिरे, मेथ्या, नेप्तीचे झाडाची साल, हे सर्व जिन्नस बरोबर घेऊन दह्यांत कालवून चारावे.

३ बाळवेल, धायटी फूल, प्रत्येक १८ टांक घेऊन वाटून दह्यांत काळवून द्यावें.

---

## पोटशूळास औषध.

तिंगडी ८८॥०, सिलारस ६ टांक, चित्रकमूळ ९ टांक, बिंद्रावनाचा बिल ८८।०, व उडदाचें पीठ ८८।० एकत्र करून रानबोराप्रमाणें गोळ्या कराव्या व गोळ्या सावलींत वाळवून लोटींत घालून ठेवाव्या. पोटशूळ जहाला तर दोन गोळ्या पोटांत द्याव्या ह्मणजे शूळ बरा होईल.

२–घोड्याचे पोटांत तिडका उठतात, ह्मणजे पोटांत दुखतें, त्या योगानें घोडा उठबस करितो, आणि पोट फुगतें, त्यास उपचार–तूप ९ टांक, व मिरपूड २॥। टांक, एकत्र करून पाजावें. ह्मणजे पोट दुखतांनां राहील.(२) येरंडमुळ्या शस्त्र न लावितां उपटाव्या, त्याची साल काढून दगडांनीं कुटून बाजरीचे पिठांत गोळा करून चारावा. (३) पिकलेलें वांगें, आगस्त्याची वाळलेली उसरी ( शेंग ), हिंग १ टाक, मीठ २॥ टांक, एकत्र करून चारावें.

---

## चित्रकशूळ.

पाठ व कंबर वांकडी होते, तिरपा चालतो.त्यास उपचार–बेहडा, आवळा, वेखंड, लसूण, हिरडे, निर्गुडी, टाकळी हीं प्रत्येक पावशेर पावशेरप्रमाणें घेऊन, पाणी घालून त्याचा रस काढावा. आणि हा रस पाठीस चोळावा. दोन्ही थोबाडांचे व पाठीचें रक्त काढावें. आणि उन्हांत बांधावें. मग वेखंड, सुंठ, पिंपळमूळ, हीं प्रत्येक ९ टांक, घेऊन चूर्ण करून तुपाबरोबर ७.सात दिवस द्यावें.

## मायाजवर्तशूळ.

घोडा दांडी फिरवितो,व जमिनीवर लोळतो, त्यास उपचार—भाजीचे मुळे आणून त्यांचा रस काढावा. त्यांत समुद्रफळ व गूळ कालवून चाटण द्यावें' तीन दिवसांत आराम पडेल.

---

## अंजनशूळ.

घोडा जमिनीवर पडतो, डोळे मिटलेले ठेवितो, त्यास उपाय-भुईनिंब अर्धाशेर घेऊन त्याची पूड करून चिंचेच्या रसांत मिळवून तीन दिवस द्यावी.

---

## वर्तशूळ.

घोडा जमिनीवर पडतो, मान लांब टाकतो, जमीन हुंगून बसतो, उभा राहतो, पुन्हा बसतो,अशीं लक्षणें असतात. त्यास उपाय—जुनी घोंगडी जाळून त्याची राख तूप व गूळ या बरोबर कालवून ३ दिवस द्यावी. शूळ बरा होईल.

---

## पाणीशूळ.

घोड्यास पुष्कळ दामटून आणून लागलेंच पाणी पाजितात. त्या योगानें पाणीशूळ उत्पन्न होतो. त्यामुळें पोटांत गडगडतें, बसून फार वेळ राहतो. बसला ह्मजणे पाय पसरतो. त्यास उपचार-सुंठ, मिरें, पिंपळी, लसूण, गजपिंपळी, वेखंड, सैंधव, हीं प्रत्येक नऊ नऊ टांक घेऊन, त्याचें चूर्ण करून गुळांत कालवून पोटांत द्यावें. (२) वरील औषधांत सांगितलेले सर्व जिन्नस घेऊन त्यांत वावडिंगें व ओंवा घालून गाईचें तूप पाऊणशेर घेऊन एकत्र करून तीन दिवस पोटांत द्यावें.

---

## नासावर्तशूळ.

घोडा नाकपुड्या ताणूं लागतो. उष्ण श्वासोच्छ्वास करितो, दोन्ही कुशींला हुका मारतो. व सर्व अंग वांकवितो. तेव्हां त्यास नासावर्तशूळ झाला असें समजावें. त्यास उपचार—पळसाचें बीं, किंवा बेलफळाचें बीं ९ टांक, शोपा ९ टांक, पिंपळी ९ टांक, अश्वगंध ९ टांक, वाळओंवा ९ टांक, हिंग २ टांक, महाळुंगांचा रस ४ टांक, हीं सर्व औषधें एकत्र करून व त्यांत ९ टांक गूळ घालून १ शेर तुपांत मिळवून, ३ दिवस पोटांत द्यावें.

---

## मूत्रावर्तशूळ.

मूत्र फार थोडें होतें किंवा अगदींच होत नाहीं, आपल्या भोंवतीं फिरतो, नमीन वारंवार हुंगतो, कुशींत दुखूं लागतें, अशीं लक्षणें होतात त्यास उपचार,—पिंपळी, गजपिंपळी, भुईनिंबाची साल, आणि लसूण हीं प्रत्येक नऊ नऊ टांकप्रमाणें घेऊन, एकत्रकरून तुपाबरोबर द्यावीं. ( २ ) तांबडी मिरची व गुळवेल हीं नऊ नऊ टांकप्रमाणें घेऊन, पूड करून १ शेर तुपांत तीन दिवस द्यावीं.

२—घोड्याचें मूत बंद होतें व तो जमिनीवर पडतो, दम टाकतो, उठतो, पुन्हा बसतो, त्यास उपचार.—मोहऱ्या व साबण वाटून घोड्याचे दांडीचे केंस घेऊन त्यावर चिरगुट गुंडाळून त्याची वात करावी. त्या वातीस सदरीं लिहिलेलें औषध लावून ती वात घोड्याचे शिस्नांत अगर घोडीचे योनींत घालावी. ह्मणजे बंद झालेलें मूत्र खुलें होईल.

---

## क्षुधावर्तशूळ.

वारंवार हिंसतो, जमिनीवर पाय हाणतो, कुशी मारतो, त्यास क्षुधावर्त ह्मणतात. त्यास उपचार.—पांगाऱ्याची साल, पळसाचें बीं,

मीठ, डोरलीचें बीं, कडसराचें बीं, सैंधव हीं प्रत्येक ९ टांकप्रमाणें घेऊन, तिळाचे तेलाबरोबर द्यावीं. किंवा १ शेर तुपांत३दिवस द्यावीं.

---

## वातोदरीशूळ.

घोडा वारंवार उठतो,बसतो,कुंथतो,ओठ व दांत जमिनीवर बळकटपणें टेंकतो व जोरानें दमे टाकतो, त्यास उपचार.—वेखंड, कोष्ट, पाषाणभेद, तीन्ही नऊ नऊ टांक, व दाती मुळाचा रस ६ टांक, तर्वटाचें मूळ व सैंधव ९ टांक, हीं एकत्र करून कांजीबरोबर द्यावीं.

---

## रक्तप्रमेहशूळ.

उराच्या शिरा काढल्या असतां जसें रक्त वाहतें, तसें रक्त घोड्याच्या नाकपुड्यांतून वाहातें. त्यास उपचार.—कांडळीच्या मुळीचा रस व गाईचें दूध अर्धे अर्धे शेर एकत्र करून अर्धे नाकांत घालावें व अर्धे पोटांत द्यावें. नंतर बोळ ९ टांक, तिळाचें तेल ९ टांक, घेऊन बोळाची पूड करावी, आणि दोन्ही एकत्र चारावीं.

## कृमिशूळ.

हा शूळ झाला असतां नाभी उडते, दांतांनीं आपली बेंबी धरतो, लाळ गाळतो, त्यास उपचार.—सुंठ, मिरे, पिंपळी, ओवा, पळसाचें बीं, वेखंड, कोष्टकोळींजन हीं प्रत्येक नऊ नऊ टांक, निर्गुडी ८८॥० गूळ ८८॥० हें सर्व एकत्र वाटून, २॥ शेर गुळांत कालवून गोळा करून द्यावें.

---

## स्नेहावर्तशूळ.

घोडा जमीनीवर पडून लोळतो, आणि हातपाय कांपवितों, पोट उडूं लागतें, तेव्हां त्यास स्नेहावर्त शूळ झाला असें समजावें.

त्यास उपचार.—लसूण, सैंधव, हिंगणमूळ, पळसाचें बीं, वालओंवा, हीं प्रत्येक ९ टांक, गूळ पावशेर, दहीं अच्छेर, सर्व एकत्रकरून ३ दिवस पोटांत द्यावें. ( २ ) हिंग ४ टांक, लसूण ९ टांक, गूळ पावशेर एकत्र करून ३ दिवस द्यावें.

---

## बिंबावर्तशूळ.

वारंवार भूमी हुंगतो, जमिनीवर पडतो, पुन्हा उठतो, पुन्हा जमिनीवर पडतो, अशीं लक्षणें होतात. त्यास उपचार.—रगत्याची राख, हिंग ९ टांक, पळसाचें बीं ९ टांक, चेनीचें पाणी, सेरीचें पाणी ( संवदणीचें पाणी ) १ शेर घेऊन त्यांत देणें. ३ दिवसांत बरें होईल.

## बिभ्रमशूळ.

घाडा अगदीं निचेष्ट राहातो, किंवा वारंवार अंग टाकतो, घोड्यास ताप येतो, उभा राहतो, काहीं खात नाहीं, पुन्हां पुन्हां उठतो; घोड्याचे अंगास तेल तूप समभाग घेऊन चोळावें. घोडा तीन दिवस उन्हांत बांधावा. आणि गूळ, ओंवा, सुंठ, हिरडे, हे प्रत्येक ९ टांक घेऊन चूर्ण करून, तुपांत कालवून पोटांत द्यावें. ( २ ) गूळ १ शेर, हाळद ९ टांक, ओंवा ९ टांक, सुंठ ९ टांक, हिरडे ९ टांक, काळी टाकळी अर्धा शेर, पांढरी टाकळी अर्धा शेर निर्गुडीचा पाला ०॥ याप्रमाणें घेऊन १ शेर तुपांत कालवून तीन दिवस पोटांत द्यावें. ( ३ )—गूळ, गाई ( मोहरी ) हाळद, लसूण, ओंवा, सुंठ हीं प्रत्येक ६ टांक घेऊन कुटून तुपांत द्यावीं.

---

## कामावर्तशूळ.

घोड्याचा गळा घर घर वाजतो व वरचेवर अंग टाकतो, त्यास उपचार-

पांगाऱ्याच्या मुळ्यांचा रस १ शेर, गोखरू मुळाचा रस १ शेर, गाईचें तापलेलें दूध १ शेर, सुंठ छटाक, व पिंपळी छटाक, एकत्र करून दर रोज दोन वेळ देत जावें. असें तीन दिवस करावें.

---

## कृशावर्तशूळ (शुक्लावर्त).

घोड्याचे तोंडांतून पिंवळें पाणी पडतें, अंगांतून घाम येतो व अंगांवरचे केश उभे राहतात, त्यास उपचार—अश्वगंधाची मुळी छटाक, पिंपळी, मिरें, सुंठ, व कोष्ठ प्रत्येक छटाक घेऊन एकत्र करून गाईचे दुधाशीं किंवा तुपाशीं ३ दिवस द्यावें.

## गळग्रही शूळ.

नाकांतून आणि तोंडांतून पिंवळें पाणी पडतें, पोटांत कांहीं वाजतें व अंग (गात्र) ताणतो, त्यास उपचार—खोडराची राख ३ टांक, संवदणीचें पाणी १ शेर, पळसाचें बीं ९ टांक व हिंग ४ टांक हीं एकत्र करून पोटांत द्यावीं. (२) दोन्ही कुशीच्या बाजूच्या चार व छातीच्या चार अशा शिरांचें रक्त काढावें; नंतर वेखंड १२ टांक व सुंठ छटाक, ह्याचें चूर्ण मद्यांत कालवून तीन दिवस द्यावें.

## वायुशूळ.

पोट फुगून अवरोध होतो, कुंथतो, मूत्र बंद होतें, व जोरानें दम टाकतो, त्यास वायुशूळ ह्मणतात. त्यास उपचार—रामयाची साली ९ टांक, वेखंड ९ टांक, सुंठ ९ टांक, दांतीचा रस पावशेर, हीं एकत्र करून गुळाबरोबर पोटांत द्यावीं. (२) पांगाऱ्याची साल, तरवटाची साल, वेखंड, सुंठ, हीं प्रत्येक ९ टांक, हिरडा ८ टांक, गूळ शेर १, तिळाचें तेल १ शेर एकत्र करून तीन दिवस द्यावें.

---

## रूक्षावर्त शूळ.

पुढल्या पायांनीं भूय खणतो, जमीन वारंवार हुंगतो, त्यास उपचार—सुंठ, मिरें, पिंपळी, वावडिंग, ओंवा, हीं प्रत्येक नऊ टांक, एकत्र करून गाईचें तूप ००॥।- घेऊन त्यांत कालवून ३ दिवस पोटांत द्यावें.

---

## रसावर्तशूळ.

घोडा आडवा पडतो, पोट गडगडतें, त्यास उपचार—उरावरील शिरांचें व मांड्यावरच्या शिरांचें तसेंच छातीवरच्या शिरांचें रक्त काढणें. मग ओंवा छटाक, हिरडे, जिरें, भुईतरवड, निंबाची साल, राळ, हीं प्रत्येक ९ टांक घेऊन एकत्र करून तुपांत किंवा १ शेर गुळांत कालवून तीन दिवस द्यावी.

---

## खडशूळ.

पोट फुगतें, अंग टाकतो, अवरोध होतो, पोट मऊ असतें, लीद केली तर पायांवर पडते व आपल्या कुशी पहातो, अशीं लक्षणें होतात. त्यास उपाय—कांटेशेंवरीची साल, आणि दातीचा रस, तेलांत घालून द्यावा. हिंगण्याची साल, वावडिंगें व पांगाऱ्याची साल, हीं प्रत्येक १२ टांक, हिंग ९ टांक, व गूळ एक शेर एकत्र करून चारावें. ह्यांत घोडा आपल्या कुशी पाहत नसेल तर उपाय करावा, पहात असल्यास असाध्य समजावें.

---

## अजीर्ण शूळ.

अतिसार होतो, वरचेवर अंग टाकतो व पोट मऊ असतें त्यास उपचार—हिंग, संचिचळ, वेखंड हीं प्रत्येक ९ टांक, आणि सुंठ, जायफळें हीं ६ टांक, एकत्र करून कांजीबरोबर द्यावीं. (२) वर सांगि-

तळेलीं औषधें घेऊन त्यांत पादेलोण, कचोरा, सैंधव नऊ नऊ टांक मिळून पोटांत द्यावें.

---

## सर्व प्रकारचे शूळांस औषध.

सैंधव, मविचळ, गंधबीड, मीठ, सुंठ, मिरें, ओंवा, पिंपळी, हिरडा, बेहडा, आवळकटी, दुर्लभा, कोष्ठ, वेखंड, वावडिंगें, भारंगी, हिंगणाची साल, पळसबीज, अर्कंद, रिंगणीमूळ, गुंजाच्या झाडाची साल, निर्गुडी, रानओंवा, हीं सर्व औषधें समभाग घेऊन वस्त्रगाळ चूर्ण करून, तूप किंवा गूळ अगर चिंचेचें बरबट ह्यांत कालवून दर रोज सकाळीं देत जावें. दोन सप्तकें दिलें असतां सर्व प्रकारचे शूळ जातील. ( २ ) सैंधव, ओंवा, कोष्ठ, वावडिंगें, लसूण, जमालगोटा, डोरली, गंधानचा पाला, पत्री, शेवग्याची साल, चित्रकमूळ, हीं सर्व औषधें प्रत्येकीं छटाक, व सुंठ, मिरें, पिंपळी, हिरडा, बेहडा, आवळकटी, भारंगी, कडुवृंदावन, सागरगोटा, सबजाचा पाला, भुईतरवड, कडुनिंबाचा पाला, हीं प्रत्येक २ टांक, आणि वेखंड ९ टांक, हीं सर्व औषधें कुटून एकत्र करून १ शेर गुळांत कालवून तीन दिवस द्यावीं. सर्व प्रकारचे शूळ जातील.

---

## निदाकणी रोग.

घोड्याला तहान लागत नाहीं, झोंप येत नाहीं, खात नाहीं, व सर्व अंग अगदीं कृश होतें त्यास उपाय–हिरड्याचे झाडाची साल, चित्रक, डोरलीचीं मुळें, जिरें, वेखंड, भुईतरवड, भुईनिंब, सैंधव, मीठ, सोरमीठ, हळद, निर्गुडी, ओंवा, सुंठ, पिंपळमूळ, पिंपळी, काडेचिराईत व माका, हे सर्व जिन्नस समभाग घेऊन पूड करून गुळांत कालवून सात दिवस द्यावें.

---

## वायाळ घोड्यास उपचार.

वातामुळें घोड्याच्यानें हालवत नाहीं, व चालतांना अंग हालत नाहीं. त्यास उपचार—गुग्गुळ पावशेर गूळ २९ शेर आणि हिरडे, बेहडे, आवळकटी, सुंठ, पिंपळी, इंद्रजव, पित्तपापडा, पिंपळमूळ, पळसाचें बीं, आंबेहाळद, चित्रक, पाहाडमूळ, हाळद, आजमोदा, भारंगी, कोष्ट, वेखंड, भद्रमोथा, बाफळी, कचोरा, सैंधव, कांच, संचळ, गंधबीड, मीठ, व अस्कंद, हीं सर्व प्रत्येकीं पावशेर प्रमाणें घेऊन एकत्र चूर्ण करावें. मग निर्गुडीचा व शेवग्याचा पाला, दोन दोन शेर किंवा त्यांची साल २ शेर घेऊन तीं सर्व मडक्यांत घालून दादरा बांधावा. त्या मडक्यांत अगोदर एक शेर पाणी घालावें. आणि मडकें चुलीवर ठेवावें. सर्व पाणी अटलें ह्मणजे चुलीवरून काढून त्यांतील औषधें तूप अगर गूळ याजबरोबर पोटांत एक सप्तक द्यावें.

घोडा लढाईंत जाऊन थकून आला, अगर उन्हांत स्वारीस अथवा घोडे घोडे एकमेक झोंबी लागून शिणले तर त्या योगानें शोषलेला दिसेल. आणि त्या योगानें चरवत नाहीं व कांहीं खाववत नाहीं, स्तब्ध राहतो. त्यास उपचार—पिंपळी, सुंठ, देवदार, पद्मकोष्ठ, हिरडे, आवळकटी, डाळिंबाची साल, जेष्ठमध, जवखार, खजूर, व द्राक्ष, ह्या सर्वांचें चूर्ण चिंचेच्या बरबटांत कालवून, द्यावें. (२) वेखंड, ओंवा, शोपा, धणे, पांढरें जीरें, हळद, मेथ्या, भारंगीच्या मुळीची साल, शेवतीचीं फुलें, कडू पडवळ, भद्रमोथा, व एरंडमूळ, हें सर्व दोनशेरप्रमाणें घेऊन, गाडग्यांत चार शेर पाणी घालून त्यांत सर्व औषधें घालावीं. त्याचा काढा चतुर्थांश उरवावा. त्या काढ्यांत १ तोळा पिंपळीची पूड घालावी. तो काढा द्यावा. घोडा चार दिवसांत बरा होईल.

---

## घोडा फार चरत नाहीं त्यास उपचार.

हिरडे, आजमोदा, ओंवा, लसूण, वेखंड, वावडिंगें, हिंग हळद, भांग, सैंधव, हीं सम भाग घेऊन चूर्ण करावें. अर्धा शेरप्रमाणें रोज द्यावें. असें दोन सप्तकें करावें. असें केलें असतां घोडा चरूं लागेल. (२) जोंधळ्याचा घाटा, भांग, व मीठ, सर्व समभाग मिळवून दोन मुठीप्रमाणें घेऊन अच्छेर गुळांत कालवून द्यावें.

---

## मंदाग्निशोष.

पाण्यावर मन नमतें, घोडा अगदीं कृश होतो, त्यास उपचार. हिरड्याची साल, चित्रक, डोरलीमूळ, जिरें, वेखंड, भुईनिंब, भुईतरवट, रिंगणीमूळ, सैंधव, संचळ, वावडिंग, हाळद, निर्गुडीचा पाला, ओंवा, सुंठ, पिंपळी, पिंपळमुळ, किराईत, व माका हीं सर्व तीन टांकप्रमाणें घेऊन, चूर्ण करून गुळांत कालवून पोटांत द्यावें. एक सप्तकपर्यंत दिलें असतां मंदाग्निशोष जाईल.

---

## घोडें शिणलें असतां अंगाचें कातडें हालत नाहींसें होतें, अगदीं आवळून जातें त्यास उपचार.

प्रथम अंगास चोपड करावें. त्या चोपडीचा प्रकारः रुईचीं पानें, वारुळांतील तांबडी माती, साबणाची अर्धी वडी, हाळद, व आंबेहाळद, हीं प्रत्येक ९ टांक, व करंज्याचा पाला हीं औषधें कुटून हशीचे मूत्रांत शिजवून चिरगुटांचा अगर वाखाचा कुंचा घेऊन त्याणें वर चांगलें शेकावें, उन्हांत बांधावें, असें तीन दिवस करावें. चौथ्या दिवशीं पाण्यानें अंग धुवावें. मग संध्याकाळीं हाळद, मीठ, व गूळ हीं प्रत्येक ९ टांक, भांग २ टांक आणि अफू १ मासा, हें सर्व बाजरीचे पिठांत कालवून द्यावें. (२) चांगल्या रक्ताचें बकरें

मारावें ब त्याचें रक्त पितळींत धरून तें घोड्याचे अंगास चोपडावें. ३ दिवस राहूं द्यावें, चौथे दिवशीं धुवावें.

---

## डायाफ्रम.

डायाफ्रम या पडद्यांत स्पयाझम या नांवाचीं हरकत येते. हा रोग चांगले तयार असणारे घोड्यास फार काम घेतल्यानें होतो.

लक्षण.–पोटांतून आवाज फार जोरानें येतो,बहुतकरून लोक असें ह्मणतात कीं,जर त्यास ही इजा आहे तर कान लाऊन ऐकलें असतां दोन अवाज ऐकूं येतात. हा लवकर बरा होतो.

इलाज.–सलफ्यूरिक ईथर, टिंकचरओपियम हें द्यावें. उत्तम दाणा व पाणी द्यावें. पोटदुखीचे उपाय करावे.

---

## हेपिटायटिज पहिला.

काळजांत गरम सूज येते, ह्यांचे भाग आहेत. पहिला आक्यूट (फार)व दुसरा क्रानिक (हलका) ह्याच्या योगानें काळजांत कोणतीही हरकत होत नाहीं. परंतु कामांत होते.

कारण.–खुराक जास्त झाल्यानें, मेहनत कमी झाल्यानें, पडदा (मेम्ब्रन) पिंवळा झाल्यानें डोळ्याचें तेज कमी होतें, खाणें खात नाहीं, लीद थोडी थोडी खराब व घाण येणारी होते, मूत्र थोडें व काळें, जर जास्तही इजा वाढली तर अकव्हीयस ह्यूमर (डोळ्यांत पाणी येणारा पहिला पडदा) यांत पिवळी वस्तु आड येते, नाडी फार जलद किंवा मंद वाहते,पुढून दबावल्यास भितो, किंवा उजवे पायानें लंगडतो व बेफाम होऊन पडतो,

इलाज.—जुगलरव्हेन ह्मणजे मानेच्या काळ्या रक्ताची शीर हिचें रक्त काढावें, राईचें प्लस्तर उजवे बाजूस मारावें, कडक जुलाब द्यावा, तो.—सलफेट ऑफ म्यागनेशिया एक पाऊन्ड, नायट्रिक

इथर एक औंस, व पाणी दीड बाटली मिश्रण करून द्यावें. · गरम झूल व गरम बांडीस बांधावें, किंवा चार चार तासांनीं नायट्रिक इथर एक औंस प्रमाणें एक दिवस द्यावें, रक्त काढावें, जुलाब द्यावे, इपिकाक्कायना दीड ड्राम द्यावा; हा न मिळेल तर मांदार झाडाच्या मुळीची बुकणी द्यावी, किंवा टर्किशबाथ देऊन उबदार कोठडींत बांधन अंगांतून घामे निघण्याची तजवीज करावी.

---

## हेपिटायटीज, दुसरा.

क्रानिक ( हलका ) हा रोग फार प्रयासानें ओळखतां येतो.

लक्षण.—दाणा खात नाहीं, गवतच खातो, मेमरन ( पडदा ) पिंवळा, किंवा खराब होतो.

इलाज.—सल्फेट आफ् म्यागनेशिया सहा औंस व नायट्रिक इथर एक औंस द्यावें. जुलाब द्यावा. हिरवा घास किंवा, भुस्सा वगैरे द्यावा. इपिकाकायना दीड ड्राम गोळी तयार करून सकाळीं व संध्याकाळीं द्यावी, प्रकृत नीट झाली तर नायट्रिक म्युऱ्याटिक आसिड पुष्कळ पाणी मिळवून द्यावें. थोडी मेहनत घेत जावी. जुलाब दुधाचा किंवा तुपाचा द्यावा, संख्यासोमल चार आणेभार सहा हप्ते-पर्यंत व बचनाग एक रुपयाभार आठ दिवसपर्यंत द्यावा.

या रोगानें घोडा मरण्याचीं लक्षणें: लिव्हर(काळीजाचा) रंग खराब मातिसारखा होतो, किंवा तें कडक कातड्याप्रमाणें होतें, किंवा पिंवळे चट्टे पडतात, किंवा गांठी गांठी होतात. मनुष्यास हा रोग झाल्यास सूज येऊन पू होतो.

---

## वायूविषयीं.

वायूचे प्रकार १६ आहेत, त्यांचीं लक्षणें व त्यांजवर उपचार खालीं लिहिल्याप्रमाणें.

## वटकिलंक वायु.

हा असा होतो कीं, घोडयाचे छातीवर मोठ्या गांठी होतात; त्यास उपाय—निगुर्डीचा पाला, टाकळीचा पाला, वेळूचा पाला, शेवग्याची साल, ओंवा, लसूण, हे सर्व जिन्नस समभाग घेऊन तुपांत मिसळून घोडयास चारावे. मग अंकोल्याचा पाला, चिंचेचा पाला, व पांगाऱ्याचा पाला आणून गाडग्यांत पाणी घालून त्यांत हे सर्व पाले घालून शिजवावे. आणि ज्या ठिकाणीं गांठी असतील त्या ठिकाणीं ऊनऊन बांधावें. असें एक सप्तक केलें असतां वटकिलंकवायु बरा होतो.

---

## मृगमुखदुःखवायु.

घोड्याचें सर्व तोंड सुजतें. त्यास उपाय—जवखार, मोहोरी, सिरसाचें बीं, सेंधेलोण,व हाळद,हे सर्व जिन्नस समभाग घेऊन वाटून चिंचेचे रसांत ऊन करून त्याचा घोड्याचे तोंडास लेप करावा. लेप करण्याचे पूर्वी घोड्याचे तोंडास तिळाचें तेल चोळावें. मग ओंवा, लसूण,व सुंठ हीं समभाग घेऊन गुळांत कालवून, पोटांत सात दिवस द्यावीं.

---

## गोलवायु

घोड्याचे सर्व अंगास गांठी येतात व त्या सर्व गांठींतून पिवळें पाणी वाहूं लागतें. त्यास उपाय—तिळाचें तेल व तूप गांठीवर चोळावें. नंतर निर्गुडीचा पाला पाण्यांत घालून पाणी तापवून त्यांनीं गांठी शेकाव्या. व लसूण, सुंठ, ओंवा, वेखंड, हे सर्व समभाग घेऊन गुळांत कालवून चारावे. असें एक सप्तक केलें असतां गोलवायु नाहींसा होईल.

---

## सन्निपातवायु.

घोड्याचे पोटाखालीं सूज येते व पोटांत गडबडतें, घोडा कांहींच खात नाहीं, उभा राहून झोंप घेतो व कांपूं लागतो. त्यास उपचार- सुंठ, ओंवा, लसूण, हे सर्व समभाग घेऊन, गुळांत कालवून खाण्यास द्यावें. व तिळाचें तेल व तूप एक ठिकाणीं करून पोटाखालीं चोळावें. आणि वारुळाची माती व मीठ एकत्र करून पोटाखालीं लेप द्यावा. २ ओंवा, लसूण अच्छेर, हिंग ३ टांक, व निर्गुडी ९ टांक, हीं एकत्र करून तुपाबरोबर द्यावीं. हिंगाची पूड, हिंगाचा नस ओढण्यास द्यावा. ३ सैंधव, वावडिंग ४॥ टांक, सुंठ, पिंपळ- मूळ, ओंवा, हीं चार टांक, निर्गुडी, भारंगी ९ टांक, या सर्वांचे चूर्ण करून गुळाबरोबर ४ दिवस पोटांत द्यावें.

---

## तळवायु.

घोडा भूमीवर पाय चांगला न ठेवितां भीत भीत ठेवितो व पाया- खालीं तळाशीं मास वाढतें, त्यास तळवायु ह्मणतात. त्यास उपचार- मेण, ह्मशागुग्गुळ, राळ, भुईनिंब, काळेंजिरें, लाख, कांबिया शेंदूर, मिरें, व गूळ हीं समभाग घेऊन चूर्ण करून त्यांत तेल किंवा तूप सारखें मिसळून तळावर घांसावें. त्यावर लोखंड तापवून त्याचा वर शेक द्यावा. सात दिवसात तळवायु जाईल.

---

## अवयवहीनवायु.

हा वायु होण्याचा प्रकार—घोड्याची छाती सुजते व मान एकीकडे वांकडी होते व घोड्यास चालतां येत नाहीं. त्यास उपाय— दोन्ही पुढील पायांचें रक्त काढावें व वामि व परळीचा पाला (मारयाचा पाला) हे सर्व जिन्नस समभाग घेऊन गाडग्यांत पाणी घालून त्यांत शिजवावें. व त्या ऊन्ह पाण्यानें शेकावें. आणि

आंतील उन्हून चोथा चिरगुटांत घालून त्याणें छाती शेकावी. ह्मणजे उबारा येईल. आणि सैंधव, सुंठ, हिंग सर्व समभाग घेऊन तुपांत कालवून घोड्यास ४ दिवस चारावें.

---

## द्विपदवायु.

पुढील एक पाय व मागील एक पाय सुजतो. त्यास उपचार—निर्गुडीचा पाला ००॥,टाकळीचा पाला ००॥, सेगूरतीचा पाला००॥, हे पाले घेऊन वाटून त्यांत मीठ अच्छेर घालावें. आणि खापरांत घालून ऊन करावें आणि पायावर त्याचा लेप करावा व चासणीचा शेक सात दिवस द्यावा आणि ओंवा ००१,व लसूण०००९ हे घेऊन २४ तोळे गुळांत कालवून द्यावें. (२) निर्गुडी, टाकळी, शेवगा यांचा पाळा अर्धा शेर वजनप्रमाणें घेऊन त्यांत अर्धा शेर मीठ घाळावें. हें सर्व खापरांत घालून ऊन करावें. आणि उन्हून पायास चोळावें व विटेचा शेक द्यावा. नंतर सुंठ, पिंपळमूळ, लसूण, हीं प्रत्येक ९ टांक आणि ओंवा पावशेर, हीं एकत्र करून १॥ शेर गुळांत कालवून द्यावीं.

## अद्भुतवायु.

घोडा मान वांकडी करितो, त्याच्यानें चालवत नाहीं, त्यास उपचार—उराच्या बेंबीच्या शिरांचें रक्त काढावें. त्याचप्रमाणें पायाच्या शिरांचें रक्त काढावें. ओंवा व पर्यळू (माका) हें एकत्र वाटून पाजावें. व हेंच औषध ऊन करून पायावर व उरावर लेप करावा. मग ओंवा शेपा अर्धा अर्धा शेर घेऊन, त्यांत सुंठ २ टांक, सैंधव १ टांक एकत्र करून तुपाबरोबर द्यावें.

## वायुस्तंभ.

घोड्याच्या सर्व अंगावर मोठमोठ्या गांठी होतात, व घोडा दम बाहेर टाकतो, जांभई देऊन पुढील दोन्ही पायांनीं जमीन धरितो. त्यास उपाय–सुंठ, काळेंमिरें, पिंपळी, शेवग्याचे झाडाची साल, काडेचिराईत, लसूण, हिंग हे सर्व समभाग घेऊन तुपांत कालवून द्यावें. व परळाचा ( माक्याचा.) पाला, निर्गुडीचा पाला, टाकळीचा पाला, या तिन्हींचा रस काढून खापरांत ऊन करून दोन्ही पायास ४ दिवस लेप करावा.

---

## चौरंगवायु.

चारी पाय सुजतात. त्यास उपचार—सुंठ, लसूण, राई, सैंधव, हीं लिंबाचे रसांत वाटून त्याचा लेप करावा. आणि पिंपळमूळ, सुंठ, चिराईत, हिंग, ओंवा, सैंधव, हीं प्रत्येक ९ टांकप्रमाणें घेऊन चूर्ण करून गुळाबरोबर द्यावें. वारुळाच्या आंतील माती, लसूण, मोहऱ्या, हीं सर्व समभाग घेऊन निर्गुडीचे रसांत वाटून त्याचा चारी पायांस लेप करावा. वीट तापवून शेक द्यावा. असें सात दिवस करावें. आणि टाकळीचा पाला, लसूण, ओंवा, हे सर्व जिन्नस बरोबर समभाग घेऊन तुपांत कालवून द्यावें. एक सप्तक दिलें असतां बरें होईल.

---

## वेलिदोषवायु.

एक वृषण वर चढतो आणि मागला पाय लंगडतो आणि अंगावर गांठी उठतात व त्यांतून लस वाहते. त्या गांठीस वेली असें ह्मणतात. ती वेली परीक्षा करण्याकरितां असें करावें कीं, केळीचा मोक हरभऱ्यायेवढा घेऊन व शाळिचा मोमळ जोंधळ्यायेवढा त्यांत घालून गांठ चिरून त्यांत हें औषध संध्याकाळीं घालावें. दुसरे दिवशीं गोळा निघाला तर

वेलिदोष खरा आहे ह्मणून समजावें. यास उपचार—दोन्ही नाकपुड्या मध्यें चिरून अरीच्या योगानें शीर उचलावी. आणि त्यांत गोखरूची पूड व मीठ भरावें. डाहाणा (दांडा) तापवून डाग द्यावा. मग गूळ २ शेर, सवागी ९ टांक, एरंडाच्या डिच्या पावशेर, शेळीचें मास दोन शेर, इतकें एकत्र शिजवून सात दिवस ह्याप्रमाणें द्यावें. (२) कडू पडवळ, चिंचोके, पिंपळमूळ, अनमोदा, वावडिंग, पापडा, गाजराचें बीं, भुईनिंब, वोवा, लसूण, सुंठ, शिरसाची साल, हे सर्व जिन्नस बरोबर घेऊन, तुपांत द्यावे. व तिळाचें तेल सर्व अंगास चोळावें. हिंगाची पूड करून नाकांत तपकिरीप्रमाणें ओढण्यास द्यावी लहान ( पारोशा ) पिंपळाची साल आंतून तांबडी असते ती आणून सेबळीचे ( निर्गुडी ) रसांत मीठ घालून त्यांत साल घालून भगरा ऊन करून अंडावर सात दिवस लेप करावा.

---

## कंपवायु.

दोनी वृषण सुजतात, त्यास उपचार—सुंठ, व दुर्लभा हीं औषधें ९ टांक घेऊन व तितकीच शेवग्याची साल घालून, सर्वांचें चूर्ण करून तूप अथवा गूळ अगर तिळाचें तेल ह्यांत एक सप्तकपर्यंत पोटांत द्यावें. (२) डोरली, येरंडमूळ, उमराची साल, वेखंड, मुर्दाडशिंग, निर्गुडीचा पाला, हे सर्व समभाग जिन्नस तिळाचें तेल आणि तूप ह्यांत एकत्र करून पोटांत द्यावें. वृषण तेलानें चोळावें. निर्गुडी व पांगाऱ्याच्या पाल्याच्या रसाचा वृषणास लेप करावा व वर विटाचा शेक द्यावा.

---

## उत्कर्णवायु.

डोके वर चढवितो, चारी गात्रें ताणतो, मान ताठते, गळा ताठतो, दांतखिळी बसते, मागले व पुढले पाय लांब करितो. आणि हातपाय वळतात. अशीं लक्षणें होतात. यांत हातपाय वळत

नसल्यास साध्य, वळत असल्यास असाध्य असें लक्षण समजावें. या वायूला चढाव वायु असेंही ह्मणतात. आतां हा उत्पन्न होण्याचें कारण सांगतों. घोडा बांधले जागीं उभा असतां एकदम कुत्रा, उंदीर अगर मांजर वगैरे पाहून डचकतो त्या डचक्यासरसा हा उत्पन्न होतो. पाठीवर मोठी नाळ पडलेली असतां उत्पन्न होतो. किंवा पायास भद्रा कुदतो आणि तशांत स्वारीस नेला असतां त्यामध्यें पायास खडा लागून एकदम दचकतो. त्या योगानेंही उत्पन्न होतो. त्यास उपचार—शेवग्याचे मुळीची साल, निर्गुडीचा पाला, लसूण, हिंग, सैंधव, संचळ, वावडिंग, ओंवा, पिंपळमूळ, किराईत, पळसाचें बीं हीं सर्व औषधें प्रत्येकीं ९ टांक घेऊन चूर्ण करून त्यांत मद ९ टांक घालून तुपाबरोबर द्यावें. नंतर येरंड, धतूरा, टाकळी, आरणी, शेवगा, निर्गुडी, यांचा पाला आणून त्यांत हळद, कोष्ट, वेखंड, नागसैंधव याचें चूर्ण घालावें. आणि सर्वांचा काढा करून ऊनऊन अंगास चोळावा. वर विटेचा शेक द्यावा. एक सप्तकपर्यंत सूंठगूळ देत जावी. किंवा तिळाचें तेल सर्व अंगास चोळावें. पोटाखालीं विस्तव ठेवून शेक द्यावा. इतकेंही करून बरा न झाल्यास तोंडावर डाग द्यावा.

---

## गिरपथा.

जर घोड्याच्या शिरा आंखडलेल्या असतील तर त्यास उपचार—तिळाचें तेल, व काळ्याधोत्र्याचा रस हे दोन्ही बराबर घेऊन एकत्र करून घोड्याचे सर्व अंगावर लेप करावा. व चांगला चोळावा. घोड्याला उन्हांत बांधावें. (२) टाकळीचा रस, व तिळाचें तेल, एकत्र करून नाकांत घालावें. त्याच दिवशीं संभाळीचा रस व तिळावणीचा रस, दोन्ही बराबर सुमारें दोन शेर घेऊन, घोड्याला चारावें. तीन दिवसपर्यंत नास ह्मणजे तपकिरीचे लेप

द्यावे. उपशमन आणील. ( ३ ) टाकणखार आणि लसूण एके ठिकाणीं कांडून बारीक कापडामध्यें पोतांडी बांधून ठेवावी. आणि कानावर चिरगुटें गुंडाळून तीन दिवसपर्यंत कान बांधून ठेवावे. नंतर सोडावे. चारी पायांच्या तळव्यांस डाग द्यावे. व ऊन पाणी तीन दिवस पाजावें ह्मणजे उपशमन पावेल.

---

## एकांगवायु.

चारीपाय व पोट सुजतें, गळा ताठतो, त्यास उपचार—पहाड, तेवडा, अस्कंद, हिंग, सुंठ, गंधबीड, सैंधव, ओंवा, वावाडिंग, हिरडे, हीं प्रत्येक १ टांक घेऊन चूर्ण करून गुळाबरोबर एक सप्तक द्यावें.

२ हिंग, गंधबीड, सैंधव, ओंवा, वावडिंगें, बेहड्याचें टरफल, अश्वगंध, लसूण, वेखंड, मीठ, सुंठ, हिरडा, हे सर्व जिन्नस समभाग घेऊंन गुळाबरोबर खाण्यास द्यावें. तूप व तिळाचें तेल सर्व अंगास चोळावें. टाकळी, निर्गुडी, चिंच याचा पाला वाटून तेल किंवा तूप कढवून त्याचा अंगास लेप करावा. किंवा हे पाले कुटून त्या रसाचा चारी पायांस लेप करावा. एक सप्तकपर्यंत द्यावा.

घोड्याचे अंगावर पाऊस पडून घोडा भिजतो. आणि पायाखालींही चिखल असतो. त्या योगानें त्यास थंडी वाजते, स्तब्ध राहतो, व कृश होतो. त्यास उपाय–निर्गुडीचा पाला पाण्याशीं वाटून ४ शेर रस काढावा. त्यांत वारूळाची माती आणि ह्मशीचें शेण कालवून ऊन करून अंगास मर्दावा. घोड्यास उन्हांत बांधावा आणि येरंडाचा पाला अर्धाशेर पोटांत द्यावा.

---

## त्रिकस्तंभवायु.

घोड्याचें मागलें अंग थरथरा कांपतें. त्यास शेवग्याच्या मुळाची साल, टाकळीचा पाला, निर्गुडीचा पाला, सुंठ, लसूण, चि-

राईत, पिंपळमूळ, पिंपळी, हिंग, हीं औषधें ९ टांकप्रमाणें घेऊन चूर्ण करून तुपाबरोबर सात दिवस द्यावें. हिंगाची पूड तपकिरीप्रमाणें ओढण्यास द्यावी. तेल व तूप एकत्र करून चांगलें अंग मर्दन करावें. असें तीन दिवस करावें. वर विटेचा शेक द्यावा. व उन्हांत बांधावें ह्मणजे त्रिकस्तंभवायु जाईल.

---

## मनस्तंभवायु.

पुढचा पाय ताठतो, पायाचा पुठ्ठा सुजतो, मान ताठते, गळा ताणतो व घसा बंद होतो, त्यास उपचार—वेखंड, वावडिंग, पिंपळी, पिंपळमूळ, हिंग, शेवग्याचा पाला, ओंवा व पित्तपापडा, हीं प्रत्येकीं ९ टांकप्रमाणें घेऊन चूर्ण करून तुपाबरोबर सात दिवस द्यावें. आणि अंगास तिळाचें तेल चोळावें. सात दिवस उन्हांत बांधावें. आटवे दिवशीं पांगाऱ्याचा पाला पाण्यांत घालून पाणी तापवून तें पाणी घोड्याचे पाठीवर वस्त्राची घडी घालून त्यावर शेकत शेकत घालावें. असें तीन दिवस करावें. किंवा पांगाऱ्याचा पाला, निर्गुडीचा पाला व आडोळशाचा पाला,हे पाले गाडग्यांत घालून ऊन करून तें गाडगें घोड्याचे तोंडाजवळ नेऊन त्याचा वाफारा द्यावा.

---

## तळवायु.

सहज भीत भीत पाय ठेवतो व तळहीन होतो.त्यास मेण,मस, गुग्गुळ, राळ, भुईनिंब, काळीजिरें, लाख, कांब्या शेंदूर ,मिरें व गूळ, हें एकत्र करून चूर्ण कीजे. मध्यें तूप व तेल मिळवावें.तळावर घासून मग वीठ तावून एक सतक शेक द्यावा. साध्य.

२ राळ पावशेर, मेण पावशेर, लाख पावशेर, कांबिया शेंदूर व बोळ तोळे ९ हें एकत्र चूर्ण करून त्याचे तीन भाग करावे. एकेक

भाग तेलांत कालवून तळावर लावावा. वर विटेचा शेक द्यावा. असें तीन दिवस करावें.

---

## बेल ह्मणजे घोड्याच्या सर्व शिरा आंखडतात त्याजवर उपचार.

मोठें डोरलें, लहान डोरलें, बेहडा, गुळवेळ, निंबाची साल, आडुळसा, सुंट, मिरें, पिंपळी, सैंदेलोण, हे सर्व जिन्नस एकएक तोळा घ्यावे. नंतर १॥ शेर मुग घेऊन ६ शेर पाण्यांत भिजत घालावे. त्यांत वरील जिन्नस घालावे. त्यांत पावशेर मध घालून कालवावें. त्याच्या २१ गोळ्या कराव्या. दररोज एक गोळी चारावी. नंतर मासे धुऊन पाणी पाजावें. बरें होई तोंपर्यंत निर्मळ पाणी पाजूं नये. (२) तिळाचें तेल, व काळे धोत्र्याचा रस एकत्र करून त्याचा घोड्याचे अंगास लेप करावा. खूप चोळावें व घोड्यास उन्हांत बांधावें (३) टाकळीचा रस आणि तिळाचें तेल एकत्र करून नाकांत नस्य द्यावें. व निर्गुंडीच्या पाल्याचा रस, तिलवर्णाचे पाल्याचा रस २ शेर सुमार घेऊन घोड्याला चारावे. तीन दिवस नस्य द्यावें. (४) टाकणखार व लसूण एक ठिकाणीं कुटून बारीक कापडामध्यें पुरचुडी करून घोड्याचे नाकांत ठेवावी. आणि वर चिरगूट गुंडाळून तीन दिवस नाक बांधून ठेवावें. नंतर सोडावें. आणि चारी तळव्यांस डाग द्यावे.

---

## ग्लयांडर्स (सैबा).

हा रोग फार करून पंजाब व नगर ह्या ठिकाणीं फार होतो. कारण, कित्येकांस तो जन्मापासूनच जडलेला असतो, कित्येकांस आईबापांपासून उद्भवतो, एकापासून दुसऱ्यास उत्पन्न होतो. हा रोग फार खराब आहे, बहुतकरून बरा होत नाहीं.

ह्याचे चार प्रकार आहेतः आक्यूट ह्मणजे एकदम उत्पन्न

होऊन फार बळावतो, सबआक्यूट ह्मणजे सावकाशीनें बळावत जातो, क्रानिक हा रोग फार मेहनतीनें समजतो, आणि इनसिडेशियस हा समजण्यांत येत नाहीं. लक्षण.—आक्यूटचें: एका नाकपुडींतून पाणी पडतें, तीन रोजांचे आंत तें पाणी पिंवळें होतो. ग्लयांड हे मांसाचे गोळे आहेत, हे सुडून टणक होऊन चिकटून जातात, सेंबा रशीसारखा लटकून राहतो, परंतु ही इजा फारच बळावली असेल तर, पू चिकट होऊन नाकाचे आंत जमून बसल्यानें दम घेण्यास अडथळा होतो. नाकास खराब घाण येते. एकादे वेळेस सेंबा फुटून नासरू होतें. फारसींत बेल किंवा उंदरी ह्मणतात त्या रोगाप्रमाणें पाय सुजतात. नाकांतून काळसर पाणी येतें. नाकाचें हाड सडून पडतें, या लक्षणाचा घोडा मरतो.

लक्षण.—सबआक्यूटचें: प्रथम पाणी येतें, नंतर पू तारेसारखा होतो, नासरू होतें, ग्लयांड (मांसाचे गोळे) टणक होतात, तब्बेत चांगली राहत नाहीं, बेली रोगासारखीं लक्षणें होतात.

लक्षणें.—क्रानिकचीं: हा रोग समजून येत नाहीं, फक्त दोन्ही नाकपुड्यांतून चिकट पाणी निघतें.

लक्षणें.—इनसिडीशियसचीं दोन्ही किंवा एका नाकपुडींतून पाणी निघतें. ग्लयांड (मांसाचे गोळे) सुजून चट्टे पडल्यासारखे दिसतात व कठीण होतात, किंवा चिकटत नाहींत, नाकाचे आंत बारीक चट्टे पडतात, रक्ताचे आंत विषारी वस्तु मिश्रण होऊन. फुप्फुसाचे आंत गांठ होते.

इलाज—गोळी घालून मारावा, वाफ द्यावी, राई, काळेजिरें, सुंठ, गुग्गुळ, हिंग सफेद, मोरतोतिया, पिंपळीलेंडी, एक तोळा घेऊन गोळी करून द्यावी.

## कच्चें धान्य खाल्यानें किंवा मठ खाल्यानें अजीर्ण होतें त्यावर.

अजमोदा, पिंपळी, व भांग हें चार चार टांक घ्यावें. दगडी मीठ नऊ टांक घ्यावें. सर्व बारीक वस्त्रगाळ करावें व घोड्यास एकदम द्यावें. कोद्रु खाल्यानें कफ व खोकला होतो. तेव्हां चाल सोडतो. व गरम शरीर होतें, बेशुद्ध होतो, केव्हां नीट असतो, बसतो, त्यावर इलाज.—कमळ (तळ्यांतील फूल) गरम करून घोड्याचे अंगास चोळावें. एक शेर दशमूळ, नऊ टांक दगडी मीठ, सहा टांक राई, व तिळाचें तेल अर्धाशेर हें सर्व एकदम घोड्यास पाजावें. जुलाब होईल. अनुभव आहे.

घोडा दुबळा होतो, गवत खातांना तोंडांतून पाणी फार जातें. चारा खाऊं शकत नाहीं. ढांसतो व त्याचे हातपाय बारीक होतात. त्यावर उपाय: शिरका जुना, व तिळाचें तेल दोन्ही सारखें वजन घ्यावें, जिरें एक भाग तिन्ही कढवून व तीन अंड्यांची सफेदी घालून पाजावें.

दुसरा इलाज—ताजें दूध, रेवाचिनी व एलवा ह्मणजे बोळ हें कढवून मऊ करावें व घोड्यास द्यावें. अनुभव आहे.

खिजान ह्मणजे शरीर वाळतें व केंस जातात, रात्रीस नाकांतून श्वास चालतो, त्यावर इलाज फार होत नाहीं. बकरीचा बच्चा घ्यावा, त्याचे हातपाय बांधावे, मोठे भाड्यांत घालावें. त्यावर ज्वारीचा आटा व घास घालून कढवावें. तें असें कीं, त्याचे सांधे आपोआप गळून पडतील. मग त्याचा शिरका घोड्यास पाजावा. त्यावर गाईचें तूप दोन रत्तल रोज पाजावें. अनुभव आहे.

खिनानतीर ह्मणजे अंगावर फोड होतात, सांधे ढळतात, शरीरांतून पिंवळें पाणी निघतें. नाकांतून निळें पाणी निघतें, घाण येते, व माशी फार बसते, असा प्रकार कांहीं एक प्रकारची मुळी असते ती

खाल्यानें होतो. नाकाजवळच्या दोन शिरा असतात त्यांचें रक्त काढावें. नाकांत तेल घालावें. ते बदाम वगैरेंचें घालावें व डाग द्यावा. तीन दिवस घोड्यास सोडावें व बुरा अरमनी रक्त काढलेलें ठिकाणीं घालावी. वर लिहिल्याप्रमाणें बकरीचे बच्याचें पाणी करून एक रत्तल पाजावें, नाकांत बदामाचें तेल घालावें, कांहीं लोक कपाळावर डाग देतात. कानशिलावर व कांहीं टाळूवर डाग देतात व कोणी बेंबीवर डाग देतात.

काळजाजवळ बेमारी होते ती तीन प्रकारची आहे: पहिलें काळजांत दर्द होतें, दुसरें दिल सुकून जातो, आणि तिसरा खपलाल ह्मणजे मन हालणें ( मन घाबरणें. )

पहिला प्रकार—घोडा आपले सुंभावर मारतो. जमीनीवर पडतो, फार पशिना ( घाम ) जातो. पहिल्यानें डावे फासल्यापासून घाम येतो, घोड्याचें शिश्न व अंड सुस्त होतात, लघवी थेंब थेंब होते व होतही नाहीं. त्यावर उपचार.

शिरा काढाव्या. तंगाचे जाग्यावरच्या शिरांचें रक्त काढावें. रेवाचिनी किवाबराबर घेऊन बारीक करून साडेसात रति ध्यावी व २६० दोनशेंसाठ रति वजन दुधांत पाजावी.

दुसरा इलाज—वेताच्या झाडाचें बीं, व साखर सफेद, बराबर घेऊन पाण्यांत घोडयास पाजावें. सात दिवस नाकांत केशर व गुलाबपाणी घालावें; गुलाबशिरका पाण्यांत मिळवून नाकांत घालावा. अनुभव आहे.

दुसरा प्रकार—काळीज सुकून जातें त्याची खूण अंगाचें कातडें सख्त होतें, घोडा दुबळा होतो, घांस खाऊं शकत नाहीं व छातीवर फोड होतात.

तिसरा प्रकार—दिल घाबरतो, छाती उडते, कंप होतो; नाकांतून अवाज निघतो त्यास श्वास ह्मणतात.

कासनीचें पाणी साखर मिळवून पाजावें. नाकांत रेवाचिनी व वेताच्या झाडाचे पानाचा रस घालावा. तंगाजवळचें रक्त काढावें.

आंतड्यांतील बेमारीवरचे दोन प्रकार.--

पहिला प्रकार—कराहा ( ढांस ).

दुसरा प्रकार—जिकूनपस ( दम खालीं वर होतो ).

पहिला प्रकार-घोडा ढांसतो. परंतु दाणा पाणी खाते पिते वेळेस फारच ढांसतो. खासीबराबर तोंडांतून कफ येतो. त्यावर इलाज.

जवाचा आटा बकरीचे दुधाबरोवर द्यावा. खडीसाखरेचें पाणी पाजावें. शिरका व मध नाकांत घालावा. मटार कढवून पाणी पाजावें किंवा जवाचे आट्यांत बोराअरमणी द्यावी. फटकी व बोरा अरमणी सात दिवसपर्यंत पाजावी.

दुसरा प्रकार—दम होतो. ही फार वाईट बेमारी आहे.

घोडा लाच्यार होतो. व घोडयावर स्वारी केली ह्मणजे तोंडांतून पाणी निघतें. दम फार चढतो, घोडा घाबरतो, तोंडांतून थुंका व कफ निघतो, तो शेंबडाप्रमाणें निघतो. तंगापाशीं * याप्रमाणें डाग द्यावा. पोटावरही ह्याप्रमाणेंच डाग द्यावे. दवा देणें तोः

रुईच्या झाडाचें मूळ,इंद्रावणीचें मूळ,काळाबोळ,पिंपळी,पिंपळमूळ, पिंपळपान, सुंठ, मीठ, सोरा, अजवान, रिंगणीचें बीं, उटकटाचें बीं, चित्रक, धमासा, डाळिंबाचे फळाची साल, शहाजिरें, सातू, निळातोता ( जंगला ), बदाल, अजमोदा, जमालगोट्याची साल, लवंगा, हिरडे, बाळहिर्डे, कोळिंजन, रुईचीं पानें पिकलीं, रुईचे झाडाची साल,अकलकारा,व शेराचा चीक पावशेर,हे सर्व जिन्नस बारीक करून भांड्यांत घालून झांकून ठेवावे. त्यावर विस्तव ठेवावा. शिजल्यावर बारीक करावें.नऊ पैसेभार त्या पैकीं घेऊन व वेखंड नऊ पैसे भार घेऊन एकत्र करून सकाळीं चाळीस दिवसपर्यंत द्यावें, अनुभव आहे.

## दम्याविषयीं.

दमा कफापासून होतो. फार मजल केल्यानें दम लागतो त्यावरून समजणें. दम छाटतां येत नाहीं. डोळे लाल होतात. शरीर गरम होतें. घाम फार येतो. •नाकांतून पाणी जाऊं लागतें व दम छाटतां येत नाहीं. असें असेल तर बरा होण्यास मुष्कील आहे.

उपचार.—हिरडे, बाळहिरडे, व आमळा, सहा सहा पैसेभार घेऊन बारीक वस्त्रगाळ करून पावशेर तांदूळ व पावशेर साखर मिळवून घोळ्यास द्यावे.

इलाज दुसरा.—केळें, साखर, व मध, पावशेर प्रमाणानें घेऊन व नऊ पैसेभार तांबड्या मिरच्या आणि डाळिंबाचे दाणे नऊ पैसेभार एकत्र करून खाण्यास द्यावें.

इलाज ३ रा.—एक शेर खजूर, व बांबूचीं पानें नऊ पैसेभार एके ठिकाणीं करून खाण्यास द्यावें.

इलाज ४ था.—पित्तपापडा, नऊ पैसेभार, बांबूचीं हिरवीं, पानें नऊ पैसेभार, दूध व मध यांत विळवून खाण्यास द्यावें. अनुभव आहे.

हरएक प्रकारचे रोगावर.—दमा, मिरगी, व कुरकुरी, वगैरेंवर साबणाची गोळी द्यावी. संख्या सोमल एक तोळा, उंबरवेलीचा रस एक शेर, तव्यावर सदर्हू रस घालून चुन्याचे कळी प्रमाणें सोमल शिजवावा. नंतर खाक झाल्यार दररोज एक मासा घोळ्यास द्यावा. गरमी फार झाली तर पावशेर तूप तीन दिवसपर्यंत द्यावें. गरमी न झाली तर तूप देऊंनये.

दुसरे कोणतेही प्रकारचे रोगावर ही उपयोगी व अनुभविक गोळी आहे: संख्या सोमल दोन तोळे, जायफळ तीन मासे, व जायपत्री, वेलची, लवंग तीन तीन मासे, घेऊन अदपाव लसुणांत खल करावा. गोळ्या रतीप्रमाणें कराव्या. दररोज एक गोळी द्यावी. रोग कसाही असल्यास दूर होईल. अनुभव आहे.

मनुष्यास शक्ति येण्यास पाहिजे तर त्यांत कस्तुरी तीन मासे घालून रती एवढ्या गोळ्या कराव्या. त्यांतील एक घेऊन ती लसूण किंवा आलें किंवा विड्याचीं पानें यांत घालून द्यावी. अनुभव आहे.

दुसरा इलाज.—कसेही प्रकारचे रोगावर हळदीचीं पानें, भिलावे चार तोळे, गुग्गुळ चार तोळे, सज्जिखार चार तोळे, एलवा बोळ ४ तोळे, खजूर बीसुद्धां चार, पुराणा गूळ अर्धशेर, लसूणबिया चार तोळे, पांढरा काथ चार तोळे, साबूण चार तोळे, व अकलकारा चार तोळे, हीं सर्व बारीक करून एकेक गोळी तोळ्याची करावी. दर दिवशीं एक गोळी सकाळीं व संध्याकाळीं गुळांत द्यावी. अनुभव आहे. यास काळी गोळी ह्मणतात.

तिसरा इलाज.—कोणतेही रोगावर. सुंठ, मिरच्या, चित्रकाची साल, हिरडे, बाळहिरडे, अमला, वावडिंग, धने, वेखंड, पिंपळपानें, कोरफडीची साल, हळद, धमासा, नागरमोथे, समली, गेरू, भारंगी, दांतवण, मालकांगोणी, चिराईत, चित्रकसाल, अजवान व आवळकठी, शिरस अजमोदा, काळेजिरें, सफेदजिरें, व पित्तपापडा. हे सर्व जिन्नस नऊ नऊ टांक घेऊन बारीक करावे. मोठे घोड्यास कांहीं कमी द्यावें. तेंच गाईचे मुतांत दिलें तर पडसें व खाशि, गरमी, दमा वगैरे बिमारी जाईल व घोडा मोठा होऊन शक्ति येईल. हेंच जर तुपांत दिलें तर कफ होईल.

चौथा इलाज.—जुलाब होण्यास. सुंठ, मिरच्या, वावडिंगें, चित्रकसाळ, चोक, बदाम, नागरमोथें, पिंपळपानें, मांजिष्ठ, हाळद, कलू, धमासा, वसा, नलूफर, गुग्गुळ, हें प्रत्येक छटांक घ्यावें. बारीक करून आठशेर पाण्यात कढवावे. एक शेर राहिल्यावर वस्त्रगाळ करून घोड्यास द्यावें. दोन आठवडे याप्रमाणें करावें. अनुभव आहे.

पांचवा इलाज. कसेही प्रकारचे रोगावर—नसा, दमा, शिंगाडा, कुरकूरी, शूळ, सरदी, गरमी बदकसर, वगैरे वर सोमलाची गोळी सांगितली आहे ती द्यावी. संख्या सोमल एक तोळा. काळीमिरीं एक-तोळा, काथ तीन तोळे, अलें (अद्रक) पावशेर त्याचा रस काढून मग मिरच्या बारीक कराव्या. व सोमलही बारीक करावा. दोन्हीं एकत्रकरून नंतर काथ व आल्याचा रस घालून खल करावा. दोन तास खल करून मग आल्याचा रस जिरला ह्मणजे हरभऱ्याएवढ्या गोळ्या कराव्या. आणि घोडयास रोटींत घालून गोळी द्यावी. सात दिवस याप्रमाणें द्यावें. अनुभव असे.

वरील गोळीपासून गरमी फार होईल तर तांदूळ अर्धशेर शिजवून दहीं एक शेर मिळवून खाण्यास द्यावें.

लिंबाचे झाडाच्या पानाचा रस कोरफडीचा रस, दोन्ही एकत्र करून खाण्यास द्यावें. गरमी निवेल. जर गरमी न होईल तर देऊंनये.

कसेही प्रकारचे रोगावर मसाला.—दमा, चांदणी, धडकी, बरसात, छाला, कुरकुरी, ज्वर, मुतरा वगैरेंवर इलाजः

वेखंड, ००।० पावशेर, अंबेहळद ००।० पावशेर, चित्रकमूळ ००।० पावशेर, कुचला ००।० पावशेर, इंद्रावन खार ००।० पावशेर, काटेइंद्रावणीचा मगज ००।० पावशेर, मुरदडाशिंग ००।० पावशेर. लसूण ००।० पावशेर, कांदे पांढरे ००।० पावशेर, वाघाचे मांस एक तोळा, चिमणीचें मांस व हाडें पावशेर, तरसाचे कपाळाचीं हाडें ००।० पावशेर, बिल्लीचीं (मांजरीचीं) सर्व हाडें ००।० पावशेर, तेलिया सुहागी १ एक तोळा, हिराहिंग १ एक तोळा, कापूर एक तोळा, पिंपळपानें व पिंपळमूळ ४ चार तोळे, सज्जिखार तीन तोळे, मोराची चर्बी एक तोळा, घोरपड या जनावराची चर्बी एक तोळा, आजवानखुरासनी तोळे ६, वावडिंग तोळे ६, अकलकारा तोळे ६, तंबाखू तोळे ६, बकरीचें पित्त १२५ एकशेपंचवीस तोळे,

रूईचीं फुलें एक शेर, बांबाचे झाडाचीं पानें एक शेर, बांबूचीं पानें एक शेर, काळी जिरें एक शेर, मेथ्यांचें पीठ दोन शेर, काळे धोतऱ्याचें बीं अतपाव, आणि कोंबडें एकरंगी कांपून पोटांतील मैल काढून त्याचे पर, दोन्हीं पाय, व चोंच, अशीं ध्यावीं. नंतर पित्त मात्र निराळें ठेवून बारीक करून त्यांत सर्व औषधें घालावीं.परंतु मांस व औषधें तुपांत भाजावीं. एकवीस विंचू घेऊन त्यांचे नांगे कांपून टाकावे व तूप, व चर्बी एकत्रकरून शिजवावे.बाकी सर्व घालून भाजावें. नंतर मेथीचें पीठ त्यांत घालून काकवी मिसळून एकत्र करावें. दररोज घोड्यास सकाळीं व संध्याकाळीं एकेक अदपाव गोळी. सातदिवसपर्यंत द्यावी. बरे झाल्यावर, देऊं नये. नाहीं तर पंधरा दिवस दाण्यापूर्वीं सकाळीं द्यावा. सर्व रोग बरे होतात. अनुभव आहे.

## घोड्यास उचकी लागते त्यास.

देवदाराचीं पानें दोन पैसेभार बारीक करावीं. भुईरिंगणी व सुंठ नऊ नऊ पैसेभार बारीक करून वस्त्रगाळ करावी. त्यांत पावशेर तिळाचें तेल घालून घोड्यास पाजावें.

इलाज २ रा.—मोराचे पर जाळून त्याची राख नऊ पैसेभार घेऊन त्यांत मध दीड पाव एकत्र करून घोड्यास द्यावी.अनुभव आहे.

सुक्या उचकीवर.–साखर पावशेर, व मलई पावशेर, दोन्हीं एकाजागीं मिळवून हें औषध घोड्यास पाजावें.

दुसरा इलाज––दाणा न जिरल्यानें उचकी लागते त्यावर.—एरंडाचें मूळ, बेलमूळ व अजमुंदाचें मूळ, प्रत्येक नऊ पैसे भार घेऊन एकत्र करून कुटावे व अर्धाशेर तिळाचें तेल आणि सवाशेर मध एकत्र करून द्यावें. नंतर त्याजवर खालीं लिहिलेलें औषध द्यावें.

एक शेर बकरीचें मूत पाजावें. भुईरिंगणी, कलुंजी, बावची व देवदार प्रत्येक बराबर घेऊन सर्व शेरभर करावें. वीसशेर पाण्यांत कढ-

वावे. दहाशेर राहिल्यावर पाणी साफ करावें. त्यांत चार शेर तेल, व एकशेर सुंठ बारीक करून त्या पाण्यांत घालावी. अर्धशेर पाणी दररोज द्यावें.

काळजाजवळ गुडदे होतात त्यावर—घोडा मुस्कीलीनें मूत्र करितो. तें मूत्र लाल होतें. व कांहीं वेळानीं फार लाल होतो. गडघ्याजवळ उजवे अंगास फोड येतात, व त्याचें डोकें फिरतें, खालीं पडतो. फोड डाविकडे झाले तर फार होतात. डोकें हालवितो व डावीकडे पाहतो. त्यास उपाय—

थंडीचे दिवसांत गहूं व गरमीचे दिवसांत जवाचा आटा पाणी घालून पाजावा. २४ डाग द्यावे ते गुडदेचे जागेवर बारा बारा दरबाजूस. हरळी, नागजु, व साफाचें लांकूड हीं दोन्हीं दारूंत घालून पांढऱ्या मिरच्या घालाव्या व घोड्यास पाजावें.

दुसरा इलाज—बेंबीचें रक्त काढावें.

तिसरा इलाज—महग झाडाचें मूळ—त्याचा रंग पिंवळा असतो.—तें पाण्यांत कढवावें. त्यांत सफेत साखर घालून घोड्यास एक रत्तल पाजावें. अनुभव आहे.

---

## गुदावर फोड होतात त्यावर.

बारिदगी—गुदाभोंवतीं लाल होतें, रक्त वाहतें, फोड थोडे होतात, त्यावर इलाज—तिळाचें तेल, शेंदूर, किंवा अंड्याचा पिंवळा बलक, सुवासिक तेल, व केशर, एकत्र करून लावावें. किंवा लेप करावा. रक्तचंदनाचे गंधाचा लेप करावा. कापूर व अंड्यांतील पिंवळा भाग दोन्ही एकत्र करून लावावें व शेंदुराचें मलम लावावें.

दुसरा प्रकार—तहाजु रूदतुर. सर्व गुदावर फोड फार होतात. त्यापासून रक्त वाहत नाहीं व कातडें निघत नाहीं. त्यावर इलाज—द्राक्षाचें पाणी, धन्याचें पाणी, मेण व सुगंधि तेल हीं सर्व

चोळावें. किंवा कापूर, धन्यांचें पाणी व अश्वत्थ झाडाचें पाणी व मेण हें सर्व तिळाचे तेलांत घालून लेप करावा किंवा शेंदुराचें मलम लावावें.

तिसरा प्रकार—बवासीर ह्मणजे मूळ व्याध, गुदांत फोड येतात, ते कठीण होतात व घाण येते. कांहीं लोक त्याला धुऊन टाकतात. दोन्यांनीं ते फोड बांधतात, ते गुदांतून बाहेर येतात. त्यांस लेप एक करावा सदहू फोड कांपतात. अनुभव आहे.

उपचार—कांपल्यावर फुलाचें तेल लावावें. नंतर कागद घेऊन जाळून त्याची राख फटकी व माजूम गुलबार ह्याबरोबर घेऊन ती भुकटी गुदास लावावी.

---

## घोड्याचें गुद बाहेर येतें त्यावर.

भाजलेली सोहागी अर्धा छटाक, व भांग कचरा वगैरे काढून दोन टांक भाजावी. मग दोन्ही छाणून घ्यावीं व त्यावर लेप करावा. कांहीं दिवसांत बरें होईल. अनुभव आहे.

---

## लेंडी बाहेर पडते वेळेस गुद बाहेर पडतें त्यास.

हिरडे, व हळद, दोन्ही बरोबर घेऊन भांड्यांत घालून शिजवावें. व बाहेर काढून बारिक करून वस्त्रगाळ करावें. नंतर गुदद्वार बाहेर येतें त्या वेळेस लिंबाचे रसांत कालवून लावावें. लिंबु न मिळेल तर गाईचे पित्तांत लावावें. व तीन दिवसपर्यंत आंत घालावें. अनुभव आहे.

दुसरा उपाय—सज्जिखार, हळद, कलोंजी, गाईचें पित्त, किंवा राईचें तेल, किंवा कडूतेल, तीन दिवसपर्यंत चोळावें. अनुभव आहे.

गुदांतून रक्त पडतें. त्यास खसखशीचे फळाची साल, जंगली दालचिनी गूळ बरोबर घेऊन कढवावें आणि तांबडी साखर व दारू यांत घालून पिण्यास द्यावी. अनुभव आहे.

दुसरा इलाज.—माजूम, डाळिंबाचे झाडाची साल यास शिजवून मग पाणी आणि शिरका एकत्र करून त्याचे आंत घालावें. अनभव आहे.

---

## लेंड्या कठीण होतात व पडल्याबराबर रक्त बाहेर पडतें त्यास.

चक्कादहीं एक शेर आणावें. बेलझाडाचें बीं चार पैसेभार, पांढरें जिरें चार पैसेभार व धने चार पैसेभार हीं सर्व बारीक करून वस्त्रगाळ करावीं. त्यांत दहीं घालून ज्वारीचे पिठांत चवदा गोळ्या कराव्या. दररोज एकेकप्रमाणें दोन आठवडे द्यावें. अनुभव आहे.

दुसरा इलाज.—तूप आतपाव, आवळकटी आतपाव, मुरुडफळ एक पैसाभार, पिकलेली भांग चार पैसेभार, अजवान आतपाव, व शक्करी ( खडीसाखर ) हीं सर्व साखर खेरीज भिलाव्याचे तेलांत घालावीं, नंतर भाजून बारीक करावीं, मग त्यांत ती साखर घालून ज्वारीचे पिठांत चवदा गोळ्या कराव्या. दररोज एक गोळी देणें. अनुभव आहे.

---

## असहाल किंवा नळसुरी ( पोटांतून मैल निघतो ).

उपचार.—कितरा झाडाचा गोंद, व इसबगोल, बराबर घेऊन घोड्यास खाण्यास द्यावें. अनुभव आहे.

जंगली अंजिराचीं पानें खाण्यास द्यावीं व त्याजवर जव खाण्यास द्यावे.

---

## घोड्याची लीद पाण्याप्रमाणें होते त्यास.

कंगई झाडाचीं पानें अर्धा शेर मोठे घोड्यास व लहान घोड्यास पावशेर, दहीं एकशेर त्यांत कांहीं पाणी घालावें, एक वेळ घोड्यास खाण्यास द्यावें ह्मणजे बंद होईल.

### अन्न जिरत नाहीं त्यामुळें लीद पाण्याप्रमाणें होते.

डाळिंबाचे दाणे, सुंठ, पिंपळपानें, दगडी मीठ, बेलफळाचा मगज़ छटाक, किंवा बेलबोळ ज्याचें गुजराथेंत लोणचें करितात तें किंवा कोणी बदामही देतात.

कच्चे डाळिंबाचे दाणे नऊ पैसेभार, कायफळ, इंद्रजव नागरमोथे व कवठ, हीं सर्व औषधें नऊ पैसेभार प्रत्येक घ्यावीं. सर्व बारीक करावीं. पावशेर मध व अर्धा शेर सदहू औषधें एकत्र करून द्यावें.

करंज्याचें बीं व कवठ प्रत्येक पावशेर घेऊन एक शेर साटी तांदूळ शिजवून एक शेर दहीं व पावशेर तूप त्यांत घालून घोड्यास द्यावें. तीन दिवस दाणा देऊं नये. तीन दिवसांत बरें न झालें तर सात दिवस द्यावें. नंतर मासाची शीर व तांदूळाची शीर ह्मणजे पेज द्यावी, पहिल्यानें दाणा कांहीं द्यावा. पुढें वाढवीत जावा.

दुसरा इलाज.–घोड्यास गोडें तेल पुष्कळ पिण्यास द्यावें. चर्बीही पुष्कळ द्यावी.

तिसरा इलाज.—हिंग व दगडी मीठ एकत्र करून वस्त्रगाळ करावें, एक शेर गुळाचे दारूंत दर दिवशीं द्यावें. वरील हिंग साहा पैसेभार व मीठ नऊ पैसेभार द्यावें. अनुभव आहे.

चौथा इलाज.—अजमोदा, अजवान, कारल्याचे झाडाची मुळी, बोळ, शेंदेलोण, राई, मुळटी, काळाकुडा, चिराईत, हिरडे, बाळहिरडे, कंगाईची पानें, शेंदण्या झाडाचें बीं, जव ( आळशी ), कितराझाडाचा गोंद, काळे दाणे व पांढरे दाणे, पांढरें जिरें, धावड्याचें मूळ, संभाळू ( निरगुडी ) चीं पानें, सज्जिखार, अफू जवखार, व समुद्राचें मीठ, हें प्रत्येक बराबर घेऊन व सदहू सज्जिखार सर्वांपेक्षां कमी घेऊन सर्व बारीक कुटावें. सात दिवस घोड्यास खाण्यास देणें.

---

## डिसेंटरी.

हा रोग आंव झाल्यानें, किंवा रक्ताचे ढाळ होऊन, किंवा मोठें नासरू झाल्यानें होतो.

कारणें.—डायरियाचे योग्नें, किंवा सर्द जागेपासून होतो.

लक्षण.—ढाळास फार घाण येते, आणि ते पूमिश्रित किंवा रक्तमिश्रत होतांत, फार त्रास पडेल, फार बसेल, तहान लागेल, नाडी एका मिनिटांत साठपर्यंत चालते, फार घाबरा होतो, दाणा व चारा खातो, दुबळा राहतो.

इलाज.—हवाशीर ठाणामध्यें ठेवावा. गरम झूल किंवा गरम बांडीस बांधावें, दाणा व चारा बारीक करून द्यावा, लिनसिड, चहा, किंवा कांजी देत जावी, पोटास गरम (स्टिम्यूलन्ट) औषधें लावावीं. चार प्रकारचीं औषधें द्यावीं, व तीं तीन तीन दिवसांनीं बदलावीं. प्रथम क्यालोमेल, आणि ओपियम एकेक स्कुपल द्यावें. ह्यानें गुण न आल्यास, तिसरे दिवशीं अलम पावडर दोनपासून चार ड्रामपर्यंत द्यावी. ह्यानेंही आराम न वाटल्यास तिसरे दिवशीं नायट्रोम्यूऱ्याटिक आसिड पाण्यांत मिश्रण करून दिवसांतून दोन वेळां द्यावें. ह्यानेंही बरें न वाटल्यास, टरपेन तेल अर्धा औंस द्यावें. इपिकाकायना दीड ड्राम दिवसांतून तीन वेळां द्यावा, किंवा ह्याचे बदली मांदार झाडाची बुकणी द्यावी. बाभळीचा गोंद सहा तोळे, थंड पाण्यांत मिश्रण करून द्यावा. सफेद जिरे एक तोळा, हिंग एक तोळा, अफू अर्धा ड्राम, पीठ, किंवा पाणी मिश्रण करून द्यावें.

---

## आगरु.

घोड्याच्या गुदद्वारांतून अंग बाहेर येतें व फोड येतात, व कळा होतात. त्यास उपचार—गुदाभोंवतीं डाग द्यावा. मग वेळूच्या कांड्या जाळून त्याची राख करावी. ही राख व मिरपूड एकत्र करून

लावावी. वर विटेचा शेक द्यावा. पाणी तापवून त्याणें गुद शेकावें.

---

## *क्रिमींवर व जंतांवर.

इलाज.—राई पावशेर, मीठ पावशेर, सेंजण्या झाडाचें बीं पावशेर व दहीं दोन शेर, हें सर्व बारीक करून दह्यांत टाकून दर दिवशीं पावशेरप्रमाणें द्यावें. तीन दिवसपर्यंत सर्व क्रिमी पडून जातील. परंतु घोड्यास खरूज फार येईल. त्यास शिरनी व चर्बी, एकत्र करून शिजवावें व घोड्यास खाण्यास द्यावें. सर्व क्रिमी जातील.

माती खातो व जमीन चाटतो त्यापासून क्रिमी होतात. व घोडें दुबळें होतें, फोड होतात. त्याची चलाखीही कमी होते. लीद सुखलेली होते. त्यावर इलाज.—कावळी वावडिंग, आजमोदाः प्रत्येक पावशेर, चित्रक, मिरची, सुंठ, दगडी मीठ, हळद, निमा झाडाचीं पानें, व साल, प्रत्येक नऊ पैसेभार घेऊन बारीक करून सात भाग करावे. दर दिवशीं दोन वेळ दाणापाणी देण्याचे पूर्वी गोमूत्रांत खमिर ह्मणजे शिजवून द्यावें.

लिंबाचीं पानें व साल, हिरडे, व बाळहिरडे, प्रत्येक पावशेर घेऊन बारीक करून दहा शेर पाणी कढवून पाच शेर पाणी राहिल्यावर दोन शेर मूग घालावे. आणि शिजवावे. त्यांत चार शेर तिळाचें तेल घालावें. सकाळीं घोड्यास खाण्यास द्यावें.

दुसरा इलाज.—अजवान, किरमाणी ओंवा, करंज्याचें बीं, पळमपापडी, कमेदा व वावडिंग, एकेक अतपाव घेऊन बारीक करून गुळांत गोळ्या करव्या. सात दिवस घोड्यास द्यावें. अनुभव आहे.

तिसरा इलाज.—धने एक मूठ पाण्यांत टाकून सारी रात्र ठेवावे. सकाळीं बाजरीचे पिठांत एकत्र करून घोड्यास तीन दिवस द्यावें. बकाणा झाडाचीं पानें पावशेर बारीक करावीं. दह्यांत घालून

सारी रात्र ठेवावें, सकाळीं पावशेरप्रमाणें घोड्यास तीन दिवस द्यावें.

---

## पोटांत गोमाशा होतात त्यावर.

घोड्याचे पोटांत गोमाशा होतात त्या योगानें तो फार खातो परंतु दुबळा होतो. जैतूनचें तेल हातास लावून घोड्याचे गुदांत घालावें.

---

## पारकिडा होतो त्यावर इलाज.

घोड्यास लाल तोंडाचे क्रिमी होतात त्यास पारकिडे ह्मणतात. त्याचा इलाज कोणास कळत नाहीं.तो इलाज मीं स्वतः पाहिला आहे. दिल्लीस पातशहा सुलतान महंमद याचे घोड्यास आजार झाला होता त्यावर एका मनुष्यानें इलाज केला तो.

१ चंदन पांढरा, १ हिंगण झाडाची साल, १ कपिला, १ हिंग, १ पळसपापडीचें बीज, १ सेवतीचें फूल, आणि नाईकोरा काळा हीं सर्व वस्त्रगाळ करून पाणी घालून तें नळीनें घोड्यास पाजावें.

दुसरा इलाज—हिराहिंग तोळे चार, पळसपापडी पावशेर, काळी मीठ पावशेर,रुईचा चीक चार तोळे,सेंधेलोण पावशेर,राई पावशेर, तूप दोनशेर,कुटकी पावशेर,कोरफड एक तुकडा,मेथ्यांचें पीठ दोनशेर, घोरपडीचीं नखें काढून व पोटांतील मैळ काढून हाडें व मांस बारीक करावें; घोरपडीचें मांस तुपांत तळावें, मग सर्व वस्तु बारीक करून तुपांत भाजून एकत्र कराव्या. अतपावाची एक गोळी करावी. सकाळीं व संध्याकाळीं एकेक गोळी चाळीस दिवस द्यावी. गूळ किंवा लसूण किंवा आलें यांचें पाणी तयार करावें, त्यांत गोळ्या कराव्या.अनुभव आहे.

---

## पांढरे क्रिमी होतात त्यावर.

घोड्यास पांढरे क्रिमी होतात ते भोपळ्याचे बियांप्रमाणें असतात. त्यास कद्दूदाणा ह्मणतात व त्यांचा,रंग पांढरा असतो.

उपाय—तेलिया सुहागी तोळे आठ ८, सोनामुखी चार ४ तोळे, अंबेहाळद १२ बारा तोळे, कोळिजन दोन २ पैसेभार, अजवान १२ बारा तोळे, गूळ बारा तोळे, हें सर्व बारीक करून सात गोळ्या करा-व्या. मग सकाळीं एक व संध्याकाळीं एक द्यावी व घोडयास चार तास फिरवावें.

## पांढरे व काळे क्रिमी होतात त्यावर.

गंधान झाडाचीं पानें मूठभर खाण्यास द्यावी. ती सकाळीं दाणा व पाणी देण्याचे पूर्वी सात दिवस द्यावीं. फार अनुभव आहे.

मीरअह्लीनें केलेलें अनुभवशीर औषध कशाही प्रकारचे क्रिमी असले तरी बरे होतात. कुटकी अतपाव, डिकेमाली अतपाव, कापूर अ-तपाव, पळसपापडी अतपाव, सोनामुखी अतपाव, राई अतपाव, हिंग छटाक, काळीं मिरें अतपाव, गंधान झाडाचीं पानें सुकलेलीं अतपाव, निंब झाडाचें बीं छटाक, अमलतास झाडाची साल व सैंधलोण(काळें व पांढरें) पावशेर, बच (वेखंड) अतपाव, बोळ छटाक, चिराईत छटाक, हिरडे व बाळहिरडे अतपाव, गुग्गूळ अतपाव, लसूण पावशेर, गजगा मगज अतपाव, अंबेहाळद अतपाव, मिरे अतपाव, कुचला अतपाव, वावडिंग तीनपाव, अजवान तीनपाव, सुहाव झाडाचें बीं, इंद्रजव अतपाव, करं-ज्याचें बीं अतपाव, फटकी अतपाव, सुंठ अतपाव, घीकवारचा मगज (कोरफड) अतपाव, हिंग छटाक, मेथीचें बीं अतपाव, मिरच्या लाल, पिंपळी अतपाव, बडीशोप पावशेर, लाहोरी मीठ अतपाव, हिंगण झा-डाची साल छटाक, बेलाचा गीर छटाक, कपिला छटाक, पापडखार अतपाव, बांगडखार छटाक, हें सर्व बारीक करून वस्त्रगाळ करावें व तीन दिवस दह्यांत घालून ठेवावें. मग त्यापैकीं पावशेर घेऊन गोळी करावी. सकाळीं दाणापाणी देण्याचे पूर्वी द्यावी. केलेलें औषध संपेपर्यंत द्यावें. सुकलें तर पुन्हा मठ्ठा घालावा. कसेही प्रकारचे

क्रिमी असल्यास मरतील. व लिदीबरोबर बाहेर पडतील आणि घोडा ताजा होईल. अनुभव आहे.

## पाऱ्यासाईट (किडा.)

हा रोग तीन जातींचा आहे, पहिल्यास लंबरी कार्डीस ह्मणतात. हा आठरा इंच लांब असतो. दुसरे ल्हान लहान असतात व मोठाही आंत असतो. हे काळ्या रंगाचे असतात. तिसरा स्ट्रांग्यूलस हे लहान आंतल्या आंत रहातात. ह्यांस काढलें नाहीं तर अंड्या एवढे मोठे होतात व त्यांच्या योगानें घोडा दुबळा होतो.

कारण.—घोडा दुबळा झाल्यानें, वाईट दाणा किंवा चारा ज्याच्यांत अंडीं किंवा कीड असेल तो दिल्यानें होतो. एखादे वेळेस तयार घोड्यासही हा रोग होतो, ह्याचें कारण समजण्यांत येत नाहीं.

लक्षण.—लिदीच्याबरोबर किडे पडतात, कुरकुरीप्रमाणें दुःख होईल, शेपूट हालवीत राहील, लीद करितांना गुदद्वार उघडें राहतें, शेपूट वर करतो त्यावेळेस पिंपळी किंवा पांढरी वस्तू नजरेस येते. दिवाल चाटतो, वरचा ओंठ वर धरतो, तोंड सुकलेलें किंवा खरखरीत राहतें, कातडीं चिकटलीं जातात, शेपूट वर करून पाहिलें तर अर्धाच तुटलेला किडा दृष्टीस पडेल.

इलाज.—इलाज पुष्कळ प्रकारचे आहेत. पैकीं दोन प्रकारचे इलाज करावेत.—सलफेट ऑफ कापर दोन ड्राम, खूप बारीक करून चार रोजपर्यंत द्यावें, पुन्हां जुलाब द्यावा. पुन्हां टानिक दवा द्यावी. दुसरा इलाज.—स्यांटोनाईन एक ड्राम संध्याकाळीं दाण्यांत घालून द्यावें, पुन्हां सकाळीं जुलाब द्यावा. पळसपापडी एक तोळा, बाजरीचें पीठ एक तोळा, तेलांत तळून खाण्यास द्यावें. राई एक तोळा, अजवान एक तोळा, वेड्या बाभळीच्या शेंगा चार, किंवा दोन, काळा निमक ताकांत गाळून पिण्यास

द्यावें, किंवा शिताफळाचें बीं कुटून ताकांत गाळून पिण्यास द्याव.

## पाठीवरचे हाडाचे आसपास फोड होतात त्यावर.

मेण, तिळाचें तेल, शेंदूर, सर्व ऊन करून त्याचा लेप करावा. कित्येक लोक खांद्याजवळचें हाड कांपून सदहू मलम लावतात.

## पोटांतील आंतडीं तुटतात त्यावर.

घोडा जें खातो तें नाकांतून निघून येतें. रक्त तापल्यानें व कफाचे योगानें असें होतें त्यास इलाज नाहीं परंतु कांहीं कांहीं करितात. थंड वस्तु खाण्यास द्यावी. त्याचे नाकांत थंड पदार्थ घालावे. तंग बांधतात तेथील रक्त काढावें.

## घोड्यास कुर्कुरी होते त्यास.

घोड्यास कुर्कुरी होते त्याचें कारण, सर्दीपासून होतें. व मातीच्यापासून किंवा लांकडाचे तुकडे गवतांत येतात ते खाल्यापासून असें होतें व त्या योगानें पोटांत मुरडतें आणि दुखतें. आंतडीचें नांव ऊर आहे. त्याला एक तोंड असतें. तें लांकूड वगैरेनीं बंद होतें. त्यामुळें मुतणें व हागणें बंद होतें, तेणेंकरून जमिनीवर पडतो, लोळतो, त्या समयीं घोडा मरतो व एखादे घोड्यास त्याच वेळेस घाम निघून फोड होतात त्या योगानें मरतो. त्यास मुरम्याचा इलाज करावा. तो येणेंप्रमाणें,—काथ पांढरा, भुक, मोचरस, राई, अकरा दाणे डाळिंबाचे, अजमोदा, हीं सर्व बारीक करून गोळ्या करून खाण्यास द्याव्या, दर्द राहील.

दुसरा इलाज—लाल क्रिमी होऊन दर्द होतें त्यास. किसनी (धने) एक पैसाभार, नागरमोथे एक पैसाभार, खस (वाळा) एक टांक, सुंठ एक टांक, व बेलाचा मगज एक टांक, सर्व बारीक करून

तीन पुड्या कराव्या. अच्छेर पाणी घालून त्यांत सदर्हू जिन्नस शिजवावे. छटाक पाणी राहिलें ह्मणजे सर्व लाल क्रिमी पडतात. अनुभव आहे.

३रा इलाज-हिंग६ महा मासे, लिंबू१ एक खट्टे मोठें. लिंबाचे आंत हिंग ठेवून त्यास कपडमद करावें, विस्तवांत शिजवावें, शिजल्यावर सर्व लिंबू खाण्यास द्यावें. दोन तास मालिस करावें, नंतर कांहीं लाल मिरच्या बारीक करून शरीरांत (गुदद्वारांत) घालाव्या.

कांही राई घेऊन बारीक कराव्या. त्या त्याचे शरीरास व अंडास चोळाव्या. व विस्तवानें शेकावें, ह्मणजे घोडा मुतेल व हागेल.

वावडिंग एक तोळा, अंजिराचें तेल एक तोळा व एरंडीचें तेल एक तोळा. अर्धशेर पाणी गरम करून त्यांत तेल टाकावें. नंतर वावडिंग बारीक करून घालावें आणि शिजवावें. अर्धे पाणी राहिल्यावर नळींत घालून पाजावें.

आणखी उपाय—हिंग एक तोळा, व मस्का छटाक, एकत्र करून घोड्यास खाण्यास देणें.

काळीमिरें एक पैसाभार भाजून बारीक करून तुपांत घालून क्रिमी झालेल्या घोड्यास खाण्यास देणें.

चुन्याची ताजी कळी त्यांत पाणी गेलेलें नसावें. व हर्ताळ हीं दोन्हीं समभाग घेऊन चण्याबरोबर गोळी करून ज्वारीचे पिठांत मिळवून घोड्यास खाण्यास द्यावी. अनुभविक आहे.

जर घोडा मरण्याचे बेतांत असेल तर त्यावर इलाज.—बकरा किंवा बकरी आणून त्यास कापून त्याचें तानें रक्त व त्याचे पोटांतील गू घेऊन दोन्हीं एकेठिकाणीं मिळवून ऊन ऊन घोड्यास पिण्यास द्यावें. अनुभाविक आहे.

करड एक तोळा, व रेवाचिनी एक तोळा, हीं एक शेर पाण्यांत बारीक करून ऊन करावीं. व तें पाणी जरा निवाल्यावर एका नळींत घालून घोड्यास पाजावें.

आलें, व खडीसाखर, हीं बारीक करून एकत्र करावीं. मग त्याच्या गोळ्या करून त्यांपैकीं एक गोळी घेऊन घोड्याचे शरीरांत घालावी. ह्मणजे त्यास लघवी होईल व लीदही करील. कुरकुरी बरी होईल. अनुभव आहे.

घोडा मोठा असल्यास काळे धोतऱ्याचीं पानें सात, व लहान असल्यास साडेतीन व हिराहिंग एक तोळा अशीं दोन्ही एकत्र करून घोड्यास खाण्यास द्यावीं. ह्या पानांपासून चमत्कारिक फायदे होतात. अनुभविक आहे.

सावण अतपाव भाजलेला, हळद छटाक, जुना गूळ अतपाव, व हलीम याचें बीं अतपाव, गुग्गूळ छटाक, गेरू छटाक, सज्जिखार अतपाव, सुहागी छटाक, फटकी अर्धपाव, अफू चार तोळे, रुईचीं पानें शंभर. फटकी व सुहागी या दोहोंस भाजावें व बाकीच्यांस बारीक करून त्याच्या लिंबाएवढाल्या गोळ्या कराव्या. दररोज एक दोन गोळ्या खाण्यास द्याव्या. अनुभव आहे.

काजरी ( सुकलेलीं वांगीं ) चार तोळे, वेखंड चारपैसेभार, कुटकी, सनवासोट ( सुंठ ) चार पैसेभार, पिपळी चार टांक, हिंग उत्तम एक तोळा व द्राक्षाचा शिरका पावशेर घेऊन किंवा शिरका न मिळाल्यास गुळाचे पावशेर दारूत किंवा तीही न मिळाल्यास गूळ पावशेर घ्यावा.सर्वांस बारीक करून शिरक्यांत किंवा दारूंत किंवा गुळांत किंवा बाजरीचे पिठांत घालून एकत्र करावें. व बांबूचे नळींत घालून पाजावें. पुष्कळ वेळां अनुभव घेतला आहे परंतु दोन दिवस घोड्यास दाणा देऊं नये. व पाणी गरम करून एक वेळ देणें. पोटभर पाणी पाजूं नये.

कुरकुरी व पोटांतील दर्द यांमुळें घोड्यास मूत होत नाहीं व लेंडीही करीत नाहीं.

त्यास उपाय.—जमालगोटे चार घेऊन एकशेर गाईचे दुधांत

कढवावे. दूध निम्मे राहूं द्यावे. नंतर ते काढून त्यांचे वरचें सालपट काढावें. नंतर पावशेर मधांत एकत्र करून घोड्यास खाण्यास द्यावे. व दूध टाकून द्यावें. अनुभव आहे. घोडा मूत करील व लेंडीही करील ह्मणजे जुलाब होतील. जुलाब बंद न झाल्यास एकशेर तांदूळ शिजवून त्यांत पावशेर तूप घालून व एकशेर चक्कादहीं घालून द्यावें ह्मणजे जुलाब बंद होतील.

कुरकुरी व पोटांतली दर्द व पारकिडा लाल झाला असतां घोडा जमीनीवर धरपडतो व दोन्ही पाय मारतो, जीभ सुकते, पोट फुगते, मलमूत्र बंद होतें. त्यास उपाय.—

बकऱ्याचें ताजें रक्त, हिराहिंग सहामासे व बकरीचे कातड्याचे आंतील गोवर हीं तिन्हीं एकत्र करून बांबूचे नळींत भरून घोड्यास पिण्यास देणें. परंतु त्यांत थोडा कांद्याचा रसही घालावा.

दुसरा इलाज—खसखशीचे झाडाचीं साल नऊ टांक, पळसबीज नऊ टांक, खारीक सुकलेली पावशेर जुनी, ओंवा एक टांक, गुलकंद एकशेर, हीं सर्व बारिक करून घोड्यास तीन दिवस खाण्यास द्यावें. अनुभव आहे.

घोड्याचें पोट फुगतें त्यास उपाय.- तरवड झाडाचा डिंक एक तोळा, पळसाचा डिंक एक तोळा, काळें मीठ छटाक, व बांगडखार छटाक, ह्या चौवांस निरनिराळें बारीक करून एकत्र करावें. नंतर मनुष्याचे मुतांत गोळ्या कराव्या. व कांहीं मूत घेऊन घोड्याचे नाकांत घालावें. घोडा त्याच वेळेस बरा होईल.

दुसरा इलाज—गरमीपासून कुरकुरी वगैरे दर्द होतें त्यावर सुंठ पावशेर, काळी मिरें अतपाव, पोखरमूळ एक पैसाभार, कुटकी एक पैसाभार, बच(वेखंड) एक पैसाभार, व ओंवा पावशेर, हीं सर्व बारीक करून दर रोज एकवेळ घोड्यास खाण्यास द्यावीं. अनुभव आहे.

घोड्यास पुष्कळ पिटलें व वर लगेच त्यास गार पाणी पाजलें

तर त्याचे पोटांत दुखतें व आवाज होतो. ह्मणजे पोटांत गुरगुर वाजतें. त्यामुळें घोडा खालीं बसतो व पाय आपटतो व लांब करतो त्यास उपाय.—

सतवा (सुंठ) सहा टांक, पिंपळी सहा,टांक पिंपळमूळ सहा टांक, वावडिंग सहा पैसेभार, अजवान सहा पैसेभार, एरंडच्याचें तेल. (रौगन शिलवर) हीं सर्व औषधें बारीक करून एकत्र करावें. व तीन दिवस द्यावें. अनुभव आहे.

घोड्याचे पोटांत शूळ होतो, व पोटावर फोड होतात, आणि लघवी बंद होते, व शेंपूट हालवतो, त्यावर इलाज.—

पाखरा झाडाची साल नऊ टांक, तिळाचें तेल शेर एक, हिर्डे आठ टांक, बच नऊ टांक, सुंठ नऊ टांक, गुलकंद एकशेर, सर्वांस बारीक करून एकत्र करावें. व तीन दिवस द्यावें. अनुभव आहे.

कुकुरी व पोटांतील दर्द यावर दुसरा इलाज.—

लिंबाचीं पानें, अजवान, सुंठ, पिंपळपानें, काळीं मिरें, राजहंस, शेंदेलोण, जवखार, खाण्याचें मीठ, बडिशोप बारीक करून वस्त्रगाळ करावीं. त्याचें पाणी द्यावें. मध उत्तम बकानाचीं पानें, व काळें मीठ (पादेलोण).हें सर्व बारीक करून व सर्व बराबर वजन घेऊन तीन दिवस देणें. वायूशूळास, कुरकुरीही ह्मणतात. पोटांतील आंतडीं बंद होतात. ही बिमारी अठरा प्रकारची आहे.

## वायुकुलन याचे सहा प्रकार.

यांजवर अजवान अर्धाशेर, बच अठराटांक, वावडिंग अर्धाशेर, अजमोदा अर्धाशेर, मीठ (पादेलोण) अर्धाशेर, हिंग एकूणतीस टांक, कोष्टकोळिंजन अर्धाशेर, व लसूण अठराटांक, ह्या सर्वांस बारीक वस्त्रगाळ करून त्याचे तीन भाग करावे. पैकीं एक भाग औषध त्यांत लसूण पैसाभार घालून व बंदजिर झाडाचें तेल हे सर्व पाण्या बरोबर द्यावे.

दुसरा प्रकार—पोटांत शूळ ही दर्द झाली असतां घोड्यास फोड होतात व ऊठबस करितो. कारण, त्याचे पोटांत दाणा किंवा कडबा यांत कीड जाते. त्या योगानें असें होतें. त्यास उपाय—

तिळाचें तेळ एक शेर, गाईचें तूप एक शेर, व दूध एक शेर, हीं तिन्ही एकत्र करून कढवावीं, एक कढ आल्यावर उतरून घ्यावें. व थंड झाल्यावर नळींत घालून पाजावें.

---

## घोड्याचे पोटांत बेडकी गेली तर.

कोष्ट, पांढरेजिरे, हिर्डे, हिंग, नागरमोथे, अजवान, व बच हे एकत्र करून ऊन पाण्यांत द्यावे. त्या योगानें विष जाईल.

शूळ होतो त्यावर.—तूप पावशेर, गाईचे दूध अर्धशेर, पिंपळी चार पैसेभार, सुंठ दोन पैसेभार हें सर्व बारिक करून एकत्र करावें, व खाण्यास द्यावें. अनुभव आहे.—

सहावा प्रकार शूळ—पाण्याची तहान फार लागते. तेव्हां पाणी फार पिऊं देऊंनये, दिले तर पोटांत दर्द होते. पोटावर फोड होतात. त्यावर उपचार.

अजवान, बच, पिंपळी, सुंठ हीं सर्व पाण्यांत उगाळून द्यावीं. एक तासांत बरें होईल. अनुभव आहे.

सातवा प्रकार शूळ—घोड्यास ताप येतो, दर्द होते, व बसतो, त्यास उपचार.—

चिराईत, तुरटी, गुलपलस (पळसाचें फूल), पांढरें जिरें, गुलाबपाण्या बरोबर द्यावें. अनुभव आहे.

आठवा प्रकार शूळ—पोटांत दर्द होते त्यामुळें मूत बंद होतें, पोटावर फोड येतात, हातपाय आपटतो, त्यास उपचार.—

सुंठ बारिक करून घोड्याचे डोळ्यांत, नाकांत व शरीरांत घालावी, म्हणजे मूत होतें.

नववा प्रकार शूळ.–पोटांत मुरडतें त्यास उपचार–कापूर,व जवदाणे, शरीरांत ठेवावे, त्या वेळेस त्याजला लघवी होईल. नागरमोथे, कचूरा, अजवान, अजमोदा, काळीं कारळीं,इंद्रजव,वावडिंग, हें बारीक करून खाण्यास द्यावें.

दहावा प्रकार शूळ—सर्दी व गर्मीमुळें दर्द होते, त्यास इलाज—मशागुग्गूळ, पिंपळीं, पिंपळमूळ, कुटकी, पिंपळपानें, काळेदाणे, जिरें, वावडिंग, हिरडे, जवखार, ज्येष्टमध, आजमोदा, खोडबच हें सर्व चार पैसेभार, अफू अर्धापैसाभार, अंबमूळ, आंबोशी, सुंठ अर्धाशेर, अर्धाशेर पाण्यांत अफू घोळावी. हें सर्व एकत्र करून त्यापैकीं चार पैसेभार घेऊन नरमूत्रांत रात्रभर ठेवावें. नंतर सकाळीं द्यावें.

अक्रावा प्रकार.—घोड्याचे पोटांत दाणे हाजम (जिरत) नाहींत, लिंदीवाटे जातात. त्यास उपचार.—

सुखवले दाणे, कडू कुसुंब्याचें बीं, चिकंदर, गूळ, खैरसाल व फूल, सर्व बरावर घेऊन कढवून गोळ्या कराव्या. त्यांत तूप घालावें. मग गुदद्वारावाट पोटांत घालावें. व कांहीं खाण्यास द्यावें ह्मणजे दाणा जिरेल. व बेंबीजवळ डागही द्यावा. याप्रमाणें कोणी डागाजवळचें रक्तही काढतात. साबूण बारिक करून गुदद्वारांत घालावा. सुखे दाणे, फटकी, गुग्गूळ, पुदाणा व शलगम, पाणी घालून कढवावें. अर्धे राहिल्यावर छाणून मीठ घालावें. व चर्बी ऊन करून गुदद्वारांत घालावी.

बद्धकोष्ठ व सर्दीपासून दर्द होतें, पोट वाजतें त्यास उपचार.—

फटकी, सुखले दाणे, घांस, असपरग्व, कांदा, व जंगलीकांदा उंदराची चर्बी काढून कढवून तिसरा हिस्सा पाणी ठेवावें. त्यांत मीठ व तिळाचें तेल घालून गुजद्वारांत घालावें.

आळसी, आलें, सुखेदाणे, बोळ, कुसूम, अंजिरपानें व कांदे,

पाणी बरोबर घालून कढवून तिसरा हिस्सा ठेवावें. मग मीठ घालून कोंबडी व बदक यांची चर्बी घालावी. व हेंही शरिरांत घालावें नाहीं तर जुलाब द्यावा. त्याणें बरें न होईल तर सकाळीं घोड्यास पाणी पाजावें. बकरीची चर्बी किंवा कोणतेही जनावराची चर्बी द्यावी. तिळाचें तेल व सोरा एक टांक,या सर्वांस छाणून एकत्र करून शरिरांत घालावें. शरीरांत घालणार माहितगार असावा. अनुभव आहे.

कचनाळ झाडाची साल अर्धाशेर, तीन शेर पाण्यांत घालून कढवून एकशेर राहूं द्यावी. हें पाणी गरम दुधाबरोबर पाजावें. जुलाब होईल. जुलाब झाल्यावर तांदूळ शिजवून अर्धाशेर दहीं व पावशेर तूप घालावें. आणि घोड्यास पाजावें. अनुभव आहे.

जुळाबाची तरकी—एरंडाचें तेल पावशेर, गाईचें दूध शेर, सोनामुखी सहा मासे, अमलतास एक तोळा, हिरडे ४, बाळहिर्डे चार, कासनीस सहा मासे, तीन शेर तुपांत कढवून एक शेर ठेवावें. आणि घोड्यास पाजावें. तें दूध व तेल एकत्र करून दवा काढून बाकीचें पाजावें. एकवेळ घोड्यास ऊन पाणी द्यावें. फार जुलाब झाले तर एकशेर दहीं व एकशेर तांदूळ शिजवून घोड्यास खाण्यास द्यावे. अनुभव आहे.

---

## नाभिरोग.

नाभिरोग समजण्याचा प्रकार—बेंबींत गांठी होतात त्याजवर इलाज—दोन्ही हातांच्या शिरांचें रक्त काढावें. व सुंठ, पिंपळी, काळे मिरे, सिरसाची साल,व हळद, हीं समभाग घेऊन चिंचेच्या रसांत एके ठिकाणीं करून खापरांत घालून ऊन करून, सुजले ठिकाणीं लेप करावा. आणखी चाटण द्यावयाचें तें—वेलदोडे, सुंठ,

लवंग, धणे, कंकोळ, हिरडा, बेहडा, अवळकटी हें समभाग घेऊन पूड करून तुपामध्यें कालवून चार दिवस द्यावें.

बेंबी सुजते त्यास बेंढिया ह्मणतात. त्यास उपचार–

पुढील पायाच्या शिरांचें रक्त काढावें. मग सुंठ, मिरे, पिंपळी, सिरसाची साल व हळद, हे समभाग घेऊन चूर्ण करून चिंचेच्या बरबटांत कालवून, खापरांत ऊन करून त्याचा नाभीस लेप करावा. त्यावर चिरगुटें बांधावीं. असें तीन दिवस करावें. नंतर सुंठ, लवंगा, कंकोळ, धने, हिरडे, बेहडा, व आवळकटी ४ टांक प्रत्येकीं, येणेंप्रमाणें घेऊन, त्याचें चूर्ण करून, तूप अगर मध यांत कालवून सात दिवस पोटांत द्यावें.

घोड्याचे नाभींत फोड होऊन त्यांतून पू जातो. त्यास उपाय–

चिंचेवरील टरफलाची बारीक पूड करावी. व फोड ऊन पाण्यानें धुवावे. व तुपाचा लेप करावा, व त्यावर सदर चिंचेची लिहिलेली पूड टाकीत जावी. असें बरें होईपर्यंत करावें. व त्या जागेवरील केंस गेले तर रेड्याचें शेण आणून त्याचा रस घेऊन त्यांत तूप मिळवून खापरांत ऊन करावें. आणि केंस गेले ठिकाणीं केंस येईपर्यंत लेप करावा.

## बेंबी व पोटाखालील रोग.

घोड्याचे पोटावर हात मारला असतां पाण्याचे मसक्यावर हात मारून अवाज होतो त्याप्रमाणें होतो. हा रोग पाणी पिण्यापासून होतो. मेहनतीनंतर पाणी फार पाजलें तर होतो. त्यावर इलाज—

पोट नरम करून पोटांतील पाणी काढून टाकावें. कोंबडी एक, व कबूतर एक, अर्धा रत्तल मास प्रत्येकाचें घेऊन एकत्र करावें. पिण्याचे दारूंत व जैतूनचें तेल बुरा अरमणी सर्व मिळवून घोड्याचे गुद-

द्वारांतून पोटांत घालावें. त्यावर दोन रत्तल दारू पिण्यास द्यावी म्हणजे पिवळें पाणी निघून जाईल.

दुसरा इलाज.—पुदिना, व इसबगोल, सवांबराबर एकत्र करून खाण्यास द्यावे. पिण्यास अवशिरचे झाडाचा चीक, कुटकी, व बोळ, बरोबर घेऊन पिण्यास द्यावें. कांहीं लोक घोड्याचें पोट बेंबीखालीं तीन अंगूळ फाडून भोंक पाडून त्यांत नळी घालून पिवळें पाणी काढून घेतात. आणि नंतर जखम भरण्याचें औषध लावतात.

पोटाखालीं फोड बेंबीपर्यंत व तंगापर्यंत होतात. त्यावर इलाज—चवक, लालमिरची, जिरे सफेद, व गंधान झाडाचीं पानें हें सर्व बारिक करून आतपाव किंवा पावशेर एक वेळ दाण्याचे पूर्वी खाण्यास तीन दिवस द्यावें. अनुभव आहे.

घोडयाचे पोटाखालीं कठीण फोड होतात. कठीण असल्यास तंबाखू चार पैसेभार, कळीचा चुना चार पैसेभार, चार पैसेभार जुना गूळ, व हिंग पावशेर. तंबाखू गुळांत घालून मळावी. थोडें पाणी घालावें. फोड कांपून धुऊन त्यांत दवा घालून लावून त्यावर पिलू किंवा चांदवेलीचीं पानें बांधून तीन दिवस ठेवावीं. दुसरा इलाज—पांढरे जिरे, व कोष्ट, हीं दोन्ही खाण्यास द्यावीं. गूळ व खोबरें बारीक करून त्यावर चोळावें. अनुभव आहे.

दुसरा इलाज—कुटकी पावशेर, काळीं मिरें पावशेर, व अंबेहाळद पावशेर. गुळांत गोळी तयार करावी, दिवसांत दोन वेळ सकाळीं व संध्याकाळीं चार दिवसपर्यंत द्यावी. तिसरा इलाज.—बेंबीखालीं, पोटाखालीं व अंगावर फार कठीण फोड होतात. बेंबीवर व चेहऱ्यावर काठवठ म्हणतात. किंवा तवकही म्हणतात. त्यास उपाय.—मैदालकडी एक तोळा, व हिरा गुग्गूळ एक तोळा बारीक करून नंतर गुग्गूळ मैदालकडींत घालावा. कपड्यांतून छानून लिंबाचे रसांत खल करून नंतर लेप करावा. अनुभव आहे.

आणखी इलाज—कठीण फोड बाहूवर किंवा अंडावर हो- तात. या रोगास तबक ह्मणतात. कुटकी अर्धाशेर, काळीं जिरें अर्धाशेर, अजवान खाण्याचे अर्धाशेर, सुहागें बी अर्धाशेर, वच पावशेर, वावाडिंग पावशेर, राई पावशेर, मिरच्या दोन तोळे, व सहा- मासे बईकमना, हीं सर्व औषधें घेऊन वस्त्रगाळ करावीं. प्रत्येक दि- वशीं सांगितल्याप्रमाणें रात्रीस दवा एकेक मूठ घेऊन तव्यांत घालून थोडें पाणी घालून शिजवावें. ह्मणजे सर्व औषधें नरम होतील. रात्रीं तसेंच ठेवून सकाळीं घोड्यास द्यावें. याप्रमाणें सात दिवस करावें. अनुभव आहे.

आणखी इलाज—रुईचे झाडावरचीं पिकलेलीं पानें दोन२ दुधांत गरम करून खाण्यास द्यावीं. बरें होईल. त्यावर दाणा देऊं नये. तीन दिवसपर्यंत पाणी एकवेळ दिवसांतून द्यावें.

दुसरा इलाज.—चित्रकमूळ अतपाव, भिलावे अतपाव, गूळ अतपाव, बारीक करून आवळ्या एवढ्या गोळ्या करून एकेक गोळी सकाळीं व संध्याकाळीं दाणा देण्याचे पूर्वी घोडयास खाण्यास द्यावी. अनुभव आहे.

तिसरा इलाज.—हाळद पावशेर, हिरडे पावशेर, व अस्कंद पांच टांक, हीं तिन्ही बारीक करून अछेर गुळांत एकत्र करून चवदा गो- ळ्या कराव्या, नंतर दोनप्रहरीं पाणी दिल्यावर खाण्यास द्यावें. सात दिवसांत बरें होईल. अनुभव आहे.

चौथा इलाज.—काळींजिरें, काळींमिरें, सुंठ, बडिशोप, कुटकी, व हिंग हे प्रत्येक पांच पांच टांक घेऊन रुईचे झाडाचीं पिकलीं पानें सर्व एकत्र करून रात्रीस छटाक द्यावें. अनुभव आहे.

पांचवा इलाज.—हळद तीन तोळे, काळींजिरें छटाक, व गजग्याचा (सागरगोट्याचा) मगज तीन तोळे, हें सर्व बारीक करून बकरीचे मुतांत सर्व रात्रभर भिजवावें. सकाळीं धत्तुराचीं पानें एक टांक दोन बकरीचे

काळजा जवळचें पित्त असतें तें सर्व संध्याकाळीं व सकाळीं द्यावें. पष्कळ अनुभव आहे.

संख्या सोमल एक टांक, शिंगरूफ सहा मासे, गूळ सहा मासे, तेलीया सुहागी एक टांक, काथ दोन तोळे, व लसूण एक टांक, हीं सर्व बारीक करून गुळांत हरभऱ्याएवढ्या गोळ्या कराव्या. एक टांक सुंठीचें पाणी करून पिण्यास द्यावें. नंतर लेप करावा.

पिंपळी छटाक, गेरू छटाक, पाण्यांत एकत्र करून लेप करावा. अनुभव आहे.

दुसरा प्रकार.—तबली ह्मणजे पोटावर तबल्यासारखा आवाज होतो. वायु पोटांत होऊन असें होतें. इलाज—

अजवान-खुरासनी पावशेर, काळीं मिरें चार पैसेभार, अंबेहळद दोन पैसेभार, व भिलावे दोन पैसेभार, मनुष्याचे मूत्रांत घालून जमीनींत सात दिवस गाडून ठेवावें. नंतर काढून सात दिवस घोड्यास एक वेळ द्यावें. अनुभव आहे.

इलाज २ रा.—दारू एक शेर, पिंपळी पावशेर, गंधानचा वेल पावशेर, व अजवान पावशेर, दारूंत घालून दोन तास झाल्यावर काढून बारीक करावें. बाजरीचे पिठांत चवदा गोळ्या कराव्या, व दर दिवशीं एक गोळी द्यावी. पाहिजे तर सकाळसंध्याकाळ मिळून दोन द्याव्या. अनुभव आहे.

दुसरें औषध.—गेरू अतपाव, व कडुभोपळ्याचें पाणी एकत्रकरून फोडावर चोळावें. अनुभव आहे.

दुसरा इलाज.—दरम्यान सर्दी होते त्यावर. रुईचे झाडाच्या मुळ्यांवरची साल एक शेर, काळीं मिरें एक शेर, व आलें एक शेर, सर्व बारीक करून सागरगोट्या एवढाल्या गोळ्या कराव्या. संध्याकाळीं दाणा दिल्यावर एक गोळी द्यावी. पाणी एक वेळ गरम द्यावें.

तिसरा इलाज.—सफेद गुंजा एक तोळा, सोमलखार एक तोळा, शिगरूफ एक तोळा, काथ छटाक, व बचनाग एक तोळा, निरनिराळे कुटून बारीक करून अल्याचे रसांत मिळवावें. गोळ्या हरभऱ्या एवढ्या कराव्या. सकाळीं दाण्याचे पूर्वीं एक गोळी द्यावी. चार दिवसपर्यंत. अनुभव आहे.

आणखी इलाज.—काळीं जिरें एक शेर. कच्चीं, दाणा दिल्यावर रात्रीस घोड्यास खाण्यास द्यावीं. व सकाळीं पावशेर लाल मिरची बाजरीचे पिठांत द्यावी. ती दाणा देण्याचे पूर्वीं द्यावी.

शिगरूफ, फटकी, सुहागी भाजलेली, जंगला भाजलेली प्रत्येक एक पैसाभार. सर्व बारीक करून अल्याचे रसांत हरभऱ्याएवढ्या गोळ्या कराव्या. सकाळीं एक व संध्याकाळी एक दाणा दिल्यावर खाण्यास द्यावी. अनुभव आहे. सर्व गोळ्या एक शेरपर्यंत कराव्या.

जहरबंद—पोटाखालीं व अंडावर फोड येतात. गाई बैल वगैरे चार पायांचे जनावरांसही हा रोग होतो. हा फारच वाईट आहे. त्यावर औषध.

सुंठ पावशेर, इंद्रजव पावशेर, सुहागी पावशेर, बच पावशेर, गजग्याचा मगज पावशेर, पळसपापडी पावशेर, समुद्रफळ पावशेर, अजवान पावशेर, सुहाचें बीं पावशेर, काळीं जिरें पावशेर, गंधानचीं पानें व फुल व झाडें, राई पावशेर, वावडिंग पावशेर, हिंगणसाल पावशेर, मऊफळ छटाक, हिरडे मोठे पावशेर, पिंपळमूळ पावशेर, काळाबोळ पावशेर, रिंगणीचें झाड पावशेर, धतूर पिवळा याची साल छटाक, अकलकारा तोळे दोन, लसूण एक, मठाचें पीठ भाजकें अर्धशेर, गुग्गुळ पावशेर, कोष्टकोळिंजन पावशेर, इमगंध पावशेर, पिंपळी पावशेर, हिंग तोळे दोन, रूईचे झाडाची साल छटाक, कायफळ छटाक, अजमोदा छटाक, पोथी अढिता एकपाव, गूळ अर्धा शेर.

हें सर्व बारीक करून गुळांत पाणी घालून कालवावें. मग त्याचा पाक करून त्यांत सर्व औषधें घालून प्रत्येक गोळी छटाक करावी. सकाळीं एक गोळी दाण्याचे पूर्वी द्यावी. व दुसरी रात्रीस दाण्याचे पूर्वी द्यावी. अनुभव आहे. या औषधानें बरें न झालें तर डाग सांगितल्याप्रमाणें द्यावा.

जहरबंद होऊन सर्दी झाली तर हळद अर्धा शेर, गूळ पुराणा अर्धाशेर, हिरा गुग्गुळ पावशेर, साबण पावशेर, अफू एक तोळा, सुहागी तेलीया छटाक भाजलेली, फटकी भाजलेली छटाक, गेरू पावशेर, व विड्याचीं पानें शंभर, हीं अफू पाण्यांत खलून मग सर्व वस्तु बारीक करून एकत्र कराव्या. अफूचे पाण्यांत लिंबा एवढ्या गोळ्या कराव्या. एक गोळी सकाळीं व एक गोळी संध्याकाळीं याप्रमाणें द्यावी. घोड्यास तहान लागते त्यावेळेस पाणी गरम करून द्यावें व गवत सुकलेलें द्यावें.

फोड फारच कठीण असल्यास हिंगणाचे झाडाचा कांटा आणून त्यांणीं फोडावा. नंतर मनुष्याची विष्ठा तीन दिवसपर्यंत दर्दास लावून लेप करावा.

दुसरा इलाज.—काळींजिरें पावशेर, गाईचे पित्तांत सर्व रात्रभर भिजत ठेवून दाण्याचे पूर्वी सकाळीं खाण्यास द्यावीं. दुसरे दिवशीं त्याचप्रमाणें द्यावें. तिसरे दिवशीं त्याचप्रमाणें द्यावें परंतु काळींजिरें सात दिवसपर्यंत भिजविलीं पाहिजेत. याप्रमाणें अंडावर फोड झाले तर बरे होत नाहींत. नरम झाले तर तंग बांधावा व कठीण असले तर डाग द्यावा.

---

## घोड्याचे बेंबींत फोड होतात किंवा बेंबी वाढली तर फोड होतात त्यावर लेप.

जैतूनचें तेल गरम करून, जिरें, इसबंद, सलगमाचें तेल, व गेरू

त्यांत घालून सर्व कढवावें आणि बेंबीवर चोळावें. मनुष्याचें किंवा जनावराचें हाड तुटलें तर अरमनीचें फूल व मटाराचें पीठ, अंड्याची सफेदी, व चिंच, एकत्र करून पाण्यांत कढवून वर लेप करावा.

दुसरा इलाज.—सनोवर १ झाड, २ मच्छि, माजूफळ, गुलनार, गुलअरमनी, सर्व बराबर घेऊन पाण्यांत कढवून हाडावर चिकटवावें. अनुभव आहे.

तिसरा इलाज.—फुलांचें तेल, पांढरें जिरें, अंड्याचें पिवळें बलक, व पांढरा काथ, हीं सर्व घेऊन बेंबीवर लेप करावा.

---

## मूत्ररोग.

घोड्याचें मूत्र गुंतलें ह्मणजे साफ होत नाहीं. व मलशुद्धिही साफ होत नाहीं. त्यास उपचार—सुंठीची बारीक पूड करून ती पाण्यांत भिजवून त्याणें वात माखावी. ती वात घोड्याचे शिश्नांत अगर घोडीचे योनींत अगर गुदद्वांत घालावी ह्मणजे मूत्र किंवा मलशुद्धि साफ होईल.

मिरपूड अगर चिंचेची पूड पाण्यांत कालवून चिरगुटाचा कांकडा करून त्यांत भिजवून तो कांकडा घोडीचे योनींत अगर घोड्याचे शिश्नांत घालावा. ह्मणने मूत्र साफ होईल. व हाच काकडा गुदद्वारांत घातला असतां मळ साफ होईल.

---

## वरचेवर मूत्र फार होतें व अगदीं कृश होतो त्यास उपाय.

कोथिंबिरीचें बीं (धने), वाळूक, कालिंगन(कलिंगड) व द्राक्षेयां तिहींच्या बिया, खजूर, आणि पित्तपापडा हे सर्व जिन्नस सहा टांक घेऊन चूर्ण करून मध पावशेर आणि दूध शेर ह्यांत मिसळून सात दिवस पाजावें.

घोड्यास मूत्रद्वारें रक्त पडतें त्यास उपचार—कोथिंबिरीचें बीं

(धने), कोळश्रोचें मूळ, साखर, व दूध हीं समभाग घेऊन एकत्र करून पोटांत तीन दिवस द्यावीं.

~~अथवा~~ तांदुळांचें पीठ पांचशेर, आणि गाईचें दूध १ शेर हें एकत्र शिजवून सात दिवस द्यावें. किंवा पादेलोण, केळीचा कांदा, भुईकोहळे, तवकील हें एकेक टांक प्रमाणें घेऊन कुटून घोडें पाहून द्यावें.

मूत्ररोग झाला असतां अंगास सुस्ती येते, आणि बल धरीत नाहीं. त्यास औषध—हिरवीं वाळकें, भुई कोहळे, कोथिंबीर, मेथी, चारोळ्या, द्राक्षें, बेळा, व नाबद हीं सर्व औषधें समभाग घेऊन, चूर्ण करून गाईचें दुधांत सात दिवस द्यावें.

---

## मूत्रभेद.

रक्त मुतत असेल तर.—पावडर क्याटीच्यू ( कात ) अर्धा औंस, फटकडी अर्धा औंस, क्यासग्योरिलियाचे सालीची पूड एकपासून दोन ड्राम, काकबा, व लिमरिक पावडर एक गोळी बनण्यापुर्ती घेऊन ती गोळी दिवसांतून दोन वेळ द्यावी.

फारच मुतत असेल तर.—अफू अर्धा ड्राम, जिंजर पावडर दोन ड्राम, ओकबर्ग एक औंस, फटकी त्या मानानें लागेल तितकी, व क्याममाइल टी एक पाइन्ट (अर्धी बाटली) हीं सर्व मिळवून पाजावें.

---

## घोडा रक्त मुततो त्यावर इलाज.

तांदूळ व दूध ००।. पावशेर, व काकडीचें बीं व खिरा सहा पैसे भार या सर्वांस एकत्र करावें. आणि घोड्यास तीन दिवसपर्यंत द्यावें. अनुभविक आहे.

दुसरा इलाज.—घोड्याचे तोंडांतून, नाकांतून, व गुदद्वारांतून व शिश्नातून रक्त पडतें, छातींत कफ जमतो, उष्ण होतें, त्यामुळें रक्त पडतें आणि घोड्याचें सर्व शरीर विस्तावसारखें भाजतें ह्मणून तो

घांस दाणा खातनाहीं. जर रक्त तोंडांतून व गुदद्वारांतून आलें नाहीं व त्याचे नाकांतून व शिश्नांतूनच आलें तर त्यास उपाय.–

अगोदर घोड्याचे शरीरास तिळाचें तेल लावावें नंतर नदात घेऊन जाऊन खूप चोळून चोळून धुवावें. घोडा बुडे इतके पाण्यांत त्यास धुण्यास न्यावें. मग त्याजवर थंड वस्तु .नीळवडी वगैरे लावावी. धने व बडिशेप याचा अर्क त्यास चोळावा. नंतर पोटांत खाण्यास देणें. केळीं पावशेर, दूध पावशेर, खडिसाखर आणि तवकीर नऊ पैसेभार, या सर्वांस बारीक करून एकत्र करावें. व दरदिवशीं अर्धा शेर मध उत्तम घेऊन त्यात घालून घोड्यास सकाळीं तीन दिवसपर्यंत द्यावें. अनुभव आहे.

दुसरा इलाज—घोडा रक्त मुततो त्यास. पित्तपापडा, व मिरच्या, प्रत्येक सहा सहा पैसेभार बारीक करून अर्धशेर मधांत एकत्र करून दररोज घोड्यास द्यावें. अनुभव आहे.

तिसरा इलाज.—गरमीमुळें घोडा रक्त मुततो त्यावर—मेंदी, कितराचा गोंद, सुखलेले धने, अमला, पांढरें जिरें, व पांढरा काथ, सर्व दोन दोन पैसेभार घेऊन एकत्र करून पाण्यांत घालून एक रात्र ठेवावे. दुसरे दिवशीं सकाळीं पाण्यांतून दुसरे पाण्यांत घालावें. मग दोन प्रहर आल्यावर घोड्यास द्यावें. याप्रमाणें तीन दिवस दर दिवशीं तीन वेळ घोड्यास द्यावें. त्याची सर्वगरमी जाऊन स्वच्छ होईल. अनुभव आहे.

दुसरी रीत.—वायु किंवा उष्णता घोड्यास होते. ह्मणून तो लाल मुततो किंवा पिंवळें किंवा एकेक थेंब मुततो, त्यास—अजमोदा व कोरफडीचें फूल हीं सहा सहा पैसेभार आणि खडिसाखर अर्धशेर, हीं सर्व एक वेळ घोड्यास द्यावीं. त्यांपैकीं अर्धशेर साखर प्रत्येक वेळेस निदान असलीच पाहिजे. सकाळीं घोड्यास हें

औषध देणें. अनुभव आहे, परंतु खडिसाखर बारीक करून त्यांत मध नऊ पैसेभार घालून घोड्यास तीन दिवसपर्यंत देणें.

[redacted] दुसरा.—घोड्याचे पोटांतील रक्त नासतें, वायु आणि कफ होऊन घोडा सुस्त होतो, घांस किंवा दाणा कमी खातो, व पाणी हळु हळु पितो त्यास उपाय.—

नागरमोथें, नरकाचूर, काळाकुडा, अजवान (ओंवा) इंद्रजव, बच, अजमोदा, धने, तबाशीर, धावड्याचें फूल, सुपारीचें फूल, बाळबोळ, व चिंच, ह्यां सर्वांस बारीक करून सात दिवस द्यावें.

दुसरा इलाज.—रक्त बंद होत नाहीं त्याजवर. सोरा छटाक बारीक करून पावशेर खाण्याचें मीठ व अर्धशेर ज्वारीचें पीठ हे सर्व जिन्नस एकत्र करून पाणी देते वेळेस त्यांत घालून सकाळीं एक वेळ प्रमाणें तीन दिवसपर्यंत द्यावें अनुभव आहे.

दुसरा उपाय.—घोड्याचें रक्त काळें होतें व मासा सारख्या गोळ्या होऊन तें बाहेर पडतें. कारण त्याचें काळीज व गुडदा यांस इजा होते, त्यामुळें रक्त नासतें त्यास उपाय.—

अवळकठी एकशेर थंड पाण्यांत रात्रभर ठेवून सकाळीं पांढरें जिरें अर्धशेर पाण्याबरोबर व तांदूळ एकशेर शिजवून आणि साखर पावशेर हीं सर्व एकत्र करून सकाळीं दर दिवशीं देणें.

दुसरा इलाज.—रक्त पडतें त्यास. बाबूचीं पानें, पांढरें जिरें, वाळा, व दहिंवर पडतें त्याचें पाणी हीं सर्व सात दिवस द्यावीं.

दुसरें औषध.—दोनशेर कडूलिंबाचें पाणी, नऊ पैसेभार तूप, मध चार शेर कच्चे, व नऊ पैसेभार साखर पांढरी, हीं सर्व एकत्रकरून त्याचे गुदद्वारांत घालावीं. व त्याचे शरीरावर पांढरा चंदन, किनार झाडाचे पानाच्या रसांत उगाळून त्याचे शरीरास लावावें. व घोड्यास खाण्यास साखर व चर्बी द्यावी.

घोडा रक्त मुततो त्यावर.—तांदूळ एकशेर शिजवून त्यांत चारशेर

अंबट दहीं घालून तीन दिवसपर्यंत घोड्यास सकाळीं द्यावें. अनुभव आहे.

---

## लघवी होत नाहीं त्यास.

घोड्यास कांहीं दर्द असो अगर नसो लघवी होत नाहीं त्यास उपाय.—हिंगण झाडाचीं पानें अर्धाशेर घेऊन, खाण्यास द्यावीं. म्हणजे लघवी होईल. अनुभव आहे.

काळ्या धोत्र्याचें एक फूल आणून बिया काढून त्यांत सहा मासे हिंग घालावा. त्यावर कणीक लावून विस्तवांत शिजवावें. शिजल्यावर काढून थंड करून खाण्यास द्यावें. आणि दोन तास मालीस करावें.

पांढरे चित्रकमुळावरची साल बारिक करून घोड्याचे शरीरांत दोन्ही ठिकाणीं (गुदद्वार वा शिश्न यांत) घालावी. त्यामुळें त्याजला लघवी होईल.

दुसरा उपाय. अवळकठी आतपाव, वाईकमळ छटाक, खोडवच तोळा एक, अजवान खुरासनी चार तोळे, अजवान चार तोळे, लवंग जंगली तोळे दोन, काळाबोळा एक तोळा, काळाकुडा एक तोळा. गंधान एक तोळा, कोष्टकोलिंजन एक तोळा, मुरडफळी चार तोळे, वावडिंग दोन तोळे, काळें मिठ छटाक, कुटकी एक तोळा, लेंडीफळ चार तोळे, हिंग पंधरा मासे, गुग्गुळ पंधरा मासे, काळीमिरी एक तोळा, अंबेहळद अतपाव, व आलें अतपाव, हीं सर्व बारीक करून गुळांत गोळ्या कराव्या, किंवा बाजरीचे पिठांत एक किंवा दोन आठवडे द्याव्या. अनुभव आहे.

---

## घोडें खळूं लागलें म्हणजे त्याची धातु पडूं लागली तर त्यास औषध.

काळेंधोत्र्याच्या मुळीची साल, व अलमगीर अतपाव घेऊन त्यांत

मीठ ओंजळभर घालून द्यावें. अथवा वेखंड दोन पैसेभार कुटून बाजरीचे पिठांत कालवून द्यावें.

क[redacted]बाच्या बिया दोन ठेंचून पिठांत दळून दोन किंवा तीन दिवस दिलें ह्मणजे खळणें राहील.

पतंगाचे लांकडाचें चूर्ण वस्त्रगाळ करून दाणालाख ८८८९, व साखर ८८८९, दोनशेर दुधांत १४ दिवस द्यावें.

---

## घोडा माजला असेल आणि खळत नसेल तर खाम थंड पाडावयास औषध.

(१) तुरटी, कापूर, मोरमीठ, आवळकटी, नीळ, धने, व जिरें, हें एकेकटांक घेऊन निरनिराळें कुटावें. ह्याचें वस्त्रगाळ चूर्ण करून, लिंबाचे रसांत कालवून, दगडाचे खलांत खलून गोळ्या ३ मासे वजनाच्या कराव्या. प्रातःकाळीं एक गोळी देत जावी. ३ दिवसांत गुण येईल. न येईल तर दोन्ही वेळ देत जावी. (२) मेंदाचा पाला एकशेरभर, पांढरे कांदे ९, व पांढरा काथ १ तोळा, दररोज एकत्र कुटून देत जावें. असें सात दिवस करावें. गुण आल्यावर आणखी चौदा दिवस द्यावें. (३) तुरटी, मोरचूत, शेराचा चीक, सुरमा, व जोंधळ्याचें पीठ हीं १ टांकप्रमाणें घेऊन शेराच्या चिकांत खलावीं आणि गोळ्या कराव्या. शेराच्या चिकात गोळ्या न झाल्या तर पाणी घालून कराव्या. १ मासा वजनाची गोळी करावी. सकाळीं एक गोळी देत जावी. गुण न आल्यास सकाळीं दोन गोळ्या द्याव्या. हें औषध फार कडक आहे ह्मणून प्रकृति पाहून द्यावें.

---

## घोड्याचे लघवीविषयीं.

हे चार प्रकारचे रोग आहेतः बवाशीर, लिंगावर लाल फोड होतात ते, हाळक, व घोड्यास लघवी होत नाहीं.

बवाशीर ह्मणजे फोड कणकीप्रमाणें, होतात. शरीरावर ह्मणजे लिंगावर, नवमागर, व कलई, जैतुनाचे तेलांत घालून लावावे. बरें होईल. फोड येतात त्यांना कंडू येते त्यावर शीर काढवी: लिंगावर-चें रक्त पावशेर काढून थंड पाण्यानें धुवावें. तूप लावावें. लिंबाचीं पानें नऊ पैसेभार, व शेर खारका दोन्ही एकत्र करून एक आठ-वडाभर खाण्यास द्यावीं. अनुभव आहे.

दुसरा प्रकार—जव ह्मणजे लिंगावर मस होतात. त्यास एलवा ह्मणजे बोळ, बारीक करून गाईचे तोंडांतील लाळेंत मिळवून. त्यांत बदामाचें तेल, निंमे गरम करून तीन किंवा पांच किंवा सात दिवसपर्यंत पिण्यास द्यावें.

घोडा दिवाणा होतो त्यावर जो उपचार करतात तो यावरही करावा.

तिसरा प्रकार—हाळक ह्मणजे लिंगावर काळें कातडें होतें. घोडीवर घोडा चढल्यावर चमडा जातो. शरीर लाल होतें. त्यावर चकं-दरचा भाजी व बुगाअरमणि या दोन्हींचें पाण्यांनीं धुवावें. नंतर धन्याचे पाण्यानें धुवावें. व शिरका व केशर लावावें.

दुसरा इलाज—शरीराचे(शिश्नाचे)तोंडांत गुलाबपाणी एक शेर सोडावें. त्यावर तिळांचें तेल, व लाल फुलांचें तेल सोडावें. अनुभव आहे.

चौथा प्रकार—घोड्यास लघवी होत नाहीं; आली तर थोडी थोडी होते. किंवा अजि होत नाहीं हे दोन प्रकार आहेत.

पोटांत दर्द होतो किंवा सर्दी होते किंवा माती खाण्यांत किंवा पारा पोटांत गेल्यानें किंवा लांकूड खाल्ल्यानें व संगरेजा पोटांत गे-ल्यानें होतो. त्यावर इलाज.

कांकडी बागायती किंवा जंगली, भवाई पठा, धने, मथ्यांचें बीं, चारोळी, अंगूर ह्मणजे द्राक्षें, इलाची मोठी, व मालकांगोणी हीं बराबर घेऊन गाईचे दुधांत एकत्र बारीक करावीं. चार

दिवसपर्यंत मोठे घोड्यास पावशेर व लहान घोड्यास छटाक याप्रमाणें सकाळीं द्यावें. अनुभव आहे.

---

## घोड्याचें बहुमूत्र बंद होण्याविषयीं.

बरगमुळी व एक किंवा दोन भाजीच्या मुळ्याचीं पानें यांचा रस काढून त्यांत कांहीं पाणी घालावें. खडीसाखरेचा पाक करावा. मग दोन्हीं एकत्र करून घोड्यास पाजावें. मूत्र एका घडींत बंद होईल. घोडा मुतता बंद होत नाहीं त्यावर मुळ्याचीं पानेंच द्यावीं. घोड्याचे तोंडांत फोड होतात. काठी मोठी आणावी. त्या काठीला छेद करावें व ती काठी घोड्याचे तोंडांत घालावी, त्यांणीं फोड फोडावे. नंतर त्यावर इलाज.—

सरसु ह्मणजे शिरस, मिरच्या, व हळद हीं सर्व बरोबर घेऊन बारीक करून गाईचे दुधांत एकत्र करावीं. व तीं घोड्याचे तोंडांत घालून तोंड बांधावें. तें दोन तास ठेवावें. कोणी चार दिवसपर्यंतही ठेवतात. अनुभव आहे.

---

## घोड्याचें मूत खुलें होण्यास.

गाईचें तूप घोड्याचे शरीरावर चोळावें. गाइचें शेण एरंडाचे पानांत गरम करून चिराइताचें बीं, इलायची, गोखरू, रुईचे बीं, व पठा झाडाचें बीं, हे प्रत्येक जिन्नस सहा पैसेभारप्रमाणें घेऊन बारीक करून वस्त्रगाळ करावे. गुळाचे शिरक्यांत मिळवून घोड्यास खाण्यास द्यावें. किंवा दारू गुळाची यांत द्यावें. व त्यावर एक शेर गुळाची दारू द्यावी. दारू न मिळेल तर मठ्ठा दोन शेर द्यावा. अनुभव आहे.

दुसरा इलाज—पिसाब बंद होतो त्यावर—पिंपळी, पिंपळमूळ, काळीं मिरें, व दारू बंदुकीची हें सर्व बारीक करून त्याचे शरीरांत घालावें.

## निफ्रायटिज.

हा रोग शिस्नांत गरम सूज आल्यानें होतो. ह्याचे आक्यूट ( भयंकर ) आणि क्रानिक ( हलका ) असे दोन भेद आहेत.

कारण.—कमरेवर मार लागल्यानें, दाणा चारल्यानें, मूत्र आणणारीं औषधें दिल्यानें किंवा लावल्यापासून हा रोग होतो.

लक्षण.—कंबर कडक कमानी सारखी होते, दाबली असतां स्वस्थ राहतो, मूत्र थोडेंथोडेंच विटकरीच्या रंगासारखें खराब करतो, किंवा रक्तासारखेंही मूत्र होतें, मूत्र होण्याची तजवीज करतां, ओरडतो व ताप फार येतो.

इलाज.—शिरांचें रक्त काढावें, जुलाब द्यावे, गरम पाण्याची पिचकारी मारावी, मेंढ्याचें कातडें कमरेवर लावावें, टारटर इम्याटिक आइन्टमेन्ट लावावें, किंवा राईचें प्लस्तर मारावें, लिनसिड चहा द्यावा, किंवा पाण्यांत गोंद मिश्रण करून द्यावा.

अखेर.—घोडा बरा होतो, किंवा क्रानिकनें हलका होतो, किंवा आंत पू होऊन सूज फार येते, किंवा पूं वाहूं लागतो, शिश्न सडून जातें, दोन्हीही रोग झाल्यास घोडा मरतो.

---

## क्रानिक.

लक्षण.—हा रोग कशापासून होतो हें खास समजत नाहीं. परंतु एखादे वेळेस कळिक ( तिडिक ) फार होते, मूत्र थोडें किंवा रक्तानें मिश्रित असें होतें, कंबर कडक राहते, परंतु काम घेतल्यानें कंबर बरी होते.

इलाज.—टारटर हम्याटिक आइन्टमेंन्ट लावावें, पिचकारी मारावी, लिनसिड चहा द्यावा, जर चांगला झाला नाहीं तर शिश्न सुजून जातें व सडतें, किंवा दगडासारखें कठीण होतें. राळ तोळा एक, व पांढरें जिरें तोळा एक, उंबराचे चिकांत गोळी करून द्यावी.

ठाणामध्यें मोकळा ठेवावा. विलायची, सफेतजिरे, व काथ, हें सर्व चारचार भाग घेऊन गोळी करून द्यावी, किंवा कमरेवर सोऱ्याचा

---

## ब्ल्याडर.

हा रोग शिस्त फटिल्यानें किंवा फुगल्यानें होतो. लक्षण—रेकटसमध्यें (गुदद्वारांत) हात घालून पाहिल्यास ब्ल्याडर सुजलेला दिसेल. जर फाटलेला असला तर ब्ल्याडरची सूज कमी होते, घामास मुत्रासारखी वाईट घाण येईल.

इलाज.—घोड्यास फिरवते वेळेस ब्ल्याडर खालीं करून पाडावा. दुसरा उपाय चालत नाहीं.

---

## अलब्यूमन ( खर ).

हा रोग मागील कांहीं रोगांमुळें मूत्रद्वारें वाहतो. हा रोग झाल्यामुळें फायबर्स एका ठिकाणीं जुळण्यास हरकत होते, कारण त्यांचीं सर्व तोंडें अलब्यूमन आणि फायब्रन ( धागे ) ह्यांच्या योगानें झालीं आहेत. अलब्यूमन हें बहुतकरून अंड्याच्या सफेदीसारखें असून तें डोळ्याच्या पहिल्या पडद्यांत आणि ह्रापसीमध्यें असतें. ज्या वेळेस खर पडूं लागल्यानें घोडा दुबळा होतो, किंवा ज्या वेळेस कांहीं अजार नसतांना घोडा दुबळा होतो त्या वेळेस घोड्याचें मूत्र घेऊन, क्यारोसिव्ह सबलीमेन्ट लोशन तयार करून त्यांत मूत्र घालावें. ह्याप्रमाणें तीन वेळ केल्यास मूत्र एका ठिकाणीं जमून जातें, किंवा नायट्रिक आसिडमध्यें मूत्र घातलें असतां त्याचा रंग पिंवळा होतो. किंवा खर पडते असें माहित पडल्यास, नायट्रोम्यूऱ्याटिक आसिड एक ड्राम आणि पाणी एक शेर, ह्यांचें मिश्रण करून सकाळीं व संध्याकाळीं द्यावें; घोडा बरा होईल. किंवा अकल-

कारा, पठाणी मीठ, बायकुंबा, व सफेद मुसळी, गुळांत मिश्रण करून गोळी करून द्यावी.

एखादे वेळेस शिश्न फाटून जातें त्यास थोडें शिश्न फाटलें अस ल्यास मूत्र थोडें होतें किंवा सर्वच फाटलें असल्यास चारी पाय एका ठिकाणीं जुळतो आणि कंबर कमानी सारखी होते, व मूत्र होत नाहीं.

कारण.—पुष्कळ दिवस मूत्र न झाल्यामुळें होतो.

इलाज.—यावर इलाज चालत नाहीं.

---

## हेमोटोरिया.

हा रोग मूत्रद्वारें रक्त आल्यानें होतो. हा तीन ठिकाणीं होतो: एक शिश्नास, एक गुदद्वारास, आणि एक मूत्र होणारे नळीस. हा रोग लवकर बरा होत नाहीं.

लक्षण.—शिश्नांत रक्त येतें.

इलाज.—कंपाउन्ड टिंकचर ऑफ सिन्यामन (दालचिनीचा अर्क) तीन औंस, डायल्यूट सलफ्यूरिक आसिड पांच औंस, व पाणी एक बाटली, या सर्वांचें मिश्रण करून दिवसांतून तीन वेळ एकेक औंस द्यावा. राजन व कात हीं द्यावींत, आणि फुटाण्याचीं टरफलें, राळ, व भाजलेली फटकी, असें मिश्रण करून द्यावें.

---

## क्यालक्युलाय.

हा रोग शिश्नांत दगडासारखी वस्तु बनल्यानें होतो. हा चार ठिकाणीं होतो: शिश्नास, युरेटर (नळीस), ब्ल्याडर (गुद), आणि युरिथ्रा (मूत्र होणारी नळी). लक्षण.—पहिलीचें काम करतांना तिडकीसारखी इजा होते, मूत्र झाल्यावर दर्द बंद रहातें, व मूत्र हो-तांना बारीक बारीक दगडासारखी वस्तू निघते.

इलाज.—लिनसिड चहाचे आंत ओपियम एक ड्राम मिश्रण करून द्यावें, पुन्हा नायट्रो म्युऱ्याटिक आसिड दोन ड्रामप्रमाणें दिवसांतून तीन वेळ पाण्यांत बरा होईपर्यंत द्यावें.

दुसऱ्याचें लक्षण.—मूत्र होतें, किंवा बिलकुल होत नाहीं, रेक्टममध्यें हात घालन पाहिल्यास समजेल.

इलाज.—ओपियम. एक ड्राम पाण्यांत दोन दोन घटकेनें देत जावी, किंवा अर्धे अर्धे घटकेनें ऊन पाण्याची पिचकारी रेकटममध्यें मारावी, नंतर हात घालून ब्ल्याडरचे आंत दगड असतो तो काढावा.

तिसऱ्याचें लक्षण.—मूत्र करितां करितां एकदम बंद होतें.

इलाज—नाहीं.

चवथें लक्षण.—शेपटी उचलून पाहिल्यास दगडासारखी वस्तू नजरेस येईल.

इलाज.—कापून काढावी. मेथी, सपाळ, लाहोरी मीठ, नवसागर, चुन्याची कळी, कुसतासाक, तोतिया, तखटाचें बीज चार रुपयेभार सर्वांस कुटून गोळी करून रोज एक गोळी द्यावी. किंवा नवसागर, बचनाग, अफू व हिंग, दारूंत मिश्रण करून घोटून गोळी करून द्यावी.

---

## वृषणरोग.

वृषण सुजतात, निबर होतात आणि चेपलें असतां दुखतात त्यास उपचार—सज्जीखार, जवखार, सुंठ, पिंपळी, सैंधव, व रायहाळद, हीं सर्व प्रत्येकीं ३ टांक आणि सोमल १ टांक हें घेऊन चूर्ण करून तेलांत कालवून त्याचा वृषणावर लेप करावा. मग चिंचेचा पाला मीठ घालून ठेंचून त्याची पोतांडी करून त्यांनीं वृषण शेकावें. असें तीन दिवस करावें. मग कंकोळ, नागकेशर, व गूळ हें प्रत्येक पावशेर घेऊन एकत्र करून चूर्ण करावें. आणि ३ दिवस पोटांत द्यावें.

घोड्यास अंडरोग होतात त्यामुळें दाणापाणी टाकून कृश होतो

त्यास औषध–(१) प्रथम ३ दिवस मोहऱ्या अर्धाशेर, व बाजरी अर्धा शेर याचे वेगळाले तीन भाग करावे. त्यांतील निमे भाजावे व निमे कच्चे ठेवावे. ते दळून त्याची भाकर करून प्रातःकाळीं चारावी. (२) गुग्गूळ १ तोळा, आणि गूळ पावशेर एकत्र करून चारावें. (३) कणीक पावशेर, गूळ अच्छेर, आंबेहाळद व हाळद, एकेक तोळा, मैदालकडी, सेंधेलोण, हीं दोन प्रत्येक दोन तोळे कुटून म्हशीच्या मुतांत भिजवून पुरचुंडी करून शेकावें. पुन्हा त्याचा लेप अंडास करावा. हा लेप तीन दिवस ठेवून चौथे दिवशीं ऊन पाण्यानें धुवावा.

घोड्यास वृषणरोग होतो त्याचें लक्षण—वृषण दोन्ही थोर होऊन लोंबतात, सुजेसारखे दिसतात परंतु सूज नव्हे. त्यास औषध. तेल ००।, व तूप ००।. याचा लेप वृषणास करावा. व वरती मिठाचे पोटलीनें शेकावें. निर्गुडीचा रस ०००९, तरवडाचा रस ०००९, वांबीचा रस ०००९, गव्हाचें पीठ ००।., हाळद २ टांक, एकत्र करून शिजवून चार दिवस वृषणास लेप करावा. पोटांत देण्याचें औषध—शेपा, चित्रकमुळाची साल, सुंठ, सज्जीखार, टांकणखार, जवखार, सेंधेलोण, सांबरलोण, डांगर, काळेलोण, पापडखार, माईखार, सोललेला लसूण व गजग्याचें बीं, हें सर्व नऊ टांक व सिंगरूफ ४ टांक, एकत्र करून आल्याचे रसांत सुपारी एवढ्या गोळ्या कराव्या. एक सकाळीं व एक संध्याकाळीं याप्रमाणें एकवीस दिवस द्याव्या.

वृषणाचा दुसरा प्रकार.—ओव्याची राख ००॥, गजग्याचें बीं ००॥, चित्रकमुळाची साल पावशेर, लसूण अर्धाशेर, सुंवळखार ४ टांक, पत्रेहरताळ ४ टांक, आणि सिंगरूफ ४टाक व सोमलाची राख एकत्र करून आल्याचे रसांत रिठ्याच्या बीयेवढी गोळी करून निर्गुडीचे पाल्यांत सकाळीं व संध्याकाळीं दाणा खाल्ल्यावर एक याप्रमाणें एकवीस दिवस औषध द्यावी. सदरील सोमल घालण्याविषयीं लिहिलें आहे तो सोमल जाळण्याचा प्रकार—सोमलाचा खडा खा-

परामध्यें ठेवून त्याजवर सज्जीखार ८८|. पावशेर चूर्ण करून त्यांत घालावा. आणि खापरावर झांकण ठेवावें. खापराखालीं दोन प्रहरपर्यंत दिपाग्नि लावावा. ह्मणजे सोमलाची राख होईल. हरताळ घालण्याविषयीं लिहिलें आहे ती पत्रेहरताळ जाळण्याची कृति—गव्हाचें पीठ व उडदाचें पीठ हें दोन दोन मुठी घेऊन तिंबून हरताळ तबकामध्यें घालून वीस किंवा तीस गोळ्या होतील त्या लोटक्यांत घालून त्यावर दोन किंवा चार मातकापड करावें. मग थाळीमध्यें घालून जाळावें. ह्मणजे गोवऱ्या थाळींत घालून त्यांत जाळावें. लोटकें ठाल झालें ह्मणजे काढून लोटक्यांतील राख निघेल तेव्हां हरताळभस्म समजावें.

---

## अंडावर बेमारी होते त्यास.

अंडावर फोड होतात. अंडाचे आंत सरद गरमी होते. त्यामुळें फोड होतात. दोन्ही पायांचे रसीच्या शिरा काढाव्या. रक्त पाहिजे तितकें काढावें. त्यावर लेपः ज्वारीचे पिठाचा खमीर करून कासनीचें पाणी घालावें. व पाण्याचा तवंग एकत्र करून लेप करावा, शिरा काढल्या त्यावर.—

गांडूळ बाटलींत किंवा गाडग्यांत पंधरा दिवस ठेवावें, सुकल्यावर बारीक करावें. अंडावर फोड होतील त्यावर कांहीं दिवस चोळावें. अनुभव आहे.

दुसरा इलाज.–सुंठ, पिंपळी, पिंपळमूळ, जवखार, हे सर्व जिन्नस सहा सहा पैसेभार घेऊन बारीक करावे. मग वस्त्रगाळ करून एक शेर पिण्याचे दारूंत एकत्र करावे. दिवसांतून तीन चार वेळ खाण्यास द्यावे. दारू न मिळेल तर मधांत घालावे. पांच दिवस एरंडीचें तेल किंवा तिळाचें तेल किंवा भुईमुगाचें तेल अन्डावर लावावें व गाईचें शेण, अंजिराचीं पानें, गरम करून अंडावर बांधावीं.

तिसरा इलाज.-पिंपळमूळ, पिंपळी, पिंपळ्याजवखार, चवक, शेतरज, चित्रक, व सुंठ, प्रत्येक पांच पांच टांक घेऊन बारीक वस्त्रगाळ करावें. दोन शेर मुगांत शिजवावें. सर्व औषधें, त्यांत घालून सकाळीं घोड्यास खाण्यास द्यावें. एक दिवसांत दोन वेळ द्यावें. कडवा किंवा सुकें गवत, वैरण किंवा हरभरे हे खाण्यास द्यावे.

---

## अंडावर मोठे फोड होतात त्यावर.

ऊद, अफू, चिरंजी(चारोळ्या), व खजुराचें बीं, ह्या सर्वांस बारीक करून कोंबडीचे अंड्याचे सफेदींत घालावें. त्याचा लेप अंडावर करावा. त्यावर अंजिराचीं पानें बांधावीं. अनुभव आहे.

दुसरा इलाज.-दोन्हीं पायांच्या शिरा काढाव्या. वाइट रक्त गेल्यावर जमालगोटा ह्मणजे जेपाळ एक, दगडी मीठ छटाक, चमेलीचे तेलांत एकत्र करून पाणी घालून कढवून अंडावर लावावें आणि शेक द्यावा. कांहीं दिवसांत बरें होईल. अनुभव आहे.

---

## पोटाखालीं व अंडावर फोड होतात त्यास.

तेलीया सुहागी एक पैसाभार, भाजलेली फटकी दोन पैसेभार, कुटकी दोन पैसेभार, काळीं मिरें पांच पैसेभार, गूळ पुराणा तीन वर्षांचा चार पैसेभार, हे सर्व बारीक करून गोळ्या कराव्या. एक गोळी देऊन पाणी पाजावें. नंतर दाणा द्यावा.

दुसरा इलाज.-रुईचें बीं एक पैसाभार भाजलेलें, तंबाखू एक तोळा, सुंठ एक तोळा, तिन्ही बारीक करून कांहीं पाणी घालावें. व शिजवावें आणि अंडावर तीन दिवस लावावें. फोड बसतील.

---

## पिसाब व लीद बंद होते व पोट दुखतें त्यास.

शेपूट मारतो, पाय उचलत नाहीं, बेहोश होतो, चाबूक मारला

तरी होश (शुद्धीवर) नसतो. जीभ काळी पडते, तोंड सुकतें त्यावर इलाज नाहीं. परंतु पिंपळमूळ, सुंठ, व काजळ प्रत्येक तीन पैसेभार घेऊन गोमूत्रांत मिळवावें. त्या औषधांत वत्ती (वात) बुडवून शरीरांत ह्मणजे लीद व मूत्र या जागीं घालावी.

दुसरा इलाज.–दगडी मीठ, पिंपळमूळ, नागरमोथे, व शिरस, प्रत्येक पांच पांच पैसेभार घेऊन बारीक वस्त्रगाळ करून एक शेर कच्चा शिरका अर्धशेर तिळाचे तेलांत एकत्र करून खाण्यास द्यावें.

तिसरा इलाज.–रुईचीं पानें पांच, छिद्रासाल, जवखार, हिंग, चिंच, पिंपळमूळ, सुंठ हे सर्व चार चार टांक घेऊन, गुळाचे दोन शेर दारूंत द्यावें. जर दारू न मिळेल तर दुसरे कशांत देऊं नये. पिसाब बंद न होतां चालू झाला तर एक शेर तिळाचें तेल, दोन शेर मध, व नऊ टांक पिंपळमूळ, एकत्र करून घोड्यास खाण्यास द्यावें. छाती जवळचे व मांडीजवळचे शिरांचें रक्त काढावें.

चौथा इलाज.–मोहाचे झाडाची साल बारीक करून त्यांत नरमूत्र घालून शिजवावें. त्याचा अर्क घेऊन नळीनें घोड्यास पाजावें. मोहाची साल न मिळेल तर खेचर जनावराची उरलेली वैरण आणून भांड्यांत घालून शिजवावें. तें पाणी घोड्यास नळीनें पाजावें. हेंही न मिळेल तर संभाळूचीं पानें, व तिळाचें तेल नरमूत्र घालून खाण्यास द्यावें.

पांचवा इलाज.–कुटकी दोन टांक, काळीं जिरें दोन टांक, कायफळ दोन टांक, पिंपळी दोन टांक, खोडबच दोन टांक, राई दोन टांक, वावडिंग दोन टांक, काळींमिरीं दोन टांक, हळद दोन टांक, अंबेहळद दोन टांक, आणि बकरीचें पित्त वीस किंवा चवदा, सर्व बारीक करून वस्त्रगाळ करावें. व गाईचे पित्तात मिळवावें. सुकल्यावर दोन पैसेभार प्रमाणें सकाळीं सात दिवस द्यावें. अनुभव आहे.

---

## एक अंड चढतो व एक खालीं होतो, वर चढलेला उतरत नाहीं त्यास उपाय.

हा आजार घोड्यास कफ होतो व रक्त नासतें तेणेंकरून होतो. किंवा एक पाय लंगडतो. जिकडे अंड चढतो तिकडे अंडावर रग असते. त्याचें रक्त काढावें. त्यावर तूप लावावें. नंतर गाईचें शेण, नरमूत्र, आणि मीठ एकत्र करून शिजवावें. नंतर अंडाचे खालीं एक तासपर्यंत लावावें. नंतर घोड्यास कुळथी व कण्हेराची साल पावशेर प्रमाणें दोन्ही घेऊन तिळाचें तेल पावशेर मिळवून पाणी घालून शिजवावें. पाणी एक शेर राहिल्यावर जिन्नस काढून घेऊन पाणी पिण्यास द्यावें.

---

## गरमीमुळें घोड्यास लाल फोड होतात त्यास.

तूप लावावें, खिरणीचे झाडाची साळ किंवा बेलाची साल किंवा बेरीची साळ, पाणी घालून नरम करावी आणि ती अंडावर लावावी.

दुसरा प्रकार—फोड चिरून आंतील मळ काढावा. व वर सांगितल्यापैकीं, एकादें औषध लावावें.

---

## त्वग्रोग—खरूज.

तुमल ह्मणजे ( फोड )—हे फोड सर्व घोड्यांचे शरीरावर मोठे किंवा लहान होतात, त्यांतून लसही निघते. हातानीं नरम करावे. व ऊन पाण्यानें धुवावे, त्यावर चरबी चोळावी.

खरूज होऊन काळे डोळे होतात. घोड्याजवळ कोणी गेलें असतां, तो ओरडतो. केंस झडून जातात, कातडी काळी होते व सुकते, टाळूवरून हात फिरवला असतां केंस झडतात. त्यावर उपचार.—

रक्त काढावें, तें रक्त मानेवरचें सुमारें दोन तीन रत्तल काढावें,

नरफ्याचें बीं, व बारतंगीचें बीं, बारीक कुटून पाण्यांत मिश्रण करून पाजावें. व हुरमोजी खाण्यास द्यावी.

कडू इंद्रावण बारीक करून, गाईचे दुधांत मिळवावें. व बदामाचें तेल घालून थोडें गरम करून दररोज घोड्यास पाजावें. हा उपचार तीन किंवा पांच किंवा सात दिवसपर्यंत करावा.

सफरा ह्मणजे (सर्व शरीर पिंवळें होतें), डोक्यावर फोड उठतात, त्यांतून पिंवळे पाणी निघतें. शरीरावरचे व कपाळावरचे केंस पडूं लागतात, याप्रमाणें झालें असतां सफरा झाला असें समजावें. त्याजवर उपचार—

मानेच्या शिरांचे दोन बाजूंचें रक्त काढावें. तें रक्त दोन किंवा तीन रत्तलपर्यंत काढावें.

खरजेचा एक प्रकार आहे, त्याजला पित्ती ह्मणतात. तो प्रकार सर्व शरीरावर एकाएकी होतो, आणि एका तासांत दृष्टीस फोड पडतात. त्या फोडामध्यें थोडी लाली असोन त्या फोडांवाटे पाणीं वाहतें. त्याजवर उपचार.—

रक्त काढावें. ह्मणजे शिरा खुल्या कराव्या त्या अशा कीं, मानेजवळच्या शिरा तोडून त्यांतून दोन किंवा तीन रत्तल रक्त काढावें. आणि लाल चादरीनें घोड्याचें सर्व अंग झाकावें. हा रोग होण्याचें कारण असें आहे कीं, घोड्याचे अंगांत गरमी होते त्यापासून हा रोग होतो, आणि सदरप्रमाणें रक्त काढल्यावर हिंदवानाचें बीज, खिरपाचें बीज, खिऱ्याचें बीज. सदरहू बिजें वाटून अथवा दुसरे प्रकारें खाण्यास द्यावीं. अथवा रेवाचिनी पाण्यांत वाटून पाजावी.

पावशेर मिरच्या, पावशेर तूप, मिरच्या वाटून फार बारीक करून तुपांत मिळवून पाजावें.

काळीज सुकलें तर खरूज होते, ती मानेवर आयाळीचे जागीं, कपाळावर शेंडीचे ठिकाणीं, व शेपूट इतक्या ठिकाणीं तांदुळाचा

कोंडा जसा असतो त्याप्रमाणें भुसा उत्पन्न होतो. त्याप्रमाणें घोड्याचे त्वचेवर ह्मणजे अंगावरही भुसा निघतो. नाकांतून दुर्गंधीचें पाणी निघतें, दांत व ओंठ सुस्त होतात (महिरतात). घोड्याचें सर्व शरीर वाळतें केंस पडल्याप्रमाणें होतात, हीं चिन्हें होऊन जी खरूज होते ती फार करून अंगास गरमी झाली तर होते. त्याजवर उपचार-मानेजवळच्या शिरांचें रक्त काढावें, तें रक्त दोन किंवा तीन रत्तल काढावें. जवसाचें ( सातूचें ) पीठ त्यांत जैतूनचें तेल मिळवून अंगास चोळावें व तीन दिवस तसेंच राहूं द्यावें. चौथे दिवशीं घोड्यास पाण्यानें धुऊन खराऱ्यानें चांगलें घांसावें. चांगलें अंग कोरडें झाल्यावर जैतूनचें तेल देऊन त्याचे वजनाबरोबर तितका वजनभार गुग्गुळ घेऊन त्यांत मिळवून घोडयाचे अंगास चोळावें, ख्यारदस्ती, बुराआरमणी, सारखे घेऊन द्राक्षांचे दारूंत पाजावें.

उंटाचें दूध, तिळाचें तेल, जैतूनचें तेल, राई, काळें मीठ, येणेंप्रमाणें पाण्यांत कढवावें व जेथें खरूज झाली असेल तेथें लावावें. व तीन दिवसांनंतर धुऊन टाकावें.

दहापंधरा भिलावे घेऊन बारीक कुटून गाईचे एक शेर दुधांत कढवावें. अच्छेर दूध राहिलें ह्मणजे भिलावे व तें दूध तीन दिवस अंगास लावावें. नंतर धुऊन घोडा छायेंत बांधावा.

अच्छेर तांदूळ, व निंबाचीं पानें अच्छेर बारीक करून शिजवावें. आणि एके ठिकाणीं करून घोड्यास खाण्यास द्यावें.

अगनबंद ( भिलावे ) याचें तेल खरूज झाली असेल तेथें लावावें. दहीं लावावें. नंतर थंड पाण्यानें धुवावें.

खरजोहराचीं पानें घेऊन जैतूनचे तेलांत मिळवावीं आणि तें तेल अंगास लावावें.

बावचीचीं पानें अच्छेर घेऊन बारीक करून तेलांत मिळवून अं-

गास लावावें. दोन घंटा चोळावें, उन्हांत बांधावें, दुसरे दिवशीं थंड पाण्यानें धुवावें. याप्रमाणें तीन दिवस करावें.

आरसाचें तेल, करंज्याचें तेल, आवळ्या गंधक, हे तिन्ही एके ठिकाणीं करून जेथें खरूज झाली असेल तेथें दगडांनीं घांसावें. लाल झाल्यावर तेथें औषध लावावें, चिंचेचीं पानें, संभाळूचीं पानें, एके ठिकाणीं करून कुटावें. आणि दिवसांतून चार वेळ चोळावें.

चोपचिनी व पळसाचें लांकूड, चिंचेची साल, व अघाडा घेऊन जाळून चुन्याचे कळींत मिळवून अंगास ३ दिवसपर्यंत लावावें. नंतर घोड्यास थंड पाण्यानें धुवावें.

घोड्याचे पायास गजकर्ण होतें. मनुष्याप्रमाणें टाकळीचें बीं, तिळाचें फूल, मीठ खाण्याचें, हळद, इंद्रायणीचें बीं, कोपलचें झाड, आकड्याचें ह्मणजे रुईचें बीं, व बावची, एकंदर घेऊन कुटून बारीक करून दह्यांत मिळवावें. आणि जेथें गजकर्ण झालें असेल तेथें लावावें. सात दिवस गजकर्ण, खरूज, गर तिन्हींवर लावावें.

गजकर्ण व खरूज याजवर---काळें जिरें ६ सहा मासे, काळें मिरें ६ सहा मासे, निलातोता ६ मासे, व सेंदूर ६ मासे, निरनिराळें कुटून नऊ टांक तुपांत कढवून नंतर निळातोता व सेंदूर यांची पूड घालावी. व काचेच्या कुंड्यांत सर्व औषध खलावें. तें मलम गजकर्ण व खरूज यांवर लावावें. व गरेचा रोग होतो त्यावरही लावावें ह्मणजे बरें होईल.

मनशिळ १ एक तोळा, व तिळाचें तेल १ एक शेर घेऊन त्यांत मिळवावें. सदहू मलम जेथें दरद झाली असेल तेथें लावावें आणि घोडा उन्हांत बांधावा, तीन दिवसपावेतों असें करावें. पुढें ऊन पाण्यानें धुवावें.

अंजिराचे झाडाचीं पानें, ताकांत वाटावीं. बारीक करून अंगास लावून उन्हांत बांधावें. तीन दिवसपर्यंत असें करावें नंतर थंड पाण्यानें धुऊन टाकावें.

फटकी अतपाव, हुरमोजी अतपाव, मनसिळ छटाक, लिंबाचा रस अच्छेर, मीठ खाण्याचें छटाक, लाल मिरच्या छटाक, हीं सर्व लिंबाचे रसांत मिळवून खरूज असेल तेथें लावावें. दोन प्रहरां-नंतर धुवावें, उन्हांत बांधावें. धुण्याचे वेळेस साबूण लावून धुवावें. अनुभव आहे.

चित्रक ८ टांक, फिलफिल गर्द ८ टांक, अंबेहळद ८ टांक, सज्जीखार अर्धा शेर, अकडयाचें ह्मणजे रुईचें लांकूड १ टांक, सराचें बीं एक शेर, बांवच्या एक शेर, व गंधक अर्धा शेर, हें बारीक करून नरमूत्रांत भिजवावें, व तसेंच साऱ्या रात्र भिजूं द्यावें. दुसरे दि-वशीं तेलांत कढवावें व अंग खराऱ्यानें साफ करून त्यावर लावावें. तीन दिवसपर्यंत असें करावें.

अयाळेंन खरूज होते त्यावर उपचार—रक्त वाईट झालें तर किंवा उष्ण झालें तर रक्त काढावें. शेपटी जवळचे हड्डीजवळ रक्त चार रति काढावें. सकाळीं दररोज १ शेर खजूर खाण्यास द्यावा. पावशेर लिंबाचीं पानें खाण्यास द्यावीं.

दुसरा उपचार—तिळाचें तेल १ शेर, भिलावे, मीठ खाण्याचें पावशेर, व हळद थोडी, चाऱ्ही एक ठिकाणी करून कढवावीं. व रस अंगास लावावा. उन्हांत बांधावा, निंबाचे गरम पाण्यानें धुवावें.

पारा एक टांक, गंधक एक टांक, मनशीळ एक टांक, हाळद एक टांक, सेंदुर एक टांक, पांढरें जिरें एक टांक, पिंपळमूळ एक टांक, व कलोंजी एक टांक, हीं बारीक करून पारा, गंधक प्रथम मिळ-वावे नंतर सर्व एके टिकाणीं करावें, आणि अंगास लावावें, घो-ड्यास उन्हांत बांधावें, असें दोन तीन दिवस करावें, मग गरम पाण्यानें धुवावें.

राई चारशेर, साबू चारशेर, खाण्याचें मीठ नऊ टांक, हाळद चारशेर, लिंबाचा रस, आणि नरमूत्र, हीं औषधें खरारा करून रक्त काढावें

र्मिष्ठा चुकून देवयानीचें वस्त्र नेसते. त्यामुळें त्या उभयतांचा कलह होतो. देवयानीस कूपांत लोटून शर्मिष्ठा घरीं निघून जाते. [२१-२६] इतक्यांत ययातिराजा मृगया करून थकला असतां पाण्या करितां त्याच वनांत येतो. कूपांत देवयानीस पाहून तिला वरकाढून आपल्या नगरास निघून जातो. [ २७--५९ ] देवयानी रागावून तेथेंच राहते. शुक्र व वृषपर्वा तिची समजूत करितात. शर्मिष्ठा तिची दासी झाल्यावर ती परत घरीं येते. [ ६०--८२ ] पुनः देवयानी शर्मिष्ठेसह त्याचे वनांत क्रीडार्थ गेली असतां येथें ययाति येतो. शुक्राज्ञेनें ययाति देवयानीस वरितो.

विद्यालाभ-मुदित सुर हरिसि ह्मणति विक्रमासि यासम या
पूर्वीं न पावलोंचि, प्रभुजी टाळूं नकाचि या समया ॥ १
आह्मां न दिसेचि दुजा सुखदायक शत्रु-नाश-सम यज्ञ
समयीं पराक्रमातें करिते शुभयशोधनाश समयज्ञ ॥ २
वृषपर्वतडागाचा होऊं नेदी विनाश कविरोध ॥
पाडावा यांत यशः- संपज्जीवनविनाशक विरोध ॥ ३
करुनि विचार असा हरि जेथें वृषपर्व-दैत्य-पति-राज्य॥
त्या देशीं जाय, ह्मणे जरि मिळतें रंध्र लघुहि तें प्राज्य ४
तों रम्यवनीं शक्रें जळकेलिरता सखीयुता धन्या ॥
अवलोकिल्या कविसुता एक, दुजी सर्वदैत्यपति-कन्या ५

---

१ शुद्ध यश हेंच धन त्याची आशा करणारे. २ वृषपर्वा हेंच सरोवर. ३ शुक्राचार्य हाच बांध. ४ यश व संपत्ति हेंच उदक याचा विनाश करणारा. ५ इंद्र

त्रिमा सुरवरकन्या पाहुनि हर्षे मनीं ह्मणे बलहा ॥
भगवंत पावला या दोघींत प्रथम लावितों कलहा ॥ ६
उदकीं क्रीडत होत्या त्यांचीं वस्त्रें सरस्तटीं होतीं ॥
मारुतरूपें शक्रें मिश्रित केलीं परस्परें हो तीं ॥ ७ ॥
राजसुता शर्मिष्ठा जळकेलि करूनि त्या तटीं आली ॥
होती जलाशयींच श्रीमत्कवि-कन्यका तिची आली ८
शर्मिष्ठा कविजांबर नेसे झडकरि कळों न वासवें दे ॥
तों तीस देवयानी बोहुनि तत्परिहितात्मवास वदे ॥ ९
असुरसुते मच्छिष्या होउनि मद्वस्त्र नेससी कां गे ॥
बहु मातलीस ऐसें मज समुदाचारलोप हा सांगे ॥ १०
मर्यादा पाळावी, निजाशिव गुरूचेचि पाय, रीतीतें ॥
सांडूं नये ह्मणति कवि साधुपदाचीच पायरी तीतें ॥ ११
शर्मिष्ठा तीस ह्मणे बैसावें जैं सभेंत मत्तातें ॥
त्वत्तातें व्हावें तैं बंदी, तूं विसरलीस मत्ता तें ॥ १२ ॥
सिंहासनीं विराजे मद्गुरु, न सहस्रकरांहि परि सविता ॥
बैसे खालें त्वद्गुरु कवि कविता करुनि त्यासि परिसविता
माझी न पाविजे त्वां मत्ताताची तुझ्या न सरि तातें ॥
जें जह्नुकन्यकेचें भाग्य न पावेल अल्पसरिता तें ॥ १४

---

१ बल दैत्यास मारणारा इंद्र. २ सखी. ३ देवयानीचें वस्त्र. ४ इंद्र. ५ तिनें नेसलेलें आपलें वस्त्र. ६ मर्यादाभंग. ७ सहस्र आहेत कर ज्याला तो सविता. ८ स्तुतिपाठक.

## अकला याजवर उपचार.

घोड्याचे चार खवाल्यावर दर्द होतें, त्याला बरसात ह्मणतात. हें दर्द बारा महिने राहतें. तें मज्या बिघडल्यापासून होतें. त्यावर घोड्याची लीद व मसुराचें पीठ मिळवून त्यावर बांधावें. दुसरें बुरा आरमणी ह्मणजे एक प्रकारचें मीठ आहे तें घेऊन कोंबड्याच्या एक अंड्याचा बलक घेऊन त्यांत मिळवून त्यावर बांधावें.

तेलीया सुहागी अर्धा तोळा, भाजलेली फटकडी एक तोळा, वावडिंग एक तोळा, निळा तोता एक तोळा, पळसाचें बीं, अखळकटी सुमारें दोन चार, हीं सर्व घेऊन बारीक करून बाजरीचे पिठांत सात दिवस घोड्यास द्यावी.

तिळाचें तेल तीन शेर, दहीं तीन शेर, लिंबाचे पाल्याचा रस पावशेर, उडदाची डाळ एक शेर, सर्व एकत्र करून भांड्यांत ठेवून जमिनींत सात दिवस पुरावें, नंतर काढून सकाळीं १४ दिवस तें औषध द्यावें.

केश झडतात, त्यास धुणें नाहीं, खरारा करीत नाहींत, या योगानें होतें. घाणीनें होतें. जागा स्वच्छ ठेवावी, जागा बदलावी, सुगंध पदार्थ अंगावर घांसावे. तिळाचें तेल व लिंबाचा रस अंगास चोळावा.

मिरीएम ह्मणून एक झाड आहे, तीं पांच आणून कुटून जैतूनचे तेलांत मिळवून लावावें आणि दुसरे दिवशीं धवावें. तें गुलाबाचे पाण्यानें धुवावें, सफेत भोपळ्याचीं पानें खाण्यास द्यावीं.

लुतेप्रमाणें केंस झडतात, त्यावर उपचार-मायफळाचे सालीचें चूर्ण तिळाचे तेलांत पिण्यास द्यावें.

एगमन ह्मणून एक मछी समुद्रांत होते त्याची चरबी व उंदराची चरबी, अंगास चोळावी. व हत्ती जनावराची चरबी चोळावी.

लसयुक्त अंग होतें त्यास वांद्राची व कुत्र्यांची चरबी अंगास चो-

लावी. वाघाची व डुकराची चर्बी चोळावी, अजमवून पाहिलें आहे. जातरान, व बुराअमणी मीठ दोन्ही मिळून तेलांत लावावीं.

बरसातीचे आजाराचा प्रकार—पाणी पिवळें जातें व रक्त जातें. फोड होतात. ते कांपून त्यांत मीठ भरावें. फोड लाल होतात, ते कठीण असून डोळ्याजवळे व पिसाबचे जाग्यावर होतात. कांहीं घोड्यांचे सर्व शरीरावर होतात. जवसाचें तेल अतपाव, कापूस दोन वर्षांचा आठ तोळे, मसुराची डाळ मूठभर, जवसाचे तेलांत चार तोळे लावावें. सकाळीं व संध्याकाळीं लेप द्यावा.

फठकडी भाजलेली, पापडखार भाजलेला, नवसागर भाजलेला, ताजा चुना, व मुद्दारसेंग, सर्व बारीक करून सर्व वजन बरोबर करून लिंबाच्या रसांतचार किंवा पांच दिवस द्यावें.

सेंदूर एक तोळा, निळातोता भाजलेला २ व मासे, कापशीच्या पाल्याचा रस एक तोळा, एकत्रकरून दोन तीन दिवसपर्यंत लेप लावावा.

बरसातीचे ऋतुमध्यें जो रोग होतो त्यावर उपचार.—घोड्याची लीद ताजी, किंवा हत्तीच्या किंवा गाढवाच्या ताज्या लेंड्या, मनुष्याचे लघवीमध्यें शिजवून नंतर जखमेवर बांधावें. मुदत सहा दिवसपर्यंत. म्हणजे रोग नाहींसा होईल.

चुना पाण्याशिवाय सुका असावा व तो निर्मळ म्हणजे चांगला उत्तम व इडलिंबू. पहिल्यानें चुना दारूमध्यें घालून तो चुना थंड झाल्यावर त्यांत इडलिंबाचा रस घालावा. नंतर कापूस घेऊन त्याच्यावर औषध लावावें, नंतर तो लेप जखमेवर घालावा. तिसरे दिवशीं तो लेप काढून टाकणें. जर जखम बरी न झाली तर पुन्हा नवीन लेप सदर्हू प्रमाणें लावावा. व मखमालीचा रस काढून त्यावर चोळावा.

बिबवे आतपाव घ्यावे व मासे एकशेर, व हरभरे अतपाव घेऊन ते दोन वेळां भाजावे. व बिबवे आणि मासे एकत्र करून भा-

जळेल्या हरभऱ्याचें पीट करून, बिबवे व मासे यांचें जें कांहीं केले-
लें औषध तें व पीठ हरबऱ्याचें हें एकत्र करून त्याच्या १४ चौदा
गोळ्या करून, दररोज सकाळीं एक देत जावी. असें चौदा दिवस क-
रावें. व ऊन पाणी पिण्यास द्यावें तें एक वेळ पाजावें. थंड पाणी
देऊंनये, व घास कडबा खाण्यास द्यावा. आणि कळीचा चुना भिज-
वून तपकीर त्यांत मिश्रित करावी व तें औषध घोड्याच्या जख-
मेवर लावावें.

धोतरा पिंवळा त्याच्या मुळ्या सुद्धां चार तोळे, व काळे मिरे तीन
तोळे, दररोज द्यावे, तीन दिवसांत बरें होईल.

कडू लिंबाचीं पानें एक शेर, व तांदूळ एकशेर, हें सर्व एकत्र
करून शिजवावें, नंतर त्यांत एकशेर दहीं घालावें, व एक तोळा
हिरडे, मोठी वेलची एक तोळा, सोनामुखी एक तोळा, जिरे पांढरी
पांच तोळे, हिरडे मोठे अतपाव, अवळे अतपाव, जुना ह्मणजे फार
दिवसाचा गूळ अर्धाशेर. सदहू एकत्र करून त्यांत दहीं, तांदूळ,
व कडू लिंबाचीं पानें एकत्र करून एक दिवस ठेवावें.व प्रत्येक दिव-
शीं घोड्यास खाण्यास आतपाव द्यावें.

मकईचें पीठ एकशेर, व बारीक मासे एकशेर हें तिळाच्या तेलांत
तळावे, तें इतके तळावें कीं, अगदीं जाळून टाकावें. व फटकी, नव-
सागर,त्यांत घालावें आणि त्याचें औषध करून तें लावावें.व जें कांहीं
औषध राहील तें मठाचें पिठांत घालून त्याच्या चाळीस गोळ्या क
रून सात दिवस घोड्यास द्याव्या.

हिरवा जंगळा छटाक,व मोगरेल तेल च्यार पैसेभार घेऊन त्यांत
तो शिजवावा. आणि त्याचे लेप सात दिवस लावावे.

हिरवा जंगला१तोळे, कळीचा चुना१ तोळे, व पिंवळा धोत्रा या-
चीं मुळें हीं सावलींत वाळवावीं. व तीं दोन तोळे घेऊन बारीक करा
वी. सदहू बरसातींत जो रोग होतो त्याच्यावर सदरीं लिहिले-

लें औषध एकत्र करून त्या जखमेस थंड पाण्यानें भिजवून साफ धु-ऊन टाकावें आणि त्याच्यावर सदर्हू औषध लावावें, एका आठव-ड्यांत बरें होईल.

लेप करण्यापूर्वीं मनुष्याचे केंस जाळून त्या जखमेस लावावे नंतर औषध लावावें. दाहा पंधरा दिवसांत बरें होईल.

मिच अर्धाशेर, बिबवे अर्धाशेर, व गूळ तीन वर्षांचा अर्धाशेर एक-त्रकरून १४ गोळ्या कराव्या. प्रत्येक दिवशीं सकाळीं एक गोळी खाण्यास द्यावी.

ताजा चुना व तिळाचें तेल हें तरवड्याचे झाडाचें रसांत सज्जीखार चार पैसेभार घेऊन एकत्र करून लेप करावा.

## बरसात.

जंगला छटाक, व मोगरेल तेल चार पैसेभार घेऊन त्यांत कढवून त्याच्यावर लावावें.

तपकीर अतपाव, व काळें मिरें चार पैसेभार कापसांत टाकून कच्चें भाजावें. चुना अतपाव, व फटकी दोन पैसेभार बारीक करून एकत्र करावी. एक दिवस अगर दोन किंवा तीन दिवस लावावें. प्रथम लिंबाचे रसानें बरसात चोळावी.

करंजाचीं पानें घेऊन कुटून चाळीस रोज पर्यंत, दररोज पावशेर-प्रमाणें घोड्यास खाण्यास द्यावीं.

साबूण ३० पैसेभार, व तंबाखू ३० पैसेभार बारीक करून ३ तीन पैसेभार गोळी करावी. व सकाळीं एक आणि संध्याकाळीं एक, दाणा दिल्यानंतर द्यावी.

शिंगरूफ एक तोळा, व रुईची साल मुळ्यासुद्धां सावलींत सुकवावी. त्यापैकीं १॥ दीड तोळा घेऊन बारीक करावी, त्यांत शिंगरूफ मिळवा-

वा. एकवीस पुड्या कराव्या, आणि सकाळीं एक, बारा वाजतां एक, आणि संध्याकाळीं एक याप्रमाणें पुड्या द्याव्या.

लहान शिंप घेऊन जाळून बारीक करावी, आणि चिंचेची साल, व पिंपळाची साल निरनिराळी जाळून राख करावी. तिन्ही गाईच्या दुधांत मिळवून बरसातीवर लेप करावा.

मीठ खाण्याचें छटाक, व फटकी छटाक, भाजून डोळ्यावर जखम असते तेथें दोन आठवडेपर्यंत लावावें.

तिळाचें तेल एक पैसाभार कढवून कळीचा चुना त्यांत मिसळून जखमेवर लेप द्यावा.

सोमल एक तोळा, मोगरेल तेलांत घालून जखमेवर सात दिवसपर्यंत चोळावें.

काळें मिरें अतपाव, हळद अतपाव, काळेंजिरें आतपाव, व गुग्गूळ एक पैसाभार हे सर्व बारीक करून नरमूत्रांत घालून जमीनींत सात दिवस पुरून ठेवावें. नंतर काढून थोडेंथोडें घोड्यास खाण्यास द्यावें.

जायफळ १ तोळा, लवंगा तीन मासे, मनशिळ एक तोळा, गुडगुडीचा मैल १ तोळा, व तंबाखू १ सर्व बारीक करून लिंबाचे रसांत बरसातीवर लावावें.

वेलदोडे एक तोळा, साहारी मीठ तीन तोळे, बाळहिरडे अतपाव, गूळ जुना अतपाव, चिंच अतपाव, हीं सर्व बारीक करून गुळांत मिळवावीं. एक तोळ्याची एक प्रमाणें गोळी करावी. नंतर लिंबाचीं पानें अछेर, व भात १ शेर हें रात्रीस शिजवावें. सकाळीं दहीं शेरभर घरांत केलेलें घ्यावें. नंतर दह्यांत भात कालवावा, गोळी अगोदर द्यावी नंतर भात द्यावा. याप्रमाणेंच संध्याकाळीं करावें.

रुईचा चीक व येरंडेल तेल एकत्र करून, कानावर टाकून डोळ्यावर पट्टी बांधावी. नंतर मोरचूत, व निळा जंगला, भाजून बारीक करून तीन दिवस पट्टी बांधावी.

डोळ्यावर व खालीं बरसात होते त्याजवर उपचार—हरताळ, व निळाजंगला भाजलेला, बारीक वस्त्रगाळ करावा आणि बरसातीवर लावावा. कांहीं दिवस असें करावें, घोड्यास खाऊं देऊं नये.

बरसातीवर जखम झाली तर त्याजवर उपचार—शेंदूर, खडी-साखर, दरयाचा फेंस, कसरी दगड, हीं सर्व बारीक करून लिंबाचे रसांत मिळवावें, आणि बरसातीवर लावावें. नंतर वर लिहिल्याप्रमाणें पट्टी लावावी.

बकऱ्याचे पाठीची हड्डी घेऊन, त्यांतील मगज काढावा, व शिंगरूफ, आणि शेंदूर यांचा पट्टा डोळ्यावर लावावी.

नासरु हें डोळ्याचे कोनावर होतें, तेणेंकरून डोळ्यांतून पाणी फार वाहतें, व गू फार येतो. त्याजवर उपचार—रक्त काढावें, कतुरीवन ह्मणून एक नदीचे किनारीं मुळी असते ती, व काळें मीठ आणि जंगला बराबर घेऊन त्यावर लावावें.

नरकवटी भुकटी करून लिंबाचे रसांत लावावी.

मायफळ, कतुरीवन, भाजलेली फटकी, केशर, व अफू हें सर्व बारीक करून विंचू जाळून त्याची राख घेऊन वस्त्रगाळ करून, नासुरांत तीन दिवस भरावी.

बुराअदमणी मीठ, इंद्रायणी मीठ, दर्याचा फेंस, व खडीसाखर, बरोबर वजन घेऊन, नवसागर चवथा हिस्सा घेऊन, सर्व बारीक करून वस्त्रगाळ करावें. आणि आठ जवा इतकें नासुरांत भरावें.

---

## घोड्यास गर होतात त्याजवर उपचार.

सर्व शरीरावर गर होतात, ते कांहीं मोठे व कांहीं लहान असतात. त्यापासून पिवळें पाणी निघतें, त्यास हातानें नरम करावें. आणि ऊन पाण्यानें धुऊन टाकावें. मेण आणि चर्बी हीं दोन्ही

मिळून विसळवावी. आणि त्यांत तिळाचें तेल टाकावें. आणि तें त्या गरांस लावावें.

काळें मीठ-पावशेर, बांगडखार, सज्जिखार, ओंवा ( अजवान ), हळद, आंबेहळद, बच, सुंठ, कुटकी, गुग्गुळ, अफू तीन मासे, पिंपळी, पिंपळमूळ, चारट, शेण व स्त्रियांचे विटाळाचें भिजवलेलें फडकें, खाण्याचें मीठ, व मध पावशेर. त्यापैकीं मध एक पैसाभार घोड्याचे जिभेस चोळावा. आणि ऊन पाण्यानें धुऊन टाकावें. नंतर बच (वेखंड) आणि आंबेहळद वजन ॥९ हीं कुटून आणि शिजवून सकाळीं सातदिवस पर्यंत द्यावें. नंतर सदरीं लिहिलेला सर्वमसाला पावशेरप्रमाणें घ्यावा, व त्यास बारीक करून मधामध्यें त्याच्या गोळ्या कराव्या. त्या सकाळीं घोड्यास द्याव्या, असें दोन आठवडेपर्यंत करावें. ह्मणजे घोडा बरा होईल.

अगोदर काशीचे पाण्यानें त्यास धुऊन टाकावें. काशी आणि राजपुतक हीं दोन्ही एके ठिकाणीं मिसळावीं. व मेण आणि चर्बी यांणीं तें गरावर चोळावें. आणि त्याजवर राजपुतक व काशी हें लावावें.

गर मानेंत व शेपटींत कठीण व सुकें होतात, पाणी जात नाहीं, रंग पांढरा होतो त्यास उपचार—एक लहान बेटकुळी आणावी. दररोज एकप्रमाणें चार दिवस खाण्यास द्यावी. पांचवे दिवशीं डिकेमाली ॥५ पांच टांक द्यावी. त्यांत एक साप सरडा मोठा रंगी बेरंगी असा आणावा. आणि गोडें तेल घेऊन त्यांत कढवावा. आणि गरावर लेप करावा.

दगडांनीं चोळून रक्त काढावें. नंतर सोबणखार, चुना, निळातोता व लिंबाचा रस यांचा लेप करावा. गुग्गुळ १ एकशेर, पावशेर काळें मीठ, आणि हळद पावशेर. १५ गोळ्या करून रोज एकप्रमाणें सकाळीं खाण्यास द्यावी.

बकरीचें मांस, कलमी सुहागी, हिंग व राई हे सारखे घेऊन काळे मिरे दहा पट, लाल मिठ दहा पट व बाजरीचें पीठ २० पट, सर्व मिळून १८ गोळ्या कराव्या. रोज सकाळीं एक द्यावी.

माजलेला गुग्गुळ अर्धा शेर, व बैलाची चर्बी दहा शेर शिजवून ४० गोळ्या कराव्या. सकाळीं एक गोळी दाणा देण्याचें पूर्वीं द्यावी.

उडदाची डाळ अर्धा शेर, अंबेहळद पावशेर, तूप अतपाव, व बकरीचें मांस तुपांत शिजवावें, नंतर तीन गोळ्या कराव्या. प्रतिदिवशीं रात्रीं एक गोळी द्यावी. बरें झालें नाहीं तर सात दिवसपावेतों द्यावी.

पैसाभार चुना, व साबू पैसाभार, पाण्यांत मिळवून त्याचा लेप करावा. व विस्तवानें शेकावें.

तूप व मीठ, एकत्र करून अंगास चौदा दिवस लावावें.

दररोज सकाळीं शिळे पाण्यानीं धूत जावें.

गुरगुडीच्या पाण्यानें दररोज धूत जावें.

जोंधळ्याचें पीठ पावशेर, बिबे अर्धाशेर, बिबे कुटून जोंधळ्याचे पिठांत घालून, त्यांत पाणी घालून शिजवावें. त्या पिठाचा लेप घोड्यास करावा.

तिळाचें तेल १ शेर घेऊन त्यांत अर्धाशेर बिब्याचे तुकडे टाकून, दोन्ही जिन्नस एकत्र करून शिजवावें. त्या तेलाचा तीन दिवस घोड्यास लेप करावा. हें औषध खरजेसही उपयोगी आहे.

चित्रक पावशेर, आंबेहळद, हळद, गंधक, रुलीम, जमालगोटा, मोहरी, सज्जीखार, हे प्रत्येक पावशेर, व रुईचें ढांकूड एक तोळा, हे जिन्नस आणून पूड करून माणसाचे मूत्रांत भिजवावें. आणि मग त्यांत तेल घालून शिजवावें. व घोड्याचें अंग खाजवून त्यावर हें औषध लावावें.

आघाड्याचे झाडाचीं मुळें व पाला जाळून त्याची राख करावी. ही राख तिळाचे तेलांत खलून गरेवर लावावी.

जोंधळ्याचें पीठ अर्धाशेर,व सोरमीठ अर्धाशेर, एके ठिकाणीं मिसळून त्याची भाकर करून चांगली भाजावी, नंतर ती भाकर कुटून त्याचा चांगला चुरा करून ती पूड वस्त्रगाळ करावी, ही पूड तिळाचे तेलांत मिसळून गरीवर लावावी. एक आठवड्यांत बरें होईल.

ह्या औषधानें गर बरी न झाल्यास, ज्या ठिकाणीं रोग झाला असेल त्या ठिकाणीं थोडेसें चिरून त्यांत रुईचा चीक भरावा.

---

## सरफिट.

कारण.—अन्न जिरणारे कोठ्यांत कांहीं हरकत झाल्यानें, किंवा किडणीमध्यें हरकत झाल्यानें खराब वस्तु निघून सरफिट नांवाची इजा होते. नर्व्ह (शिरा) मध्यें ही हरकत झाल्यानें इजा होते, एकांत खरूज होते, व दुसऱ्यांत फोड येतात.

लक्षण.—खरूज होते, क्यूटिकल ह्मणजे कच्चे कांतडें निघून त्यांतून रक्त येऊन कांतडें सरकल्यासारखें होतें, फिरून खरूज बंद होऊन त्या लाल जागेवर पांढरे छिलटे येतात.

इलाज.—ब्रानम्याशमध्यें नायटर दोन ड्राम द्यावें, नरम रतीब लावावा, ठाणामध्यें मिठाचे खडे ठेवावे. व्हिनीगर लोषन लावावें, किंवा, सलफ्यूरिक आसिड लोषन लावावें. सलफ्यूरिक आसिड एक औंस व पाणी दोन बाटल्या पिण्यास द्यावें.त्या योगानें क्यूटिकल नरम होऊन नर्व्ह (शिरा) यांस अराम होतो, फुलर्स लोषन ऑफ आरसेनिक एक औंस पिण्यास द्यावें, किंवा ताक लावावें. काळी मिरची,व सोन गेरू एक एक तोळा, फटकीचें बीं एक तोळा, एक जागीं मिश्रण करून पिठांत द्यावें. उदाचा अर्क द्यावा, किंवा काळी माती लावून उन्हांत उभा करावा.

मणकस—ह्या प्रकारचा घोड्याचा रंग उत्पन्न होऊन घोडा अगदीं अशक्त होतो. त्यास उपचार–इरसाल आंब्यांचा रस काढून

तांदूळ, धुवासाखर व गाईचें तूप एकत्र करून दोन आठवड्यांपर्यंत द्यावें. ह्मणजे मणकस रंग बरा होईल.

त्वग्रोग सर्व शरीरावर होतो. मुख्यत्वेंकरून [illegible]स सूज असते. खांदा व कुशी खेरीजकरून बाकीचे अंगावर त्याचा प्रादुर्भाव होतो. अंगाचें पहिलें [illegible]तडें वर आल्यासारखें दिसून त्वचा दिसूं लागते: नंतर थोडे दिवसांनीं खवलीं पडतात, त्यानंतर कातड्यावर कोंडा उत्पन्न होतो. आणि तो कोंडा त्वचेवरचे केस घेऊन निघूं लागतो. हा रोग उन्हाळ्याचे जे महिने आहेत त्यांत व मेहनत करून आल्यानंतर अंगांत गर्मी असल्या वेळीं हिरवें गवत व थंड पाणी सेवन केल्यापासून होतो. या साठीं असें न होऊं देण्याकडे सर्व काळ लक्ष्य असावें. जर मेहनत करून आल्यावर लागलेंच घोड्यास हिरवें गवत खाण्यास दिलें किंवा थंड पाणी पिऊं दिलें तर केव्हां केव्हां पोटशूळही उत्पन्न होईल. या सदरीं सांगितल्याप्रमाणें त्वचेच्या रोगास सरफिट असें ह्मणतात. हा बरा होण्यास जुलाबाचें औषध पांच किंवा सहा दिवसांचे अंतरानें, देत जावें. व भुशाबरोबर कांहीं नैटर मोताद द्यावें. व घोडा फारच लठ्ठ असेल तर रक्त काढावें. हाही एक उपचार आहे.

म्यालंढर ह्मणजे गुडघ्याचे सांध्याचे पाठीवर कोंड्यासहवर्तमान ज्या पुळ्या उठून फुटतात त्याला म्यालंडर असें ह्मणतात. आणि हा रोग रक्त नासल्यापासून होतो. त्यास उपचार—आल्टरेटीव आणि कूलिंगफिजीक (सौम्यजुलाब) दिला पाहिजे. व नैट्रेट ऑफ सिलवर ऑइंटमेंट लावावें. अथवा आर्मीज ऑइंटमेंट लावावें.

स्यांडर रोग ( मांडीचे सांध्यासमोर ) म्यालंडर प्रमाणेंच जो कांहीं रोग होतो त्याला औषध जें मॉलंडरच्या रोगास सांगितलें तेंच योजावें.

कातड्यावर सूज येते, किंवा गांठी होतात, बाजूस खांद्यावर गांठी

येतात व कांहीं गांठी जिरून डाग पडतात. गरमीचे दिवसांत हा रोग होतो, तसेंच घोडा बाहेरून फिरून आल्यावर गरमीमुळें व थंड पाणी किंवा हिरवें गवतें दिलें तर हा रोग होतो. साधारण जुलाब ५ वे अगर ६ वे दिवशीं द्यावा. नैटर व ब्रांडमांस सात औंस भुशांत द्यावें. घोडा खाण्यानें लठ्ठ झाला असेल तर रक्त काढावें.

सुंभास किंवा टांचेस क्षत पडून दुःख झालें तर पाण्यानें धुण्यापासून जास्ती होतें. या करितां पूर्वींचें मलम लावावें. थंड जुलाब द्यावा. एक औंस नैटर भुशाबरोबर किंवा कोंड्याबरोबर जुलाब होण्याच्या पूर्वी द्यावें. नंतर थंड जुलाबाची गोळी द्यावी. व जुलाब बंद झाल्यावर नैटर १ औंस भुशाबरोबर द्यावें.

---

## बोसावाद.

घोड्याच्या सर्व अंगावर गांठी होतात आणि गांठीचे आंतील मांस मोठें होतें त्यास उपाय—पळसाचें लांकूड, चिंचेच्या झाडाची साल, व आवाडच्याचे झाडाची साल, ह्या सर्व साली निरनिराळ्या जाळून त्यांच्या राखा व शिंपा जाळून त्याचा चुना हे सर्व समभाग घेऊन व पाण्यांत एकत्र कालवून लेप करावा. ३ दिवसांत उपशमन होईल.

---

## ग्रीस रोग.

ग्रीस रोग ( टांचेला जें क्षत होतें ) त्यास ह्मणतात. हा रोग गाडीचे घोड्यास उत्पन्न होतो.

हा रोग तीन जातींचा आहे. सिंपल ( साधा ), अलसरव्हेटीव ( नासुरा ) सारखा, आणि ग्रेप्स ( द्राक्षा) प्रमाणें होतो.

कारण.—अंगावर मळ ठेविल्यानें, खराब दाणा चारल्यानें, सर्दीपासून, पाण्यानें धुतल्यावर चांगला कोरडा न केल्यामुळें, आणि अशक्त घोडा असला तर हा रोग होतो.

सिपळचीं लक्षणें.—पाठीमागले पाय थोडे सुजतात, लंगडूं लागेल, परंतु कामाच्या वेळेस लंगडणार नाहीं, अंगावरचे केंस उभे राहतात. अंग तेलकट होतें. व कातडें नरम होतें.

इलाज.—खाण्यांत बदल करावा, तीन दिवसपर्यंत पोटिस बांधावें, तें सूज कमी होईपर्यंत. आलम पावडर सुजेवर टाकावी, फिरवीत जावा; बरा होईल.

नासुरा सारख्या सुजेचीं लक्षणें.—मागील पायाचे गुडघ्यापर्यंत सूज येते, फार लंगडतो, तेलासारखा पदार्थ जास्त निघतो, नासरूसारखें दिसेल.

इलाज.—ओपियम पावडर पोटिसांत घालून तें पोटिस तीन दिवसपर्यंत बांधावें. क्लोरेड ऑफ झिंक दोन स्क्रुपल, टिंचर ओपियम २ औंस, पाणी एक बाटली, याचें मिश्रण करून दिवसांतून दहाबारा वेळ लावावें. घाण येत असल्यास बारीक कोळसा दोन पौंड, खळ ( कणकीची ) एक बाटली, भुस्सा एक पाउन्ड, बारली एक पाउन्ड, व ओपियम पावडर मिश्रण करून पोटीस बांधावें. एकाच पायास सूज आल्यास ह्याचे चौथा हिस्सा तयार करून लावावें.

ग्रेप्सचीं लक्षणें—कातड्यावर द्राक्षासारखे गोळे येतात. तेला सारखा पदार्थ निघतो, ती जागा लाल होते, हात लावल्या बरोबर रक्त निघूं लागतें.

इलाज.—त्या गोळ्यास चाकूनें कापावें, रक्त बंद होईल असा डाग द्यावा, कोळसा, आणि खमीर ( आंबवलेली कणीक ) यांचें पोटीस बांधावें.

जर लहान घोड्यास सूज आली तर, सहा पौन्ड भुस्सा आणि गाजरें खाण्यास द्यावीं. अन्न पचन होणारें व मूत्र साफ होणारें औषध द्यावें. जिनसन एक ड्राम, व नाइटर २ ड्राम, सुंठ आणि गूळ ह्यांत गोळी करून द्यावें, गाजराचें पोटीस बांधावें, रपेट द्यावी. लिंबोणी, फटकी, पाप-

हखाल, पांढरें जिरें, अंबेहळद, गंधकाचा अर्क आठ आणे भार व सर्व औषधें तोळा तोळा घेऊन पाण्यांत उगाळून लेप करावा.

---

## गजचर्म.

घोडा वारंवार अंग घांसतो, अंगावर चट्टे पडतात. अंग हत्तीच्या अंगाप्रमाणें खरखरीत होतें ह्मणून त्यास "गजचर्म" ह्मणतात. त्यास औषध—रूईच्या मुळीची साल,कुडयाची साल,निर्गुडीची साल,हळद, दारूहळद, कांच, संचळ, व गंधवीड, हीं सर्व औषधें पावशेरप्रमाणें घेऊन वाटून गोमूत्रांत एक दिवस भिजत घालावीं. दुसरे दिवशीं घोड्याचे अंगास लावावें.ह्मणजे बरें होईल. (२) अंकोल्याची ओली मुळी पावशेर आणून कुटून बारीक करावी. मग बिब्बे, बावंच्या, व खडशिंग, प्रत्येक २ शेर आणून चूर्ण करून तिळाचें तेल पावशेर, व अंकोल्याची कुटलेली साल घालून पातालयंत्रांत घालून तेल काढावें. तेल करपूं देऊंनये. हें तेल सात दिवस अंगांस चोळावें. असें लाविलें असतां गजचर्म, खरूज, खांडूक, मूत्रा, जखम, फोड व गरीचीं छिद्रें या सर्व रोगांवर गुणाकारी आहे. हळद गाईचे दुधांत कालवून पोटांत द्यावी.

---

## रिंगवर्म.

हा रोग चकरीसारखे चट्टे पडून होतो, यांत किडे होतात त्यांस प्यारेसाइट ह्मणतात.

कारण.—एकापासून दुसऱ्यास हा रोग उद्भवतो, किंवा त्याच्या शरीराच्या फेरफारानेंही उद्भवतो. ह्याची लस दुसऱ्यास लागल्यास आठ पासून चौदा दिवसांत ही इजा होते; ह्याप्रमाणें न झाल्यास स्पर्शापासूनही इजा होत नाहीं.

याच्या दोन जाती आहेत. एक सुखी खरूज व एक ओली खरूज. ओलीचे आंत पिवळें पाणी निघून खरूज जास्त होते.

ओलीचा उपाय.—व्हाइट आइन्टमेन्ट लावावें, आणि पांढरा कपडा बांधून त्याजवर झूळ घालावी.

सुखीचा उपाय. साबूण आणि पाणी यानें साफ धुवावें, किंवा क्यांथ्रेडिस एक औंस व व्हिनीगर आठ औंस, भिजवून चवदा रोज लावावें, लिंबू चोळावें, किंवा लिंबु आणि मनसर मिश्रण करून दोन दिवस लावावें, म्हणजे बरी होईल.

---

## लिस ( ऊ ).

उवा पडतात त्यांजवर.

इलाज.—सर्व शरीर धुवावें, किंवा तंबाखूचे पाण्यानें धुवावें, किंवा कारबालिक लोषन लावावें, सिताफळाचीं पानें, वाटून लावावीं.

---

## घोड्याचे पहिले केंस उपटून दुसरे आणण्याचा प्रकार.

केश पांढरे झाल्यास त्याजला उपचार—प्रथम केंस उपटून त्यावर वडाचा चीक मर्दावा. व त्यावर पारंब्यांचे तुकडे आणि खापरी घोटून बांधावी ३ दिवस सोडूनये, चौथे दिवशीं सोडून वस्त्रानें घांसावें. व वर लोजखार मर्दावा, आणि पुन्हां वडाचा चीक मर्दावा. त्यावर बिब्याचें तेल लावावें. व त्यावर बुरणुसाचा तुकडा एक दिवस बांधावा. नंतर सोडल्यावर पांढरे केंस जातील.

## कपाळावरचे, मानेवरचे व डोळ्याच्या कोनाचे केंस झडतात त्यावर.

ऊन पाण्यानें किंवा मुलाचे अगर गाढवाचे मुतानें कपाळ व मान धुवावीं. नंतर त्या ठिकाणीं उंदराची अथवा शहामृगाची किंवा घोड्याची

चर्बी ऊन करून त्यांत नव्वद रति तिळाचें तेल, अर्धा रत्तल तीळ व अंबर चार जव घालावें. प्रथम जैतुनाचे तेलानें धुऊन मग वर लिहिलेले जिन्नस चोळावे ह्मणजे नवे केंस येतील. हनुभविक आहे.

---

## अंगावरचे केंस निघून जातात, ते येण्यास उपाय.

लोणी, नीळ, कांहीं साबण, कांहीं मीठ, पांढरा काथ, व लिंबाचीं पानें भाजलेलीं सर्व बारीक चूर्णाप्रमाणें करून लोण्यांत मिळवून दररोज दोनतीन वेळ केंस गेले असतील तेथें लावावें ह्मणजे केंस येतील. अनुभव आहे.

इलाज दुसरा.—खोबरें व दोन भिलावे जाळून नीळ १ तोळा, व जंगला भाजलेला सहा मासे, या सर्वांस बारीक करून लोण्यांत मलम तयार करावें, तांब्याचे भांड्यांत ठेवून दररोज तीन वेळ लावावें.-लौकर केंस येतील, अनुभव पुष्कळ आहे.

तिसरा इलाज—बकरीचा मुलखा, मीठ, तूप, हळद, नीळ, सर्व मिळवून मलम करावें. दररोज दोन तीन वेळ लावीत जावें. केश पुष्कळ येतील. अनुभव आहे.

चौथा इलाज—केंस येत नसतील तर येण्यास. सज्जिखार बारीक करून मुळ्याचे रसांत मिळवून जेथें केंस गेले असतलि तेथें लावावें. केश येतील.

पांचवा इलाज.—कांहीं कारणांनीं केश गेले असतील तर ते येण्यास उपाय. दारूपिण्याचे बाटलीचीं बुचें तीन चार घ्यावीं. नंतर तीं जाळून त्यांची राख तुपांत अगर तेलांत मिळवावी. मग केंस गेले ठिकाणीं दिवसांतून दोन तीन वेळ लावावी.

कोंबडीचे अंड्याचें तेल व माशीचा गू कांहीं बूच जाळून सर्व मिळवावें—जेथें केंस गेले असतील तेथें चोळावें—एक हप्तापर्यंत केंस येतील.

## मस झाला तर सावरू उपचार.

मस झाला तर चार पांच लिंबाचे रसानें त्यावर चोळावें. नंतर ताजा चुना घेऊन लिंबाचे रसांत लावावा.

सोमलखार, सितर याचे तेलांत कालवून लावावा. कांहीं घोड्यास मस फार येतात व कांहीं घोड्यास कमी येतात. फार असल्यास शस्त्रांनीं कापावें. त्यावर सज्जिखार व कळीचा चुना ताजा, मनसीळ, सारखे घेऊन नरमूत्रांत भिजवून तीन दिवस लावावें. घोड्यास खाजवूं देऊं नये.

गूळ मसावर लावावा. त्याजवर लोखंड तापवून डाग द्यावा.

मस वस्त्र्यांनीं छेदून टाकावें. आणि त्यावर नरविष्ठा सात दिवस लावावी. डोळ्यावर मस होतात त्यास उपचार—सज्जिखार, शहाजिरें, हळद, सुहागी, व चुना ताजा, सारखें घेऊन बारीक करून लिंबाचे रसांत मसावर चोळून लावावा. असें कांहीं दिवस-पावेतों करावें.

घोड्याची लीद ताजी शिजवून कळीचा चुना त्यांत भिजवावा, आणि लिंबांचा रस घालून मसावर सात दिवसपर्यंत लावावा.

सोमल, सज्जिखार, साबूण, खडीसाखर, व दांत, हे सारखे घेऊन लिंबांचे रसांत घालून दोन दिवस ठेवावें. नंतर दोन दिवसपर्यंत मसावर लावावे. खावयास भात दह्यांत घालून द्यावा. सज्जिखार, साबूण, कुत्र्याचा गू पांढरा घेऊन, मस छेदून त्यावर लावावा. तीन दिवसपर्यंत असें करावें.

घोड्याचे सर्व अंगावर मस होतात. त्याजला जसे माणसाचे अंगावर मस होतात, त्याप्रमाणें घोड्याचे अंगावर लहान मोठे होतात. ते पोटाखालीं व डोळ्याखालीं कोपऱ्यावर व लिंगावर व गुदद्वारावर व कांहीं सर्व शरीरावर होतात. त्यामुळें सर्व शरीर

काळें होतें. त्याजला घोड्याचें तोंड बंद करून त्या मसावर सज्जिखाराची पूड करून लावावी.

कळीचा चुना व गूळ एकत्र करून मसावर लावावें. म्हणजे मस नाहींसे होतील.

सज्जिखार व कळीचा चुना हे दोन्ही सारखे वजन घेऊन एकत्र करून मसावर लावावे.

जैचपळ, शेतरज्य, मिरच्या, समलतीब, व अबलूस हे जिन्नस प्रत्येक नऊ मासे घेऊन गाईचे गोमूत्रांत एकत्र करून लावावें.

शरसफ, नागरमोथे, व पवार, हे प्रत्येक सहा मासे घेऊन माणसाचे मूत्रांत एकत्र करून त्या मसावर चोळून लावावें. एक आठवडा हा दवा करावा. आणि सितुराचें तेळ पावशेर, लिंबाचा रस पक्का एक शेर, व वीस मासे गोखरू हें सर्व बारीक करून एकत्र करावें व घोड्यास पाजावें.

हिराकस, काळेदाणे (कलोंजी), शेतरजची साल, व लिंबाचीं पानें वाळलेलीं, ह्या सर्वांचें चूर्ण करून मसावर बांधावें.

निळा तोता (मोरचूद), फटकडी, हिराकस, हें प्रत्येक ६ सहा मासे घेऊन बारीक करावें. व रुईचे लांकडाचेंहीं चूर्ण करावें, एकंदर चाऱ्ही जिनसांचें चूर्ण लिंबाचे रसांत भिजवून त्यांत कळीचा चुना घालून कालवावा. आणि मसावर ४ किंवा ५ दिवसपर्यंत लावावें.

हालिला, आकड्याचें (म्हणजे रुईचें) बीज जंजबिज, बावची, दगडी मीठ, व शहतरा, एकून सर्व जिन्नस १९ मासे घेऊन, माणसाचे मुतांत एकत्र करून पाजावें.

---

## पादरोग—रसुलीवर उपचार.

अंबेहळद पावशेर, सज्जिखार छटाक, दीडपाव रेती, व गूळ पावशेर,

सर्व बारीक करून गुळांत शिजवून कपड्यांत बांधून रसुलीवर, बांधावें. नंतर दुसरे दिवशीं बरें झालें तर पुढें बांधूं नये. बरें न होईल तर सहा दिवसपर्यंत असें करावें.

पायांत रसुली झाली तर त्यास उपाय.—कुटकी छटाक लहान घोड्यास, मोठ्यास अतिपाव, बाजरीचे पिठांत ७ सात दिवसांपासून १९ दिवस पावेतों द्यावी.

शेवग्याचे झाडाचा डिंक तीन तोळे, सुहागीतेलिया एक तोळा, मीठ तोळा एक, फटकी तोळा एक, काळें मिरें तोळा एक, व लवंग ६ सहा मासे, हे सर्व जिन्नस बारीक करून, शेवग्याचे रसांत १४ चौदा गोळ्या कराव्या अगर कोरफडाचे रसांत पाहिजे तर गोळ्या कराव्या. व दाण्याचे अगोदर एक व नंतर एक अशा दोन्ही गोळ्या सकाळीं देत जाणें.

जेपाळ पाण्यांत वाटून लावावें. दुसरे दिवशीं अंबेहळद तुपांत लावावी.

सेंदणीची साल पाण्यांत भिजवून त्याची पट्टी तीन दिवस लावावी.

रसुली हा रोग—हाडावर होतो, व गुडघ्यापासून पुढचे पायास व मागचे पायास खुरापर्यंत होतो, व हे फोड गरापेक्षां मोठे असतात, आणि यापासून पिवळें पाणी निघत नाहीं. हे मऊ असतात. यास डाग देतात. नंतर त्याजवर साखर टाकितात. याप्रमाणें तीन दिवस करावें.

· सज्जिखार, जवखार, बेलाची साल, व खजुराची साल, जांवळीची साल, कबुतराची विष्ठा आणि आघाडा. अगोदर साली जाळाव्या नंतर त्यांत आघाडा व कबुतराची विष्ठा मिश्रण करावी. व चुलीवर ठेवून कढवावें. आणि तें एक दिवस तसेंच ठेवून जेथें रसुली झाली असेल तेथें लावावें. त्यांत कळीचा चुना मिसळून त्या जागेवरचे केंस काढून लावावें.

घोड्याचे पायावर गांठी होतात त्यास औषध—मनगटाचा भोंवरा थोडा शस्त्रानें चिरून, त्यांत बिब्याचें तेळ भरावें. आणि गीवरीनें शेकावें. ( २ ) शाळु जोंधळ्याचा वाळलेला पाचोळा कुटून माणसाचे मुतांत शिजवून, तो मनगटावर चिरगुटांनीं बांधावा. ( ३ ) घोड्याची वाळलेली लीद व हरभरे एकत्र करून मनगटावर चिरगुटांनीं बांधावें. वरचेवर पाणी शिंपीत जावें. असें एक दिवस करावें.

बैदा—पुढल्या पायाचें मनगट सुजतें आणि गांठीप्रमाणें दिसतें. त्यास बैदा ह्मणतात, त्यावर उपचार—प्रथम फांसण्या टाकून रक्तमोक्ष करावा. मग सज्जिखाराचें चूर्ण करून तें घोत्र्याच्या रसांत कालवून वर लावावें आणि त्यावर पिंपळाचें पान बांधावें. नंतर शेळीचें मूत्र व नरमूत्र एकत्र करून वर लावावें. असें एक सप्तक करावें. ( २ ) शिळाजित लिंबाचे रसांत वाटावें. फांसणी टाकून जिरवावें. असें तीन दिवस करावें, वर लोहगळाची साल पाण्यांत वाटून वडी करून वर ३ दिवस बांधावी. सोडूं नये.

गीर्द पाषाणास औषध—गोडे तीळ,मोहरी,लसूण,प्रत्येक पावशेर प्रमाणें घेऊन निरनिराळे कुटून बारीक करावें. एकत्र करून पायास बांधावें. तीन दिवस सोडूं नये व पाणी लागूं देऊं नये. खुरपें लाल करून भोंवईस चोंचे द्यावे. अंडीं बाहेर येतील.

चक्रवळ—पायाच्या तळावरचा मेंदा फुटतो. कठिण होतो आणि चेपला असतां दुखतो. चालतांना कुंथतो, त्यास चक्रावळ ह्मणतात, त्यास औषध—लोखंड तापवून त्याणें डाग द्यावा, आणि त्यावर गंधक, शिसें, व नवसागर ठेवून पुन्हा शेक द्यावा. असा क्रम एक दिवस करून मग नरमूत्रांत राख कालवून वर लावावी. ( २ ) अगोदर गोणाचें ताट्टुक बांधावें. त्यावर मुतावें नंतर मोरचूद, जंगला, पारा, हें प्रत्येक एकेक तोळा घेऊन लिंबाच्या रसांत खलून तीन दिवस लेप करावा. व त्याजवर घोंगडयाचें फडके गुंडाळावें. पांच

दिवसांत मांस झडून भोकें पडतील. नंतर गाईचें लोणी व चिचोऱ्याचें झाड जाळून त्याची राख चिंचोऱ्याचे रसांत कालवून त्याचा चक्रावळीवर लेप करावा. व कोरफड चिरून ऊन करून त्यानें शेकावें. व कोरफडीचा लेप द्यावा. पांच दिवसांत उपशमन होईल. खरूज, गर, गजचर्म या रोगांसही हें औषध आहे. करंज्याचा पाला, जोंधळ्याचे ताटाचा मगज वाळवून त्याची कज्जली बरोबर घेऊन, एकत्र करून गाईचे मुतांत खल करून तीन दिवस लेप करावा.

मौळू रोग—चारी पायांचा मेंदा फुटतो. किंवा दोन पायांचा फुटतो, अथवा मनगट फुटतें. ईसब होऊन कंड फार येते. आणि कंड फार येऊं लागल्यामुळें दांतांनीं त्या ठिकाणीं चावतो. त्यास मौळू, इसब, अगर विसप ह्मणतात. ह्यास उपचार–सोमल, गंधक, पारा, व तिळाचें तेल, हीं प्रत्येक १ टांक घेऊन रुईचीं पिकलेलीं पानें शेकून त्याचा रस अर्धाशेर काढावा. आणि ह्या रसांत हीं सर्व औषधें बारीक कुटून घालावीं. ह्यांत तेलही मिसळावें आणि हें सर्व ऊन करून पायावर लावावें. असें दोन दिवस करावें. मग ओंवा व रिंमणीचीं फळें पाण्याशीं वाटून त्याचा रस दोन शेर काढावा. ह्या रसांत २ दोन शेर गोमूत्र घालून त्यानें पाय धुवावा. नंतर पुनः वर सांगितलेलें औषध लावावें. आणि पोटांत बाभळीच्या शेंगा ३ शेर कुटून नित्य चारीत जाव्या. ( २ ) गोंदता चार टांक घेऊन त्याचें वस्त्रगाळ चूर्ण करून तें दोन शेर तेलांत घालून कढवावें. आणि तें तेल पायास लावीत जावें. ( ३ ) शिरस करंज्याचें बीं, अस्कंद, चित्रक, सैंधव, कांच संचळ, चिराईत, व नाव्याचें बीं, हीं सर्व औषधें प्रत्येकी ३-३॥ टांक घेऊन त्याचें वस्त्रगाळ चूर्ण करावें. आणि गोमूत्र दोन शेर व दूध २ शेर एकत्र करून त्यांत हें चूर्ण घालून तें सर्व चोपडया मडक्यांत घालून तीन दिवस उकिरड्यांत पुरून ठेवावें. ह्मणजे औषध चांगलें

आंबेल. नंतर काढून पायास लावावें.सात दिवस लाविलें असतां इसब जाईल. व हें औषध खरजेस लाविलें असतां खरूज जाईल.

तांदुराधतुरा—ह्या होतो कीं, घोडचाचे दोन्ही पाय सुजून मोठे घट, नारळाप्रमाणें होतात. त्यास उपचार—बिबे२शेर,सरसून ह्मणजे राईसारखें ह्मणजे मोहरीप्रमाणें असतें तें २—शेर, करंज्याचें बीं २ शेर,व बावचो२शेर,हे सर्व जिन्नस बरोबर घेऊन एके ठिकाणीं करून पाताळयंत्रानें तेल काढावें व शिशामध्यें घालून ठेवावें. यांतील राहिलेले दोन टांक, व आवळ्या गंधक एक टांक, पूड करून त्या तेलांत कालवून घोड्याचे पायावर लेप करावा. दुसरे दिवशीं लिंबाच्या रसानें धुऊन टाकावें. पुन्हा सदरप्रमाणें गंधक व तेल एकेठिकाणीं एकत्र करून पायावर लेप करावा. चार दिवसपर्यंत बांधावा. याप्रमाणें करीत असावें. ह्मणजे पाय तडकून तुकडे तुकडे होतात. चार दिवस गुदरल्यावर नऊ टांक गंधक घालून तेल लावावें. जर हेंच तेल जखमावर व सगळे फोडाला लावीलें तर बरें होईल.

गाठूर किंवा टाचरू यास औषधें—बिबवे, करडया, व बावच्या, हीं प्रत्येक दोनशेर घेऊन, पातालयंत्रांत घालून त्याचें तेल काढावें. हें तेल चोपडच्या भांड्यांत घालून ठेवावें. मग गंधक १ टांक, व हें तेल २ टांक, एकत्र खलून गाठूरावर लावावें. आणि वर चिरगुट बांधावें. दुसरे दिवशीं गाठूर लिंबाच्या रसानें धुवावें. असा क्रम सात दिवस करावा. मग दोन सप्तकेंपर्यंत हेंच तेल वर लावावें ह्मणजे गाठूर बरा होईल.

---

## अवठाण.

घोडे बांधण्याची जागा उंच नीच असल्यामुळें व त्यावर फार फिरल्यामुळें त्याचे अंगावर गांठी होतात. त्यास उपाय—तिळाचें तेल सर्व अंगास चोळावें नंतर टाकळीच्या पाण्यानें चांगला शेक

द्यावा. असें तीन दिवस करावें. मांसव्याधि—अंगास गांठी उत्पन्न होतात व मांस मोठें होतें. कंडू सुटतो. त्यास औषध—पळसाचे लांकडाची राख, चिंचेच्या टरफलाची राख, ओघाड्याचे लांकडाची राख, आणि शिपा जाळून त्याचा चुना हें सर्व समभाग करून पाण्यांत कालवून त्याचा लेप करावा. गांठी ३ दिवसांत बऱ्या होतील.

---

## बेरहड्डीविषयीं.

बेरहड्डी यास मराठींत हड्यावर्ण ह्मणतात. त्याचीं लक्षणें—घोड्याचे सुंभासभोंवतीं किंवा मांड्याचे खालीं लिंबा येवढे फोड येतात. त्यास इलाज.—

नस्तर ( एक शस्त्र आहे ) त्यानें त्याजवरचे केंस काढावे. व त्याचें रक्त काढून टाकावें. नंतर त्याजवर रुईचा चीक व शेराचा चीक व तीनधारी निवडुंगाचा चीक हीं तिन्हीं एकत्र करून लावावीं. परंतु शेंदेलोण, कांहीं जंगला, हळद व कांहीं खडीसाखर हीं सर्व बारीक करून शेराच्या सालीं घालून शिजवावें. व हड्यावर्णावर तीन दिवसपर्यंत लावावें. तीन दिवसांनीं दुसरी पट्टी त्याजवर मजबूत बांधावी. नंतर सांगितले मलमा पैकीं कोणतेंही मलम लावावें. अनुभव आहे.

उपाय २ रा. नस्तरानें केंस कांपून फोडाचें रक्त काढावें. आणि त्याजवर बकरीचे गुददे व कांहीं हळद आणि जंगला हीं सर्व एकत्र करून तीन दिवस बांधावीं. अनुभवशिर आहे.

तिसरा उपाय: वस्तऱ्यानें केंस काढून मग खजूरांतील बिया काढून टाकून त्या खजुरांत अफू दोन मासे, कांहीं हिंग, कांहीं शेंदूर व शेराचा चीक हें सर्व भरून त्या खजुरास गव्हाचा आटा लावावा व विस्तवावर शिजवावा. नंतर तो भाजल्यावर

त्याचें पीठ काढून त्यापैकीं कांहीं हड्यावणावर गरम गरम तीन दिवस तीन वेळ बांधावें.

मेण तोळे २ दोन, भिळावे पंधरा, जुना कापूस एक तोळा, गूळ छटाक, बोळ २ दोन तोळे, अंबेहळद एक तोळा, अजवान १ एक तोळा, हें सर्व बारीक मेणाप्रमाणें करावें. नंतर त्याच्या दोन पोतंड्या कराव्या. विस्तवावर शेकावें. सात दिवसपर्यंत एक पोतंडी थंड झाली कीं, दुसरी घेऊन शेकावें. याप्रमाणें करावें.

जखम झाल्यावर सदरीं लिहिल्याप्रमाणें कोणतेंही एक मलम करून त्याजवर चिकटवावें.

गंधा बेरूजा व ऊद निर्मळ हे बारीक करून तांब्याचे भांड्यांत शिजवावे. कपड्यावर लावून बेरहड्डीवर तीन दिवसपर्यंत बांधावें. त्यावर आणखी कपडा बांधावा. तीन दिवसानंतर बरें जाहलें तर बरें; नाहींतर दुसरी पट्टी करावी. अनुभव आहे. विस्तवानें शेकीत जावें.

उडीद, व अजवान, दोन्ही दळून बारीक करावें आणि त्याची भाकरी लाल करावी. व ती हड्यावणावर बांधावी. हा इलाज चांगला आहे.

इलाज २ रा. बच, अंबेहळद, तीळ, एरंडीचें बीं. गोवर्धन, नवसागर हीं सर्व बारीक करून एरंडीचे तेलांत भाजावीं. नवसागर निराळा बारीक करून भाजून त्यांत टाकावा. मग त्याची भाकरी करून हड्डीवर तीन दिवस पर्यंत बांधावी. अनुभव आहे.

रुईचे झाडाचा चीक चार पैसेभार व कणीक चार तोळे, एकत्र करावीं. त्यांत एक मासा टाकणखार बारीक करून टाकावा. आणि त्याची भाकरी करावी. नंतर बेरहड्डीवरचे केंस काढून त्यावर बांधावी. ती तीन दिवसांनंतर काढावी. याप्रमाणें तीन वेळ नऊ दिवस करावें. बेरहाड्डीवर जखम होऊन पाणी निवत असलें तर मलम करावें.

तें बच एक टांक, पांढरा काथ एक टांक, पांढरें मेण एक टांक, राळ एक टांक, रोठी सुपारी एक टांक, कपिला एक टांक, कापूर एक टांक, जंगला तीन मासे आणि राईचें तेल किंवा शिरसींचें तेल अर्धा शेर. पूर्वी तेल ऊन करावें नंतर सर्व जिन्नस बारिक करून त्यांत घालावे. सुपारी प्रथम भाजून बारीक करावी. कपिळा व तेल एकत्र करावें. नंतर मेण व दुसरे जिन्नस टाकून शिजवावें. ह्मणजे मलम होईल. हड्डीवर लावावें. अनुभव आहे.

दुसरा इलाज—कणीक चार पैसेभार त्यांत पाणी घालून दोन भाकरी बेरहड्डी असेल तेवढ्या आकाराच्या कराव्या. नंतर बारीक मीठ घेऊन दोन्ही भाकरींचे दरम्यान ठेवून शिजवाव्या. एक एक भाकरी गरम गरम बेरहाडीवर बांधावी. बेरहाडीवरचे केंस काढून मिठासुद्धां भाकरी मजबूत बांधावी. तीन दिवसांनंतर काढावी. बरें न झालें तर आणखी तीन दिवस पट्टी करावी. हें औषध मिर बुराणोद्दिन यांणीं केलेलें आहे. जखम हड्डीवर झाली असेल तर मळम लावावें. बाभळीची साल फार बारीक करून ती व पांढराकाथ, संगजिरें, व मुरदाडशिंग, हीं सर्व बारीक करून ती भुकणी त्यावर चार पांच वेळ लावावी. अनुभव आहे.

तिसरा इलाज—उंटाची फासोळी विस्तवावर गरम करून त्यांणीं हड्डीवर दिवसांतून दोन वेळ शेकावें. कांहीं दिवसांनीं बरें होईल.

चौथा इलाज.—उंटाचे केंसांचा नमदा मनुष्याचे मुत्रांत भिजवून त्यावर बांधावा. तीन दिवस बांधल्यावर मूत वरचेवर त्यावर शिपडीत जावें. हेंही चांगलें आहे.

हाडावरचे केंस काढावे. शेंदलोण, बच, व लसूण या सर्वांस लिंबाचे रसांत बारीक करावें. व त्याचा बेरहडीवर लेप करावा. एरंडींचीं पानें आणून शेकून त्याजवर तीन दिवसपर्यंत बांधावीं. अनुभव आहे.

खारीक व कोडखार बारीक करून ठेवावें. खारीक कपड्यानें क-

पडबंद करून ती बाभळीचे कोळशांत भाजावी. दोन तास ठेवून नंतर बारीक चिरून त्यांत कांडेखार घालावा. तें बारीक करून तीन दिवस बेरहड्डीवर बांधावें. रोज नवा नवा बांधावा. अनुभव आहे.

कळीचा चुना एक पैसाभार, व पापडखीर अर्धा पैसेभार, दोन्ही एकत्र करून गोळी करावी. हड्डीवरचे केंस काढून गोळी कपड्यांत घालून हड्डीवर बांधावी. त्यावर राहून राहून पाणी टाकीत जावें. अनुभव आहे. खारीक सर्वरात्र पाण्यांत ठेवावी. नंतर काढून विस्तवावर गरम करावी. नंतर काढून ती गरम असतांनाच बारीक करून हड्डीवरचें केंस काढून बांधावी. तीन दिवस तीन पट्या कराव्या.

भांग तीन मासे, उडदाचें पीठ दोन दोन टांक, त्याची भाकरी करावी. त्याचा एक भाग गरम करून हड्डीवर बांधावा.

दुसरा इलाज—हरएक प्रकारचे बेरहड्डीवर इलाज, शिंगरुफ, जंगला, कपिला, रुईचा चीक, व शेराच्या पिंवळ्या कांड्या एकत्र करून लेप करावा.

इलाज ३ रा.—हड्डीवरचे केंस काढावे. त्यावर शेराचा चीक लावावा व कांहीं रुईचा चीक व कांहीं खडीसाखर हें सर्व एकत्र करून हड्डीवर लेप करावा. बोटानीं चोळावें, नंतर लेप करावा. उंटाचें हाड आणून बेरहड्डी येवढें कांपून त्यावर दूध व खडीसाखर घालून गरम करून बेरहड्डीवर बांधावें. तीन तासांनंतर सोडावें. बरी झाली तर बरें; नाहीं तर एक दिवसपर्यंत ठेवावें. हा अनुभव आहे. महंमद सौदागर विलायती याचे बुकांतला हा अनुभविक उपाय आहे.

---

## नेवरपाय किंवा हस्तेकाम.

एक पाय दुसरे पायावर घांसतो, त्यापासून चालते वेळेस जखम होते.

त्यावर इलाज.—मलम करूं नये. बेरहड्डीप्रमाणेंच त्या जागेवर मांस वाढतें त्यावर बेरहड्डीप्रमाणें करावें.

हाडावरचें मांस वाढतें तें हाताचे कलाव्याचे जागीं. त्यावर इलाज.—बेरहड्डीवरचा करावा व याप्रमाणें ० ० ० डाग द्यावा. या रोगास शालिहोत्री गवळ्या ह्मणतात.

दुसरा प्रकार अर्ज.—घोड्याचे हाताचे व पायांचे सांधीवर फोड गरमीमुळें होतात. त्यांतून रक्त पिवळें वाहतें व फोडावरचें कातड्याचा रंग काळ्या मातीप्रमाणें काळा असतो. शालिहोत्री लोक यास इसब असें ह्मणतात, त्यास उपाय.-प्रथम त्या फोडास चिरून त्यास गरम पाण्यानें धुवावें. नंतर मुरदाडसिंग व गूळ मिश्र करून त्यांत शिरका घालून तीन हिस्से मलम करून लावावें.

दुसरा इलाज.—मुरदाडशिंग कुटून बारीक करावें. व तें दुधांत खमिर करून नंतर कपड्यास लावून त्याची पट्टी ईसबावर बांधावें.

आणखी इलाज.—गेरू व माजूफळ हीं दोन्ही बराबर घेऊन शिरक्यांत खमिर करून तें ईसबावर बांधावें.

काळे भिलावे बारीक करून त्याचें तेल इसबावर लावावें.

घोड्याचे समोरचे किंवा मागले पाय मुरगळतात. त्यापासून तो लंगडतो त्यास इलाज.—

एरंड्यांचें तेल, अंबेहळद, गेंदालकडी, व मीठ. प्रथम ते पाय तेलानें चोळून काढावे. नंतर हीं औषधें बारीक करून कपड्यांत घालून त्याची पट्टी दोरीनें मजबूत बांधावी.

दुसरा इ.—कांहीं अंबेहळद, कांहीं मीठ व वांगीं. प्रथम वांगीं भाजून तीं कपड्यांत घालावीं. नंतर हळद व मीठ हें बारीक करून त्या वांग्यावर घालावें. तीन किंवा चार दिवस अनुक्रमें हा इलाज करावा. परंतु तीं पट्टी गरम गरम बांधावी. अगदीं अनुभव आहे.

तिसरा इ.—भाजली गेंदालकडी दोन पैसेभार, गेरू छटाक, व लसूण

छटाक• हीं तिन्ही लिंबाचे रसांत खलावीं. जेथें घोड्यास दुःख झालें असेल तेथें लेप करावा व जरा शेकावें. चवथे दिवशीं गरम पाण्यानें धुवांवें. अनुभविक आहे.

चवथा इलाज—चिंचेचीं पानें एकशेर, तरवडाचीं पानें एकशेर, व कांहीं मीठ हीं तिन्हीं शिजवून ज्या पायानें घोडा लंगडत असेल त्या ठिकाणीं तीन दिवस बांधावीं.

पांचवा इलाज—कांहीं शिरस व कांहीं एरंडेल व कांहीं शेंदेलोण, अंबेहळद एक पैसाभार, मैदालकडी तितकीच, ह्या सर्वांस बारीक करून शिजवून गरम गरम कपड्यावर घालून लेप करावा. व शेंकावें आणि जर घोड्याचें हाड तुटलें असेल तर ती पट्टी जोरानें बांधावी.

इलाज सहावा.—माहाळुंगाचीं पानें दोन मोठीं घेऊन हळद एक पैसाभार, व कांहीं शेंदेलोण ह्या तिन्हींस मनुष्याचे मुतांत गरम करावें. पहिल्यानें शेकावें व मग बांधावें.

सातवा इलाज.—राई बारीक कुटून त्यांत शिरका घालावा व थोडें पाणी घालून जेथें इजा झाली असेल तेथें मालिस ( चोळणें ) करावें. मग त्याचा लेप करावा.

घोडयास कोठेंही दर्द झाली असेल ह्मणजे काठी मारल्यामुळें किंवा पायास अथवा सर्व शरीरास इजा होते त्यास चोपड ह्मणतात, त्यास इलाज.—

मेंढीचें दूध शेरभर, एक भोपळा,—जेवढा मोठा तेवढा चांगला, जर मोठा न मिळेल तर लहान लहान दोन,—त्यांतील सर्व बिया भोंपळा न फोडतां फक्त डेंख कांपून काढून टाकाव्या, व बेलफळासारखें पोंखरून तयार करावें. नंतर जो मगज बिया खेरीज निघाला तो सर्व व दूध एकत्र करावें. मग तें त्या भोपळ्यांत घालून त्याचे तोंडास गव्हाचें पीठ लावावें, किंवा चिकणमातीचा लेप करावा. नंतर तो भोपळा घोड्याचे लिदींत सात दिवस पुरून

ठेवावा. घोड्यास अगोदर जो लेप बांधला असेल तो काढून टाकून नंतर शेंदेलोण सहा पैसेभार व हाळद भाजून दोन्हीं बारीक करावीं. नंतर त्या भोपळ्यांतील दुधापैकीं तिसरा हिस्सा घेऊन त्या दुधांत शेंदेलोण व हाळद चारपैसेभार घालावी. नंतर याचप्रमाणें तीन दिवस, चोपड, व दर्द किंवा दरदेचे फोड ह्या दोन्ही रोगांवर लाऊन मग दोनप्रहरीं उन्हांत बांधावें. नंतर घोड्यास ऊन पाण्यानें धुवून टाकावें.

घोडा मुरगळतो त्यावर उपचार —बकरीच्या लेंड्या आणून मग या एके भांड्यांत घालून शिजवाव्या. त्या अशा कीं,सर्व मूत्र आटून जाईल. नंतर उतरून त्या लेंड्या एके कपड्यावर टाकाव्या. नंतर जेथें दर्द किंवा फोड किंवा मुरगळलेली जागा असेल त्या ठिकाणीं बांधव्यों व दोरीनें अवळावें, याप्रमाणें चार दिवस किंवा पांच दिवस करावें.

लक्या ह्मणजे मांसाचा तुकडा लिंबासारखा होतो. तो बहुत करून घोड्याचे मुंबाचे तोंडाचे किनाऱ्यावर होतो. कधीं कधीं दोन्ही किनाऱ्यांवर होतो. त्यापासून घोड्यास दर्द होते. व तेथील मास कठिण होते. त्यावर इलाज.

त्या मांसास शेकून नरम करावें. नंतर त्यामधील पू काढून टाकून सांगितलेले मलमापैकीं एक मलम लावावें. किंवा त्या मांसावर बिसरबिंदा बांधावा, ह्मणजे तो मऊ होतो, किंवा हें मलम करावें. डुकराची चरबी घेऊन साफ करावी. आणि तिनकेंच जैतुनाचें तेल घालावें. व मुरदाडशिंग आणि फटकी हीं दोन्हीं समभाग घेऊन छानून कुटावी. व डुकराचे चर्बीत घालून खजुराचे लांकडानें ढवळून शिजवावें. व त्यावर लावावें.

तिसरें मलम.—मुरदाडशिंग, सनोबराचें झाडाचा गोंद, व हीं समभाग घेऊन व जावशिर सात टांक, मरमुकी, व जंगला चवथा हिस्सा

घेऊन कुटावें, व छानून त्यास जैतुनाचे तेलांत घालून खलून लावावें.

इलाज.—मेथी, आळसी, (जवस) व मुरदाडशिंग हीं तिन्हीं बारीक करून शिजवावीं. वरचेवर हालवावें. तयार झाल्यावर लावावें.

इलाज.—तरसाची व घोरपडीची जीभ व त्यांच्या नाकाचें हाड व कुलिंजन, नरगिरी, सोहागी, तिळाचें तेल, व भडकतेल, तयार करून नागवेलीचे पानावर चिकटवून दररोज ४।५ दिवस बांधावें. अनुभविक आहे.

घोड्याचे सुंबाजवळ फोड येतात व त्यांतून पू, रक्त व पिवळें पाणि वाहूं लागतें. अगोदर त्यास कांपून सर्व पू वगैरे काढून टाकावा व त्याजवर कंगव्यासारखा डाग द्यावा. मग त्याजवर जवखार, व सज्जिखार, हीं दोन्हीं बरोबर घेऊन त्यांत चिंच मिळवून त्याचा लेप करावा, व त्याचेवर अंबरवेल–सेराचे झाडावर तिचा वेल असतो ती–आणून गरम करून बांधावी. अनुभविक आहे.

इलाज २रा—दगडी मीठ अर्धा टांक, अजवान तीन टांक, लसूण सुकलेला अर्धा टांक, अद्रक (आलें) अर्धा टांक वावडिंग अर्धा टांक, व गूळ बारा टांक, हें सर्व एकत्र करून खाण्यास सात दिवस पर्यंत द्यावें. अनुभविक आहे.

इलाज ३रा—वर लिहिल्याप्रमाणें डाग देऊन त्याजवर लेप करावा; तो येणेंप्रमाणें-राई एक तोळा, सवागी एक तोळा, व लसूण तोळा १, हीं सर्व एकत्र करून बारीक करावीं. व नरम करून त्यावर लेप करावा.

दुसरा प्रकार.—फुतुल्ला किंवा गिर्दपाषण ह्मणजे सुंभाजवळ फोड होतात, त्यांतून पू वाहातो. ते फोड चिरलेले असतात. त्यावर लेप करावा.

बकरीची चर्बी घेऊन तुम्ती किंवा शिरक्यात लावावी. अरणा ह्या औषधांत शिरका घालून लावावें. वस्तऱ्यानें केंस काढून मुरदाडशिंग दर्दावर भरावें. किंवा हळद, व मुरदाडशिंग हीं दोन्हीं बारीक करून लाल मेणांत घालून पातळ करून लावावीं.

चक्रावळ ह्मणून सुभाजवळ होतें. हें फार वाईट दर्द आहे, इलाज चालत नाहीं. परंतु कांहीं औषध करितात. ते फोड वस्तऱ्यानें चिरून पू वगैरे काढून गरम पाण्यानें धुऊन खाण्याचें मीठ, व मोहाचे झाडाची साल या दोन्हींत मनुष्याचें किंवा बकरीचें मूत्र घालून शिजवावें. शिजल्यावर बांधावें.

दुसरा इलाज.—भिलाव्यांचें तेल त्याजवर लावावें. अनुभव आहे.

तिसरा इलाज.—सुभावर किंवा हातापायांवर फोड झाले तर गुडदाप्रमाणें सुकलेले मोठे फोड होतात, त्यास.—चित्रक तीन टांक, पांढरा गूळ दोन टांक, सज्जिखार दोन टांक, नवसागर एक टांक, व जेपाळ आठ टांक, हीं सर्व निरनिराळीं कुटून बारीक करावीं. व दोन तास तसेंच राहूं द्यावें. नंतर तिळाचें तेल घेऊन दहा भिलावे दोन दोन तुकडे करून शिजवावे. आणि थंड झाल्यावर मग काळ्या शेंदूर एक टांक बारीक करून त्या तिळाचे तेलांत घालावा. पहिल्यानें भिलावा घालावा व मग दुसऱ्या जिनसा घालाव्या. तीन दिवस नुस्तें ठवून चक्रावळीवरील केंस काढून सदहू औषध वर लावावें व विस्तवानें शेकावें. तीन दिवस असें करावें. फार अनुभव आहे.

चौथा इलाज.—गोणपाटाचा तुकडा घेऊन मनुष्याचे मूत्रांत भिजवून त्यावर बांधावा. वरचेवर नरमूत्र त्यावर तीन दिवसपर्यंत शिपडावें. सज्जिखार एक टांक व जंगला एक टांक, हे दोन्हीं लिंबाचे रसांत भिजवून त्याचा लेप करावा. त्यावर पळसाचीं पानें बांधावीं.

पांचवा इलाज.—तेल्यासुवागी भाजलेली एक टांक, व निंबाचीं पानें किंवा बिब्याचीं पानें यांत ती सुवागी दररोज एक टांक खाण्यास द्यावी.

सहावा इलाज.—पांढऱ्या कण्हेरीचे झाडाच्या मुळ्या, त्यावर मनुष्याची सावली न पडतां काढाव्या. त्या मुळ्यांवरची साल घेऊन

ती सावलींत सुकवावी. नंतर बारीक करून तिळाचे तेलांत खलून चक्रावळीवर तीन दिवस बांधावी. तीन दिवसांत बरें झालें तर ठीक, नाहीं तर पुन्हां तेंच औषध लावावें. अनुभविक आहे.

पुढील पायास चक्रावळ होणें त्यावर उपाय.—प्रथम फोडास वस्तऱ्यानें कांपावें व त्यांतून पू वगैरे काढून टाकावा. तीन जेपाळाच्या बिया, व तिळाचें तेल एकत्र करून जखमेवर लावावें. नंतर फटकीची पूड त्यावर तीन दिवसपर्यंत बांधावी. व त्यावर विड्याचीं पानें तीन दिवस बांधावीं. चवथे दिवशीं काढून एक पैसाभार राळ, जंगला तीन मासे, व तिळाचें तेल दोन पैसेभार. राळ व जंगला बारीक करून तिळाचे तेलांत कढवावा. नंतर थंड पाण्यांत दोन वेळ धुऊन रुई व शेराचा चीक घालून हें मलम दर्दावर ऊन करून सात दिवस लावावें. अनुभव आहे.

दुसरा इलाज.—जंगला दीड मासा, फटकी तीन मासे, सुवागी दीड मासा भाजलेली, व गुग्गुळ तीन मासे, हीं सर्व लिंबाचे रसांत खलून शिजवावीं. आणि लेप करावा, व विस्तवानें शेक करावा. किंवा विड्याचीं पानें बांधावीं. फार अनुभव आहे.

तिसरा इलाज.—चक्रावळ फार दिवसाची असेल तर डाग द्यावा. नंतर छिनून काढावें व त्यावर साबूण चोळावा. अनुभव आहे.

चौथा इलाज.—चक्रावळ छिणावी ( कांपावी ) नंतर कोरफड व खाण्याचें मीठ बारीक करून दोन्ही गरम गरम फोडावर बांधावें. तीन दिवसांनीं सोडावें. बरें झालें तर ठिक; नाहीं तर पुन्हां तसेंच करावें. त्यांणींही बरें न झाले तर डाग द्यावा.

तिसरा प्रकार.—गळा, हा सुंभाचे आंत मासाचा मोड येतो. त्यापासून घाण येते, त्याला धुवावें, त्यांतून पू वगैरे काढावा. मग कण्हेरीची पानें, राई, लसूण, केशर, हीं सर्व बराबर घेऊन

बकऱ्याचे चर्बीत मिळवून वर बांधावें. भोकें पडतात त्यास जैतून तेल व अस्कंद लावावें.

सुंभाचे आंत पुतळीचेवर छिद्र पडतें, त्यांतून पू रक्त निघून घाण येते व पिवळें पाणी निघतें, त्यावर सज्जिखार भाजलेला, फटकी भाजलेली, जंगला भाजलेला, चुना ताजा कळीचा, कोरडा, गुडगुडीचा मैल, भिलावे भाजलेले दहा, काथ पांढरा सफेत, काळेंजिरें, सुपारी, मुरदाडशिंग, शेंदूर, डिकेमाली, हीं सर्व बारीक करून एकत्र करावीं. त्यांत कांहीं राळ व मेण घालून त्याचा गोळा करून छिद्रांत भरावा. त्यावर गोणताट मजबूत बांधावें. कांहीं दिवसांनीं बरें होईल. हें ईमाम सौदागर याणें केलें असे.

इलाज.—रक्त काढावें, व सुंभ कापावे. नंतर जंगला अर्धटांक व अर्धटांक हरताळ दोन्हीं बारीक करून एकत्र करावें. आणि सुंभांवर ह्मणजे सुंभाचे बाहुलीवर लावावें. व बकरीचा चमडा बांधावा. दोन हप्त्यांत बरें होईल. पुराणी असेल तर एक महिनाभर करावें.

दुसरा इलाज—ऊद एक तोळा, शेंदूर तोळा, लसूण अतपाव, भिलावे सात, राळ तोळा, मुरदाडशिंग तोळा, मुसंब्बार तोळा, मेण तोळा एक हें बारीक करून तिळाचें तेलांत कढवावें. गोबर लावून सुंभास छेदून गरम तेल घालावें. दवा बांधावी. गरम करून त्यावर चर्बी ठेवून मजबूत बांधावें. दोन तीन हप्ते ह्याप्रमाणें करावें. अनुभव असे.

आणखी इलाज—नालबंदाकडून छाला कांपावा. नंतर रक्त निघाल्यावर धुऊन साफ करावें. मग राळ, मेण, लाख, शेंदूर, व तेल तिळाचें एकत्र करून कांपलेल्या छाल्यावर लावून गरम विटेनें शेकावें.

आणखी इलाज—सुंभ नालबंदाकडून कापावें. रक्त वगैरे काढावें.

जंगली बारीक करून भरावा. त्यावर राळ घालून लिंबाचा रस सोडीत जावा. दोन तीन दिवस असें करावें. अनुभविक आहे.

तिसरा इलाज—नालबंदाकडून कापावें. नंतर जंगला बारीक लिंबाचे रसांत मिळवून त्यावर लावावा. तीन दिवसांनीं सोडावें. नंतर पांढरा काथ, बोळ, चुना कळ्या, शेंदूर, राळ, मेण, तेल, व भिलावे. तेल व भिलावे गरम करून त्यावर दोन तीन वेळ शेक करावा.. नंतर काथवगैरे साहा जिनसांचें बारीक करून सर्व एकत्र करून छाल्यावर चिकटवावें, त्यावर सात दिवसपर्यंत कातडें बांधावें. अनुभव आहे.

चौथा इलाज—छाला नालबंदाकडून कांपवावा. तेल व भिलावे गरम करून शेकावे. दोन मासे जंगला बारीक करून लिंबाचे रसांत गोळी करावी व फोडावर चिकटवावी. एक मूठभर चिंच व एक मूठभर भिलावे बारीक करून छाल्यावर एक दोन रोज बांधावें. बरें न झालें तर नऊ दिवस याप्रमाणें करावें. अनुभव आहे.

पांचवा इलाज—छाला नालबंदाकडून कापवावा. मेण तोळा, चर्बी तोळा, जंगला तोळा, अहक तोळा सुकलेला, शेंदूर तोळा, भिलावे मूठभर, बोळ तोळा, गुळाचे व लिंबाचे रसांत मिळवून लोहाचे भांड्यांत शिजवून दर्दावर चिकटवावें. त्यावर चर्बीही बांधावी. तीन दिवस.

छाला होण्याचें कारण.—जास्त खाल्यानें अजीर्ण होतें. त्यामुळें छाला पुढील व मागील पायास होतात. जास्त खाण्यास देऊं नये. रतीब दिला तर मसालाही पाहिजे. असें होऊन छाला झाला तर ० ० ० ० असे डाग द्यावे. एक महिन्यापुढें आणीक तसेच डाग द्यावे.

सहावा इलाज.—भिलावे २० वीस, चर्बी बकरीची ४ तोळे, मेण चार ४ तोळे, कांड्या शेंदूर चार तोळे, जंगला भाजलेला तोळे २ दोन, व तिळाचें तेल छटाक, सर्व बारीक करून तेलांत घालून कढवावें. छाल्यावर तें मलम गरम गरम चार वेळ सात दिवस लावावें. तेलानें

शेकावें, बाकी जिन्नस त्यावर ह्मणजे चवड्यावर बांधावें.तीन दिवसांनीं सोडावें. बरें न होईल तर पुन्हा असेंच सात दिवस करावें.

पांचवा प्रकार. सुंभावर जखम होते. ती नालबंदाचे चुकीनें खिळे मारतांना होते, रक्त निघतें. त्यांत पाणी जाऊंनये, पाणी गेलें तर दुसरी बेमारी होईल. मेख तुटली असेल तर काढावी. राहिली तर जखम होईल. न काढली तर सुंभ खराब होतील. खिळा काढण्यास तेल सोडावें.जैतुनाचें तेल,कतरान व फटकी बारीक करून दर्दावर भरावें व बांधावें. ज्या घोड्यास नालाची सवय नाहीं त्यास दर्द झालें तर सुंभ गरम पाण्यानें धुवावा.

फकाक, ह्मणजे सुंभे फाटतात. मातींत सुंभ फार भिजल्यानें व त्यावर माती वगैरे राहिल्यानें, किंवा शेणांत वगैरे भरल्यानें आणि भरलेले असतां तसेच फिरविल्यानें सुंभ सुकून फुटतात, त्याजवर इलाज.—

प्रथम ऊन पाण्यानें सुंभ धुवावे. नंतर लेप करावा. बकरीचे चर्बीनें चोळावें. किंवा शिरका लावावा. चक्रावळीपैकीं कोणतें तरी मलम लावावें.

दुसरा इलाज.—चंद्राकार सुंभासभोंवतीं डाग द्यावे. गुण येईल.

सुंभास नऊ प्रकारचे रोग होतात त्यांचीं नांवें:—

१ ताबक, २ अजज, ३ गह्ला, ४ वकरा, ५ तंशिशा, ६ दगड लागून होतोतो, ७ मेख लागून किंवा हाडास इजा होते, ८ सुंभ तंग होतात, आणि ९ फार चालण्यानें पाय मोडणें.

प्रकार पहिला.—सुंभाचे किनाऱ्यावर पांढरे फोड येतात.ते लांबट व फुटलेले असतात, त्यांतून पिवळें पाणी वाहतें. हा रोग रानांत गवत चरतांना होतो. लहान डाग पिसाबाचे जाग्याजवळ द्यावा. नतर फोडांतील पाणी काढावें. डागाचे जागेवर बकरीची चर्बी ला-

वावी. फटकी, व माजूफळ हीं दोन्ही उगाळून लावितात व जैतूनचें तेलही कोणी लावितात.

चवथा प्रकार—सुंभास फोड होतात. त्यास कुरण बोलतात. हें दर्द पुतळीस होतें. त्यांतून पिवळें पाणी मळतें. तें धुवावें. मग जैतून तेल गरम करून, जर फोड फार पिवळे नसले तर लेप करावा. गाईचें तूप व गव्हांचा भुसा गरम करून लावावा. नमदा (बुरणूस) किंवा कातड्यानें बांधावा. लंगडतांना राहिल्यावर नाल करावें.

इलाज २ रा.—सुंभाजवळ लिंबायेवढे येतात. ते फोड छाल्याप्रमाणें असून ती बिमारी कठिण आहे. त्यावर—हिरडा व अंबेहळद, दोन्ही भाजून सज्जीखार बारीक करून वस्त्र गाळ करावें. वस्तऱ्यानें कापून लिंबाचे रसांत किंवा तुपांत किंवा, लोण्यांत मिळवून हें सर्व तीन दिवस बसवावें. अनुभव आहे.

तिसरा इलाज.—छाला कापून त्यांतून रक्त निघालें पाहिजे. नंतर पांच भिलावे, राळ तोळा एक, कांब्या शेंदूर एक तोळा, लसूण एक तोळा, आतपाव ऊद, मुरदाडशिंग एक तोळा, मेण एक तोळा, बच दोन किंवा एक तोळा, राई एक पैसाभार, असें शिजवावें. हिंगणीचे मुळीची साल एक तोळा शिजवावी. हें सर्व बारीक करून तिळाचे तेलांत गरम करून लावावें. शेणानीं बंद करावें. असें कीं, तेल जाणार नाहीं. नंतर तेल लावावें. थोडी चर्बी लावावी. दोरीनें तीन दिवसपर्यंत खूप बांधावें. नंतर उघडून पहावें. बरें न झालें तर पुन्हां सात दिवसपर्यंत तसेंच करावें. नंतर उघडावें. बरें झालें म्हणजे नाल करावें. कांहीं दर्द राहिल्यास तेंच पुन्हां करावें.

मुरदाडशिंग व गूळ मिश्र करून त्यांत शिरका घालून तिन्हींचें मलम करून लावावें.

इलाज ४ था.—मुरदाडशिंग कुटून बारीक करावें. व ताजे दुधांत खमिर करावें. नंतर तें कपडयास लावून त्याची पट्टी इसबास बांधावी.

पांचवा इलाज.—गेरू व माजेफळ, पैकीं गेरूबरोबर घेऊन व शिरक्यामध्यें खमिर करून तें इसबावर बांधावें.

काळे भिळावे घेऊन ते बारीक करून त्याचें तेल काढून तें इसबावर लावावें.

घोडयाचे समोरचे पाय किंवा मागले पाय मुरगळतात त्यापासून तो लंगडतो त्यास इलाज.—

एरंडाचें तेल, अंबेहळद, मैदालकडी, व मीठ. प्रथम ते पाय तेलानें चोळून काढावे. नंतर हीं औषधें बारीक करून कापडांत घालून त्याची पट्टी दोरीनें मजबूत बांधावी.

इलाज दुसरा.—कांहीं अंबेहळद, कांहीं मीठ व वांगीं. प्रथम वांगीं भाजून तीं कपडयांत घालावीं. नंतर हळद व मीठ बारीक करून त्या वांग्यांवर टाकावें व तीन चार दिवस बांधावें. हा इलाज करावा; परंतु ती पट्टी गरम बांधावी. अनुभविक आहे.

---

## पायाचे रोग.

पायाचे टांचेस दुःख झालें तर.—सुपरअशिटेड आफ लेड एक ड्राम, व चर्बी एक औंसमिळवून एकंदर पायास लावावें.

नैट्रेड आफ् सिल्व्हर अर्धा ड्राम, गोलार्डचा अर्क एक ड्राम, व चर्बी एक औंस मिळवून लावावें. सुंभांत मळ वगैरे असेल तो काढावा.

इलाज.—हिराकस, भिलावे, व करंज्याचें बीं, एक शेर घेऊन त्यांत मध व कायफळ मिळवून लावावें.

घोड्याचे सुंभ घांसून जातात. व नाल बराबर बसत नाहींत. त्यावर इलाज. मध व गूळ एकत्र करून सुंभावर लावावा. शेक द्यावा. ह्याप्रमाणें तीन दिवस करावें.

बिगर नालाचा घोडा मुशाफरी करून जर लंगडूं लागला तर त्यावर इलाज.—तवा गरम अंगाराप्रमाणें करावा. त्यावर रुईचीं

घार पानें कुटून बारीक करून घाळावीं. त्यावर थोडें मीठ घालून त्यावर घोड्याचे पाय टेवावे. हें डागाप्रमाणें आहे. एक वेळ केल्यानें बरें न,झाल्यास दोन तीन वेळ करावें. अनुभव आहे.

घोड्यास नारू फार मजल केल्यापासून होतात,दुसरा प्रकार मांदगी, तिसरा प्रकार चोपड. पहिले दर्दावर ह्मणजे नारूवावर औषधः मानेजवळ किंवा नाका जवळ किंवा दुसरे ठिकाणीं मनुष्यास हातापायावर होतात त्याप्रमाणें झाल्यास घोड्यास फार इजा होते. नारूची परीक्षा करून त्या जागेवर तेल चोळावें ह्मणजे नारू वर येईल. ओढून काढला तर सर्वच वर येणार नाहीं. दररोज थोडेंथोडें तेल लावून काढित जावा. बाकी राहूं देऊं नये. गूळ जुना अठरा टांक व काथ पांढरा अठरा टांक, दोन्हि बारीक करून गुळासुद्धां दोन गोळ्या करून सकाळीं एक व संध्याकाळीं एक ह्याप्रमाणें तीन दिवस द्यावी. अनुभविक आहे.

दुसरा प्रकार ह्मणजे मांदगी,चाळीस पन्नास कोस चालत आल्यानें थकला तर सांधे दुखून बेमार होतो. त्यास मसाला द्यावा तो येणेप्रमाणें; अंबेहळद अतपाव किंवा पावशेर, साबूण, गूळ जुना अर्धाशेर, लोटणखार पावशेर, साज्जिखार पावशेर, तेलिया सुवागी भाजली, अतपाव, गुग्गूळ पावशेर, गूळ पावशेर, भांग छटाक भाजलेली, सर्व बारीक करून अतपावाची गोळी मोठे घोड्यास द्यावी. लहान घोड्यास रात्रीस छटाक द्यावी. आणि चाकरी मालीस दोन तास करून झुल घालून निजूं द्यावा. घाम निघून मांदगी जाईल.

दुसरा इलाज.—हा अहमदनगरचे नबाब यांणीं केलेला आहे तो मसाला येणेंप्रमाणें. गूळ पुराणा पावशेर, गुग्गूळ छटाक, सुंठ छटाक, सुवागी भाजलेली एक तोळा, अफू एक मासा, हळद खाण्याची अतपाव, हिंग तोळा एक हें सर्व बारीक करून व एकत्र करून सर्व खाण्यास द्यावें. दोन तास मालिस करावें, मांदगी उतरेल व नीट हो-

ऊन दुसरे दिवशीं चालण्यास तयार होईल. ह्या गोळीस सरजीखानी गोळी ह्मणतात. फार अनुभव आहे.

तिसरा मसाला.—गुग्गूळ दोन टांक, सज्जीखार दोन टांक, साबूण दोन टांक, हिंग सहामासे, हाळद दोन टांक, अफू एकमासा, गूळ पावशेर, भाजलेली तेलीयासुवागी दोन टांक, भाजलेली फटकी दोन टांक हें सर्व बारीक करून मजल झाल्यावर रात्रीस सर्व एकदम द्यावें. अनुभव आहे. दुसरें दिवशीं स्वारीस येईल.

घोडा फार थकला तर भांग पैसाभार, गुग्गूळ १ पैसाभार, हळद छटाक, गूळ पावशेर, व शेंदेलोण एक पैसाभार, सर्व बारीक करून गव्हांचे आटयांत शिजवून घोडयास द्यावें, फार अनुभविक आहे.

---

## घोड्याचे पाठीवर पुष्कळ पैसा घालून दुसरे गांवीं पाठविल्यानें मांदगी येते. त्यावर उपचार.

चोक नऊ टांक, काळें जिरें नऊ टांक, इसबन जाळण्याची नऊ टांक, वावडिंग नऊ टांक, व बच ९ टांक, जनावराचे तुपांत सर्व जिनसा शिजवाव्या व घोड्यास खाण्यास द्याव्या. संभाळूचीं पानें, एरंडाचीं पानें व टाकळी झाडाचीं पानें चार चार पैसेभार व आणखी नऊ टांक चोक बारीक करून वस्त्रगाळ करून तिळांचे तेलांत किंवा मधांत द्यावें. अनुभव आहे.

---

## दुसऱ्या ओझ्यापासून झालेली मांदगी.

गुग्गूळ छटाक, अंबेहाळद छटाक, गूळ पुराणा अतपाव, आहाळीव छटाक, कांदे चार जुने, सुंठ छटाक, तेलीया सुवागी भांजली एक तोळा, भांग दोन पैसेभार, व थोड्या मोहोऱ्या या सर्वांस बारीक करून दारूंत किंवा अल्याचें रसांत किंवा अंगुराचे शिरक्यांत किंवा

गुडगुटीचे पाण्यांत गोळ्या कराव्या व रात्रीस सदर्हूप्रमाणें एकदम द्याव्या. याप्रमाणें तीन दिवस करावें. अनुभव आहे.

दुसरा इलाज. मसाला.—शेंदेमीठ छटाक, गुग्गूळ छटाक, फटकी छटाक, व गेरू अतपाव, यांची आल्याचे किंवा कांद्याचे रसांत किंवा मद्यांत गोळी करून रात्रीस द्यावी. अनुभव आहे. फार मजल केल्यानें ह्मणजे नेहमीं जाण्यायेण्यानें घोडा रोड झाला तर त्यावर उपचार.—सदर्हू घोडा एक दोन महिने बिन कामीं ह्मणजे काम न घेतां तबेल्यांत ठेवून दररोज मसाला चाळीस दिवस द्यावा ह्मणजे मांदगी जाऊन हुशार होईल व शक्ति येईल.

आह्माळीवाचें बीं एक शेर,हळद एक शेर,तूप एक शेर, गूळ एक शेर व मेथीचें बीं एक शेर, या सर्वांस बारीक करून तुपांत भाजावें, गुळाचा पाक घालून हलव्यासारखा करून चिनी भांड्यांत ठेवावें. दररोज पावशेर सकाळीं देत जावें. रंग चांगला होऊन हुशार होईल व दम फार येईल. अनुभव आहे.

तान्हेला घोडा झाल्यावर पाणी न दिल्यामुळें किंवा दवडून तहान लागल्यानें किंवा भारी ओझ्यानें तहान लागली किंवा वेळचे वेळेस पाणी न दिलें तर उन्हानें रक्त तापतें त्यांत त्याजला थंड पाणी दिलें तर घोड्यास फोड होतात. ते सर्व सांधीचे जागीं होतात. मूत करीत नाहीं व पिसाब बंद होतो. डोळ्यांतून पाणी जातें व घोडा निजतो. त्यास इलाज.—

तेल तिळाचें व अबलुत दोन्ही एके जागीं गरम करावीं, आणि सांध्यावर चोळावें. नंतर गाईचें शेण व एरंडाचीं पानें सुजेवर बांधावीं. दगडी व लाहोरी मीठ, काळें मीठ,प्रत्येक तीन टांक घेऊन सर्व बारीक करून अंबट दह्याबरोबर मिळवून सकाळीं घोड्यास खाण्यास द्यावें.आणखी दोन शेर दहीं व कांहीं मद्य घोड्यास पाजावा.

चोपड करण्याची ती कमताकत, दुबळा, अजारी झाला तर चोपड

करावीं. फार चालण्यानें रोड होतो. व दाणा घास कमीं दिल्यानें केंस वाढतात. चोपड तीन दिवस करावी. मीठ खाण्याचें एक शेर, ज्वारीचें पीठ एक शेर, व साबूण अतपाव, हीं सर्व पाण्यांत शिजवून घोड्याचे सर्व शरीरावर मालिस करावें. व त्याजवर चोपड करावी. दुसरे दिवशीं त्यास सकाळपासून संध्याकाळपर्यंत उन्हांत बांधावें. फक्त तें तीन दिवस करावें. गरम पाण्यानें चवथे दिवशीं धुवावें. जर घोड्यास गर्मी किंवा सर्दी झाली तर त्या वेळेस हें औषध करावें:—

साबूण, अतपाव मिरें काळीं, राई अतपाव, वाव डिंगें अतपाव, शेंदेलोण अतपाव, वाई कमना अतपाव, काळीं जिरें अतपाव, अजवान अतपाव, काळें मीठ अतपाव, हिंग एक तोळा भाजलेला, सुहागी भाजलेली नऊ मासे या सर्वांस बारीक करून बाजरीचे पिठांत मिश्र करून, नंतर चार पैसेभार रोज द्यावें, तें दाणा दिल्यावर द्यावें.

दुसरी चोपड.—बकऱ्याचें रक्त व मीठ त्यांत घालून घोड्यास चोळावें. साज्जिखार व लोटणखार अतपावप्रमाणें घेऊन बारीक करून ऊन रक्त घेऊन त्यांत घालून मालिस करावें. व सर्व अंगास लावावें. क्षार राहील तो त्यावर चिकटवून द्यावा. तीन दिवसपर्यंत तसेंच ठेवावें. नंतर चवथे दिवशीं सकाळीं गुळीचें पाणी गरम करून त्यांणीं मालिस करावें. नंतर ऊन पाण्यानें धुवावें. ह्मणजे चोपडलेलें सर्व निघून जाईल.

काळी मिरची एक बारीक करून पाण्यांत शिजवून घोड्याचे अंगास चोळावी. तें सुकूं द्यावें. नंतर त्याच दिवशीं धुवावें.

खाण्याचें मीठ एक शेर, उडदाचें पीठ पाण्यांत टाकून अर्ध कोमट उतरून चोळून घोड्यास उन्हांत दोन तास बांधूनें नंतर ऊन पाण्यानें धुवावें.

तांदुळाचें पीठ एक शेर व मीठ खाण्याचें एक शेर, हीं सर्व शि-

जवून सहा शेर पाण्यामध्यें ऊन ऊन अंगास चोपडावें. मग उन्हांत बांधून ठेवावा. याप्रमाणें तीन दिवस करावें. चवथे दिवशीं ऊन पाण्यानें धुवावें. व त्याचे अंगावर कांबळी घालावी. भांड्यांत तें पाणी गरम करून त्यांत घोड्याचे शेपटीचा कांदा बुडवावा. त्यावर हें बांधावें. नंतर मसाला द्यावा तो येणेंप्रमाणें.—

हळद पावशेर, काळीं मिरें पावशेर, गुग्गूळ पावशेर, सुंठ पावशेर, सोहागी छटाक, काळीं मिरें पावशेर, राई पावशेर, अजवान पावशेर, मीठ खाण्याचें पावशेर, बच पावशेर, लसूण पावशेर, लवंगा चार पैसेभार, कायफळ एक तोळा, अलें पावशेर, कांदे चार. हें सर्व बारीक वस्त्रगाळ करून गुळांत बारा गोळ्या कराव्या. एकेक सकाळ संध्याकाळीं याप्रमाणें सहा दिवस द्यावी.

घोड्यांस मीठ फार खाण्यास देतात त्यामुळें घोडे मलूल होतात. आणि लांबवर फिरविल्यानें गर्मी होते. तेव्हां घोड्यास मीठ देतात त्या योगानें घोड्याची छाती जळते. व ताप येतो, त्यावेळीं मीठ देऊं नये. कांहीं लोक खालीं लिहिल्याप्रमाणें मीठ देतात.—

मोठे घोड्यास आठवड्यांत तीन पाव, व लहान नाहीं व मोठा नाहीं त्यास दीडपाव, व लहानास एक पाव देतात. यापेक्षां जास्ती देऊं नये. कोणी अर्धा कच्चा शेर देतात. मिठापासून गर्मी होऊन खोकला होतो व ताहान लागते. तेव्हां घोड्यास तलावांत नेऊन धुवावें. व एक तास पाण्यांत राहूं द्यावा. व तलावांतील माती चिखल अंगास लावावा, व तास झाल्यावर पुन्हां पाण्यानें धुवावा. चिखल लावल्यावर उन्हांत तासभर उभा करावा. नंतर पुन्हां पाण्यांत धुऊन बाहेर आणावा. व मग खाण्यास मसाला द्यावा. साखर एक शेर, अर्ध शेर मध, पावशेर तूप हीं सर्व पावशेर प्रमाणें रोज पाजावीं. फार उपयोग आहे. कोंबडीचा शीरवा पाजावा, त्यापासून गर्मी कमी होईल, थंड जागेंत बांधावें. अनुभव आहे.

सहांवा प्रकार.—घोड्याचे नाल ल्हान असतात, हलके असतात, दगडांत घेऊन गेल्यावर नाल निघून जातात, सुंभांतून रक्त निघतें, व बंद होतें, त्याला नथमुतनी ह्मणतात. त्या घोड्यास मोजे घालावे.

गाईचें तूप, व भुसा गव्हांचा, निमे गरम करून नाळावर बांधावा. नंतर सुंभावर जैतूनचें तेल टाकावें. अनुभव आहे.

हड्डी किंवा मेख वगैरे लागली असेल ती काढावी. मुलाजाम ह्मणजे बारीक मेणाचा कपडा घेऊन त्यावर फटकी, व नवसागर हें बारीक करून जैतुनाचे तेळांत गरम करून बांधावें. अनुभव आहे.

आठवा प्रकार.—सुंभ तंग होतात ह्मणजे आंखडतात त्यावर इलाज.–सुंभाचे सभोंवतीं डाग द्यावा. नंतर जखम करून रक्त काढावें. मीठ चोळून चर्बी भरावी. नंतर नाल मारावे. चाळीस दिवसांत बरें होईल.

नववा प्रकार.—यांत तीन प्रकारः—वकरा, ताबक व तंवशिसा यांतून पू वगैरे निघतो तो काढावा. साफ करून जैतूनचें तेल, व सफेद जिरें मिळवून लावून ममदा ( बुरणूस ) बांधावा. दोन तीन वेळ हा इलाज करावा.

---

### मागील पायांत दर्द होतात त्यास पसतक ह्मणतात.

एक किंवा दोन पायास फोड होतात. ही बिमारी भारी कठिण आहे. त्या योगानें घोडा लंगडतो, त्याजवर उपाय–बकरीचें काळीज किंवा गाईचें काळीज बारीक करून व दोन पैसेभार कोंकणी मीठ बारीक करून काळीजांत मिळवावें. तें कपड्यावर ठेवून मस्तकावर दोरीनें बांधावें. तिसरे दिवशीं काढावें, पुन्हा असें करावें. याप्रमाणें नऊ दिवसांत तीन पट्या कराव्या.

जमालगोटे ३ तीन, जपाळत्रिया ३ तीन, तिळाचे तेलांत घालून

जखमेवर चोळावें. फटकी त्यावर टाकून तीन दिवसपर्यंत पट्टी बांधावी. पट्टी बांधण्यापूर्वीं विड्याचें पान त्यावर ठेवावें. चवथे दिवशीं ती पट्टी काढून राळ एक पैसाभार व जंगला हीं दोन्ही बारीक करून तिळाचें तेल गरम करून त्यांत दोन्ही जिनसा टाकल्यावर चुलीवरून उतरून घ्यावें. नंतर ती दवा थंड पाण्यांत टाकून दोन वेळा धुवावी. नंतर रुईचा चीक दोनपैसेभार घालून दर्दावर आठ दिवस किंवा सोळा दिवस चोळावें. बरें न झालें तर गोल डाग० ० याप्रमाणें द्यावे. अनुभव आहे.

पाषाणा ह्मणून एक रोग होतो. तो घोड्याचे मांडीवर, गुडघ्यावर, खालीं पोटावर,व पुढील पायांस याप्रमाणें ठिकठिकाणीं चार प्रकारचे रोग होतात. त्यांचीं नांवें:

पहिला नजद, दुसरा नफख, तिसरा मल्ला, व चवथा कमा.

पहिला प्रकार.—टांचेजवळ हाड दिसून येतें. बाहेर आल्यास त्यास बकरी नजद ह्मणतात. व आंत दिसूं लागल्यास नफक ह्मणतात. दोन्ही बाजूंस हाड दिसलें तर जमाली ह्मणतात. या योगानें घोडा फार लंगडतो.हा रोग फार कठिण.बहुतकरून बरा होत नाहीं. घोडा लंगडतो,चालतांना गरम होतो,उभा रहातो.त्यावर डाग द्यावे.

दुसरा प्रकार—वायु उत्पन्न होतो, तो टांचेजवळ होतो. त्यापासून फोड होतात. किंवा त्यावरचें कातडें निघून घोडा लंगडतो. त्यास इलाज—घोड्याचा खुराख कमी करावा. घोड्यास थंड पाण्यांत घेऊन जावें. नंतर त्यास लेप लावावा तोः बोळ, कडूइंद्रावण, शिरका,व कन्हेरीमुळ्याचा लेप करावा. कांहीं लोक शस्त्रांनीं टोंचून लेप लावितात. लेपानें बरें न झाल्यास चक्रासारखा डाग द्यावा.

तिसरा प्रकार.—मल्ला ह्मणजे टांचेजवळ फोड होतात. जोड निराळा होतो. त्यावर वर लिहिलेला लेप करावा. फटकी बांधावी. बरें न झालें तर डाग द्यावा.

चवथा प्रकार.—टांचेजवळ हाड दिसतें. गवत फार खल्यानें व पाणी फार प्याल्यानें अजीर्ण होतो. किंवा अजीर्ण झाल्यानें होतो. त्यास इलाज.

घोड्यास नदींत किंवा तलावांत पोहण्यास घालावें. शस्त्रांनीं जखम चिरावी. शेलगमाचें पान घेऊन गरम करून मिठाची थैली शलगमाचे गरम पाण्यांत भिजवून शेक द्यावा. व सदहू पैकीं लेप करावा.

---

## उरुद्रोणी रोग.

दोन्ही पायांमध्यें सूज येते, ती मंडलाकृति होते. त्यास उपाय—शस्त्रांनीं फोडावें. नंतर सज्जीखार ०००४, जवखार व ०००४, लोणाखार ०००४, हीं घेऊन, आणि चिंचेचे चिचोके काढून त्याचा रस काढावा. व त्यांत वर सांगितलेल्या जिनसांची पूड करून टाकावी. व सर्व एकत्र करून खापरांत घालून ऊन करावें. आणि घोड्याचे सुजलेले जागीं लेप करावा. नंतर ओंवा ०००१२, शेपा ०००१२, वेखंड ०००९, सुंठ ०००१२, हे सर्व जिन्नस बरोबर घेऊन तुपांत कालवून घोड्यास द्यावे. ३ दिवस किंवा सात दिवस दिलें असतां उपशम होईल.

कोसाई—दोन्ही पायांचेमध्यें मांड्यांखालीं गांठी होतात. त्यास उपाय—प्रथम ह्या गांठीं शस्त्रांनीं फोडाव्या, आणि सेंदेलोण, लसूण, परसून ह्मणजे चिंचेचे चिचोके काढून त्या वरील चिंचेचा रस काढावा. आणि त्यांत ह्या जिन्नसांचीं पूड करून टाकावी. आणि खापरांत घालून ऊन करावें. त्याचा गांठीवर लेप करावा. व ओंवा, शेपा, लसूण, सुंठ, वावडिंगें, हे सर्व जिन्नस तुपामध्यें एकत्र करून सात दिवसपर्यंत घोड्याला चारावे.

चाकळ रोग—दोन्ही मांड्यांपैकीं एक मांडी सुजते. किंवा खालीं सूज येते, किंवा पोटाखालीं येते, ती सहाणेप्रमाणें वाटोळी असते. त्या-

स चाक्कलरोग ह्मणतात. त्यास उपाय—सज्जीखार, जवखार, लोणा-खार, सुरसुनबी, हाळद, सुंठ, वेखंड, हीं प्रत्येक पावशेर, आणि सैंधव, मिरें, पिंपळी ही प्रत्येक ९ टांक घेऊन पाण्यांत घालून वाटावी. आणि त्याचा लेप सुजेवर तीन दिवस लावावा. हिरडा, सैंधव, काडेचिराईत, वेखंड, लसूण हीं ९ टांक आणि सुंठ पावशेर, हें एकत्र करून तुपाबरोबर एक सप्तक द्यावें. हा रोग होऊन जर घोडा फार दम टाकील किंवा नाकातोंडांतून पिंवळे पाणी पडेल तर तें असाध्य लक्षण समजावें.

जानीवे.—ह्मणजे, घोड्याचे एका पायावर किंवा दोन पायांवर अगर कधीं कधीं चारी पायांवर मांडीच्या आंत गांठी येतात. आणि त्या योगानें इजा होते. त्यास उपचार—गांठीवरचे केंस काढून वर फांसणी द्यावी. नंतर जयपाळ, सैंधव, नवसागर, व मंजिष्ट हें पाण्यांत वाटून त्यानें मर्दावें. विटा तापवून त्यावर शेक द्यावा. असा क्रम तीन दिवस करावा.

---

## सन्निपातद्वंद्व.

दोन्ही पुढले पाय अगर दोन्ही मागले पाय सुजतात, आणि रक्ताप्रमाणें लाल होतात, पाय रक्तवर्ण झाले असतां तें असाध्य लक्षण समजावें. रक्तवर्ण न झाल्यास त्यास उपचार करावा. सुंठ ४ टांक, पिंपळमूळ ९ टांक, हिरडे ९ टांक, चिराईत ९ टांक, कोष्ट ९ टांक, ओंवा पावशेर, आणि निर्गुडी पावशेर, याप्रमाणें घेऊन चूर्ण करावें. हें चूर्ण गुळाबरोबर अगर तुपाबरोबर द्यावें. आणि वारुळाची माती शेळीचे मुतांत कालवून, खापरांत घालून ऊन करावी, आणि त्यानें पाय शेकावा. असा क्रम तीन दिवस करावा.

घोड्याचें सर्व अंग वारंवार उडतें, आणि मुततो. त्यास उपचार—वावडिंगें तुपांत घालून ऊन करून चांगलीं शिजवावीं व पावशेर शि-

रसाचें तेल, हें न मिळल्यास तिळाचें तेल घेऊन एकत्र करावें आणि कुशीला लेप करावा. व वीट तापवून त्यावर एरंडाचें पान गुंडाळून त्याणें शेकावें. दररोज घोड्याला उन्हांत बांधावें. व रात्रीं पुन्हा शेकावें. असें चार दिवस करावें. दररोज तिळाचें तेळ घोड्याचे अंगास लावावें.

---

## हड्डी.

हड्डी ह्मणजे दोन्ही पायांस गांठी येतात आणि फुटतात. व त्यांतून पाणी जाऊं लागतें. हड्डीवरचे केंस काढून वर फांसणी घालावी. मग जयपाळ, व नवसागर, लिंबाच्या रसांत कालवून वर मर्दन करावें. त्यावर निवडुंगाच्या कांड्या तापवून शेक द्यावा. दुसरे दिवशीं हेंच औषध लावून शेणाच्या गोवरीचा शेक द्यावा. (२) ज्या ठिकाणीं गांठ बांधली असेल त्या ठिकाणीं शेराच्या देंव्या ऊन करून शेक द्यावा. व सैंदेलोण, वेखंड, लसूण, लिंबाच्या रसांत वाटून हड्डीवर लेप करावा. पुन्हा शेराच्या देंव्या ऊन करून शेक द्यावा. असें ३ दिवस करावें. व ओंवा, वेखंड, लसूण, आणि सैंदेलोण, कांडेचिराईत, हे सर्व जिन्नस बरोबर घेऊन, गुळांत कालवून चाटण द्यावें.

---

## रसाचा प्रकार.

घोड्याचे सर्व अंगास एक किंवा दोन गांठी होतात. व त्या फुटून त्यांतून लस वाहूं लागते. त्यास उपचार—मीठ व डांगर आणि शेळीच्या लेंड्या बारीक करून एकत्र करावें व गांठीवर बांधावें. दुसरे दिवशीं सोडून पुन्हा औषध बांधावें. ४ दिवसांत उपशम होईल.

---

## हाडपंकरस.

दोन्ही पायांस गांठी येऊन फुटतात, त्यांतून लस वाहाते. त्यास

उपचार–सैंधव, लसूण, निर्गुंडी, व सेवग्याची साल, सर्व बरोबर घेऊन कुटून पायास चार दिवस बांधावें. वर शेक द्यावा.

---

## तळवे गांठीरस.

घोड्याचे सुंभाचेमध्यें गांठी येतात. तेणेंकरून तो लंगडतो, त्यास उपचार–राळ पावशेर, लाख पावशेर, कांबिया शेंदूर, लोध्र, व मेण, हे नऊ टांक घेऊन एकत्र चूर्ण करावें. हें चूर्ण तिळाचे तेलांत कालवून गांठीवर लेप करावा. वर चिरगूट बांधून त्यावर विटांचा शेक द्यावा. असें तीन दिवस करावें. व तळस्तंभरसावर खालीं सांगितलेलें औषध ( चाटण ) द्यावें.

---

## तळस्तंभ रस.

खुरा खालच्या बाहुल्या उकलतात, त्यांतून लस वाहाते, किंवा घोड्याचे हाताखालीं छातीवर रेव असते, तेथून पाणी वाहूं लागतें. त्यास औषध–लोहचूर्ण, हिरडे, व काथ हीं औषधें प्रत्येक नऊ टांक घेऊन चूर्णकरून तिळाचे तेलांत कालवून त्याचा लेप बाहुलीवर करावा, किंवा उरावर करावा. वर विड्याचीं पानें बांधावीं. बाहुलीवर चिरगूट बांधून वर विटाचा शेक द्यावा, असें सात दिवस करावें आणि ओंवा, निर्गुंडी, लसूण हीं पावशेर, आणि पिंपळमुळाची साल ९ टांक, हें चूर्ण करून गुळाबरोबर सात दिवस द्यावें. ( २ ) धत्तुऱ्याचा ( धोतऱ्याचा ) रस दोनशेर व शेळीचें दूध दोनशेर, एकत्रकरून उकरड्यांत सात दिवस पुरून ठेवावें. नंतर वेखंड, कोष्ट, व कांबिया शेंदूर, हीं प्रत्येक पावशेर घेऊन चूर्ण करून तेलांत कढवावें, मग घोड्याचा पाय धुऊन, रक्त निघेपर्यंत खूप घांसावा. पुन्हां धुवावा, आणि त्यावर पहिलें औषध चोळावें, आणि वर हें तेल लावावें आणि चांगलें मर्दन करावें. पाय उघडाच ठेवावा. पाय ओला होऊं देऊं नये.

दोन सप्तकें केलें असतां तळस्तंभरस बरा होईल. ( ३ ) कुत्र्याचें शीर व सापाची कांत जाळून ती राख व मीठ एकत्र वाटून पायाचा तळवा घांसून त्यावर लेप करावा. मग शेळीच्या लेंड्या शेळीच्या मुतांत कालवून त्याचा लेप करावा. वर एरंडाचीं पानें लावून चिरगुटानीं बांधावें, असें सात दिवस केलें असतां तळस्तंभरस दूर होईल. (४) मोरचुदाची बारीक पूड करून टांचेंत भरून वर लिंबाचा रस सोडावा. बरें होईल.

---

## रतिभंगरस.

दोन्ही हातपाय सुजतात, काठीप्रमाणें उभे रहातात, लवत नाहींत व चारी गात्रें सुजतात, त्यास उपचार–दोन्ही पुढचे पाय व मागचे पाय यांच्या शिरांचें रक्त काढावें, व रक्त काढलेल्या ठिकाणीं तरवडाचे मुळीची साल, भुईकोहळा याची पूड एकत्रकरून चोळावें. आणि भुईनिंब, कडूनिंब, जिरें, हिरडे, आणि तरवडाचे मुळीची साल, हीं औषधें समभाग घेऊन एकत्र कुटून कोहळ्याच्या रसांत कालवून त्याचा शिरावर लेप करावा. वर चिरगुटें बांधावीं. असें तीन दिवस करावें. नंतर ओंवा पावशेर, निर्गुडीचे पाल्याची पूड पावशेर, लसूण ९ टांक, व सुंठ पावशेर एकत्रकरून त्यांचें चूर्ण गूळ किंवा तूप यांजबरोबर सात दिवस द्यावें.

---

## मधुपंकरस.

सर्व संधींस गांठी होतात, त्यास उपचार—गांठी शस्त्रानें कांपून त्यावर चिंचेचा पाला, व निलंबीचा पाला, वाटून त्याचा लेप करापा. मग टाकळीचा पाला व गूळ हीं औषधें तुपाबरोबर चार दिवस द्यावीं.

---

## पाणीपंकरस.

पारी पायांस गांठी होतात. त्यास उपचार--गांठी प्रथम शस्त्रानें कांपून त्यांवर सज्जीखार,व जवखार हीं समभाग घेऊन त्यांत चिंचेचें बरबट घालून कालवून ३ दिवस त्याचा गांठीस लेप करावा. आणि ओंवा पावशेर, सुंठ, सैंधव, वावडिंग, हीं प्रत्येक नऊ टांक घेऊन चूर्ण करून गुळाबरोबर पोटांत द्यावें. सात दिवसांत बरा होईल. ( २ ) ओंवा, सैंधव, सुंठ, पिंपळमूळ, व लसूण, हें समभाग घेऊन त्यांत तितकाच गूळ घालून घोड्यास द्यावें. गांठी धुऊन वर लिंबाच्या रसाचा लेप करावा. व सांगितलेले दोन्ही खार लावावे.

---

## गुडघी.

गुडघे सुजतात त्यास उपचार--मोहाचा पाला आणून गुडघ्यावर बांधावा, असें तीन दिवस करून मग नागवेलीचा पाला, पांगाऱ्याची साल, खैरमुळाची साल, डोरली मुळाची साल, व औदुंबराच्या मुळीची साल, हें औषध पाण्यांत वाटून त्याचा गुडघ्यावर लेप करावा; असें तीन दिवस करावें, पिकेल तर शस्त्रानें छेदावें, मग बोरांतील बियांतील मगज काढून शेळीचे मुतांत कालवून गोळा करून सात दिवस पोटांत द्यावा.

---

## गुडघ्यावर चार प्रकारचें दर्द होतें त्यास.

१ खताम, २ गुज ३ असबाबा, आणि ४ लतमला.

खतां ह्मणजे गुडघ्याची, हड्डी कठीण होते, घोडा लंगडत असतो, त्यावर उपाय नाहीं, परंतु डाग द्यावा. तो ( ≥ ) या प्रमाणें.

गुज ह्मणजे गुढघ्याचे सभोंवतीचें हाड मोठें होतें, कठिण होत नाहीं, सुजतें, घोडा लंगडतो. त्यालाही डाग द्यावा तो वर लिहिल्याप्रमाणें.

तिंसरा असबाब. गुडघ्यास फोड होतात, व त्यांतून पाणी वाहतें. बोरीचें फळ घेऊन बारीक करून शिरक्यांत घालून दर्दावर लेप द्यावा, घोड्यास थंड पाण्यांत बुडवावें, खाण्याचा खुराख कमी करावा. मांडीजवळच्या शिरांचें रक्त काढावें, आणि बरें न झाल्यास खालीं लिहिल्याप्रमाणें लतमुतलावर जें औषध लिहिलें आहे तें करावें.

लतमुतलयाचा प्रकार.—गुडघ्यावर फोड येतात, ते गर्मी व सर्दीपासून होतात. गुडघ्यावरचे केंस झडून जातात व घोडा लंगडतो, त्याजवर उपचार.

गाईचें तूप जुनें, जैतूनचें तेल, लसूण, आणि एक कबूतरपक्षी याचे खांद्याचें रक्त घ्यावें. सर्व एकेजागीं करून गुडघ्यावर एक एक तासानें लावीत जावें.

मुषममस.—गुडघ्याचे सांधींत मागें फोड होतात. ते कठीण असतात. त्यापासून घोडा लंगडतो, खात नाहीं, उभा रहातो, चालत नाहीं, कदम पुढें टाकीत नाहीं, त्यावर इलाज.—

गाईचें तूप व एरंड्याचें तेल फोडावर चोळावें. व त्यावर नमदा (बुरणूस) बांधावा.

दुसरा इलाज.—राई, इंद्रायणी व मीठ, सारखें घ्यावें. त्याजला गाईचे तुपांत मिळवावें. चकंदरचें पाणी सर्व मिश्रकरून फोडांवर लावावें.

तिसरा इलाज.—दारू पिण्याची जैतूनचे तेलांत कढवावी व त्यांत अक्रोडाचा मगज व इंद्रायणी मीठ घालून फोडावर बांधावें. अनुभव आहे.

जिरें, किरमाणी ओंवा, व मीठ खाण्याचें हे बारीक करून बकरीचे काळजाजवळची चर्बी, गुद्दा ह्मणजे काळिजाजवळ असतो तो, व गाईची चर्बी, हीं एकत्र करून बरें होईपर्यंत फोडावर बांधावीं.

दुसरा इलाज.—कांदा, चर्बी गाईची, व मीठ खाण्याचें सर्व बारीक करून फोडांवर बांधावें. फोड नरम झाल्यावर ते फोड कांपावे.

त्यांतील रक्त व पू काढून टाकावा ह्मणजे बरें होईल. त्यांनीं बरें न झालें तर डाग द्यावे. बरसातीसारखा हा प्रकार आहे; सबब बरसातीचा इलाज केला तरीही बरें होईल.

बेल ऊर्फ घोडेस्वारांनीं घोड्यावर बसून त्याचें पाऊल कमी पडल्यापासून बरसातींत त्याचे गुडघ्यावर फोड येतात. त्यास, कदपस, असें ह्मणतात. त्यावर उपचार.—

एरंडीचें बीं बारीक करून त्यांत गाईचें तूप जुनें मिळवून तें फोडावर चोळावें, आणि त्याजवर नमदा बांधावा.

दुसरा प्रकार.—गुडघ्यावर फोड कठीण होतात. ते पायापासून आरंभ होतो, कित्येक घोडयांस पायापासून आरंभ होऊन सर्व शरीरावर फोड होतात. त्यापासून पिवळें पाणी जातें व लस वाहते. त्यास बेल ह्मणतात. त्यावर उपचार. बाजरी किंवा त्याचें सरमाड घोडयास देऊं नये. संख्या सोमल अर्धामासा, व सवागी अर्धामासा. सवागी भाजावी, दोन्ही ज्वारीचे पिठांत मिळवून भाकरी करून सात दिवस खाण्यास द्यावी. अनुभवशीर आहे.

तळ्यांतील बेडुक्या सात, तीन वर्षांचे गुळांत दररोज एकेक खाण्यास द्यावी ह्मणजे बरें होईल. अनुभव आहे.

---

## बेलरोगावर.

रुईचीं पानें तीन रोज द्यावीं, तीं ताजीं आणून हिरव्या व ओल्या गवतांत खाण्यास द्यावीं. अनुभविक आहे.

रुईचे झाडाचा चीक, तिळाचें तेल दोन पैसेभार आणि कांबिवा शेंदूर एक तोळा, सर्व मिळवून फोडावर लावावें.

बेलरोगाचे फोड चिरले जातात त्यावर अर्धापाव तूप गाईचें,व धोत्रा काळा याचें बीं एक पैसाभार शिजवून खल करावा आणि जखमेवर लावावें. अनुभव आहे.

मैदालकडी तीन मासे,जंगळा तीन मासे, अंबेहळद तीन मासे,सर्व बारीक करून लिंबाचे रसांत खलून लेप करावा आणि विस्तवानें शेकावें. फार अनुभव आहे.

कळीचा चुना तीन तोळे, जंगला सुहा मासे भाजलेला, आणि भाजलेल्या तीन सुपाऱ्या यांचें चूर्ण करून बेलास लिंबांनीं चोळावें, व त्यावर ही दवा लावावी. अनुभव आहे.

टाकणखार तीन टांक व गूळ, एका जागीं करून वस्तऱ्यानें बेल कांपून त्यावर लावावें. अनुभव आहे.

काळा सज्जीखार व शिरका,दोन्ही एकत्र करावे व हिंगणाचे काट्यानें बेळास कांपून वर दवा लावावा. नंतर बचनाग व लसूण घेऊन भाजून बारीक करून जखमेवर लावावें. अनुभव आहे.

बेल्याचे मोठे फोड होतात त्यावर उपचार.—

कुचला तीन टांक, जपाळ व जंगला तीन टांक भाजलेला, संख्या सोमल तीन टांक,तांबड्या गुंजा तीन टांक,व चित्रकाचें बीं तीन टांक, सर्व लिंबाचे रसांत खलावें. फोड हिंगणाचे काट्यानें कांपून वर सदहू मलम लावावें. नंतर त्यावर चित्रकाची बी चिकटवावी. अनुभव आहे.

अघाड्याचें बीं तीन टांक, सुहागी तीन टांक, व प्रत्येक दिवशीं गूळ घेऊन घोड्यास खाण्यास द्यावें. अनुभव आहे.

कोष्टकोळिंजन, हळद, अकलकारा, बचनाग, सज्जीखार, जवखार, काळें मीठ, पापडखार, कण्हेरीचे मुळीच्या सालीचा रस, अघाड्याचा रस, व जयपाळ हीं सर्व एकसारखें वजन घेऊन बारीक करून त्यांचा एक हिस्सा तिळाचे तेलांत घालावा, व एक हिस्सा नरमूत्रांत घालून हें सर्व उकळावें,ह्मणजे जमून येईल मात्र तेल जाऊं देऊं नये. सदहू तेल शिशींत भरून ठेवावें व लावीत जावें, विस्तवानें शेकावें. राहिलेलें औषध अनपानप्रमाणें सात दिवस खाण्यास द्यावें. अनुभव आहे.

फोड शिंगानें फोडावे व त्यावर लिंबाचे फाकेनें रक्त येईपर्यंत चोळावें, त्यावर कळीचा चुना चोळावा, दुसरे दिवशीं त्याचप्रमाणें करावें. याप्रमाणें सात दिवस करावें. अनुभव आहे.

शिजणाचे झाडाची साल दोन पैसेभार व मर्जेसुरख दोन्ही एकत्र करून सकाळीं व संध्याकाळीं खाण्यास द्यावें.

भिलावे सहा शेर, तरवडाचें बीं एकशेर, मालकांगोळी एकशेर, बकाण्यालिंबाचीं पानें एकशेर पक्कीं झालेलीं, हांड्यांत घालून हांड्याचें तोंड कांपडानें बांधून टाकावें आणि त्याचा अर्क काढावा व दिवसांतून दोन तीन वेळ फोडांवर लावावा.

असखार गाईचे दुधांत तीन किंवा सात दिवस चोळावा व थोडा खाण्यास द्यावा. अनुभव आहे.

कावाचे झाडाच्या सालीचा मगज ४० चाळीस तोळे, प्रत्येक दिवशीं एक तोळा घेऊन विड्याचे ५० पन्नास पानांबरोबर मिळवून खाण्यास चाळीस दिवस द्यावा. त्यावर मसाला खाण्यास द्यावयाचा तोः—काळींमिरें शेरभर, वावडिंगें शेरभर, कुटकी शेरभर, सुंठ शेरभर, गागरून शेरभर, पिंपळमूळ शेरभर, शेंदेलोण शेरभर, सुहागी भाजलेली शेरभर, बोरीचे झाडाचा गोंद शेरभर, अजवान शेरभर, हळद शेरभर, जवखार शेरभर, खुरासनी अजवान शेरभर, पिंपळी शेरभर, गुग्गूळ शेरभर, शेंबल झाडाचीं मुळें पावशेर, शेराची साल शेरभर,व गूळ तीन वर्षांचा जुना दोनशेर,हें सर्व बारीक करून चाळीस गोळ्या कराव्या, पावशेराची एक करावी. मग सकाळीं अल्याचे रसांत द्यावी.

दुसरा.इलाज.—भिलावे एकशेर भाजलेले, रुईचे झाडाचीं पानें पक्कीं एकशेर, पांढरे तीळ एकशेर, आणि अजवान एकशेर. भिलाव्याची साल मेणाप्रमाणें होईपर्यंत बारीक करून त्यांतून एक मूठ घेऊन गोळी करीत जावी. सकाळीं व संध्याकाळीं एकेक गोळी

द्यावी. गवत सुखें खाण्यास द्यावें. गरम जागेंत घोडा बांधावा. हवा लागूं देऊं नये. व रुईचे झाडाचे दुधांत लोणी मिळवून फोडांवर लावावें. अनुभव आहे.

लाळमिरची दररोज, दुसरे दिवशीं २ दोनप्रमाणें चढत्या मिरच्या याप्रमाणें चाळीस दिवस द्याव्या. त्याप्रमाणेंच एकेक उतरती करावी. नंतर हरभऱ्या एवढा किंवा मुगाचे दाण्या एवढा हिंग व एकेक कांदा रोज चाळीस दिवस खाण्यास द्यावा. बेलीचा अजार पाठीकडे किंवा मानेकडे राहिल्यास डाग द्यावा. नंतर फोड शस्त्रानें कांपून त्यांत हिंग भरावा. पट्टी द्यावी. अनुभव आहे.

नागोरी अस्कंद एकशेर, अक्कलकारा कच्चा पावशेर, मिरची काळी ह्मणजे मिरें पावशेर, कुटकी पावशेर, बिब्बे एक शेरभर, अजवान एक पावशेर, अल्याचा रस पावशेर, आणि लिंबाचा रस अतपाव हें सर्व बारीक करून लिंबू व आल्याचे रसांत मिळवून मग अतपावाची गोळी करावी. रोज सकाळीं घोड्यास द्यावी. तद्वात रोगापासून बेला होतो. त्यावर हा उपचार असे. पोटाखालीं हा रोग झाला तर घोड्याचे सुंभ रक्त निघेपर्यंत कापावे.

दुसरा इलाज.—गेरू पावशेर, शेंदेलोण, व रसकापूर दोन किंवा चार, तोळे तिन्ही बारीक करून तीन वर्षांचे जुने गुळांत मिळवून लिंबा एवढ्या गोळ्या कराव्या व सकाळीं एकेक रोज घोड्यास चारावी. गरम पाणी पाजावें. हरभऱ्याची चंदी द्यावी. बाजरीचें सरम देऊंनये व बाजरीही देऊंनये. बेल रोगावर रक्त काढावयाचें त्याची शीर छातीजवळ असते. छातीवरच्या शिरा असतात त्यांपैकीं दोन हातांकडे एक, तंगाकडे एक, तिसरी मानेकडे एक, व चवथी पोटाकडे एक. मानेकडे शिरांचें रक्त काढावें. त्यानंतर दवा द्यावा तो—सज्जीखार, शहाजिरें, व चुना कळीचा, असें

बारीक पिठाप्रमाणें करावें. पाण्यांत शिजवावें. नंतर लिंबाचा रस काढून त्यास चोळावें, त्यावर हें तीन चार राजेऔषध लावावें. अनुभव आहे.

दुसरा इलाज—जुनें तेल घेऊन त्यांत भांग घालावी आणि तें तेल फोडावर लावावें. नंतर टाकणखार, नवसागर, व सज्जीखार, सर्व बराबर वजनानें घेऊन कुटून वस्त्रगाळ करून त्यांत पन्नास लिंबांचा रस घालावा आणि फोडांवर लावावें. त्यावर दोन तोळे पारा, कापुसांत ठेवून फोडावर बांधावा. डाग द्यावयाचा असेल तर संबुळखार व हरभऱ्याचें पीठ व बकऱ्याची चर्बी त्यावर चिकटवावी.

इलाज ३ रा.—राळ अर्धशेर, तिळाचें तेल एक शेर, व हळद चार टांक, एकत्र कढवावें. मग तें तेल गाळून घ्यावें. नंतर लिंबाचा रस आठवा हिस्सा त्यांत घालावा, पुन्हा मिसळण करून तें तेल फोडावर चोळावें. परंतु तेल चोळण्यापूर्वीं ऊन पाण्यानें सकाळीं व संध्याकाळीं जखम धुऊन टाकावी. अनुभव आहे.

गरम हवेपासून फोड होऊन त्यांतून रक्त जातें, किंवा रक्त जमल्यानें फोड मागील पायापासून होतात. फोड लहान असतात तेव्हां पडसें होतें, त्यावर उपचार.—

शस्त्रानें फोड व आंतील दर्द कांपावें. व त्यावर रुईचा चीक घालावा. नंतर अर्धशेर तूप घेऊन त्यांत जंगला नऊ टांक घालून कढवावें. फोडावर तें तूप चोळावें.

चित्रक, सुंठ, हिरडे, बाळहिरडे, भारंगी, पित्तपापडा, भुईरिंगणी. सेवग्याचे झाडाची साल, धावडा, कडीलिंबाचीं पानें, सर्व पावशेरप्रमाणें घेऊन बारीक करून एकत्र करावें. त्याचे सात भाग करून दररोज एक हिस्सा घेऊन आठशेर पाणी घेऊन त्यांत मिळवून एक शेर पाणी राहीपर्यंत उकळावें. व तें, सकाळीं पाजावें. बदामाचें तेल नंतर पाजावें. याप्रमाणें सात दिवस

करावें. आणि नंतर फोड चिरून, राई चर्बी, व लवंग हें बारीक करून त्यावर लावावें. व शिवाय लवंगा पावशेर, व माजूम पावशेर, खाण्यास द्यावी.

---

## अनसबाबा.

फोड सर्दीपासून किंवा गरमीपासून होतात. त्यापासून घोडा लंगडत नाहीं. जेव्हां ते मोठे फोड होतात तेव्हां त्यानें अन्न जिरत नाहीं व गवत फार खाल्यापासूनही होतात. ते दोन्ही हातांस किंवा दोन्हीं पायांस होतात. गरमी किंवा सर्दीपासून झाले असतील तर ते एकठव होतील असे दोरीनें किंवा कपड्यानें बांधावे. नंतर त्या जागची शीर चिरावी, त्यांतून रक्त पू वगैरे काढून टाकून वर लिहिलेले तेलांपैकीं पाहिजे तें तेल लावावें. दर्दांत पाणी जाऊं देऊंयये. कांहीं सवदागीर त्यावर डाग देतात. घोडा अर्ध अंग वळतो, अर्ध अंग ताठतो व जांभया देतो. फक्त शेंपूट हालवीत असतां पायावर फोड फार होतात, त्यावर इलाज—अबलूथ व अर्धशेर तिळाचें तेल दोन्हीं एकत्र करून कढवावें, निम्मे गरम करून फोडांवर तीन दिवसपर्यंत चोळावें.

एक शेर दूध व पावशेर हिरव्या मिरच्या, सकाळीं घोडयास खाण्यास द्याव्या.

घोड्यास बादी व सर्दी होऊन खोकला होतो व फोड होतात. अशा रोगावर उपचार—सोहागी भाजली पावशेर, काळीमिरें पावशेर, कुचले पन्नास, नरकचूर पावशेर, अंबेहाळद पावशेर, गजग्याचा मगज पावशेर, चोक पावशेर. मनुष्याचे कवटींत हे सर्व बारीक करून कपड्यानें वस्त्रगाळ करून दररोज दोन तोळे घेऊन तुपांत एक पैसां भार एकत्र करून चारावें. अनुभव आहे.

बग ३० तोळे, चोक ७ तोळे, राई आतपाव भाजलेली, अंबेहाळद ७ तोळे भाजली, कुटकी ७ तोळे भाजली, काळींमिरें तोळे ७ भाजलीं, तेलिया सोहागी भाजकी तोळे ७, कुचला पन्नास, पिंपळगांठ ७ तोळे, पिंपळी ७ तोळे भाजलेली; हिंग तोळा एक भाजलेला, सुंठ भाजलेली ७ तोळे, सज्जीखार, भाजलेला तोळे ३१, काळें मीठ तोळे ३१, भिलावे ५०, व गंधक तोळे ७ हें सर्व बारीक करून कुटून गुळांत किंवा शिरक्यांत गोळ्या कराव्या. दर गोळी आतपावाची करावी व सकाळीं एक ह्याप्रमाणें दाणा दिल्यावरद्यावी. बहादूरशहांनीं केलेलें औषध असून अनुभव आहे.

तेलिया सुहागी, सेंदेलोण, व हिंग हें प्रत्येक तोळा घ्यावें. बारीक करून एकत्र करावें. नंतर हिंग टाकून चार तास खलावें. त्याच्यांत पाणी घालून सात किंवा दहा गोळ्या कराव्या. सकाळीं दररोज एक गोळी द्यावी.

शेराच्या डिंगऱ्या दोन पैसेभार भाजून घ्याव्या, लसूण दोन पैसेभार, कायफळ एक पैसाभार. लसूण व शेराच्या डिंगऱ्या कुटाव्या. नंतर कायफळ बारीक करून त्यांत टाकावें. नंतर थोडें पाणी घालून ऊन करावें व फोडावर लेप करावा. चार पांच दिवसांत बरें होईल.

गुग्गुळ ७ तोळे, काळीं मिरें ७ तोळे, अजवान ७ तोळे, व तीन वर्षांचा गूळ ७ तोळे, हीं सर्व बारीक करून एक पैसाभार किंवा अर्ध पैसाभार खाण्यास द्यावीं. अनुभव आहे.

मैदालकडी एक पैसाभार, गव्हांचा भाजला मैदा तीन पैसेभार, सज्जीखार एक पैसाभार भाजला, हळद एक पैसाभार भाजली, व गुग्गूळ एक पैसाभार भाजलेला, सर्व बारीक करून फोडांवर लावावें. पाणी घालून कढवून लेप करावा. त्यावर एरंडाचीं तीन पानें बांधावीं, तीन दिवसांत बरें होईल. अनुभव आहे.

---

## बादीवर इलाज.

रुईचीं पानें एक मूठभर, काळ्या व पांढऱ्या धोत्र्याचीं पानें एकेक मूठभर, पिंवळा धोतरा एक मूठभर, कुसुपित्याचें झाड एक मूठभर पानासुद्धां, तरवड एक मूठभर, कुरंज मूठभर, वडाचे झाडाचीं पानें एक मूठभर पिकलेलीं, कुचल्याच्या बिया दहा भाजलेल्या, गजग्याचीं पानें एक मूठभर, हिरड्याचीं पानें एक मूठभर, कुटकी अतपाव, चारोळ्या अतपाव, गजगा अतपाव, पळसपापडी अतपाव, व इंद्रजव अतपाव, हें सर्व बारीक करून पावशेराची एकेक गोळी करावी. सकाळीं व संध्याकाळीं घोड्यास एकेक द्यावी.

शेराचे झाडाच्या मुळ्या, व अंबेहळद, दोन्ही बारीक करून एकत्र करून फोडावर बांधावें. दुसरा उपाय. ह्याऊच झाडाचीं पानें व अमरवेल या दोन्ही घेऊन कुटून फोडावर बांधाव्या. अनुभव आहे.

सुया झाडाचें बीं चार पैसेभार, बच चार पैसेभार, राई अतपाव, लाल मिरच्या छटाक, अजवान छटाक, काळीं मिरें अतपाव, हें सर्व बारीक करून पाण्यांत शिजवून, नंतर भिलावे चार व लसूण छटाक, कुचल्याच्या बिया चार, गजगा छटाक, बारीक करून एकत्र करून रात्रीं दाणा दिल्यावर पावशेरप्रमाणें, तीन दिवस मोठ्यास पावशेरप्रमाणें व धाकट्यास अर्ध पावशेरप्रमाणें खाण्यास द्यावें. अनुभविक आहे.

काळीं जिरें एक मूठभर, गाईचें तीन चार पित्तांत घालावीं, आणि रात्रभर ठेवावीं. सकाळीं एक मूठभर बच घेऊन सर्व एकत्र करून घोड्यास तीन दिवस द्यावीं. अनुभव आहे.

काळीं जिरें एक मूठभर, किंवा जास्ती नरमूत्रांत शिजवावीं. आणि फोडांवर लावावीं, गरम करून शेकावें. व कपडा बांधावा. अनुभव आहे.

अंबेहळद, येलबा ( बोळ ), कुचले दहा, भिलावे दोन, मैदा लकडी थोडी, काळा बोळ, काळीं जिरें एक मूठ, गजगाचा मगज

कांहीं,* मैदा गव्हाचा, रक्तबोळ, साबूण, हें सर्व लिंबाचे रसांत खलून ऊन करून फोडावर तीन दिवसपर्यंत लेप करावा. अनुभव आहे.

मागील पायास मोठी नस असते त्यावर फोड होतात, त्यापासून घोडा लंगडतो. त्यास पायी ह्मणतात. त्यास उपचार.—तीनधारी निवडुंग आणून त्याजला छेदन करावा ( मोळावा ). त्यांत बोळ कांहीं व गुग्गूळ, व हळद हें बारीक करून भरावें. आणि त्या निवडुंगास गव्हांच्या आल्यानें लपेटून तो निवडुंग भाजावा. भाजल्यावर काढून गव्हाची कणीक दूर करून निवडुंग फोडावर तीन दिवस बांधावा, रोज ताजें औषध करावें. अनुभव आहे.

तीळ दोन तोळे, व उंटाची लेंडी दोन तोळे, दोन्ही बारीक करून मग नरमूत्रांत शिजवून फोडांवर दररोज नवें बांधावें. लहान मोठे फोडांस उपचार—शेराचें कोंवळें लांकूड सालीसुद्धां आणावें. त्याजळा कपडमठ करावें, फुफाट्यांत भाजावें, कपडमठ काढल्यावर शेराची साल घेऊन पुन्हा शिजवून फोडांवर तीन दिवसपर्यंत बांधावी. अनुभव आहे.

दुसरा इलाज.—पिंपळाचे झाडाची अंतर साल, व मुळसरीची अंतर साल, पिठाप्रमाणें बारीक करून त्यांत नरमुत्र घालून शिजवावें, त्याची पट्टी रोज रोज नवी नवी करून फोडांवर बांधावी.

तिसरा इलाज.—कच्चे हरभरे कडब्याच्या पाल्यावर ठेवून फडक्यानें फोडांवर बांधावे. व त्यावर वरचेवर पाणी शिंपीत जावें. तिसरे दिवशीं पट्टी काढावी आणि नवी लावावी. नऊ दिवसपर्यंत करावें. अनुभव आहे. त्यावर मैदालकडी, अंबेहळद, रक्तबोळ, भिल्लावे, अजवान, काळीं मिरें, व अमरवेल, हीं सर्व बारीक करून तुपांत शिजवावीं, व त्याचा लेप फोडांवर करावा. अनुभव आहे.

दुसरा उपाय.—तूप. व पांढरें जिरें अर्धवट गरम करून चोळावें, आणि मिठाचें पाणी त्यावर टाकावें.

तिसरा उपाय.—कांहीं फुलें घेऊन त्याजबरोबर गव्हांचें पीठ अशीं खमिर करून पाण्यांत एकत्र करावीं. आणि कातरीनें त्या फोडांवरचे केश कातरून त्यावर लावावें.

---

## मरज सत्ताका.

मरज सत्ताका ह्मणजे घोड्याचे पायाचे बंद एक दुसऱ्यापासून दूर होणें. ही इजा बहुतकरून कठीण ठेंच लागल्यामुळें होते, आणि पायाचा चुरा चुरा होतो, व त्याजवर फोड होतात, आणि लंगडू लागतो. ही इजा फार वाईट आहे. याचा उपाय मागें ह्मणजे गंडमाळेंत लिहिला आहे.

घोड्याचे दोन्हीं पायांस जखम होते. त्याचा रंग पिंवळा असतो त्याजवर मलम लावावें तें.--

गेरू, शिरका, कडूवृंदावन, व बोर, हीं सर्व घेऊन फोडास फोडून त्यांत डुकराची चर्बी व शिरका व हे वरील जिन्नस यांचें मलम करून तें लावावें.

दुसरा इलाज.-द्राक्षाची दारू, व गुलजार शिजवून त्यांत शिरका टाकून चोळावें.

तिसरा उपाय.—घोड्याचे बंद किंवा हाडें दोन्हीं पायांचीं वाढतात, त्यास कांहीं इलाज नाहीं. परंतु त्याजवर डाग देतात ते चौफटीचा व ≋ आणि चंद्राकृतिप्रमाणें तकारिज ह्मणजे घोड्याच्या हाताचीं हाडें पुढें येतात, व बाहेरचे बाजूस किंवा आंतले बाजूस टांचेस त्यांचें दुःख होऊन त्यामुळें घोडा लंगडतो त्याजवर * केलेल्या खुणेसारखा डाग द्यावा.

---

## पाठीवरचे दर्दीवर.

पांठीवरच्या दर्दीचे तीन प्रकार आहेतः—

## पहिला प्रकार इजखीलाल.

पाठ सुस्त होते. पाठीचा कणा फाटतो. ही बेमारी कठिण आहे. चालते वेळेस घोडा ऊनवे व हावेकडे जाण्यास पहातो व पडतो. मग उठण्यास फार आयास होतात. त्याचे मणके फाटतात व सुस्त होतात. पाठीवर जफत याची पट्टी द्यावी. ती लांबवर मारावी. सात दिवसांनंतर पट्टी काढावी. ती जैतूनचे तेलानें काढावी. आणि दुसरी सात दिवस मारावी. नंतर बरें न होईल तर नुकता तेल पाठीवर घालावें. नुकता तेल पांढरें व काळें असतें. नुकता व जैतूनचें तेल बराबर घेऊन कढवावें. पट्टींत घालून पाठीवर सात दिवसपर्यंत लावावें, घोड्यास औषधाचे वेळेस हलूं देऊंनये. बरें न झालें तर डाग द्यावे.

---

## दुसरा प्रकार, रेहूस साहूस.

ही शरिरांत सर्दी होण्यापासून होते. घोडा जमिनीवर निजला तर उंठू सकत नाहीं. फार सक्तीनें उठतो. त्यावर इलाज.—

कोंबडीचीं दहा अंडीं, फुलाचें तेल, व नुकत्याचें तेल, तिन्ही सारखीं घेऊन घोड्याचे पाठीला चोळावें. गवत खाण्यास द्यावें. त्याचेवर जैतूनचें तेळ व लसूण कुटून मिळवून गुदद्वारांत नळीनें घालावें.

---

## तिसरा प्रकार, हरका.

पाय निसरल्यानें किंवा पडल्यानें दांत पडेल तर पाठीचे कण्यास इजा होते त्यावर इलाज.—

गाईचें तूप, जैतूनचेंतेल, सलगमचें तेल, लसूण, जिरें, मीठ, डुकराची चर्बी हें एकत्रकरून पाठीला लावावें.

---

## कुशींत दोन प्रकारची बेमारी.

एक आकब, हा जीन तंग बांधून होतो व त्यामुळें फोड होतात. आणि २ अकूर ह्मणजे बरगडी मोडते. त्याचें कारण उडी मारल्यानें व चोंट लागल्यानें. गोस्त (मांस) फुरदाड होतें, व आंत पू होतो, नंतर नासूर होतें, इलाज.—फोड कापावे, मीठ, पाणी कापडास लावून त्यावर चिकटवावें. बरा होईपर्यंत स्वारी करूंनये. लोणी किंवा सफेदा, कोंबडीचीं अंडीं कपड्यावर लावून बांधावीं.

अंजिर शिरका दारूंत भिजवून त्यांत थोडा भूस घालून कापडावर घालून जखमेवर बांधावें, पू झाला असेल तर चिरावें, धुवावें, मीठ व लसूण आंत भरावा, तीन दिवस राहूं द्यावें, नंतर चवथे दिवशीं नवीन करावें. नासूर झालें तर चिरावें व जंगली अस्सन व मीठ भरावें. हें नेहमीं करावें, बरें होईल.

दुसरा प्रकार.—सफेदा, अंडीं, चित्रक, इसबगोल, व निशास्ता हें सर्व मिळून चोळावें व त्याची पट्टी बांधावी.

**हाड मोडलें तर**—गोंद बतमचा, गोंद सनोबर झाडाचा, दरशक जंगली—अनार (डाळिंबाचे झाडाचें मूळ), काळा बोळ, कडूवृंदावन, अकामिया (मिरचीचें झाड), जांभळीचा गोंद, बोळ, सर्व बराबर घेऊन कढवावें व हरभऱ्याची आंब हड्डी मोडल्या ठिकाणीं लावावी, घोड्यास फिरवूंनये.

गोंद बुंद झाडाचा, गोंद सनोबर झाडाचा, गोंद दुतीचा, बोळ, अकामिया, जंगली डाळिंबाची मुळी, काळा बोळ, सर्व बराबर घेऊन पाण्यांत कढवून त्यावर लावावें.

---

## शेपटीस बेमारी होते त्यावर.

पहिला प्रकार—दूम मोडणें आणि दुसरा प्रकार त्यावर केंस येतात.

जंबिरियानें केस बांधावे. तिसरे दिवशीं खोलावें, नवें मांस येऊन मिळेल. याप्रमाणें पुन्हा बांधावें नाहीं तर दूम वांकडी होईल.

दुसरा प्रकार. घोडा दूम पाठीवर किंवा बाजूनें मारील तर वाईट खोड आहे.

वस्तऱ्यानें शेंपूट चिरावें, त्यांत मनुष्याची सुकलेली विष्ठा भरावी, रक्त बंद होईल. मलम लावावें. पूर्वी मलमें सांगितलीं आहेत.

केंस येण्यास उपाय.—शेपटीची शीर तीन अंगुळें कांपावी. मग त्यांत मीठ भरावें. बुराअरमणी यानें गरम पाण्याबरोबर धुवावें. आणि हिंग पाण्यांत किंवा शिरक्यांत लावावा. दुसरा इलाज-अयाळ, व कपाळावर केंस येतात, अंजीर शिरक्यांत भिजवावे त्याचा खमिर करावा, त्यावर बोळ व गुग्गूळ कपड्यावर लावून बांधावा.

---

## घोड्याची साधी बिमारी.

रहूलम फाशील ह्मणजे एकाच पुढचे हातावर फोड होतात त्यापासून घोडा पुकारतो. दुसरे दिवशीं दुसरे हातावर फोड होतात. पहिले जातात. घोडा पुकारा करितो. तिसरे दिवशीं उजवे पायावर होतात, घोडा फार पुकारतो. चवथे दिवशीं चवथे पायावर होतात. जागोजाग होतात. अजीर्णापासून होतात, दाणा खाण्यानें होतात. पायाचें रक्त काढावें व हाताचें काढावें; नंतर पाठीचें काढावें, नंतर पायावर डाग द्यावा. मेथी व मटर खाण्यास द्यावें. मेथी व अळशी बारीक करून शिरक्यांत खमीर करून पायावर लावावें.

दुसरा इलाज.–ज्वारीचें पीठ, बालूना, पुदीना व बाकला (वेलची) शिरक्यांत खमीर करून पायावर लावावें.

पायांत दर्द होते त्यावर—गवत खात नाहीं, सुस्त होतो व एक अंड लोंबतो त्यावर उपचार. कसरसारखा इलाज करावा. डाग देऊन चिक्कण तेल लावावें. डुकराची चर्बी, फटकी, सेगंज, जैतूनचे

तेलांत मिळवून लावावें. व पूर्वी सांगितलें आहे तें मलम लावावें. ताप येत असल्यामुळें किंवा कमी पाणी प्याल्यानें हात उचलून धरतो, चार पायांनीं उठूं शकत नाहीं. किंवा हवेच्या कारणानें बेमारी होते. रक्त काढावें. मेथी, अळशी, केशर, बरावर घेऊन शिरक्यांत खमीर करून हातापायांवर लावावें. नंतर ज्वारीचें पीठ, अळशी, व बाबूना, व बाकला बारीक करून मुलाचे मूत्रांत मिळवून पायांवर लावावें.

---

## खाण्याची व पाणी पिण्याची बेमारी होते.

ह्या बेमारीचे सहा प्रकार आहेत.

१ कण्हेरीचें झाड खाल्यानें, २ कोंबडीचा गू खाल्यानें, ३ सबजा खाल्यानें, ४ सुतेरा खाल्यानें, ५ पाण्यांतील माशी खाल्यानें, आणि ६ गाभणी उंटिणीचें दूध प्याल्यानें.

पहिला प्रकार.—जमिनीवर पडतो, लोळतो, तोंडांतून फेंस जातो, डोळे लाल होतात. व नाकांतून पाणी जातें, त्यावर उपचार.—

खजूर पाण्यांत गरम करून पाजावा. गाडगें घेऊन त्यांत मुनुका घालाव्या. पाणी घालून उकडावें. अर्ध पाणी राहिल्यावर पाजावें.

दुसरा प्रकार.—कण्हेरीचे झाडाची साल व शेंबाझाडाची साल काढा करून साखर घालून पाजावा.

तिसरा प्रकार.—कानावर व शरीरावर फोड होतात त्यास उपाय. शबचफळ आणून त्यांत बुराअरमणी घालून शिजवून नंतर पाजावें.

सुतेऱ्याबद्दल.—थुंका व घाम फार येतो, डोकें फिरवतो, हातपाय आपटतो. इलाज. घशाजवळचें रक्त काढावें, नाकांत बारांची दारू घालावी. किंवा गाईचे दुधाचा पनीर घालावा. दारू किसमिजची तीन रत्तल पाजावी. जवाबरोबर बुराअरमणी पाऱ्यांत घालून द्यावा.

**पाण्यांतील माशी**—घोड्याचे गुदावाटे ळिबा सारखे किडे निघ-तात किंवा रक्त पडतें, अंगावर फोड होतात. उपचार.—

खजूर व सवसन झाडाची मुळी घेऊन सहा रत्तल पाण्यांत उकडावी. अर्ध पाणी राहिल्यावर साखर घालावी. आणि दर-रोज दोन रत्तलप्रमाणें पाजावें.

उंटाचे दुधाबद्दल.—तोंडांतुन तांबडा फेंस पडतो त्यास. उंटाचें दूध अर्धा रत्तल द्यावें. त्यावर गाढवीचें दूध किंवा पांढऱ्या मिरच्या द्याव्या.

---

## औषधाचे इलाजानें जखमेवरचे कैंस जा-तात ते येण्यास औषध.

हस्तीदंत एक तोळा, मेण एक तोळा, बकरीची चर्बी तोळे दोन, राळ सहा मासे, डिकेमाली चार मासे, व तिळाचें तेल अतपाव. सर्व तव्यावर कढवावें. नंतर तें तेल तव्यावर घालावें, त्यानंतर लगेच चर्बी, मेण, राळ, डिकेमाली घालावी. कैंस गेले असतील तेथें तेल लावावें.

दुसरा इलाज.—चार करफष ( सरडे ) व जवखाईचें मूळ बारीक करून करडईचें तेलांत भाजून मिळवून कैंस गेले असतील तेथें लावावें. दोन रात्रींत कैंस येतील. सात दिवस लावावें.

दुसरा इलाज.—सहा मासे माशा तिळाचे तेलांत मिळवून दिव-सांतून दोन तीन वेळ चोळावें. याप्रमाणें दोन आठवडे करावें. अनुभव आहे.

वाघाची चर्बी, ससाची चर्बी, व सरड्याची चर्बी, सर्व एकत्र करून दोन तीन वेळ दिवसांतून चोळावें. अनुभव आहे. एक करफष (सरडा) जंगली, व बेडूक मोठा एक, तिळाचे तेलांत घालून लावावें. अनुभव आहे.

## मूत्रारोग.

मूत्र्यारोगाचे प्रकार तीन आहेत; एक रसमुत्रा, दुसरा मांसमुत्रा, आणि तिसरा हाड मुत्रा. हे तिन्ही मुत्रे झाले असतां अंगास तिडका येतात, मागील धड सुजतें, मागले पाय थरथर कांपतात. मांस मुत्रा झाला असतां तिडका होत नाहींत. पाय सुजतात. त्यास औषध.—नवसागर, मनसीळ, जयपाळ, मोरचूद, हरताळ, सोमल, चित्रक, सैंधव, संचळ, कांच, गंधबीद, व मीठ हीं सर्व औषधें प्रत्येकीं १ टांक वजन घेऊन चूर्ण करून त्यांत तेळ २ दोन शेर आणि निवडुंगाचा चीक ( देठ्याचा रस ) अर्धाशेर घेऊन मडक्यांत घालून कढवावें. हें तेल फुग्यास ( सुजेस ) लावावें. मग फुग्यांतून लस निघेल व चट्टा पडेल, त्यावर नरमूत्र आणि रानशेणीची राख एकत्रकरून लावावी. हें तेल जखमेस, खांड्डुकास, बेंडास, काचरू, हड्डी, जानवाशी, बगळीकशी, चावळी वगैरेस, लावलें असतां गुणावह पडेल.

सोमल, देवदार, आहळीव, कण्हेरीचीं फुलें, अगर मुळें, हीं प्रत्येक एकेक टांक घेऊन चूर्ण करून तेलांत घालून खलावें. मग पुढील पायाच्या डोळ्यावरचे केश भादरून त्यावर फांसणी टाकावी. वर हें तेल लावावें. आणि शेक द्यावा. असा क्रम तीन दिवस करावा. पाय सुजतील त्यावर दहींभात बांधावा. असें दोन दिवस करावें. मग वर पर्यळू ( माका ) ऊन करून एक सप्तक बांधावा. मग चट्टे पडतील, त्यांजवर नरमूत्र व रानशेणीची राख एकत्र खलून लावावी. पायास पाय घांसूं देऊंनये.

नाग एक टांक, व जयपाळ एक टांक घेऊन, चूर्ण करून लिंबाचे रसांत कालवून हें औषध मुत्र्यावरचे केश भादरून त्यावर फासावें; वर बिब्याचें तेल जिरवावें व वर शेक द्यावा. वर पुन्हा हें औषध लावावें. असा क्रम दोन दिवस ठेवावा. मग पर्यळू ( माका ) मनु-

ण्याचे मुतांत भिजत घालून, ऊन करून वर बांधावा, असें एक सप्तक करावें. नंतर नरमूत्र व रानशेणीची राख एकत्र करून वर लावावी.

डाळिंबासोमल, नागरक्तसिंग, हरताळ, जेपाळ, तांबडीं व पांढरीं कण्हेरीचीं फुलें, हीं एकेक टांक घेऊन चूर्ण करून तेलांत कालवावें. हें तेल फुग्यावर फासण्या टाकून वर लावावें. असा क्रम दोन दिवस करून मग नरमूत्रांत पर्यळूचा पाला घालून ऊन करून वर बांधावा. असा क्रम ७ दिवस करावा. नंतर त्यावर नरमूत्रांत रानशेणीची राख कालवून लावावी.

बिबे म्हशीचे मुतांत भिजत घालून त्याचें तेल काढावें, तें तेल पायास तीन दिवस लावावें. वर परळाचा पाला ऊन करून बांधावा. असा क्रम एक सप्तकपर्यंत करून मग नरमूत्र व रानशेणीची राख एकत्र करून लावावी.

मांसमुत्रा व वायुफुगा याजला औषध—काळाबोळ तीन टांक घेऊन लिंबाचे रसांत उगाळावा, आणि फुग्यावर त्याचा लेप द्यावा, वर परळाचा पाला ऊन करून तीन दिवस बांधावा, नंतर निवडुंगाच्या ( फांद्या ) आणून त्या मधोमध चिरून त्यांत मीठ, व हळद यांचें चूर्ण करून भरावें. ती कांडी वाटून ऊन करून ३ दिवस फुग्यावर बांधावी, फुगा फुटून बरा होईल, त्यावर राख व नरमूत्र एकत्र कालवून लावावें.

सर्व प्रकारचे मुत्र्यास औषध—सोमल, नाग, कोष्ट, आहाळीव, मीठ, मोरचूद, डोंगरमीठ, नवसागर, सुंठ, मिरें, गाजराचें बीं, व जवखार हीं प्रत्येक एकेक टांक प्रमाणें घेऊन चूर्ण करून घोड्याचे दांडीचा शेंडा एक बोटभर चिरून त्यांत हें औषध लिंबाचे रसांत कालवून भरावें, मग हळुहळु चोळावें. असा क्रम दोन दिवस करून मग दहींभात बांधावा. सर्व मुत्रे बरे होतील.

मांसमुत्रा व वायुफुगा यांजवर औषध--केरळ मुळाची साल,शेवग्या-च्या मुळीची साल,पिंपळमुळीची साल,व मोहाचीसाल यांचें चूर्ण करून पाण्याबरोबर वाटून फुग्यावर फासणी टाकून हें औषध ऊन करून लावावें.

सोमल, आहळीव, गंधक, जेपाळ, गुंज, व हरताळ, हीं समभाग घेऊन चूर्ण करून तिळाचे तेलांत कालवून फुगा अरीनें टोंचून हें तेल जिरवावें. असें दोन दिवस करून, कुकडे कांजळ फुग्यावर बांधावें. मग दहींभात बांधावा. असें दोन दिवस करून रानशेणीची राख नरमूत्रांत कालवून लावावी.

जमालगोटा, लिंबाचा रस, व एरंडेल, हे तिन्ही जिन्नस समभाग घेऊन, तांब्याचे परातींत घालून तांब्याचे भांड्यानें खुप घोटावे, आणि भरून ठेवावें, नंतर वस्तऱ्यानें मुत्र्यावरचे केंस काढून त्याजवर वरील औषधाच्या, दाभणानें तीन रेघा माराव्या व ह्याचाच दोन्ही पायांस लेप करावा, असें तीन दिवस करावें. पायासपाय लागूं देऊंनये, पाय चिरगुटांनीं निरानिराळे बांधावे.

आंकोल्याची मुळी, व बावंच्याचें बीं, हीं समसमान घेऊन त्यांत तेल घालून पातालयंत्रांतून तेल काढावें. नंतर वस्तऱ्यानें मुत्र्या वरचे केंस भादरून त्यावर एक ( नितल ) प्रमाण भोंक पाडावें. नंतर सदहू तेलाचा त्यावर लेप करावा. तीन दिवसांत सर्व मुत्रे बरे होतील. हेंच तेल जखम, व गजचर्म ह्या रोगांवरही फार उपयोगी आहे.

शिगरास मुतरे फुटतात त्यास उपचार---कांबिया सेंदूर, व मिरें, हें एकेक मासा घेऊन चूर्ण करून रुईचे चिकांत कालवून गोळ्या करून दररोज एक प्रमाणें एकसतक द्याव्या.

मुत्रा मागील पायावर व तंगडीवर होतो. ही इजा चवदा प्रकारची आहे:—

पहिला प्रकार—मुतरा बादीपासून ह्मणजे अजीर्णापासून होतो व त्यावर फोड येतात. त्यांतूनपू व पाणी पिंवळें निघतें, त्यावर इलाजः —जेपाळाचा मगज, लिंबाचा रस,व एरंडीचें तेल अतपाव मिळवावें, तीनचार दिवस दर्दावर लावावें. नंतर बकरीचें दूध एक शेर, गुग्गुळ अर्ध छटाक, व सुहागी अर्ध छटाक हें बारीक करून गोळ्या कराव्या व त्या सीत दिवस द्याव्या. किंवा चाळीस दिवस हें औषध द्यावें. रोज नवें औषध करावें. अनुभव आहे. त्यासमयीं घोड्यास बाजरी व सरम देऊंनये. कडबा व हरबरे द्यावे, व हिरवें गवत पाहिजे तर द्यावें. मुतऱ्यावरचे केंस काढावे जेपाळ एक तिळाचें तेलांत घालून लावावें. अगोदर शस्त्रानें त्याचें रक्त काढावें. नंतर औषध तीन दिवसपर्यंत लावावें. जखम ठणकूं लागेल तर तूप चोळावें. अनुभव आहे. मुरदाडसिंग बारीक करून अर्धाशेर काळा सज्जिखार घेऊन व पावशेर सुहागी भाजलेली बारीक करून दररोज सकाळीं एक मूठभर पाणी पिण्याचे वेळेस द्यावी. अनुभव आहे पाण्यांत ती पूड देणें. बुटासाहेब सवदागर यांणीं केलेला हा वरील इलाज अनुभविक आहे.

खुरासणी ओंवा एक शेर, सज्जिखार एक शेर, अंबेहळद, काळा पांढरा काथ अर्धाशेर, हरभऱ्याची भाजली दाळ एकशेर,व संख्या सोमल तोळे २ दोन, सर्व वस्तु बारीक करून तीन वेळ वस्त्रगाळ कराव्या, नंतर एकत्र करावें. सोमल त्यांत थोडा थोडा घालावा. सकाळीं छटाकाची गोळी करून दाणापाण्याचे पूर्वी अल्याचे रसांत द्यावी.

दुसरा इलाज—मनशीळ एक तोळा, अवळासार, गंधक एक तोळा, गुग्गुळ एक तोळा,व गव्हाची कणीक दोन तोळे, हीं सर्व बारीक करून दारूंत मिळवून आवळ्याचे बी येवढी गोळी करून रुईचें पान तव्यावर ठेवून सर्व गोळ्या त्यांत घालून शिजवाव्या. दररोज एकेक गोळी खाण्यास द्यावी. चांगली रीत आहे.

तिसरा इलाज.—मोहाचें बीं अतपाव, व चुना कळीचा अतपाव, बारिक करून साफ करावा. त्यांत मोहाचें बीं बारीक करून एकत्र करावें. नंतर त्याची भाकरी करावी. अर्धा भाग भाजावी व अर्धा भाग हिरवी ठेवावी. मग ती दर्दावर बांधावी. तीन दिवसांत बरें न झालें तर याप्रमाणेंच पुन्हा करावें.

चौथा इलाज.—लाल मिरच्याचें बीं तीन मासे, जंगळा तीन मासे, संख्या सोमल तीन मासे, जवखार तीन मासे, सुंठ तीन मासे, बचनाग तीन मासे, आवळा तीन मासे, व मीठ तीन मासे, हें बारीक करून लिंबाचे रसांत तीन दिवस खल करून लावण्याजोगें झाल्यावर घोड्याचे शेंपेचे केंस काढावें. मग त्याचें टोंक वांग्याप्रमाणें चिरावें, त्यांत औषध भरावें. दुसरे दिवशीं पट्टी काढावी. पुन्हा अशीच तीन दिवसपर्यंत पट्टी भरावी. चवथे दिवशीं सुके तांदूळ घेऊन त्यांत दहीं घालून जखमेंत भरावें ह्मणजे कसाही मुत्रा असल्यास बरा होईल.

शेराच्या पिकल्या डांग्या चार टांक, व लोणी अतपाव. नरमूत्रांत शेराच्या डांग्या शिजवाव्या व लोण्यांत सकाळीं व संध्याकाळीं खाण्यास द्याव्या. दररोज सदर्हूप्रमाणें चार दिवस करावें.

मनुष्याची कवटी, काळे तीळ चार पैसेभार, सज्जीखार चार पैसे भार, गूळ चार पैसेभार, सुहागी चार पैसेभार, व गाईचें शिंग चार पैसेभार, सर्व बारीक एकत्र करून मग एकवीस गोळ्या कराव्या. सकाळीं व संध्याकाळीं एकेक गोळी द्यावी. धंदी कमी करावी. पाणी एकवेळ ऊन देत जावें. अनुभविक आहे.

खारीक, मिरें एकवीस, व सज्जीखार अतवाव, हें सर्वरात्र पाण्यांत भिजवून ठेवावें. सकाळीं काढून पुसून त्यांतील बिया काढाव्या. त्यांत सज्जीखार भरून त्यावर कणीक लावून दर दिवशीं एक भाजून देत जावी. एकवीस दिवसांनीं बरें होईल. अनुभव आहे.

मनुष्याचे डोक्याची जळालेली कवटी, भाजलेली तेलिया सुहागी पावशेर, गोमूत्र छटाक, व सज्जीखार अतपाव हें सर्व बारीक करून गोमूत्रांत घालून रात्रीस ठेवावें,सकाळींच काढून दोन किंवा चार पैसे-भाराची एक गोळी करून रात्रीं खाण्यास द्यावी. अनुभव आहे.

लोहारी मीठ, व कांहीं सुहागी, कांहीं नरमूत्रांत शिजवून त्यावर तें सात दिवसपर्यंत लावावें.

दुसरा इलाज.—सुंठ पंधरा टांक, बच दोन टांक, हळद दोन टांक, पिंपळी मोठी दोन टांक, पिंपळमूळ दोन टांक, राई छटाक, लसूण छटाक, हें सर्व बारीक करून दह्यांत किंवा ताकांत घालून सात दिवस घोड्यास द्यावें. अनुभव आहे.

कवटी तरसाची व एक मनुष्याचीही बारीक करून वस्त्रगाळ करावी. पिंपळमूळ अकरा पैसेभार शिजवून बारीक करावें. ही तिन्ही औषधें व तीन वर्षांचा जुना गूळ मिळवून मग एकवीस गोळ्या कराव्या. सकाळीं दररोज एक गोळी द्यावी. पाणी दोन वेळ पिण्यास द्यावें. वर सांगितला गूळ अकरा पैसेभार असावा. अनुभव आहे.

---

## दुसरे प्रकारचा मूत्रा. पाण्यापासून मागील पायास होतो तो.

त्यांतून पिंवळें पाणी निघतें, ह्मणोन त्याजला अंबीमूत्रा ह्मणतात. त्याजवर इलाज.—संख्या सोमल मुगाचे दाण्याएवढा घ्यावा. कापसांत घालून गोळी करावी. जेथें मूत्रा झाला असेल तेथें कांपून नंतर दर्दाचे जागीं एक दिवस बांधावें. हें औषध केल्यानें एक दिवसांत बरें होईल. कदाचित् न झालें तर पुन्हा तसेंच करावें. तांदूळ शिजवावे, दहीं त्यांत मिळवून तीन दिवस दर्दाचे ठिकाणीं बांधावें. चवथे दिवशीं मुत्रा अपोआप निघून येईल, नाहीं तर शस्त्रानें कांपून त्याजवर पुढील मलम लावावें.—

मलम.—तिळाचें तेल दहा पैसेभार, शेंदूर अतपाव, व कापूर एक पैसाभार. तिळाचें तेल लोखंडाचें भांड्यांत शिजवावें. त्यांत शेंदूर घालावा. पुन्हा त्याचप्रमाणें करावें. फेंस काढून टाकावा. चुलीवरून उतरून थंड करावें. नंतर कापुर व मेण हें त्यांत टाकावें, मग मलमपट्टी करावी. अनुभव आहे.

जंगली खबुतराचा गू पावशेर, इंद्रजव पावशेर, अफू तीन तोळे, टाकणखार सहा तोळे, काळीं मिरें पावशेर, हळद छटाक, फटकी छटाक, गंध गोळी होईपर्यंत घ्यावा. सर्व बारीक करून मधांत एकत्र करून सहा गोळ्या कराव्या. दररोज सकाळीं एक गोळी द्यावी. दिवसास पाणी गरम एक वेळ द्यावें. घोड्यापासून चाकरी दोन तास घ्यावी. सात दिवस दाणा देऊं नये.

दुसरा इलाज.—बच पावशेर, छालीया सुपारी भाजली पावशेर, अंबेहळद पावशेर, मनुष्याची कवटी भाजलेली, व सुहाबीज पावशेर हें सर्व बारीक करून दररोज सकाळीं पावशेर औषध द्यावें. अनुभवीक आहे.

मूत्र्यास शस्त्रानें कांपावें, काळे धोतऱ्याचीं पानें, व सेंदेलोण, दोन्ही एकत्र करून जेथें कांपलें असेल तेथें बांधावें. चार दिवसांनीं पट्टी काढावी. याचप्रमाणें अशी पट्टी चार वेळ करावी. अनुभव आहे.

निवडुंग तीनधारी आणून बारीक करावा. कांगोळी एक शेर, गाईचे तुपांत एकवीस दिवस द्यावी. त्याजवर हरभरे व कुळीथ देऊं नये. मूग, ज्वारी, आटा, व तांदूळ द्यावे. जखम रोज पहावी. अतिशय नरम होऊन फायदा नसेल तर दाणा, ज्वारी व मूग बंद करून टाकावें. म्हशीचें किंवा गाईचें दूध मिळालें तर पिण्यास द्यावें. अनुभव आहे.

सुहागी, हिराकस, काळीं मिरें, गुग्गुळ, कोष्टकोळिंजन, सुंठ, सतव, व

अंबेहळद. हिराकस व सुहागी भाजून बाकीचीं औषधें बारीक करून वस्त्रगाळ करावीं. व मग सर्व भाजून एकत्र करावें. त्याचे एकवीस हिस्से करावे. ताजफळत्यांत एक हिस्सा घालून दाण्याचे नंतर त्यास खाण्यास द्यावें. मग एक घडी झाल्यावर पाल्हेर तूप दिवसा पिण्यास द्यावें. अनुभव आहे.

पारा एक तोळा, मोगरा, व विड्याचीं पिकलीं पानें शंभर. वस्तऱ्यानें कें‍स काढून मोगरा चोळावा. नंतर पानसुपारीप्रमाणें पानें खाण्यास द्यावीं पारा व घोड्याची विडा खाल्लेली लाळ एकत्र करून दर्दावर चोळावी. एक तास मालीस करावें. अनुभव आहे.

तांब्याचा गंज एक तोळा, अवळ्या गंधक दोन तोळे, व सेंदेलोण दोन तोळे, हें सर्व बारीक करून लिंबाचे रसांत भिजवून तीन दिवस ठेवावें. पुढें खलावें. त्याची गोळी करून दर्दावर तीन दिवसपर्यंत बांधावी. नंतर रुईचे झाडाची राख, व तेलिया सुहागी भाजलेली या दोन्हीच्या गोळ्या पाण्यांत करून घोड्यास खाण्यास तीन दिवस पर्यंत द्याव्या. अनुभव आहे.

लेप करावा तो.—गंधक व लाल पापडखार कांहीं पाण्यांत घालून एकत्र करून दर्दावर लावून त्यावर कळीचा चुना चोळावा. अनुभव आहे.

दुसरा इलाज.—जंगला दहा पैसेभार, जवखार चार पैसेभार, तेलिया सुहागी कच्ची दोन पैसेभार, बारीक करून अल्याचें रसांत मिळवावें. सहा टांकप्रमाणें गोळी करावी. सकाळीं गोळी द्यावी. अनुभव आहे.

नवसागर पावशेर, सुहागी पावशेर, सज्जीखार पावशेर, फटकी पावशेर, काळीं मिरें पावशेर, कुटकी पावशेर, मनुष्याचे डोकीचें हाड

बारीक व वस्त्रगाळ करून सर्व एकत्र करावें. दोन पैसेभार सकाळीं खाण्यास द्यावें व रात्रीसही दोन पैसेभार द्यावें. अनुभव आहे.

दुसरा इलाज.—पाणी शिळें पंधरा टांक, तिळाचें तेल पंधरा टांक. पाणी व तेल एकत्र करावें. नंतर त्यांत सज्जीखार पंधरा टांक घालावा. मग घोड्यास पाजावें. फार जुना मुत्रा असल्यास जाईल. हा दवा पंधरा टांक घोड्यास खाण्यास द्यावें. अनुभव आहे.

नरमूत्र एक शेर, बनखटाई पावशेर, डोरली, व खाण्याचें मीठ चार पैसेभार, हें सर्व एकत्र करून शिजवावें. नंतर मीठ घालून पुन्हा शिजवावें. मुत्र्यावर चोळावें. नंतर खाण्यास हिरडे बोळ हिरवे शिजवून देणें. अनुभव आहे.

---

## तिसरे प्रकारचा मुत्रा.

घोड्याचें रक्त वाईट होतें व पिवळें पाणी वाहूं लागतें, व वायू होणें या तिघांपासून मूत्रा होतो. त्याजवर इलाज नाहीं. लाच्यारीमुळें * याप्रमाणें डाग देतात.

दुसरा प्रकार मुत्र्यास.—घोड्याच्या पायाचें हाड जोडापासून पुढें येतें व चक्रीप्रमाणें होतें. वर सांगितल्याप्रमाणें लेप करावा. बरें न होईल तर * याप्रमाणें डाग द्यावा.

अंबेहळद, सोहागी, चुना कळीचा व सज्जीखार, सर्व बारीक करून रुईचे चिकांत एकत्र करून दर्दावर लावितात. अनुभव आहे.

दुसरा इलाज.—जवाचा आटा, शेराचे चिकांत भिजवून भाकर करून अर्धीकच्ची भाजावी. तीन दिवस बांधावी. अनुभव आहे.

सुहागी भाजलेली एक पैसाभार, व मनुष्याची कवटी, बारीक वस्त्रगाळ करावी. ती पूड चार पैसेभार व चारपैसे भार सुहागी एकूण आठ पैसेभार, ज्वारीचे पिठांत घालून सात दिवस घोड्यास खाण्यास देणें. अनुभव आहे.

चपटा ह्मणजे घोड्याचे हात पाय बंदाचे जोडाजवळ पुढें येतात. त्याजवर उपचार.—

शेराच्या डिंगऱ्या एक मुठी किंवा दोनमुठी, त्याला कपडमठ करावें, विस्तवांत गरम करावें. नंतर त्याचे तुकडे बारीक करून रात्रीस दर्दावर बांधावें. सकाळीं काढून टाकावें. पुन्हा दुसरे दिवशीं त्याप्रमाणेंच करावें. येणेंप्रमाणें तीन दिवस करावें. अनुभव आहे.

दुसरा इलाज.—पारा एक तोळा, संख्या सोमल एक तोळा, शिंगरूफ एक तोळा, हरताळ तोळा, बचनाग तोळा, जंगला तोळा, सुहागी तोळा, अफू एक तोळा, व पांढरी साखर एक तोळा, सर्व बारीक करून अल्याचें रसांत वाटाण्या एवढ्या मोठ्या गोळ्या करून मग रात्रीं दाणा दिल्यावर एक गोळी घोड्यास खाण्यास ज्वारीचे पिठांत द्यावी. व सकाळींही याप्रमाणें द्यावी. दोन आठवडे सदहू औषध द्यावें. अनुभव आहे. घोड्यास खुराख मात्र जास्त देत जावा.

रुईचे झाडाचा चीक त्यांत गव्हांचें पीठ एकत्र करावें. टाकणखार चार तोळे, बारीक करून रुईचे चिकांत घालून त्याची भाकरी करून भाजावी व ती दर्दावर बांधावी. याप्रमाणें तीन दिवस दररोज एक एक बांधावी. नाहीं तर मलम लावावें तें—

एरंड्याचें बीं, हळद, पांढरा काथ, व तीळ हीं बारीक करून खांडकाळीचे रसांत एकत्र करावें, नंतर जखम गरम पाण्यानें धुऊन हें मलम लावावें. अनुभव आहे.

तिसरा इलाज.—तिळाचें तेल, गाईचें तूप, एरंड्याचें तेल, एका अंड्यांतील पांढरा मगज व हळद दोन पैसेभार, हें सर्व एकत्र करून चपट्यावरचे केंस काढून सदहू औषधाचें माळीस करावें.

चौथा इलाज.—उंटाची फांसोळी विस्तवावर ऊन करावी. व तिणें दिवसांतून तीन वेळ दर्दास शेकावें.

पांचवा इलाज.—चपट व फोड होतात. त्यांजवर भिलाव्याचें ते-

लषा लेप करावा. व त्याजवर कळीचा नवा चुना लावून शेकावें. अनुभव आहे.

शेराचा चीक, व मीठ खाण्याचें, दोन्ही एकत्र करून दर्दावर बांधावें. याप्रमाणें तीन दिवसपर्यंत करावें.

लोहोचा जंग, व सुहागी, बारीक करून जखमेवर चोळावी. नंतर डाग द्यावा. तो* याप्रमाणें एक डाग द्यावा.

सुंठ किंवा अलें, धमासा, व पिंपळमूळ हें सर्व गुळांत किंवा साखरेबरोबर द्यावें. बच, रुईचें झाडाच्या मुळ्या, शेंदूर, व मीठ, या सर्वांस बारीक करून दर्दावर चोळावें.

रुईचे झाडाचा चीक, शेंदूर, व तूप ताजें, तिन्ही बराबर घेऊन त्यांत मिळवून लेप करावा.

अंबेहळद भाजलेली, व नवा चुना, एकत्र करून लेप करावा.

मर्जेहड्डा याचें हाड जागेपासून बंदाजवळ निघून येतें. त्याचा आरंभ खालीं व वरतीं आंतून होतो. त्यावर डाग द्यावा. चपत्यावर सांगितलेले इलाज यालाही लागू पडतात.

सख्या सोमल एक तोळा, व कवठफळ सुमारें तीन. कवठांत सोमल ठेवून कपडबंद करावें, नंतर शिजवावें. त्यांपैकीं तीन मासे सोमल घेऊन घोड्याचें शेपूट चिरून त्यांत भरावा व कपड्यानें बांधावा. तीन दिवस पट्टी राहूं द्यावी, चवथे दिवशीं काढावी बरें न झालें तर याप्रमाणें आणखी करावें.

---

## चवथा प्रकार बाजर हड्डी.

याचें हाड नारंगीप्रमाणें होतें त्यावर इलाज.—

हिंगणबेट पावशेर, व मुळे छटाक, दोन्हीं बारीक करून त्यावर तीन दिवसपर्यंत बांधावें व त्यावर नरमूत्र दिवसांतून तीन चार वेळ घालीत जावें.

दुसरा इलाज.—भिलावे पांच, साबूण एक पैसाभार, लसूण छ-टाक, व नवा चुना छटाक,सर्व बारीक करून एकत्र करावें. वस्तऱ्यानें केंस काढून त्यावर तीन दिवसपर्यंत बांधावें.

इलाज ३ रा.—कांहीं मेण, व मुळे, बारीक करून व मेण ऊन करून त्यांत मुळ्याचा कीस कालवून तीन दिवसपर्यंत दर्दावर बांधावें. यास बेरहडींही ह्मणतात. त्यावर डाग देणें. अनुभविक आहे. डाग ⚞ येणेंप्रमाणें द्यावा. घोडा लंगडत असल्यास वरील डागापासून लंगडत नाहींसा होतो.

---

## पांचवा प्रकार मुसळी.

मुसळी मागील पायास होते. त्याचे फोड कठीण होतात. त्याचें कारण एक ठिकाणीं फार दिवस बांधल्यानें, अजीर्णानें व रक्त नास-ल्यानें फोड येतात. त्यास इलाज.—

मेण अर्धशेर, खोडबच (वेखंड) अर्धशेर व छरें अर्धशेर.प्रथम मेण कढवावें व खोडबच याजला बारीक करून त्यांत घालावें. नंतर छरें घालून लौकर ऊन करून घ्यावें. छरें गरम होऊं देऊं नये. तिन्ही जि-न्नस कपड्यावर घालून पांच दिवस लेप करावा.

मैदालकडी एक टांक, एक पैसाभार अलमगिरी, गहूं तीन पैसेभार भाजलेले, सज्जिखार एक पैसाभार भाजलेला, हळद भाजली एक पैसाभार, गुग्गुळ एक पैसाभार भाजला, माल-कांगोणी एक पैसाभार भाजलेली, कुलथी एक पैसाभार भाजकी, मेंडफळ एक पैसाभार भाजलेलें, व साबूण भाजलेला एक पैसाभार, सर्वांस बारीक करून पाण्यांत घालून कढवावें. मुसळीवर लेप करावा. त्यावर एरंडीचीं पानें चार पांच बांधावीं.

मसालाही खाण्यास द्यावा तो—कुटकी, पिंपळपानें, पिंपळमूळ, वावडिंग, किरायत, सुहागी तेलीया भाजली, मुरूडफळ, काळींजिरें व

मिरें बाळहिरडे, मोठे हिरडे, पळसपापडी, अकलकरा, सुंठ, राई, जायफळ जंगली, अंबेहळद, गुग्गूळ, धने, सुंठ, सुऱ्हांचें बीं, काळी मुसळी, पांढरी मुसळी, दालचिनी, कबाबचिनी, बचनाग, अवळा, सोनामुखी, डिकेमाली, सुकलेली खारीक, गज्गा, तेजबल, लवंग जंगली, तरवडाचें बीं, इंद्रावणीचें फळ, हिंगण झाडाची साल, बेल झाडाची साल, मालकांगोणीचा रस, कापूर एक तोळा, भिलावे, साबूण, कोचकोईरीचें बीं एक तोळा, कोष्टकोळंजन, अंवळासारंगधक, इंद्रजव, लाल मिरच्या, सज्जिखार, अमलतासाचा मगज ह्मणजे साल, अंबरवेल, बोळ, गुळवेल, सुकलेली अजवान, तीन प्रकारचे दुसरे अजवान, रिंगणीचें झाड पानासुद्धां, संभाळूचीं पानें दोन मुठी सुकलेलीं, रुईचीं पानें पिकलीं, हिंग, काळेंमीठ, शेंधलोण, बांगडीखार खोडबच, मीठ सांबरी, काळाबोळ, मध अर्धाशेर, कायफळ, लसूण अर्धाशेर, हळद, अफू दोन तोळे, कांदे, गूळ तीन वर्षांचा जुना दोनशेर, संख्यासोमल दोन तोळे, काथ पावशेर, हें तीन दिवस अल्याचे रसांत खलावें. गेरू, नागरमोथे, अजमोदा, ठसूचें फूल, गुलनार, गुलाबकळी, कितरा झाडाचा गोंद, बाभळीचा गोंद, एरंडीचें तेल, व शिरसाचें तेल पावशेर, चोक दोन तोळे, अजमोदा, कासनी, अस्कंद, नागोरी, सोरा, फटकी, अहाळिवाचें बीं, कुचला, चित्रकमूळ, मोहाचे झाडाची साल पावशेर, शिरसाच्या झाडाचें बीं छटाक, काळ्या टाकळीचीं पानें, नरकचूर, शिंगरूफ तोळे दोन २, जंगला भाजलेला एक तोळा, लिंबाचा रस दोनशेर, गुंदन झाडाचीं पानें पावशेर, मेंडफळें २ दोन, गाईचें पित्तांतील पाणी सर्व औषध भिजे इतकें, चरंजु अतपाव, जवखार दारू दोन शेर पिण्याची, गजगा झाडाचीं पानें दोन मुठी, द्राक्षाचा शिरला, बामझाडासुद्धां चार मुठी, हीं सर्व बारिक चूर्णाप्रमाणें करावीं. सोमल, शिंगरूफ, जंगला, व सुहागी, यांचा पांढरे काथांत

आणि अल्याचे रसांत खल करावा. तीन दिवसानंतर अतपावप्रमाणें नेहमीं औषध द्यावें. सर्व भिरनिराळें बारीक करून जीं झाडाचीं नांवें दिलीं आहेत त्यांचे रसांत कालवून दुसरे दिवशीं त्यास शेजण्या झाडाचे रसांत भिजवावें. मग सर्व दिवसभर राहूं द्यावें. तिसरे दिवशीं द्राक्षाचे शिरक्यांत भिजवून एकरात्र ठेवून नंतर दारूंत मळावें. नंतर पावशेरप्रमाणें गोळी करून मोठे घोड्यास पावशेराची याप्रमाणें गोळ्या करून एक गोळी दाणा देण्यापूर्वी सात दिवस किंवा दोन आठवडे द्यावी. सर्व प्रकारचे रोग निघून जातील. अनुभव आहे.

---

### सहावा प्रकार दुलदपाय खुलदपाय.

मांड्यांचे ठिकाणीं वायूपासून रक्त निघतें. तेणेंकरून घोड्यास अंडापर्यंत ह्मणजे अंड व शिश्न यांवर फोड होतात. सूज येते, हे फोड घोड्याचे हतास ह्मणजे पुढले पायास होतात. त्यापासून घोडा मरतो, त्यावर इलाज.

खुलपाका.—पासून मैला काढून विस्तवानें शेकावें. तीन दिवस याप्रमाणें करावें. कांहीं लोक हा उपचार फिलपाक व खुलंद याजवर करितात. कुचला, भिलावे व हळद यांचें गंध करावें. हीं तिन्हीं गंधाप्रमाणें शिस्तवार लेप करून विटेनें किंवा बाटलीनें शेकावें.

---

### सातवा प्रकार सांधेजोड.

बंदसया हें एक हाड आहे; तें मांडीपाशीं हुक्याप्रमाणें दिसतें. घोड्याचा पाय सरला तर असें होतें. त्यावर लेप फार मजबूत करावा व शेकावें. कांहीं लोक तोबरा घेऊन त्याचे आंत गवत भरून घोड्याचे दोन्ही मांड्यांत देऊन रशीनें गुंडाळून नंतर घोड्याचे पायास रशीनें ओढावें, हाड जागचे जागीं बसतें. मग त्या-

वर लेप लावावा. विस्तवानें शेकावें. नाहीं तर डाग द्यावा दोन हप्तेपर्यंत चाकरी थोडी घेतात.

---

## आठवा प्रकार.

अकला, यापासून घोडा लंगडतो, मांडीचे आंतील रगा मुरडतात, त्यास रक्त काढावें. नंतर एकमेकाचे समोर असे. तीन डाग द्यावे. जैतूनचें तेल लावावें. कांहीं लोक घोड्यांचे मांडीजवळ रक्त काढतात व त्यावर शेराचा चीक लावतात. शेराचा चीक, गोंद, गुग्गुळ, हिंग, पास्तीन, कबूतर, अंबर, नटबेर, व अळें बरावर घेऊन बारीक करून जैतूनचे तेलांत जुनी फटकी टाकून चोळावें.

---

## नववा प्रकार.

नववा प्रकार—मुसळीप्रमाणें इलाज करावा.

---

## सिम्टोम्याटीक ताप.

छाती सुजून ज्वर येतो, हा ज्वर घोडा फार गरम ठेविला, किंवा अधिक खाणें घातलें, आणि सवयीपेक्षां ज्यास्ती स्वारी करून अगर गाडीस जुंपून फार चालविला तर असा ताप येतो. घोड्याचे शरीरांतील आंतडीं सुजतात व आकर्षण होतात, नंतर ज्वर येतो. डोळे सुजतात, आणि भूक लागत नाहीं, फार जोरानें ढांसतो. याप्रमाणें चिन्हें होतात. जर घोडेवाल्याला घोडा कसा ठेवावा हें माहित नाहीं तर अशा घोडेवाल्याकडून अशी चूक होऊन घोड्यास ज्वर येतो. या ज्वरापासून केव्हां केव्हां घोड्याचे डोळेही जातात, पाय सुजतात, पोटांत रोग होतात. साधारण ज्वर आला असतां जीं चिन्हें होतात तींही या ज्वरांत होतात. परंतु थंडी वाजून येत नाहीं. श्वास लवकर टाकीत नाहीं.

पाय व कान थंड होतात. छाती सुजते, डोळे व तोंड पिवळें होतें, लघवी नारिंगाप्रमाणें तांबूस व पिवळट होते.

पुटेरताप—सर्द्दू दोन ज्वराप्रमाणें प्रथम ज्वर दिसून येतो. परंतु यापासून घोडा फार अशक्त होऊन त्याच्या नाकांतून घाण पाणी वाहतें, भूक नसते, घोड्यांस हा ज्वर जलद लागू होतो, ढाळ बंद होतात, आंतडीं तुटतात, या जातीचा ज्वर दुसऱ्यास लवकर लागतो. व हा रोग झाला असतां घोडा फार करून वांचत नाहीं. यावर औषध—कारबानेट ऑफ आमेनिया अर्धा ड्राम, पौडरबार्क अर्धा औंस, जवसाचा मगज आणि पाणी गोळी करण्यापुरतें हें औषध दिवसांतून तीन चार वेळ द्यावें. ढाळ राहण्याकरितां बीर दारू द्यावी. फार ढाळ होऊं लागले तर पोर्टवाईन तांदुळाचे भातांत द्यावी.

ढाळ होणारा ज्वर आहे, त्यास एकाएकीं औषध देऊन बंद करूं नये. परंतु फार दिवस तसें चालूं देऊं नये. जवसाचा कोंढा, व गमआर्बिक पाण्यांत द्यावा. एकाएकी ढाळ बंद होत नाहींत. लीद थोडी पडते. येरंडेल देऊन एंब्रोकेशन पोटास घांसावें ह्मणजे विकृति बरी होईल. यापासून गुण आला नाहीं तर अफूचेंपाणी दोन ड्राम पावशेर कांजींत घालून पिचकारी मारावी.

---

## पायाचे दर्दावरून ताप.

अनेक कारणानें होतो. फार श्रम दिल्यानें, सर्दीपासून, सुजेपासून, जोरानें बसल्यामुळें, उन्हाळ्या दिवसांत गाडीस फार चालविल्यामुळें, कठीण रस्त्यावर चालविल्यामुळें, सुंमाची त्वचा पडल्यानें, चारी पाय हालावून चळवळ करितो, नाडी जलद चालतें, मागील पायांवर ओझें ठेवितो, फार झालें तर खालीं पडतो. मग उठूं शकत नाहीं, पाय वळून घेतां येत नाहींत,

पाय व हात गरम होतात व शिरा दिसूं लागतात. त्यावर उपाय—रक्त काढावें. नंतर नाल बसवावे, पाय भिजवून ठेवावे. ह्मणजे थंडीच्या योगानें पाय मऊ होतात व सूज उतरते. बर्फ लाविलें असतांही उपयोगी आहे. फार सूज असेल तर बर्फ लावावें किंवा पोटीस लावावें, अथवा जुलाब द्यावा. क्यालोमेल दिवसास व रात्रीस द्यावें.. इतकें होऊन बरें न होईलतर रक्त काढावें.

---

## ज्वरांविषयीं.

ज्वर आठ प्रकारचे आहेत. त्याचें लक्षण व त्यावर उपचार खालीं लिहिल्याप्रमाणें.—

### १ संताज्वर.

तोंडास दुर्गंधि सुटते, टाळू जळते, अंगास कळा लागतात, अंगास मुंग्या येतात, अंगाची आग होते, त्याजवर उपचार-केळीचा कंद, केतकीची साल, जांभळीची साल, व उंबराची साल, हीं औषधें समभाग घेऊन, चूर्ण करावें. आणि ह्मशीचें दूध १ शेर किंवा २ शेर घेऊन त्यांत चूर्ण घालून द्यावें. असें तीन दिवस करावें. अगर एक किंवा दोन आठवडेपर्यंत द्यावें.

केतकीचें पान केतकीचे सालीचे ठिकाणीं योजलें तरी चालेल. तसेंच जांभळीचे सालीचे ऐवजीं केळीचा कंद घातला असतां उपयोग होईल.

---

### २ मन्मथज्वर.

वळू घोड्यास बहुत दिवस घोडी संगम न मिळाल्यामुळें हा ज्वर उत्पन्न होतो. येणेंकरून मूत्र थोडें थोडें वरचेवर होतें. आणि अंगास घाम येतो, त्याजवर उपचार—जिरें व तांदुळाचें पीठ चारशेर घेऊन ५ शेर दुधांत घालून आटवावें. नंतर तें गुळाबरोबर ७ दिवस

द्यावें. किंवा त्यांत पावशेर साखर घालून ३ दिवस द्यावें. दररोज तीन चार शेर दूध पाजावें.

---

## ३ अढळज्वर

सर्वकाळ अंग तप्त असतें. गवत थोडें थोडें खातो, व कधीं खात नाहीं. अगदीं रोड होतो, त्यास उपचार—तांबड्या राळ्याचें पीठ अर्धशेर, व कांटेसावरीची साल अर्धशेरप्रमाणें प्रत्येक घेऊन पाण्यांत घालून चतुर्थांश काढा करावा. त्यांत गाईचें दूध घालून पाहिल्या दिवशीं द्यावा. मग टाकळीचा पाला एकशेर आणून पाणी पांचशेर घालून त्याचा रस काढावा. त्यांत त्रिकटु चूर्ण पावशेर घालून, विस्तवावर ठेवून दोन शेर उरेपर्यंत आटवावें. हें औषध तुपाबरोबर तीन दिवस द्यावें. नंतर निर्गुंडीचा पाला, व वारुळाची माती एकत्र वाटून त्याचा लेप घोड्याचे अंगास करावा. किंवा कांगोणी, सोनकाव, तेल्या टाकणखार, व साबूण, हीं औषधें निर्गुंडीचे रसांत कालवून ऊन करून अगोदर घोड्याचे अंगास तिळाचे तेलाचा लेप करून नंतर ह्या औषधाचा लेप करावा.

---

## ४ द्वंद्वज्वर.

घोडा वाटेनें जातांनां उभा राहतो, कधीं खातो, कधीं खात नाहीं स्तब्ध राहतो, अंग थंड होतें, वृषणास घाम येतो, व दोन्ही अंग थंड होतात, त्यास उपचार—समुळी पत्रिका, काकजंघा (काकफळ) भुईनिंब, गोखरूमूळ, गूळवेल, सुंठ, रिंगणी, द्राक्षें, व भुईकोहळा हीं सर्व औषधें प्रत्येक पावशेरप्रमाणें घेऊन, त्याचा काढा अष्टमांश करून, थंड झाल्यावर त्यांत मध दोन शेर घालावा, आणि तीन दिवस द्यावा.

निवळीच्या बियांचे आंतील बीज, पित्तपापडा, सुंठ, रि

गणी, व काडेचिराईत, हीं प्रत्येक एक मूठप्रमाणें घेऊन ८ आठ शेर पाण्यांत घालून कढवावीं, तो थंड झाल्यावर त्यांत ४॥ टांक मध घालून ३ दिवसपर्यंत दिला असतां ज्वर जाईल. आणि हिंग दोन टांक, व सुंठ दोन टांक, हिंगुळाचे पाण्यांत कालवून नाकांत नस्य घालावें.

---

### ५ श्लेष्मज्वर.

अंगांत ताप असून नाकांतून शेंबा वाहतो, डोळ्यांतून पाणी गळतें. त्यास उपचार–पद्मकंद, सुंठ, भुईकोहळे, व देवदार, हीं प्रत्येक पावशेर घेऊन काढा चतुर्थांश उरवावा. त्यांत पर्यळू ( माका ) घालून दोन्ही वेळ द्यावा. किंवा हें सर्व औषध एक पलप्रमाणें घेऊन १ शेर पाणी घालून चतुर्थांश काढा उरवावा. त्यांत दोन टांक पिंपळी घालून तीन दिवस द्यावा.

---

### ६. क्षीणज्वर (सुकाज्वर).

घोड्यास लंघन पडून फारच क्षीण होतो, श्वासोच्छ्वास अकतो, जमीनीवर निजतो, फोड येतात, अंग झाडतो, शेपटी हालते, तोंडांत फोड येतात, व त्यांतून पाणी गळतें. पाण्याची फारच तहान लागते, डोळ्यांतून पाणी गळतें, त्यांस उपचार–बेलाचीं मुळें, सराटीमूळ, व द्राक्षमूळ, हीं प्रत्येक पावशेर घेऊन त्याचा काढा करून गुळांत सात दिवस द्यावा.

मालकांगोणी, पांढरे गुंजेचें मूळ, शेवतीचें मूळ, भुईकोहळा, सराटीमूळ, द्राक्षमूळ, व माईणमूळ, हीं सर्व समभाग घेऊन आठ शेर पाण्यांत घालून काढा चतुर्थांश उरवावा. त्यांत गूळ एक शेर मिळवून ३ दिवस द्यावा.

गुळाचे ऐवजी नाबदी साखर ९ तोळे प्रतिदिवशीं घालावी.

### ७. वातज्वर.

सर्वांगास गाठीं उठतात.—वाळलेली लीद करितो, त्याजवर उपचार—पहाडमूळ, नेड, कोष्ठ, पित्तपापडा, कुड्याची साल, एरंडमूळ, व शेवग्याचे मुळीची साल, हीं प्रत्येक नऊ टांक घेऊन, चारशेर पाण्यांत घालून काढा करून चतुर्थांश उरवावा व त्यांत पिंपळीची पूड अथवा निर्गुडी घालून द्यावा.

कोष्ठ, एरंडमूळ, शेवग्याचे मुळीची साल, बेहेडेदळ, व हिंगणाची साळ, हीं एकत्र करून चारशेर पाण्यांत काढा करून दोनशेर उरवावा. त्यांत पिंपळीची पूड २ टांक घालून द्यावा. तीन दिवसांत ज्वर जाईल.

---

### ८. लंघनज्वर.

घोडा गांवोंगांव फिरत असतां एक दोन उपवास पडतात, त्यामुळें हा ज्वर उत्पन्न होतो. भुकेमुळें थंडी वाजल्याप्रमाणें थरथर कांपतो, त्यास उपचार—पत्री, लवंग, जेष्ठमध, हीं प्रत्येक ००। पावशेर प्रमाणें घेऊन एकत्र पूड करून तीन दिवस द्यावी.

कंकोळ, लवंग, व जेष्ठमध, एकमूठप्रमाणें घेऊन एकत्र पूड करून तीन दिवस द्यावी.

---

### घोड्यास साधारण ताप येतो त्यास उपचार.

हा ताप थंडीपासून होतो. तो समजण्याचीं चिन्हें होतात, तीं येणेंप्रमाणें.—थंडीनें अंगास कांटा येतो, क्षुधा मंद होते, हुषारी कमी होते, नाडी जलद चालते, एक पाय थंड व तीन पाय उष्ण असतात. किंवा उलट असतें ह्मणजे तीन पाय थंड आणि एक पाय उष्ण असतो, जीभ उष्ण आणि कोरडी असते. लघवी थोडी होते व तीही कष्टानें होते, तिचा रंग पिंवळट असतो. श्वास नित्यापेक्षां

ज्यास्ती चालतो. घोडा थोडा किंवा फार ढांसतो, रक्त काढल्यावांचून जितक्या कृति करतां येतील तितक्या अल्प रीतीनें कराव्या परंतु जर नाडी जलद असेल आणि दुसरीं चिन्हें भारी असतील तर तीन-पाव रक्त काढावें.—अमेटिकबॉलचें ढाळक द्यावें, परंतु पोट-शूळ होण्यापूर्वी जर तितका अवकाश नसेल तर एरंडेल तेल चांगलेंच द्यावें. झाडा साफ झाल्यावर खालीं लिहिल्याप्रमाणें तापाचा दवा दिवसांतून २ वेळ द्यावा. लघवी साफ होऊन पूर्वीप्रमाणें होईपर्यंत थोडेंथोडें औषध कमी करीत जावें. औषध द्यावयाचें तें येणेंप्रमाणें.—पौंडर ऑफ नाइट्री १ एक औंस, क्यांफर २ ड्राम, व टारटेराईस अंटी-मोनी २ ड्राम, हीं एकत्र करून दिवसांतून तीन वेळ द्यावें. पाणी ऊन पाजावें. दाणा देऊं नये, भुसा द्यावा. तबेला थंड ठेवावा. कपडे नेहमींपेक्षां ज्यास्ती गरम ठेवावे. पाय थंड असतील तर ब्यांडीज करावें, जेव्हां हवा ६९ डिग्री असेल आणि थंड नसेल व ताप निघाला असेल तर बाहेर फिरवीत जावा. व दाणा थोडथोडा देत जाऊन पूर्वीच्या बेतावर आणावा. दुसरा ज्वर—डोळे तांबडे होतात, सुस्ती येते (घोडा निद्राळू होतो), नाकपुड्या तांबड्या होतात, नाकांतून पाणी वहातें, नंतर शेंबूड होतो, तो पाणी पिऊं लागला ह्मणजे गळूं लागतो, तेणेंकरून घोड्यास पाणी पितां येत नाहीं, श्वास टाकितां येत नाहीं, गळा सुजतो, पाणीसुद्धां गिळवत नाहीं, वरचेवर खोकला जोरानें येतो, तेणेंकरून घोड्यास फार दुःख होते. पायांनीं टापा मारितो, दिवसें दिवस घोडा अशक्त होतो, कांहीं दिवसांनीं उभा राहूंही शकत नाहीं, पाय सुजतात, १ मिनिटांत ६९ ठोके नाडीचे बसतात, ही स्थिती फार दिवस राहत नाहीं, दहा दिवसांत बरा होईल किंवा मरेल. हा रोग दुसऱ्यास लागतो. कालऱ्याप्रमाणें स्पर्शजन्यरोग आहे. छाती सुजते किंवा वाईट ज्वर होतो, तेसमयीं वरील चिन्हें दिसण्यांत येत नाहींत. नाडी फार जलद चालते,

नाकांतून शेंबूड फार पडतो, नाकपुडी फिक्कट होते, खोकला येतो, गळा दुखत असतो, भूक लागत नाहीं, तत्रापि खाण्यावांचून राहवत नाहीं. असें चिन्ह झालें असतां रक्त काढणें जरूर आहे तर १ शेराच्या आंत काढावें. रक्त काढणें तें रोगाचें पूर्वरूप असल्यास काढावें. ढाळकाची गोळी द्यावी. व पिचकारी मारावी.

जुलाब झाल्यावर तापाचें मिक्श्चर द्यावें व घोडा फार अशक्त झाला असेल तर पौष्टिक औषध द्यावें. केव्हां केव्हां पोर्टवाईन व बीर दारू पिण्यास द्यावी.

---

## घोड्याचे खांद्यावर जखम होते त्यास.

डुकराचे किंवा चित्त्याचे चावण्यानें झालेली जखम. चित्त्याची जखम थंड पाण्यानें धुवावी. घोड्यास जखम फार झाली असेल तर घोडा मरेल. जखम धुतल्यावर कुत्र्याचें डोकें जाळून जखमेवर लावावें.

धोत्र्याचीं पानें, व त्यांत खाण्याचें मीठ घालून कुटून जखमेवर लावावें. जखम फार झाली तर हातानें आंतील सर्व काढून औषध तीन चार दिवस त्यांत भरावें. जखम पक्क झाली तर लोखंड तापवून डाग द्यावा.व त्यावर खालीं लिहिलेलें मलम लावावें:—

आंबेहळद ८८८९ टांक, व सज्जीखार१८ड्राम, दोन्हीं बारीक करून जखमेवर लावावीं. ह्मणजे मुरदाड मांस जाईल. दांतवण, व जैपाळाचीं पानें घेऊन वाळवावीं. मग पाण्यांत शिजवावीं. तीं बारीक करून लेपाप्रमाणें जखमेवर लावावीं.

---

## घोड्यास नाळ पडली तर त्यावर.

बाभळीची साल घेऊन त्यांत पाणी घालून गरम करावी. त्यांत काथ घालून पाजावी. व त्याच पाण्यानें जखम धुवावी. जुना चुना घेऊन कापडांत लावावा.

तुरीची दाळ तव्यावर जाळून त्याची राख करावी. व त्यांत तेल घालून त्याची पट्टी लावावी.

जुनी चिंच जखमेपुरती घ्यावी. ती बारीक करून त्यांत नरमूत्र घालूनकढवावी व जखमेवर तीन दिवस लांवावी. बकरीची किंवा उंटाची, किंवा म्हशीची किंवा कुत्र्याची हडी जाळून जखमेवर लावावी, दहा पंधरा दिवस असें करावें.

पाठीवरचे जखमेंतून पिंवळें पाणी जातें त्याजवर—जखम वस्तऱ्यानें फाडावी, मुरदाड मांस काढावें. बिबवे शंभर दोनशें, कापूस ह्मणजे रुई, मेण, चिंच मूठभर, हळद छटाक, व बकऱ्याचे कर्डीची चर्बी बारीक करून पट्टी लावावी. खोगीर जपून घालावें. दहा पंधरा दिवस असें करावें ह्मणजे नवें मांस येईल.

मलम करणें तें पाठीवर किंवा कोठें जखम झाली असेल त्यावर लावणें. मलम खालीं लिहिल्याप्रमाणें—

शंखजिरें तोळा १, मुरदाडसिंग तोळा १, पारा तोळा १, डिकेमाली तोळा १, काथ तोळा १, व बाभळीची साल तोळे २, सर्व कुटून लोण्यांत मिळवावी. गुडगुडीच्या पाण्यानें जखम धुऊन मलम लावावें.

दुसरें मलम—सोरा एक तोळा,मीठ १तोळा जंगला६ सहा मासे, धोत्र्याचीं पानें मूठभर, बारीक करून च्यार दिवस बांधावें.

सज्जीखार व हळद, बारीक करून अल्याचे रसांत मिळवून पट्टी लावावी.

सरडा जंगली एक आणून मडक्यांत घालून त्यावर नरमूत्र घालून तीन दिवस जमीनींत पुरून ठेवावें. नंतर काढून कडू तेलांत कढवावें आणि जखमेवर लावावें.

मेण, काथ, अंब्याची साल, चर्बी, सुपारीची ह्मणजे पोफळाची साल, चिंचेची साल, मुरदाडसिंग, शंखजिरें, बाभळीची साल, अ-

घाडा, व कापूर, हीं सर्व बारीक करून, व मेण चर्बी कढवावी आणि त्यांत सदहू वर सांगितलेल्या जिनसांची पूड घालून ती खलावी. व कांहीं दिवस जखमेवर लावावी.

मेण तोळा १, साबण तोळा १॥, व ऊद, पैकीं ऊद बारीक करून कढईंत घालून तिन्ही औषधें कढवून ठेवावीं, आणि निवाली म्हणजे नाळीस लावावीं.

---

## घोडा विस्तवानें भाजला तर अंगावर फोड उठतात, व अंगावरील कातडें जळतें, त्यावर उपचार.

पाणी आणि मीठ अंगास चोळावें, नंतर शाई टाकावी. हळद, कापूर, सफेता, व दाळिंबाचे फळाची साल जाळून बारीक करावी. त्यांत गुलाबपाणी घालून अंगास लावावें.

शेंदूर, व तिळाचें तेल एकठिकाणीं करून पिसानें लावावें.

सफेता, व मुरदाडासिंग, हीं दोन्ही बारीक करून गुलाबाचे पाण्यांत कालवून अंगास लावावीं.

रक्तचंदन, कापूर, सफेता, व मुदराडसिंग, सर्व बारीक करून तिळाचे तेलांत कालवून अंगास लावावें.

केंस जाळून त्याची राख, चंदन, सिप्या, व कण्हेरीचे झाडाची साल जाळून मुलाचे मुतांत कालवून अंगास लावावें.

---

## घोड्यास दुसऱ्या जनावरांनीं केलेल्या जखमेवर उपाय.

घोड्यास जर चित्ताजनावरानें जखम केली तर ती पिंवळी होते. व त्या जखमेंतून पिंवळें पाणी निघतें. रक्त लाल होतें, रक्तांत मांजराचे डोळ्याप्रमाणें चमक होते, थंडपाण्यानें धुवावें. नंतर बेडकुळी घेऊन चिरून त्यावर बांधावी व नाळीच्या औषधांत सांगितलेलें

मलमं ऊन करून चोळावें.

घोड्यास जर वाघानें जखम केली तर मीठ व मासळ्या कुटाव्या, पांढरीं जिरें त्यांत मिळवावीं आणि जखमेवर बांधावीं. म्हणजे विष निघून जाईल. नंतर मुरदाडसिंग व शंकजिरें बारीक करून जखमेवर चोळावें.

घोड्यास जर डुकरानें जखम केली तर—ती जखम मिठाच्या पाण्यानें धुवावी. नंतर चांगली माती भरावी. दुसरे दिवशीं माती निघून गेल्यावर त्यांत शिरका घालावा.

तीर व तरवारीचे जखमेवर उपाय—सुतानें जखम शिवावी. रक्त वहात असेल तर औषध घालून बंद करावें, नंतर शिवावें. स्पंज जाळून बारीक करावें आणि जखमेवर चोळावें म्हणजे रक्त बंद होईल. तीन दिवसानंतर पिवळें पाणी निघेल तेव्हां धुऊन टाकावें. आणि स्पंज जाळून भुकटी घालावी.

घोड्याचे अंगांत तीर गेला असेल व तो निघत नसेल तर आसपासचें मांस कांपून टाकावें. नंतर रक्त बंद करण्याचें वर लिहिलें आहे त्याप्रमाणें तीन दिवस करावें. व वर लिहिल्याप्रमाणें मलम लावावें व जखम धूत जावी.

मेण, कापूर, बचनाग, अजवान, खुरासनी दोन तोळे, व तिळाचें तेल, १ तोळाप्रमाणें पहिल्या चार जिनसा घ्याव्या व तेल आठ तोळे घेऊन, त्यांत सदरहू जिन्नस बारीक करून कढवावे.

---

## जखमेंत किडे झाले तर उपाय.

कापूर, चिंचेचा रस, मीठ खाण्याचें, हिंग, तपकीर, चुना, व डिकेमाली, चिंचेच्या रसांत कढवून कीड पडलेल्या ठिकाणीं बांधून पट्टी बांधावी. गहूं शिजवून गरम गरम वर बांधावे. म्हणजे कीड मरेल.

चुना, तंबाखू, डिकेमाली, व मीठ, हिंग सारखे वजन करून घेऊन बारीक करावे व जखमेंत भरावे.

## शरीराचे रोग प्रकार सात.

१ दबाकबदिया.—काळजाजवळ मोठाले फोड होतात.

२ एरकान.—अगर ( पिळा. ) घोड्याचें शरीर पिवळें होतें.

३ ताप.—प्रसिद्ध असून वर त्याचें विवेचन करण्यांत आलेंच आहे.

४ हैजा.—किंवा ( कालरा ) अजीर्णापासून होतो.

५ शिल.—घोडा दुबळा होतो.

६ खिनाने सुष्क.—घोड्याचें सर्व शरीर सुकतें व दुबळा होतो.

७ खिनानतिर.—सर्व शरीरास फोड होतात.

पहिला प्रकार.—दबाकबदिया. घोडा डोकें जमीनीस लावतो. असें घडीघडी करतो, सारावेळ पुकारतो, घाम निघतो, डोळे खोल जातात. तंगाजवळच्या दोन्ही शिरांचें रक्त पुष्कळ काढावें. रेवाचिनी गुलाबपाण्याबराबर पिण्यास द्यावी, खाण्यास गवत घालूंनये. दुसरे दिवशीं हिरवी हरियाळी पाण्याजवळ होते ती व हिरव्या खरबुजाचें पाणी द्यावें. त्याचे नाकांत गुलाबपाणी घालीत जावें.

दुसरा प्रकार एरकान—खोकल्यापासून होतो. सर्व शरीर व कान पांढरे; आणि डोळे व तोंड पिवळें होतें. रक्तही पिवळें निघतें. हा रोग काळजाजवळ गरमी झाल्यानें होतो. इलाज करावा तो येणेंप्रमाणें.—शरीर काळें पांढरें झाल्यास डोळ्याखालील रक्त काढावें. ताळूजवळचेंही रक्त काढावें. नाकांत औषध घालावें. गुलाब, कापूर, नबशाचें तेल व लाल फूल हें घालावें. पाण्याजवळ हरीयाळ होतो त्याचा रस व खरबुजाचा व वेळूचे पानाचा रस पाजावा.

इलाज.—मेंदी, रक्तचंदन, काकडीचें बीं, बरोबर घेऊन पाण्यांत पाजावें. सर्व वजन एकवीस रती असावें.

तिसरा प्रकार. ताप.—घोडा सुस्त होतो, डोळे लाल होतात. शरीर गरम होतें, अंड खालीं उतरतात, ओंठ सुकतात व गवत खात नाहीं.

इलाज.—मागल्या दोन शिरांचें रक्त काढावें. अजमोदा व अळशी बराबर घेऊन घोड्यास पाजावें. *गंधान व दारू, खारकें बराबर द्यावी.

दुसरा इलाज.—हिरवी अळशी घेऊन अजमोद्याचें बीं गंधाना बराबर घेऊन बारीक करावें. समुद्रांचें ( मिठाचें ) पाणी घालून कढवावें, बच फशाचे तेलाबरावर द्यावें. अनुभव आहे.

तिसरा इलाज.—गरमीचे तापावर, थंड औषध द्यावें. धने सुकलेले, पांढरें जिरें, सफेद तालीमखाना, सुंठ, वावडिंग, आणि अडुळशाचीं पानें, या सर्वांस बारीक करून कढवावें व मधाबरोबर दोन किंवा तीन दिवस द्यावें. अनुभव आहे.

तोंडांतून थुंका जाईल व तोंड उघडील तर खडीसाखर खाण्यास द्यावी. अनुभव आहे.

डिंक केथराचा अतपाव, तालीमखाना छटाक व पांढरी साखर छटाक, डिंक सारेरात्र भिजत ठेवावा. मग गोंद व तालीमखाना यांत साखर घालून खाण्यास तीन दिवसपर्यंत द्यावें. अनुभव आहे.

घोड्याचे शिंगरास मातीपासून किंवा गरमीपासून ताप येतो. त्यावर लोणी सवापैसाभार, अफू दोन पैसेभार, शेराचीं पानें, व काळे धोत्र्याचीं पानें दोन तीन. अफू व लोणी मिळवून तीन दिवसपर्यंत खाण्यास द्यावें. अनुभव आहे.

दुसरा इलाज.—घोड्यास गरमीपासून ताप येतो त्यावर.

खाण्याचें अजवान अतपाव, भांग तीन मासे, व तिळाचें तेल चार पैसेभार दोन्ही घालून शिजवावें. नंतर बारीक करून अतपावप्रमाणें ज्वारीचे पिठांत तीन दिवसपर्यंत द्यावें. अनुभव आहे.

तापावर इलाज.—अंब्याचे झाडाची अंतरसाल अतपाव, पांढरा काथ एक तोळा, गुग्गुळ एक तोळा, व चुना कळीचा तीन मासे, हें सर्व बारीक करून पाण्यांत भिजवून दहीं मिळेल तर चांगलें,

सर्वांचा रस काढून काथ मिळवावा. नळीनें घोड्यास पाजावें. अनुभव आहे.

गरमीचे तापावर.—कुंगई झाडाचीं पानें मूठभर, व कवठीचे झाडाचीं पानें मूठभर, बारीक करून लोणी अतपाव घेऊन व खडीसाखर एक पैसाभार घालून एकत्र करून एक घोड्यास किंवा दोन घोड्यांस खाण्यास द्यावें. घोडा बरा होईल.

तापावर—एका कच्चे डाळिंबाची साल, व एक जायफळ, दोन्हीं पोकळ करावीं. तीन मासे अफू जायफळांत भरावी. शहाजिरें तीन मासे, अर्ध जिरें डाळिंबांत भरावें. नंतर जायफळ डाळिंबांत घालावें. अर्ध शहाजिरें राहिलें तें जायफळावर ठेवावें. मग गव्हाचे पिठानें डाळिंब कपडबंद करावें. शिजविल्यावर डाळिंब पिसावें ( बारीक करावें ) आणि चवदा गोळ्या कराव्या. व गाईचे लोण्यांत चौदा दिवस घोड्यास द्याव्या. लोणी न मिळेल तर चक्का दह्यांत द्यावें. अनुभव आहे.

तापावर गरमीपासून शूळ होतो त्यावर.—जंगली बोर, कलोंजी, सफेत जिरें, धने, तालीमखाना, अवळकांठी, मुगाठी, वावडिंग, सेवतीचें फूल, बोरांच्या बियांचा मगज, निलुफराचें फूल, खिरपाचें बीं, पित्तपापडा, काळीमिरें, मिरच्या, बडिशेफ, मनुका, व कांकडीचें बीं, हीं सर्व एकत्र करून वस्त्रगाळ करून पहिले दिवशीं अर्धाशेर द्यावें. किंवा सगळें द्यावें. तें अर्धाशेर साखर व पाण्याबराबर द्यावें. अनुभव आहे.

रक्तपित्तावर उपचार.—सर्व शरीर सुखतें, प्रकृती गरम होते, पायावरचे केंस चमकतात, फोड होतात, घोडा तोंड खालीं करतो, त्यावर इलाज नाहीं परंतु एक आहे.—

सर्व शरीरास चोपड करावी, व मालीस करावें. सुका घांस व दाणा देऊं नये. दशमूळ पंधराशेर पाण्यांत कढवावें, दोनशेर पाणी राहिल्यावर थंड करावें, तें पाजावें, बरें होईल.

दुसरा प्रकार.—घोडा वरून पडल्यापासून होतो. सफर फार करून आला असला तर किंवा सांचलें पाणी पिण्यापासून होतो. रोज रोज घोडा दुबळा होतो, मोठें पोट होतें, केंस चमकतात, त्व-लाखी जाते, तोंड लाल किंवा पिंवळें होतें, छाती उडते, शरीर गरम होतें, दाणा वगैरे फार खातो, खोकला होतो.

उपचार.—एरंडीचें तेल, चित्रकसाल, हिरडे, बाळहिरडे, व अ-मळा पांच पांच टांक घेऊन वस्त्रगाळ करावें. पिण्याचे दारूंत सकाळीं द्यावें. त्यावर गुळाची दारू पिण्यास द्यावी. अनुभव आहे.

दुसरा इलाज.—पित्तपापडा, मिरच्या, सहा सहा पैसेभार व वेळूचीं पानें नऊ पैसेभार घेऊन बारीक करून सकाळीं व संध्याकाळीं द्यावें. लाल मिरच्या, व तव शीरखस (वाळा), प्रत्येक ६ पैसेभार घेऊन अर्धाशेर बकरीचें दूध घालून गरम करून पाजावें. एकशेर लाख, चारशेर तिळाचे तेलांत कढवावी, व ती अंगास लावावी. घोड्याच्या मांडीचें रक्त काढावें, बकरीचें किंवा हर्णाचें हिरवें, किंवा डुकराचें कोणतें तरी मांस दोन-शेर घेऊन नऊ टांक लाल मिरच्या कालवून व चारशेर मध, मासांत घालून शिजवावें व सकाळीं खाण्यास द्यावें.

चवथा प्रकार, हैजा—पोटांतून उलटी होते तेव्हां रक्त काढावें. तें तंगाजवळच्या दोन्हीं बाजूंचें काढावें. बोराअरमणी पाजावी. उ-लटी बंद होईल. नाकांत दारू व बोराअरमनी घालावी.

खारीक कच्ची, व गुलनार, बारीक करून पाजावें. चिकंदर किंवा अंजिराचें पाणी पिण्यास द्यावें.

दुसरा इलाज.—सोरा तीन मासे बारीक करून दाण्यांत किंवा भुश्यांत द्यावा.

उलटीवर इलाज न केला तर घोडा मरतो. आजवान आठराटां-क, लिंबें पंचवीस, सज्जीखार पांढरा आठरा पैसेभार, हिंग एक टांक,

अवळासा गंधक पांचटांक, पांढरेंजिरें आठरा टांक व पिंपळमूळ नऊ पैसे भार, लिंबाचे रसांत घालावें व घोड्यास पाजावें. चारी पायांचें रक्त काढावें, व वरचें औषध सात दिव द्यावें.

फोड झाले तर बच, चिंच, हिरडे, एकशेर. कच्चे ह्मणजे पिकलेले नसावेत. बाळहिरडे एक शेर पाण्यांत कढवून तिळाचें तेल एक शेर तूप गरम करून त्यांत घालावें. नंतर नळींत घालून पाजावें. अनुभव आहे.

---

## घोडा चावत असल्यास इलाज.

सोरा कलमी वजन चाळीसभार बारीक करून पावशेर ज्वारीचे आल्यांत मिळवावें. पाणी देते वेळेस सर्व त्यांत घालून पाजावें, एकदां पाजल्यानें नीट झालें तर पुन्हां देऊं नये, गरीब न झाला तर तीन दिवस दररोज तेंच द्यावें. अनुभव आहे.

---

## घोडा खच्ची करणें.

खच्ची करण्याचे चार प्रकार आहेत.—

पहिला प्रकार.—हा फार उत्तम आणि सहन होणारा आहे. पाठीवर उताणा घोड्यास पाडून दोन पाय सुताचे किंवा सुंभाचे दोरीनें बांधावे. त्याचे अंड काढणीनें बांधावे, अंड चिरावे. ते कापण्याचे हत्यारानें काढावे. पडद्यापर्यंत चिरावें. हें चिरण्याचें शस्त्र खजुराचे झाडाच्या फांदीचें करितात. जखम लवकर बरी होते. चिरल्यानंतर त्यावर फटकी टाकावी. ह्मणजे रक्त फार जात नाहीं ( फटकी बांधावी ). रक्त बंद झाल्यावर फटकी बांधलेली पट्टी काढावी. आणि अंड्यास तेल वगैरे चिकणाई करावी. जैतूनचें तेल, मीठ व लसूण नंतर घोड्यास चोळावा. चालवितात त्या वेळेस रक्त निघालें तर दोरीनें शिरा बांधाव्या. रक्त बंद न झालें तर घोडा जाया होतो. रक्त बंद झालें तर घोडा बरा होतो.

दुसरा इलाज.—घोड्यास पाठीवर पाडावें. पाय व हात बांधावे, अंडास चिंधी बांधावी, त्यांतून अंडाच्या बिया निघून येतील असें फाडावें. किंवा खजूरीच्या शस्त्रानें कापावें, फटकी टाकावी, सर्व नखमेस आंत बाहेर चिकुणाई करावी. वर लिहिल्याप्रमाणें जैतूनचें तेल, मीठ, व लसूण लावावें. यास जुबारित ह्मणतात.

तिसरा प्रकार.—अंड कुटावे. प्रथम घोड्यास पाठीवर पाडावें. अंडाची रग धरावी. आणि बोटांनीं ओढावी लांकूड असतें त्यांणीं अंड ठेचावे. त्याजला मिसकास अफरंजी ह्मणतात. हें बैलासही याप्रमाणेंच करितात.

चवथा प्रकार.—अंड चिरून बी काढतात. रगा धरून बांधून ठेवितात. वर लिहिल्याप्रमाणें जैतूनचें तेल व मीठ लावितात. लसूणही लावितात. हवा लागूं देऊं नये. हा प्रकार कठीण आहे व बरा होणें कठीण आहे. बकरी व बैल यांजला फार इजा होत नाहीं कांहीं लोक अंडांस मालिस करितात.

दुसरी रीत हिंदू लोकांची—जर घोडा फार हरामी किंवा स्वारी करूं देत नाहीं. चावण्यास धांवतो, तर त्यास खच्ची केला ह्मणजे गरीब होतो. जमीनिवर घोड्यास पाडावें, चार पाय रशीनें मजबूत बांधावे व मजबूद रशीनें दोन्ही अंड चामड्याचे दोरीनें बांधावे, एक मनुष्यानें चोपड्याचे जवळ धरून ठेवावें, मनुष्यानीं तूप किंवा लोणी व थोडी हळद बारीक करून लोण्यांत एकत्र करावी, तें चार पांच मनुष्यांनीं त्याचे अंडास मालिस करावें, त्याच्या रगा अगदीं ढिल्या कराव्या. परंतु एक किंवा दोन तास चोळावें, नंतर दोन लांकडाचे चिमट्यांत अन्ड धरावें, किंवा सुतळीनें बांधावें, आणि घोड्यास तीन दिवस फिरवावें, सर्व दिवस थंड पाणी त्याजवर टाकीत जावें. याप्रमाणें तीन दिवस करावें, पुढें चिमटा काढावा, पुढें सहा दिवस फिरवावें, त्यावर महिनाभरपर्यंत

स्वारी करूं नये. असें केल्यानें घोडा गरीब होईल, अशी रीतिं हिंदुस्थान व दक्षण या देशचे लोक फार करितात. यांत घोड्यास इजा होत नाहीं. अनुभव आहे.

खचि करते वेळेस अंडाच्या शिरा किंवा कान, नाक, मान, या ठिकाणचें रक्त काढल्यावर बंद न होईल, तर त्यावर उपाय.—कापसाचा तुकडा रक्त जातें तेथें ठेवावा. बंद होईल. दुसरें औषध, हिरडे, बाळहिर्डे, अमला, अजमोदा, अजवान, नेपतीचे झाडाची डाहाळी, बोळ, शेंदेलोण, व राई, हें सर्व एकत्र करून बारीक करावें, साखर व पाणी किंवा गरम दुधांत सात दिवस द्यावें. रक्त बंद होतें.

कांहीं चुना, व अंड्याची सफेदी दोन्ही एकत्र करावीं. रक्त निघते वेळेस तेथें लावावें. त्या वेळेस रक्त बंद होईल. अनुभव आहे.

दुसरा प्रकार.—सुतेऱ्याचीं जाळीं, रक्त निघत असेल तेथें लावावीं, त्याच वेळेस रक्त बंद होईल. अनुभव आहे.

घोडा हरामखोर असतो, गरीब होत नाहीं त्यास उपाय.—अंबट लिंबू याचें बीं एक पैसाभार, राजहंस, काथ पांढरा एक पैसाभार, कितराचा गोंद एक पैसाभार, कापूर छटाक, केळ्याचे कंद, चार पैसेभार, निंबाचीं पान दोन पैसेभार, व निळंबु एक तोळा, हें सर्व बारीक करून थंड पाण्यांत दररोज सकाळीं एकवेळ सर्व द्यावें. याचप्रमाणें तीन किंवा सात दिवस करावें. घोडा गरीब होईल. अनुभव आहे.

दुसरी रीत.—गरमी असेल तर काथ पांढरा दोन तोळे, कितरा गोंद दोन तोळे, निलवडी दोन तोळे, कापूर दोन तोळे, फटकी दोन तोळे, अंबट लिंबाचें बीं छटाक, लिंबाचीं पानें छटाक, शेवाळ छटाक, कापूर तोळे दोन, गोंदणी झाडाचीं पानें, धने एक तोळा, कोरफडीचा मगज छटाक, तवाशित एक तोळा, भांग एक बोळा, कंगई झाडाचीं पानें दोन तोळे, पित्तपापडा एक तोळा,

सुपारीचें फूल एक तोळा, नागरमोथे, एकतोळा, वाळा एक तोळा, गुलखैरचें फूल, फटकी एक तोळा, जिरें पांढरें एक तोळा, धमासा एक तोळा, तालिमखाना एक तोळा, अमळा एक तोळा, मुळहाटी एक तोळा, बोराचें बी तोळा, गुलेसेवतीचें फूल सहापासे, काकडी-चें बी एक तोळा, निलूफरचें फूल एक तोळा, खिऱ्याचें बी एक तोळा, केळीचा कंद एक तोळा, सर्व बारीक करून मडक्यांत ठेवावें. मग सर्व रात्र दहिवरांत ठेवावें. चवथा हिस्सा सकाळीं घोड्यास द्यावा. दुसरे वेळेस एक हिस्सा, तिसरे वेळेस दोन भाग. घोडा गरीब होईल. अनुभव आहे. हें सात दिवसपर्यंत द्यावें, एका दिवसांत तीन वेळ द्यावें, अन्डावर, अन्डाचे शिवणीवर, व शेपटीवर डाग द्यावे.

साप चावला तर घोड्याचे दांत पडतात. हातपाय दुखतात. मुखांतून घाण येते. त्यावर उपचार—मिरची वीस टांक, घेऊन बारीक करून पिण्याचे दारूंत नाकांत घालावी. साप चावला तर तोंड बंद होतें. जीभ हिरवी होते. वाळतो. यावर उपाय नाहीं. हिरवी झाली नसेल तर उपाय करावा. तो येणेंप्रमाणें-सांध्यावर थंड पाणी घालावें. केंस अंगावर उभे न राहिले तर घोडा दुरुस्त होईल. जेथें साप चावला असेल तेथील केंस शस्त्रांनीं काढून टाकावे. रक्त काढावें, शीर काढण्याची असेल तर काढावी.

तेल, मीठ, शहाजिरें, मिरच्या, बेल, व सागाचें पाणी सुमारानें घेऊन घोड्यास पाजावें. लिंबाचा पाला तेलांत खाण्यास द्यावा.

गांधीण माशी तोंडावर, डोळ्यावर किंवा गुद व शिश्नावर चावली तर त्यास उपाय—जैपाळाची बी, शिरक्यांत उगाळून लावावी आणि कांद्याचा रस शिरक्यांत लावावा.

पिसाळलेला कुत्रा चावला तर त्यावर उपाय—कारलें, कडू वृंदा-

वन, गंजना कोई, कुटकी, पाषाणभेद, नाबरोर झाडाचा गोंद, कांदा, व मिरची एक सारखें बरोबर घेऊन त्यामध्यें गुलाबपाणी ४ चार टांक घालून तें घोड्यास पाजावें.

बोळ, गोंद वारखीं, गोंद तरसीत, तूत, डाळिबाचीं मुळें हें सर्व शिरक्यांत कुटून पाजावें, व चावलेल्या ठिकाणीं लावावें.

जखमेस औषध.—वरडीच्या (तरवटीच्या) मुळीची साल, करंजमुळाची साल व मीठ हें सारखें घेऊन वाटावें आणि जखमेवर लावावें. वर पिंपळाचीं पानें व चिरगुटें बांधावीं. असा क्रम चार दिवस करावा. नंतर त्याच दिवशीं जोंधळ्याचा ठोंबरा व बंदी एकत्र करून वर बांधावें. आणि वर दहींभात बांधावा, मग चिंचेच्या झाडाची साल जाळून राख करावी. ती राख आणि लोणी एकत्र करून, जखमेवर लावावें, तीन दिवसांत बरें होईल. हें राखेचें मलम लावण्याचे अगोदर जखम तांदुळाचे कांजीनें धुवावी.

बचनाग व हरताळ हीं दोन्ही समभाग घेऊन चूर्ण करून लिंबाचे रसांत किंवा विड्याच्या पानाचे रसांत कालवून त्याचा लेप करावा. असें एक दिवस करून मग जखमेवर दहीं-भांत बांधावा.

दालिंबा सोमल एक टांक घेऊन तेलांत खलून जखमेवर लावावें. दोन दिवस असें करून नंतर तुरटी खापरांत घालून, भाजावी, हें सहाणेवर घालून वाटून जखमेवर बांधावें. असें सात दिवस करून वर गोणपाट बांधावें. दांत लावूं देऊं नये ह्मणजे जखम बरी होईल.

पिंपळाच्या व चिंचेच्या साली खापरांत घालून भाजाव्या, आणि जाळून त्याची राख करावी. ही राख तीन दिवस जखमेवर लावावी.

वर चिरगुटें बांधावीं. आणि त्यावर दोन दिवस दहींभात बांधावा. नंतर लिंबाचे रसानें धुवावें. आणि हिंगणांच्या सालीची राख वर लावावी.

जखमेवर मीठ आणि आंबील १ दिवस लावावीं. त्यावर गोंवरीनें घासून लिंबाचे रसानें धुवावें. आणि त्यावर, चुना व मोरचुद लावावा.

कोणतेही जनावराचें शिंग जाळून त्याची राख व सरडा जाळून त्याची राख व काळे रंगाची नीळ हे सर्व जिन्नस मुरदाड तेलांत खलून जखमेवर व नाळीवर लावावें. ह्मणजे लौकर बरें होईल.

घोत्र्याचा पाला व सोरमीठ, एकत्र करून कुटावें. आणि जरा चोळून लावावें. जखम पिकली असल्यास चिरून कुजलेलें मांस काढून टाकून, निर्मळ करावें, मग सालई झाडाची साल, वाळवून कुटून बारीक पूड करावी, आणि जखमेवर लावावी. ही साल न मिळाल्यास तरवडाचा पाला मिळवून त्याची पूड करावी. व ही जखमेवर लावावी. हा पाला न मिळाल्यास हिरडे मडक्यांत घालून जाळावे. नंतर त्याची राख वस्त्रगाळ करून, जखमेवर लावावी, जखम घोड्यास खाजवूं देऊं नये.

जुना कापूस नीट करून जखमेवर चिकटवावा. उत्तम अनुभवशीर आहे.

बचनाग ००८३, टांकणखार ००८३, सोमलखार ००८३, रुईचा चीक ००८१, हीं सर्व औषधें नव्या लोटींत घालावीं व रानगोवऱ्यांनीं जाळावें. व राख झाल्यावर ती राख तिळाचे तेलांत खलून जखमेवर तीन अथवा चार दिवस लावावी. यांस उतार दहींभात वाटून २ दिवस लावावा. ह्मणजे बरें होईल.

टांकणखार ८८८४, सोमलखार ८८८४, जवखार ८८८४, जंगला ८८८४, हीं औषधें कुटून अल्याचे रसामध्यें रिठ्याच्या बी प्रमाणें गोळी बांधावी. प्रातःकाळीं निर्गुडीचा पाला मूटभर, व गोळी १ मिळून पोटांत द्यावी. सायंकाळीं ओंघळ्याचें पीठ १ मूठ, ओंवा एक मूठ, व गोळी एक, दाणा खाल्लयावर सायंकाळीं देणें. बरें होईल.

घोड्यांस दंश आला तर त्यावर उपचार—याच्या योगानें अंगाचा दाहा होतो, घाम येतो, डोळ्यांच्या पापण्याचे केस झडतात. व वरचेवर मळमूत्र करितो. फार खात नाहीं. त्यास औषध—कोष्ट, काडेचिराईत, पिंपळी, चित्रक, भद्रमोथा, हीं सर्व प्रत्येक ८८८९ प्रमाणें घेऊन त्याचें चूर्ण करून पोटांत द्यावें. मग तांदुळ-ज्याच्या मुळ्या व कवठाचे मूळाची साल हीं दोन्ही एकत्र करून पिण्यास द्यावीं.

---

## घोडीचे पोटांत शिंगरूं ठरत नाहीं त्यावर.

घोडीचे पोटांत शिंगरूं ठरत नाहीं त्याचें कारण असें आहे कीं, गर्भस्थान वाईट असतें. सफेत पाणी त्यांतून निघतें. त्यावर इलाज. माजूम, जायफळ, लसूण, व अंबेहळद, हीं सर्व बराबर घेऊन पांढरे दारूं-त कढवावें व तें पिण्यास द्यावें. ह्मणजे पडणार नाहीं. खालीं लिहिलेलें औषधानें पडेल.—मिरची, सुंठ, केशर, हिंग, सुलेमानी साखर, व चिंच बरोबर घेऊन कढवून पिण्यास द्यावें. तें दर रोज एक रत्तल द्यावें. त्यानें पोटांतील शिंगरूं पडेल.

शिंगरूं पडणार नाहीं व वाढेल त्यावर.—काथ पांढरा अर्ध पैसाभार, निंबाचीं पानें पिकलीं छटाक, व गूळ अतपाव, एकत्र करून तीन गोळ्या कराव्या व दर रोज एक द्यावी.

पोटांत शिगरूं मेलें तर काढण्याची रीत—रक्त काढावें. त्या पूर्वी बनफशाचें तेल मनुष्यानें आपले हातींस लावून ते हात घोडीचे योनींत घालावे. शिगरूं बरोबर आलें कीं नाहीं. तें खालपासून पहावें आणि हलके हलकेनें काढावें. योनींचे जवळ आणावें. आणि योनि धुवावी. ती इसपरक व बनफशाचें तेल यांनीं धुवावी. म्हणजे सहज निघून येईल.

शिगरूं पालथें आलें तर किंवा मान वांकडी असली तर कांपून काढावें. नंतर जैतूनचें तेल घोडीचे योनींत तें कढवून घालावें. जिरें, मीठ, किंवा दारू, व हिरा हिंग घालावा. योनि बांधावी. पीठ, जिरें व जैतूनचें तेल निम्मे गरम करून तीन दिवस खाण्यास द्यावें. पोटांत शिगरूं मरेल तर—पांढरीसाखर एकशेर, व बडीशेप अर्धशेर. बडीशेप बारीक करून साखरेंत घालून पांच शेर पाण्यांत छाणून घ्यावा. नळींत घालून पाजावें. शिगरूं लागलेंच बाहेर पडेल.

---

## शिगरूं ठरण्यास उपाय.

घोडीचें फूल वांकडें असतें किंवा घोड्याचें शरीर तेढें असलें तर अरबलोक घोडीस आठ दिवसांतून दोन दिवस पाणी पिण्यास देतात. तिचे शरीरास चमेलीचें तेल व अंबर यांनीं धुऊन टाकितात. आणि घोडा देतात तेणेंकरून शिगरूं ठरतें.

दुसरा इलाज.—शिगरूं ठरत नसल्यास पळसाचें कांचें मूळ अर्धाशेर आणून भाजावें. अर्धाशेर कच्चें ठेवावें व गाईचे लोण्यांत तीन दिवस द्यावें. अनुभव आहे.

दुसरा इलाज.—मेथी अर्धाशेर, सित झाडाचे तेलांत तीन दिवस ठेवून नंतर ती मेथी तीन दिवस खाण्यास द्यावी.

गाईचें लोणी पावशेर, बेलफळ पावशेर व खडीसाखर पावशेर, एकत्र करून सात दिवस खाण्यास द्यावें. नंतर घोड्यास चढवावें. उडदाचें पीठ अर्धा शेर, लहान मासे बारीक करून ते पिठांत एकत्र करावे. व त्याच्या सात गोळ्या कराव्या. सकाळीं दाणा पाण्याचे पूर्वी एक द्यावी. व घोडा देते वेळेस तिळाचें तेल योनीस लावावें. अनुभव आहे.

---

## घोडीचे योनीवर दर्द होतें त्यास.

घोडा घोडीचा एकत्र संयोग होऊन घोड्याचें शरीर मोठें असल्यानें व घोडीचें शरीर कमी असेल तर असें होतें. दोन वर्षांची घोडी असल्यास असें होतें. किंवा घोडी अशक्त असल्यानें होतें. मूत्रद्वार व गुदद्वार एक होतें.

इलाज.—सांबराचें शिंग आणून तें शरीरांत घालून हालवावें. किंवा किनारा कांपून तो रुईचे धाग्यानें शिवावा.

---

## घोडीस मोठा घोडा दिला तर रक्त व पू वाहतो त्यावर इलाज.

वावडिंग, गाईचे तुपांत कढवून थंड करून तें तूप कपड्यास लावून पळिता करावा आणि योनींत घालावा. एक आठवडायाप्रमाणें करावें.

---

## घोडें जन्मते वेळेस शरीर बाहेर पडतें व त्या वेळेस रक्त व पू येतो त्यास.

असें झालें असल्यास घोडीस इजा फार होते. ओरडते. शिंगरूं बाहेर पडत नाहीं ( निघत नाहीं ) त्यावर उपचार. डाग द्यावा.

व वावडिंग, बच, चोक, इसगंध, इसबंध, काळाबोळ, कळुंजी, संभाळूचें पान, टाकणखार, गंधक, सेजनी झाडाची साल, चित्रक, पिंपळीमूळ, हिंग, शिरसाचे झाडाचें बी व साल प्रत्येक छटाक घेऊन दररोज दोन पैसेभार भिजवून एरंडीचे पावशेर तेलांत देणें.

घोडीचे शरीरांतून पिवळें किंवा काळें निळें गढूळ पाणी वाहतें. घोडीवर दुसरें जनावर चढलें तर किंवा घोळ्यापासून ही असें होतें. त्याजवर उपाय, डाग द्यावा.

---

## घोडीचे सडाची बेमारी

ही तीन प्रकारची आहे: सडांतून दूध येत नाहीं, बंद होतें; त्यावर फोड येतात; व सडाचा पडदा कमी असल्यामुळें दूध वाहतें. सडावर लेप करावा. गरम भाकरीचा मगज किंवा केशर किंवा कापसाचे सरकीचा मगज व बेदाण्याचा मगज, सारखे घेऊन बारीक करून शिरका व दारू यांत मिळवून सडास लेप करावा.

दुसरा प्रकार.—फोड होतात तेणें करून दूध नसतें. गिले अरमणी, गुलाब, व हळद या सर्वांचें मिश्रण करून लेप करावा. तो दिवसांतून दोन वेळ करावा व बनफशाचें तेल, व निलूफर याचें तेल यांत धन्याचें पाणी घालून शिजवावें व तें सडास लावावें.

दुसरा इलाज.—लालगुलाब फूक वाटून लावावें.

तिसरा प्रकार.—सडांतून दूध जातें. दूध फार असल्यामुळें किंवा शिंगरूं पीत नसल्यामुळें किंवा सडाचें तोंड मोठें असतें त्यामुळें असें होतें. त्यावर गुलसुर्खफूल शिरका व दारू त्यांत मिळवून लेप करावा. अनुभव आहे.

दूध जास्त होण्याचा प्रकार पूर्वीं सांगितला आहे.

---

## मादीचें मूत बंद झालें तर.

१ एक बत्तासा घेऊन त्यांत काळीं जिरें याची पूड घालावी. व तो बत्तासा घोडीचे शरीरांत घालावा. हुसन अल्लीचें हें औषध आहे.

१ सागवानाचें बीं, चवथा हिस्सा पाणी, त्यांत घालून अर्क काढावा. आणि नळीनें पाजावें. अनुभव आहे.

दुसरा इलाज.—गुलखेर (पळस) याचीं फुलें, पानें, व बीं, मुळी यांचा काढा करावा. गरम पिण्यास द्यावा. हा इलाज मादीविषयीं. अनुभव आहे.

दुसरा इलाज.—पिंपळी व लसूण बारीक करूनगोळ्या कराव्या. घोड्याचे किंवा मादीचे शरीरांत ठेवाव्या. अनुभविक आहे.

आणखी इलाज.—अघाड्याचें चूर्ण पाण्यांत द्यावें. अनुभव आहे.

घोड्याबरोबर घोडीनें चालावें; हत्याण करूं नये, किंवा घोड्याचा तिरस्कार करूं नये, असें करण्यास उपाय.—

तुरटी २० वीस ग्रेन एक औंस पाण्यांत मिळवून योनीवर पिचकारी द्यावी. सुगर आफ लेड एक ड्राम, ओपियम एकड्राम, व लिनसिड मिल, बरोबर गोळी करून सकाळीं व संध्याकाळीं खाण्यास द्यावी. थंड पाण्यांत घोडी उभी करावी, कमरेवर थंड पाणी टाकीत जावें. पांढरें जिरें व काथ केळीचे पाण्यांत भिजवून पाजावें.

इलाज दुसरा.—टेसुचे फूल अर्धाशेर किंवा कमी, मनुष्याचें पिसाबांत शिजवून कपड्यांत ठेवून शरीर शेकावें. नंतर निम्मे गरम झाल्यावर दोन तास शरिरावर बांधावे.

दहाशेर पाणी कढऊन (आधणाचे करून) घोड्याची शेपूट त्यांत घालावी ह्मणजे लवकी होईल. न झाली तर लोहाची सळई लाल करून बेंबीवर डाग द्यावा.

## घोडीस घोडा दिला असतां गर्भ रहात नाहीं त्यावर इलाज.

घोडीस बारा कोस चालवून न्यावी ह्मणजे जोर कमी होईल. नंतर घोडा द्यावा. गर्भ ठरेल.

कथल्या गोंद एक पैसाभार, व चुन्यागोंद एक पैसाभार, दोन्ही गोंद शिजवावे, त्यांत मैदालकडी घेऊण पैसाभार बारीक करून गाईचें दूध एक शेर घेऊन त्यांत तिन्ही जिन्नस घालून नळीनें पाजावें.

पावशेर पिठीसाखर,व गाईचें लोणी पावशेर दोन्ही एकत्र करून दररोज सकाळीं सात दिवसपर्यंत द्यावें.आठवे दिवशीं घोडा द्यावा.गर्भ राहील.

सशाचें आंतडें गाईचे दुधांत घालून पनीर करावें; तें घोड्याचे शिस्नांत घालावें किंवा त्यावर लावून घोडा द्यावा. गर्भ राहील.

---

## खुब्यांत रहाणारे मांसांत लचक.

कारण—उतरणीचे जमिनीवर घसरून पडणें किंवा खालवर जमिनीवर घसरणें, अथवा वांकडा तिकडा पाय पडून मुरगळणें व खुब्यावर मार लागणें यापासून लचक भरते.

चिन्ह—पाय सुजतो व लंगडतो.

इलाज—गरम पाण्यानें शेकावें, सफेद लिन्यामेंट( सफेदाचें तेल) यानें खुबा चोळावा. टरपेंटाईन एक औंस, आमोनिया दोन ड्राम, व कापूर दोन ड्राम, व पाणी आठ औंस घेऊन त्यानें मालीस करावें. यानें बरा न झाला तर मोहोरीचें प्लस्तर मारावें. काजूचे झाडाची साल, ओंवा, व अंबेहळद हीं बारीक करून ऊन करावें आणि दर्दावर तीन दिवस बांधावें; किंवा कडब्याचीं पानें ऊन करून बांधावीत.

---

## खुब्याचा जोड सरकून लचक होते त्यावर.

कारण—उंच नीच जागेवर पाय पडल्यानें किंवा झटका लागल्यानें होते.

इलाज—छस्तर मारावें, अंबेहाळदीचा लेप करावा, आणि रान-गोरीनें शेकावें, किंवा गरम पाण्यानें शेकावें. बेलाडोना एक ड्राम, व चर्बी एक औंस याचें मलम करून लावावें; बकऱ्याचे रक्ताचा लेप करावा. तरवटाचीं पानें, उंटाची व बकऱ्याची लेंडी मनुष्याचे लघवींत गरम करून लेप करावा.

जोड जोडण्याचे शिरांत लचक किंवा मांसाचे तंतू आंखडणें किंवा तुटणें याजवर.

कारण—उंच नीच जागेवर पिटल्यानें, मणगट लटपटल्यानें, कमताकत घोड्यापासून जास्ती मेहनत घेतल्यानें होतो.

चिन्ह—पाय सुजतो व लंगडा होतो.

उपाय—छस्तर मारावें नाहीं तर डाग द्यावा. ताजी दुखापत असेल तर ऊन पाण्यानें शेकावें.

---

## ड्रापसी ( जलोदर ).

हा रोग कांहीं कारणानें पाणी जमत जाऊन होतो. हाच रोग नाहीं परंतु रोगाची खूण आहे. पोटांतून कांहीं बाहेर आल्यास चांगलें. किंवा जर इजा वाढतच चालली व घोडा दुबळा होत चालला तर हा रोग झाला ह्मणून समजावें, याचे योगानें आंत व बाहेर पाणी जमा होतें. हा रोग फारच वाईट आहे. ह्याचे योगानें घोडा मरतो, कारण आकसा-रवंट (आंत खेचून धरणाऱ्या शिरा किंवा आंतडीं) खेचून धरूं शकत नाहींत. कारण—कातड्याचा (त्वचेचा) व्यापार बंद झाल्यानें, किडना गुडदी ) हीचें काम बंद झाल्यानें. लक्षण—लीद बंद होते, पोटां-तला अवाज ऐकूं लागल्यास ऐकूं येतो, एकादे वेळेस आपोआप फार घाणेचा जुलाब होतो, तो वाईट, घोडा मरतो मेल्याचें लक्षणें.—गुद-द्वाराचा रंग फिक्का पडतो आणि तें नरम राहतें. काळजाचे आंत पिंव-ळी वस्तु जमा होते, मेसेंटरीक ह्याचे आंत ( झिल्लीची ) पिंवळी वस्तु

जमा होते. मेसेंटरीक ग्लान्ड (खाद्या पदार्थांचे रस) खेचून घेणारे मांसाचे गोळे खराब होतात. पाणी किंवा पू जमा होतो.

इलाज—पाणी काढण्याचे उपाय करावे. अंडु व नाभी यांचे दर्म्यान भोंक पाडून पाणी काढावें किंवा टानिक (जिरणारी) किंवा डायोरेटिक (मूत्र) होणारी दवा द्यावी, कीं, त्याच्या योगानें घाम किंवा मूत्र होईल. जन्शन एक ड्राम, व नायटर दोन ड्राम गोळी करून दिवसांतून तीन वेळ एक हप्ता द्यावी, जर मूत्र किंवा घाम फारच निघेल तर गोळी बंद करावी. व दुसरी दवा द्यावी. सल्फेट ऑयर्न एक ड्राम दाण्यांत किंवा भुस्सा यांत द्यावें. हें दिल्यापासून मूत्र किंवा घाम बंद झाला तर फिरून पाहिला दवा पोटास बारीक दोनशें भोंकें पाडावीं, त्यांच्यांतून वाहूं लागले तर भोइलोकांचें माशाचें जाळें आणून पोटास बांधावें व त्याचेवर लेप करावा.—काळ्या धोतऱ्याचीं पानें पावशेर, चांगुणीचीं पानें, पठाणी लोद तोळा एक, ह्या सर्वांचा लेप करावा. नाहींतर धोतऱ्याचें बीं चारआणेभार, सोरा, अफू, कापूर, अजवान ह्यांची गोळी दिवसांतून दोन वेळा द्यावी. खाण्यास रानडोरलीवांगी हळदींत मिळवून द्यावी.

---

## घोड्यास लंग्स रोग होतो त्याजवर उपाय.

ताप येतो, घोडा सुस्त होतो, बाजूच्या बरगड्याच्या शिरा उडतात, नाडी जलद चालते, खोकला येतो, व नंतर घाम येतो, चैन पडत नाहीं, नाकपुडी तांबडी होते, मान वर करितो, कान आणि पाय फार थंड होतात, शेजेस येत नाहीं, बसला तर उठत नाहीं, त्याजवर उपचार—रक्त काढावें, एरंडेलाचा जुलाब द्यावा, पिचकारी ऊन पाण्याची मारावी. त्यांत मूठभर मीठ घालावें, बरगडीस इस्तर मारावें, पाय रगडावे. फ्लानेल ब्यांडेज करावा, गरम कापड अंगांवर ठेवावें, घोड्यास हवेवर बांधावें. नैटर, डिगी

टेलीस; टारटर इमेटीक व अंटीमनी यांची गोळी खोकला जाईपर्यंत द्यावी. नैटर १ औंस, डिगिर्टेलीस अर्धाड्राम, टार्टर इमेटीक दोन ड्राम, जवसाचा मगज व पाणी मिळून गोळी करावी. एक वेळ रक्त काढून कांहीं नाहीं झालें तर एकदिवस जरूर दुसरे दिवशीं रक्त काढावें. पौष्टिक खाण्यास द्यावें. कंठांतील शिरा किंवा कंठ सुकून कफ किंवा खंकारे पडतील तर कफावरील औषध द्यावें.

---

## कंजेकशन ऑफ लंग्ज म्हणजे फुप्फुसांतील सूज.

हा रोग आपेआप किंवा फार मेहनत केल्यानें होतो.

लक्षण—नाडी मंद चालते, दम फार मेहनतीनें घेतो, तसदी भोगतो, बेफाम होतो, दम व नाडी चालते किंवा नाहीं हें समजत नाहीं, परंतु तोंडासमोर बाटली लावली तर समजेल.

इलाज—गरम दवा द्यावी, मालीस करावें, फासण्या काढाव्या, राई, हिंग, पिंपळगाठी, वेरुसा, अलें, कुटकी, प्रत्येक तोळा प्रमाणानें घेऊन तेलांत गोळी करून पिण्यास द्यावी. अलोंज, हाळद, व काळा निमक, प्रत्येक पाच तोळे प्रमाणानें घेऊन त्याच्या दोन गोळ्या कराव्या. एक गोळी दिल्यावर पांच दिवसांनीं दुसरी द्यावी. ह्याप्रमाणें जुलाब द्यावा. छातीवर लावण्यास—राळ पावशेर, मोम (मेण) दोन, पैसेभार सिरसाचें तेल, बिब्याचें तेल, निंबाचीं पानें सर्व जिनसांत थोडें पाणी घालून वाफ द्यावी व छातीवर बांधावें.

घोड्याचें औषध १ सेंबा २ सिगाडा ३ कुरफुरी ४ पारकिड ५ रसुल्या ६ बैजे ७ चक्रावळी ८ जहरबाद व ९ मेंड्या इतक्यांवर हें औषध चालतें. आतां औषधाचा जिन्नस बितपशील:—

| | | |
|---|---|---|
| ‌‌॥१ आंबेहळद | ॥१ गजग्याचें बीज | ॥।, सैंधवलोण |
| ॥॥१ मिरें | ॥१ गूळ जुना | ॥। पिंपळी. |
| ॥॥१ सुंठ | ॥। कोष्ट | ॥।. पिंपळमूळ. |

| | | |
|---|---|---|
| ॰॰१ ओंवा | ॰॰। कोळंजन | ॰॰।, कुटकी |
| ॰॰१ लसूण | ॰॰। पाषाणभेद | ॰॰॰९ ह्मशागुग्गुळ |
| ॰॰१ वेखंड | ॰॰। पापवेल | ॰॰। संगपलिता |
| ॰॰१ काराळे | ॰॰॥ संगजिरें | ६ अफू वजन तोळे, |
| ॰॰१ वावडिंग | ॰॰।, गंधबीड | |

भेंडा या रोगास मात्र म्हशागुग्गुळ ७ तोळे घालावा. एकंदर कुटून बेचाळीस गोळ्या बांधून प्रातःकाळीं १ व सायंकाळीं १ एक देत जावी. दाणा चारा घालावा. आरोग्य होईल.

---

## घोडा बेमार झाला असतां त्याचा बंदोबस्त ठेवणें त्याबद्दल.

दाणा चांगला, थोडा थोडा द्यावा, जबरदस्ती करूं नये, खाण्यास गाजर व शिजलेला भुसा, लिनसीड (आळशी, जवस) सातू, लिनशीड (जवसाचा) चहा, लसर्न ग्रास (विलायती गवत), कांजी, मका, गव्हाचा भुसा, हरभऱ्याचें सत्व.

गाजरापासून रक्त साफ होतें, ऊघवी होईल, तीन पौंड पासून ४ पौंडपर्यंत गाजरें खाण्यास दिलीं असतां शिरांतील रक्त साफ होईल.

आळसी, खाण्यास दिल्यानें शरीरांतील पडद्यावर नरमाई व तयारी येते, व शिस्न साफ रहातें. भुसा दोन प्रकारचा आहे; एक चमकदार असतो आणि दुसऱ्याला डायजेस्टिंग ह्मणतात. हा लवकर पचन होतो.

विलायती गवत हें तापावर दिलें असतां ताप जातो. भुसा शिजविण्याची रीत. ऊन पाणी घेऊन त्यांत भुसा टाकावा आणि झांकण ठेवून त्यास वाफ आणावी, व तो थंड झाल्यावर घोड्यास खाण्यास द्यावा.

ओट या जिनसाचें पीठ थंड पाण्यांत मिळवून नंतर ऊन पाणी घालून चहा करून द्यावा.

गवती चहा.—बारीक तुकडे करून कढत पाण्यामध्यें टाकावे,

आणि-झांकण ठेवून त्यास वाफ आणावी, व गरम असतांनाच घो-ड्यास पिण्यास द्यावा. जवसाचा चहाही असाच करावा.

दवा देण्यास कांहींच जिन्नस मिळत नाहीं तेव्हां—व्हिनिगर (शिरका) द्यावा ह्मणजे तो त्वचेवर थुरकाई आणितो, व या-पासून घामही निघतो. दोन पौंड देऊन घोड्यास झूल बांधावी ह्मणजे घोड्यास घाम येईल.

मीठ दिल्यानें रक्त साफ होतें, कोणत्याहीं प्रकारचे खाण्याचे पदार्थांत तीन औंसपर्यंत द्यावें.

मिरें दिल्यानें अन्न पचन करितें, व इजाही दूर होते.

---

## इंग्रजी औषधें, तीं कोणचे रोगांवर व कशीं द्यावीं त याविषयीं.

**एक्सट्र्याक्ट.**—झाडपाल्याचा अर्क काढलेला असतो, त्याचा पुनः अर्क काढणें त्यास ह्मणतात.

**टिंक्चर.**—अर्धी दारू व अर्धे पाणी घेऊन त्यांत औषध मि-ळविणें त्यास ह्मणतात.

**आलोज.**—जुलाबाचे उपयोगी आहे.

**जनशन.**—कोठ्यांतील पडद्यावर जोर आणिते; काळजांत किं-वा दुसरे कोठें सूज असेल तर एक ड्राम अफू द्यावी, परंतु हवेचे नळींत सूज असेल तर देऊ नये.

**हायड्रोजन.**—ही हवा आहे, काळजांत रहाते, आकसिजन हें फार जलाल आहे, हें एकटी हवा जाळून टाकील; यास्तव एक हि-स्सा आकसिझन व तीन हिस्से नायट्रोजन असावे.

**क्यार्बोनेट आफ आमोनिया.**—कंजंगशन याजवर एक ड्राम नाय-ट्रिक ईथर एक औंस पाण्यांत मिळवून दिलें असतां रक्त पातळ होतें.

**स्पिरिट ऑफ नायट्रिक ईथर.**—नायट्रिक इथर आणि सल-फ्यूरिक आसिड या दोन्हींचे बरोबर गुण आहेत. हें पुष्कळ औष-धाचे कामीं उपयोगीं पडतें.

**नायट्रिक ईथर.**—दारू आणि आक्सिझन मिळविल्यानें हें होतें. सल्फ्युरिक आसिड, दारू, अलकोहल; यांजवर घातल्यानें होतें. तापावर किंवा कंजंकशनवर एक औंसपर्यंत देतात. व बाहेर लाविल्यानें थंडावा आणि गरम सुजेवर लाविलें असतां आंतली गरमी बाहेर आणितें. घोड्यासि रक्ताचे जुलाब होत असतील तर सल्फ्यूरिक, ईथर, अथवा नायट्रिक ईथर, लायकर आमोनिया, ऑसटेट्स १ औंस, कापूर २ ड्राम, मिळवून द्यावें.

**ओपियम.**—( अफू ) याचे दोन प्रकार आहेत. एक मिनकार्टिक आसिड व दुसरा मार्फीया; पहिल्याचा गुण शरीरांत ताकत ( जोर ) आणिते व दुसऱ्याचा गुण निद्रा येते. अफूपासोन टिंक्चर ओपियम करितां येतें. त्यांत एक ड्राम अफू असते, टिंकचर ओपियम देण्याचा प्रकार एक औंस द्यावें व अफू देणें आहे तर एक ड्राम द्यावी.

**चिराईत.**— अर्ध्या औंसापासून एक औंस भुकणी करून द्यावी. ह्मणजे कुइनेलच्या अंगीं जो गुण आहे तो करिल. हें तापावर उपयोगी आहे. हें सिकोना झाडाचे सालीपासोन काढितात.

**क्विनेन**—हें शिकोना झाडांचें सालीपासूनकाढितात,हें तापावर देतात

**सिल्यासिक आसिड**—हें वेळूचे झाडांपासून काढितात, हें बहुतकरून आमवायूवर ( सांधे दुखतात त्याजवर ) देतात. सिल्यासिड आसिटिक आसिड, सिल्यासिड एक ड्राम, सुंठ दोन ड्राम, आळशी ( जवसाचा भर्डा किंवा पीठ ), व गूळ मिळवून गोळी करून द्यावी ह्मणजे बाहेर सांध्यावर जी सूज असते त्यांत गरमाई येईल.

**हायड्युटसलफ्यूरिक आसिड**—हा गंधकाचा अर्क आहे. हा पाण्यांत मिसळतो. हें माणसाचे किंवा घोड्याचे अंगावर पडलें तर पाण्यानें धुऊं नये, हें जर पोटांत गेलें तर अन्न पचन करितें ( सुखावतें ) व रक्त बंद करितें, बाहेर लाविलें असतां त्यापासून जळतें.

घोड्यास मूत्रद्वारें जर रक्त पडत असेल तर सलफरिक आसिड एक ड्राम, टिंकचर ओपियम अर्धा औंस, व पाणी एक बाटली. हें सर्व मिळवून द्यावें. खरजेवर, सलफरिक आसिड चार ड्राम व एक पिंट-पाणी मिळवून लावावें.

**आरनिका**—हें पहाडांतील झाडापासून होतें; यापासून टिंकचरही होतें. चमक-याजवर दोन औंस आरनिका, व टिंकचर आरनिका चार औंस हीं मिळवून जेथें चमक भरली असेल तेथें लावावें.

**हाइड्रोक्लोरिड आसिड, म्युऱ्याटिक आसिड किंवा स्पिरिट आफ साल्ट**—हें सलफरिक आसिड मिठावर घातल्यानें तयार होतें. हें पौष्टिक आहे, खाण्यास एक ड्रामपर्यंत देतात.

**आईल आफ तरपैनटाईन**—हें देवद्वाराच्या झाडांचे चिकांतून तेल काढितात. हें मूत्र होण्यास एक औंसपर्यंत देतात. हें अंगाला लागलें तर वरचें कातडें जळतें, तेव्हां कारबानेक सोडा ऊन पाण्यांत मिळवून लावावा म्हणजे बरें होईल. यापासून जखमेस पू वगैरे होऊन तो बाहेर पडून सर्व निचर होतो. एक औंस तरपैनताईल, व तीन औंस चरबी मिळवून लावावें, पोटदुखीवर दोन औंस तरपैनताईल, ओपियम व पाणी यांत मिळवून द्यावें.

**नायट्रिकासिलव्हरकॉष्टिक**—हें, चांदीवर नायट्रिकआसिड घातल्यापासून तयार होतें. गुडघ्यावर पांढरे केंस असतील तर हें लाविल्यानें काळे केंस होतील; व मुरदाड मांसावर लाविल्यास तें जाळून टाकील.

**कारबॉलिक आसिड**—हें डामरापासून काढितात. जहरबंद तापावर २० पासून ३० तीस ग्रेनपर्यंत देतात. बाहेर लावण्याचें आहे तर एक हिस्सा पाणी किंवा तेलाच्या बरोबर मिळवून लावितात.

**मेगडूगल्स डिसइन्फेक्टंट पावडर**—हें वाईट जखमेवर टाकितात.

**मरक्यूरी**— हें नासुरावर भुकणी करून घातली तर भरून येईल.

**क्लोराईड आफ मरक्यूरी अथवा क्यालोमेल**—हें, फिके रंगाची लीद होते तेव्हां आर्धा ड्रामपासून एक ड्रामपर्यंत द्यावें.

**सालिव्हेशन**—( तोंड आणण्याला )-क्यालोमेल द्यावें; खरजेचा रोग बहुत दिवसांचा असेल तर तोंड आणण्यापासून फायदा होईल.

**बेनाडाईड आफ मरक्यूरी**—( एक हिस्सा पारा, दोन हिस्से आयोडाईन; यापासून होतें ). एक औंस चरबी, एक स्क्रपल बेनाडाईड आफ मरक्यूरी, याचें ल्लस्तर करून गरम जागेवर मारावें.

**मरक्युरीयल आइंटमेंट**–( पाऱ्याचा मलम )–हें पारा व चरबी मिळून तयार होतें. हें खरूज वगैरे त्वग्रोगावर चालतें.

**सलफेट आफ कॉपर**—हें तीन औंस, आलम तीन औंस, पाणी तीन औंस, व सलफ्यूरिक आसिड तीन औंस, मिळवून जखमेवर लाविलें असतां रक्त बंद होईल.

**झिंक**—क्यार्बोनेट आफ झिंक ( जस्ताचे दाणे ) क्यॉर्बालिक आसिड आणि झिंक यापासून होतें. क्यार्बोनेट आफ झिंक व चर्बी मिळवून थोडी फटकी घालावी आणि तें मलम सुम तडकतें त्यावर लावावें.

**सलफेट आफ झिंक**—याचा गुण सुकवण्याचा आहे. फार दिवसांची सूज असल्यास त्याजवर पाण्यांत भिजवून ब्यांडिस करून बांधावें; हें रात्रीस बांधू नये.

**क्लोराईड आफ झिंक**—( शिरका आणि जस्त यापासून होतें.) हें पायावर एक दिवसाची सूज आली असल्यास लावावें.

**आंटिमनी**—( सुरमा ) यापासून उलटी होते. परंतु घोड्यास होत नाहीं. यापासून नाडी बराबर चालते, व कृमीचा नाश करिते. गाई, बैल यांजला याचें ल्लस्तर लवकर उठतें. एक ड्राम आंटिमनी, व एक औंस चर्बी मिळून मलम करावें.

**बटर आफ आंटिमनी**—हें क्लोराईड आणि आंटिमनी या

पासून होतें. पायाच्या पुतळीवर मास येतें, व सुंभ तडतें त्याजवर लाविलें असतां बरें होतें.

**इनसासेड**—यापासोन विषारी पदार्थाचा नाश होतो. घोडा दाणा खात नाहीं, तोंडास चिकटा येतो, व अंगावर घाण येते तेव्हां क्यॉर्बानेट आफसोडा १ औंस, नायटर २ ड्राम, क्यॉर्बानेट आफ आमोनिया अर्धा ड्रांम, व पाणी एक पिंट मिळवून द्यावें.

**सलफेट आफ सोडा**—या पासोन जुलाब होतात. हें १ पौंड पासून १॥ पौंडापर्यंत देतात.

**क्लोरेड आफ सोडियम**—हें खाण्याचें मीठ आहे. ज्या घोड्याचें तोंड गरम होतें, खाणें अंगीं लागत नाहीं, कातडी वाळतें तेव्हां घोड्याचा दाणा बदलून त्यांत हें मीठ घालून द्यावें.

**पोट्याशीयम**-हा खार आहे. यापासोन रक्त साफ होते, १ ड्राम पासोन २ ड्रामपावेतों द्यावें, जहरबंद तापावर देतात.

**नायटर** ( सोरा )—याला सॉल्टपिटर ही ह्मणतात. २ ड्राम पासोन ४ ड्राम पावेतों देतात. याचा गुण लघवी होते. घाम येतो, व तापाचा नाश होतो, असा गुण आहे.

**आयोडियन**—याचें मलम करितात, हें मलम लाविलें असतां कांहीं मास वाढलें असेल तें कमी होतें. छातींत किंवा पोटांतले असल्यास १ पासोन २ ड्रामपर्यंत देतात.

**क्यालमेल** ( रसकापूर )—काळजावर जोर करितें. जुलाब देणें ते १ ड्राम क्यालमेल. २ दोन ड्राम आलोज, २ जिंजर, व सुंठ दोन ड्राम या सर्व जिनसा मिळवून गोळी करून द्यावी ह्मणजे शरीरांतील सर्व खराब वस्तु मलद्वारें निघून जाईल. घोड्याची ताकद पाहून जुलाब द्यावा. काळजांत कांहीं हरकत असेल तर क्यालमेलचे ऐवजीं जनशन द्यावें.

**लिकर आमोनिया**—आमोनिया जनावराचे नासके वस्तूपासून

काढितात त्यांत पाणी मिळविलें ह्मणजे लिकर आमोनिया होतें. काळजांतील सुजेवर याचें ह्लस्तर लावण्याचें उपयोगीं आहे तेणेंकरून आंतील पाणी बाहेर येतें.

**स्पिरिट आमोनिया**—हें, कांहीं झाडांचे बीजांत अमोनिया मिळविला असतां त्याजला स्पिरिट आमोनिया ह्मणतात; यांत क्यार्बानेट ग्यास असतो.

**डेफ्युजष्टीम्युलेट**—हें सर्व शरीरांत गरमी आणितें, यापासोन रक्त पातळ होतें. १ औंसपर्यंत देतात. टिपणींत दिले असतां हवा निघून जाते.

**आयोडाईड आफ पोट्याश**—वीसपासोन तीस ग्रेनपर्यंत देतात. जबड्याचे खालचे गोळे सुजले तर आयोडाईनचें मलक करून लावावें. परंतु प्रथम तीन दिवस आयोडाईन नंतर तीन दिवस चर्बी लाविल्यापासोन बरें होतें. याचा गुण जी कांहीं वस्तु जमली असेल ती पातळ करिते.

**एक स्ट्र्याक्ट बेलाडोना**—टरपैनटाईल १ औंस, टिंकचर ओपियम १ औंस, सोपलिन्यामेंट १ औंस, व टिंकचर क्यापसिका १ ड्राम. मिळवून सांधे जखडतात त्यांवर लाविल्यानें बरें होईल.

**डिसेंटरि**—आंव आणि रक्त यांचे जुलाब होतात, तेव्हां ओपियम पावडर ॥ ड्राम, क्यांफर २ ड्राम, सलफ्यूरिकईथर १ औंस, व लिनसिड १ औंस, याचे चहांत मिळवून द्यावें.

**टिंकचर आकोनाईट**—हें जास्ती दिल्यास जहर आहे. थोडें दिलें असतां गुणाकारी आहे. हें पोटदुखावर देतात.

**क्लोराईड आफ लाईम**—ही घाण मारणारी वस्तू आहे. फार दिवसाचा पोटांत वायू धरीत असेल तर २ पासोन ४ ड्रामपर्यंत द्यावें. खरजेवर १ ग्यालन पाणी, १ पौंड क्लोराईड आफ लाईम मिळवून द्यावें.

**क्लोरोफॉर्म**—यापासून गुंगी येते व बेशुद्ध होतो. कोणतीही जखम कापण्याची असेल तर क्लोरोफॉर्म हुंगण्यास देऊन कापितात.

**क्यांफर**—(कापूर) लारळ झाडापासोन निघतो. १ पासोन २ ड्रामपर्यंत देतात. खोकल्यावर १ ड्राम क्यांफर १ ड्राम अफू, मिळवून द्यावी किंवा १ ड्राम बेलाडोना, मिळवून द्यावा, कापराची भुक्की करणें तेव्हां एक बुंद दारूचा त्यावर सोडला ह्मणजे होती.

**जेनशन**—हें एका झाडाची मुळी आहे, व पौष्टिक आहे. यापासोन टिंकचर, एक्स्ट्र्याक्ट, व पौडर हे तीन जिन्नस होतात. भुक्की दोन ड्राम एक्स्ट्र्याक्ट अर्धा ड्राम, टिंकचर १ औंसपर्यंत देतात. हें कोठा कमजोर होतो, खाणें पचत नाहीं तेव्हां देतात.

**क्यानपेपर.**—(लाळ लहान मिरची) ही पौष्टिक आहे. जेव्हां भूक लागत नाहीं तेव्हां क्यानपेपर ३ ड्राम,व आरसेणी ३ ग्रेन मिळवून सकाळ संध्याकाळ दोन वेळ दाण्यांत द्यावी.

**सल्फर ( गंधक )**—मासीनें किंवा दुसरे जनावरानें जखम केली तर त्यावर गंधकाची भुक्की टाकावी; तापावर १॥ ड्राम सकाळसंध्याकाळ द्यावी, जुलाबावर दिली असतां बंद होतात.

**डेजिटेलीस**—हवेचे नळींत सूज आली असतां २० पासून ४० ग्रेनपर्यंत देतात.

**सलफेट आफ म्यागनेसिया**—काळजांत कांहीं हरकत होऊन ताप आला असतां ८ औंसपर्यंत तीन वेळ देणें; जुलाब होऊं लागले तर बंद होतील.

**इंडियनहेम**—( भांग )—अर्ध्या ड्रामापासून एक ड्रामपर्यंत देतात. यापासून दर्द कमी होतो.

---

## नाडीपरीक्षा.

घोड्याची प्रकृति साधारण प्रकारची चांगली असली ह्मणजे एका मिनिटांत ३९ पासून ४९ ठोके पडतात. ताप किंवा सूज आली असतां, ८० पासून ९० ठोके पडतील, केव्हां केव्हां १०० ही ठोके पडतात. नाडीपरीक्षा ही मुख्य आहे, नाडी पहाणें ती घोड्याचे खालचे जबड्याचे कण्यावर पहावी. जेथें त्रिकोणाकृतीचा आकार आहे त्याचे कांहीं अलीकडे पहावें, बोटें ठेवून एका मिनिटांत किती ठोके पडतात हे मोजावे; अशी नाडी पहाण्याची रीत आहे.

| इंग्रजी नांवें. | मराठी नांवें. | पोटांत दिल्यानें काय होतें. | बाहेर लावल्यानें काय होतें. | किती देण्याचें तें वजन. |
|---|---|---|---|---|
| नायट्रिकम्यूऱ्याटिक आसिड .................. | .... | .... | .... भाजतें. | |
| सलफ्यूरिक आसिड.... | गंधकाचा अर्क. | खाल्लेली वस्तु पचन करतें. | भाजतें. | १ पासून २ ड्राम. |
| आलोज ............... | काळाबोळ. | जुलाब होणारें. | जखमेवर लावण्यास. | ४ पासून ६ ड्राम |
| आलम ................ | फटकी. | शोषण करितें. | शोषण करतें. | २ पासून ४ ड्राम. |
| आमोनिया .......... | नवसागर. | उष्ण आहे. | उष्ण आहे. | १ —— २ —— |
| अंटिमनी सलफेट........ | .... | आंतले आंत काम करतें | .... | २ —— ४ —— |
| अंटिमनी टारटरिज .... | उलटीचें औषध. | घाम आणितें. | गरम. | १ —— २ —— |
| आकोनाईट पावडर .... | बचनागाची भुकी. | रक्ताला हलके फिरवितें. | .... | २० पासून ३० ग्रेन. |
| टिंकचर आकोनाईट .... | बचनागाचा अर्क. | इजा दूर करतें. | .... | ०॥० ड्राम. |
| टिंकचर आरनिका .... | बचनागाचा अर्क. | घाम आणणें व रक्ताला हलके फिरवणें. | .... | .... |
| असाफोटिडा............ | हिंग. | रक्ताला हलके फिरवितें. | .... | २ पासून ३ ड्राम. |
| बेलाडोना ............ | .... | शिरांस जोर आणितें. | रक्ताला हलके फिरवितें. | ॥० पासून १ ड्राम. |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| क्यालोमेल ............ | रसकापूर. | रक्ताळा हलके फिरविते. | .... | १ पासून | २ | ड्राम. |
| क्लोराईड आफ मरक्यूरी. | पाऱ्याचा खार. | जुलाब होणें. | .... | .... | | |
| क्यांफर...... ......... | कापूर. | नाडीला बरोबर आणितें. | गांठ असली तर दूर होते | १ पासून | २ | ड्राम. |
| क्यांथ्राडिस............ | विषारी माशी. | गरमी येते व लघवी होते. | .... | ५ पासून | ८ | ग्रेन. |
| क्याच्याच्यू........ .... | कात. | सुखवतें. | जखम भरून येते. | १ पासून | २ | ड्राम. |
| चॉक.................. | खडू. | विष दूर करतें. | जखम ओढून आणितें. | २ पासून | ४ | औंस. |
| सब असिटेट आफ कॉपर. | जंगला. | पाचक. | वाण दूर करितें. | १० पासून | ३ | ग्रेन. |
| सलफेट आफ कॉपर.... | मोरचूद. | पचन करतें | जाळतें. | २ पासून | ४ | ड्राम. |
| करोसिव्ह साब्लिमेट.... | पाऱ्याचें फूल. | रक्त साफ करतें. | जाळतें. | ५ पासून | १० | ग्रेन. |
| कोटन सीड............ | जपाळाचें बीं. | जुलाब होतो. | .... | १० पासून | २४ | ग्रेन. |
| " आइल.............. | जपाळाचें तेल. | .... | .... | २० पासून | ३० | ग्रेन. |
| डिजीटेलिस............ | .... | गुंगी आणितें व जुलाब होतो. | .... | ॥० पासून | १ | ड्राम. |
| नायट्रिक ईथर........ | .... | जुलाब होणारें व घाम आणणारें व इजा दूर क० | .... | १ पासून | २ | औंस |
| सलफ्यूरिक ईथर........ | .... | गरमी व गुंगी आणितें व इजा दूर करतें. | .... | १ —— | ३ | औंस. |

| इंग्रेजी नांवें. | मराठी नांवें. | पोटांत दिल्यानें काय होतें. | बाहेर लावल्यानें. काय होतें. | किती देण्याचें तें वजन. |
|---|---|---|---|---|
| जेनशन............ | तेजियाना ( अरबी नांव. ) | पाचक. | .... | .१ —— .४ ड्राम. |
| जिंजर.................. | सुंठ. | पाचक. | .... | २ —— .४ ड्राम. |
| गमआऱ्याबिक ............ | गोंद. | लेप चढवतो. | .... | .... |
| आयोडाईन............ | .... | .... | बाहेर लावल्यानें मास ब्लिस्टर. वाढलें असेल तें कमी होतें. | ५ पासून १० ग्रेन. |
| बिनाडाईड आफ मरक्यूरी | .... | .... | | .... |
| आयोडाईड आफ पोट्याश.... ......... | .... | पाचक. | सुखवतें | २० पासून ३० ग्रेन. |
| सलफेट आफ आयर्न.. | हिराकस. | पाचक व शोषक. | .... | २० पासून ४ ड्राम. |
| असिटेट आफ लेड...... | .... | नाडी बराबर आणणें व शोषक. | .... | ३० पासून ६० ग्रेन. |
| लिनसीड.............. | आळसी. | लेप चढवणें. | पोटीस ( पिकवतें ). | .... |
| नायट्रेट आफ सिलव्हर. | काडीखार. | .... | जाळतें ( भाजतें ). | .... |
| ओपियम.............. | अफू. | शिरांला जोर आणतें व इजा दूर करतें. | .... | १ पासून २ ड्राम. |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| टिंकचर ओपियम........ | अफूचा अर्क. | शिरांला जोर आणितें व इजा दूर करतें. | .... | १ —– २ द्राम. |
| क्यारबोनेट आफ पोट्याश. | जवखार. | जुलाब होणे व विष दूर करणें. | .... | २ —– ४ द्राम. |
| नायट्रेट आफ पोट्याश. | सोरा. | ताप जोर करणें व लघवी करणें. | .... | २ पासून ६ द्राम. |
| रोझिन.................. | राळ. | लघवी आणणें. | .... | ४ —– ८ द्राम. |
| सोप.................... | साबण. | लघवी आणणें व विष दूर करणें. | गर्मी आणणें. | ॥० पासून २ औंस. |
| स्ट्रिकनिया............ | कुचल्याचा मगज. | शिरांला जोर आणितें. | .... | १ पासून २ ग्रेन. |
| सलफर.................. | गंधक. | रक्ताला हालके फिरवणें व जुलाब होणें. | .... | १॥ द्राम. |
| टरपेंटाईन............. | देवद्दाराचें तेल. | लघवी व मळ होणें व इजा दूर करणें. | झुस्तर मारणें. | २ पासून ४ द्राम. |
| क्यारबॉनेट आफ झिंक. | ,, | ,, | सुखवणें. | ..... |
| क्लोराईड आफ झिंक.... | ,, | ,, | भाजतें. | .... |
| सलफेट आफ झिंक.... | जस्तखार. | पाचक व शोषक. | सुखवणें. | १ पासून २० द्राम. |

| औषधांचीं नांवें. | औषधांचीं लक्षणें. | औषधें कोणकोणतीं. |
|---|---|---|
| पोटांतदेण्याचीं औषधें. | | |
| ऑल्टरेटिव्ह ............ | आंतलेआंत कामकरणारें औषध. | आलोज ( एलवा ), क्यालोमेल ( रसकापूर ), आंटिमनी ( सुर्मा ), सलफर ( गंधक ). |
| क्यांथार्टिक ............ | जुलाब होणारें औषध. | आलोज ( एलवा ), क्रोटन ( जमालगोटा ), क्यालोमेल ( रसकापूर ), लिनसीड आईल ( आळसीचें तेल ), म्याशेस.. |
| ऑंटिस्पयाझमॉडिक ..... | इजा दूर करणारें औषध. | आलकोहल ( उंचीदारू ), सलफ्यूरिकआसिड ( गंधकाचाअर्क ) नायट्रिकईथर, टरपेंटाईन (देवद्वाराचें तेल), ओपियम ( अफू ). |
| आस्ट्रिंजंट ............ | मुकविणारें औषध. | आलम ( फटकी ) क्याच्याच्यू ( कात ). |
| डेम्यूलसंट ............ | नरमाई आणणारें औषध. | गमआऱ्याबिक ( बाभळीचा डीक ) लिनसीड ( आळिसी ). |
| डायारेटिक्स ........... | लघवी आणणारें औषध. | नायटर ( सोरा ), रेझिन ( राळ ), टरपेंटाईन (देवद्वाराचेंतेल). |
| डायफोरेटिक्स .......... | घाम आणणारें औषध. | सोप (साबण), इमेटिक (उलटी करणारें औषध), नायट्रिकईथर. |
| फेब्रिफ्यूज.... ......... | ज्वर नाहींसा करणारें औषध. | नायटर (सोरा), क्यांफर ( कापूर ), टारटारइमेटिक (उलटीचें औषध), क्यालोमेल ( रसकापूर ), स्वीट स्पिरिट आफ नायटर ( सोऱ्याचा अर्क ). |

| | | |
|---|---|---|
| जनरलस्टिम्यूलेंट्स ..... | उष्णता आणणारें औ० | आयोडाईन, क्यालोमेल ( रसकापूर ) |
| आनोडाईन्स ........... | इजा कमी करणारें औ० | भांग. |
| नारकाटिक्स ........... | बेशुद्ध करणारें औषध. | क्यांफर (कापूर), ओपियम ( अफू ) बेलाडोना. |
| सिडेटिव्ह.............. | नाडी बरोबर चालविणारें औषध. | टारटरइमेटिक (उलटी आणणारें औषध) बेलाडोना, आकोनाईट ( बचनाग ), डेजिटेलीस (रानहावरी). |
| स्टिम्यूलंट्स ........... | उष्णता आणणारें औषध. | अलकोहल (उंचदारू), आमोनिया (नवसागर), सुलफ्यूरिकईथर. |
| टॉनिक................ | खाल्लेलें अन्न जिरविणारें औषध. | जेनशन, काडेचिराईत, कुटकी, चिराईत, सलफेट आफ आयर्न, (हिराकस), सलफेट आफ कॉपर ( मोरचूद ) |
| ऑनस्यासिडस ......... | विष नाहींसें करणारें औषध. | क्यॉर्बोनेट आफ पोट्याश ( जवखार ), क्यॉर्बोनेट आफ सोडा (पापडखार), क्यॉर्बोनेट आफ लाईम (खडू). |
| **बाहेर लावण्याचीं औ०** | | |
| ऑनटिसेपटीक्स ........ | दुर्गंधी नाहींसें करणारें औषध. | चारकोल ( कोळसा ), क्लोराईड ऑफ झिंक, नायटर (सोरा), क्लोराईड आफ लाईम (तांबडी चुन्याची पूड), क्यॉर्बोलिकआसिड. |
| आस्ट्रिजंट्स ........... | सुकवणारें औषध. | आलम ( फटकी ), क्यात्याच्यू (कात). |
| ब्लिस्टर्स ............... | ल्स्तर. | क्यांथारीडिस (माशी), बेनाडाईड आफ मरक्यूरी, लिकर आमोनिया ( आमोनिया ), मस्टार्ड (राई). |

| औषधांचीं नांवें. | औषधांचीं लक्षणें. | औषधें कोणकोणतीं. |
| --- | --- | --- |
| कॉस्टिक.................. | | म्यूरिआटिक आसिड,नायटर आणि सलफ्यूरिक आसिड ( गंधकाचाअर्क ), सलफेट आफ कॉपर ( मोरचूद ), क्लोराईड ऑफ झिंक, करोसिव्हसब्लिमेट, नायट्रेट आफ सिल्व्हर(कार्डीखार). |
| डिसक्यूयेनट्स.......... | गांठ बसविणारें औषध. | साल आमोनिया (नवसागर), क्यांफर (कापूर), आयोडाईन, सोपलिन्यामेंट ( साबणाचा मलम ). |
| डिसईनफेकट्स ........ | दुर्गंधी नाहींसें करणारें औषध. | क्लोराईड आफ लाईम (लाल चुन्याची पूड), क्यॉर्बॉलिक आसिड. |
| इमॉलियंट्स ............ | नरमाई आणणारें औ० | फोमेनटेशनस ( शेकणें ), पोलटीस ( पिकविणारें पोटीस ). स्वीट आईल (गोडेंतेल) |
| रिफ्रेजंट्स ............ | थंड पडणारें औषध. | नायटर ( सोरा ), शूगर आफ लेड, कोल्डवाटर ( थंडपाणी ). |
| रुबिफिसियंट्स......... | रक्त आणणारें औषध. | ब्लिस्टर ( फ्लस्तर ), लिन्यामेंट आफ आमोनिया, टरपेंटाईन ( देवद्वाराचें तेल ). |
| डिटरग्येजंट्स ........... | जखमा साफ करणारें औ० | व्हरडिग्रीज ( कळंक ), सलफेट आफ कॉपर (जंगला). |

| | | |
|---|---|---|
| डिजेसीव्ह ............ | पू काढणारें औषध. | ळिन्यामेंट आणि आएन्टमेंट आफ टर्पेनटाईन ( देवद्वाराच्या तेलाचें मलम व पाणी ). |
| हिलिंगयेजेंट्स ......... | जखम भरून आणणारें औषध. | आलोज ( एळवा ), मर, रेझिन (राळ), सोल्यूशन आफ सल्फेट कॉपर आणि झिंक. |

समाप्त.

# यादी घोड्यास लागणारें सामान.

## ठाणावर पाहिजे तें.

१ आघाडी. १ कावदा. १ भुरकी.
१ ठाणमोहरा. १ पिछाडी. १: गळपेंडें.
चांबड्याचा. १ मुजामा. १ तोबरा.
१ अंधारी. १ खरारा. १ लोखंडी साखळी.
१ नाल. १ भोरकडी.

## स्वारीचें सामान.

१ रुपडल्ली. १ वछाड. १ डल्याबुरनसी.
१ खोगीर. १ जिनवासन. १ तंग.
१ पुस्तंग. १ हायासा. १ तंगाचीकडी.
१ रिकाबा. १ रिकाबासोट. १ रिकाबासोटाची पिशवी.
१ घामोळें. १ गाशा.
१ गादी. १ लेंडी १ गोरबंद.
१ गंडा. १ पुंजी. १ सडका.
१ कहाडणी १ बालातंगी. १ लगाम.
१ सरदारी. १ आनीन. १ बखतर.
१ चारजामा. १ गेंदजोडी. १ वाळ्याचा गंडा.
१ चवऱ्या. १ शिरी. १ मेणय.
१ जेरबंद. १ कोरडा ( चाबूक ).
१ पेटोल्या—पोटाखाळीं ठेवून नंतर तंग बांधतात त्या.

## चांदीचें सामान.

१ मोहडा. १ गेंद जोडी. १ माळा. १ कलगी.